# मुहम्मद (स.)

## समस्त मानवतेसाठी अंतिम प्रेषित

**Muhammad (SAW) : A Prophet For All Humanity**

मौलाना वहीदुद्दीन खान

मराठी अनुवाद : प्रा. विघ्नराजेंद्र साने

## Maulana Wahiduddin Khan (1925 - 2021)

Born in 1925, in Azamgarh, Uttar Pradesh, is an Islamic spiritual scholar who is well-versed in both classical islamic learning and modern disciplines. The mission of his life has been the establishment of worldwide peace. He has received the Padma Bhushan, the Demiurgus Peace International Award and Sayyidina Imam-Al-Hassan Peace Award for promoting peace in Muslim societies. He has been called 'Islam's spiritual ambassador' to the world and is recognized as one of the most influential Muslims. His books have been translated into sixteen languages and are part of university curricula in six countries. He is the founder of the Centre for Peace and Spirituality (CPS) based in New Delhi.



www.cpsglobal.org

www.goodwordbooks.com

ISBN 978-93-86589-56-9

9 789386 589569

# मुहम्मद (स.)

## समस्त मानवतेसाठी अंतिम प्रेषित

**Muhammad (SAW) : A Prophet For All Humanity**

*मौलाना वहीदुद्दीन खान*

मराठी अनुवाद : प्रा. विघ्नराजेंद्र साने

पुस्तकाचे नाव : मुहम्मद : समस्त मानवतेसाठी अंतिम प्रेषित

इंग्रजी आवृत्ती : Muhammad : A Prophet For All Humanity

लेखक : मौलाना वहीदुद्दीन खान

प्रथम आवृत्ती : १९९५ (मुहम्मद : क्रांतीचे प्रेषित)

पुन: मुद्रण : जून, २०२१

मुद्रणस्थळ : महाराष्ट्रा कॉस्मोपॉलिटन प्रिटींग प्रेस, पुणे

पृष्ठ डिझाईन : सोहेल देशपांडे

प्रकाशक : CPS Pune

Abdus Samad Khaleel Ahmed

Ph.: 020 - 24472830 / 9665059035

CPS Mumbai

Dr. Junaid Shaikh

Mob. No.: 7304313901

CPS Parbhani

Prof. Sartaj M. Siddique

Mob No.: 9604416342

Email : smsiddiqui22@gmail.com

मराठी अनुवाद : विघ्नराजेंद्र साने, औरंगाबाद

मूल्य : ₹१२०/-

# अनुक्रमणिका

## आपल्या निर्मात्याचा 'अंतिम व सुरक्षित' संदेश

# कुरआन आपल्या मातृभाषेत

**कुरआन, आपल्या निर्मात्याचा 'अंतिम व सुरक्षित' संदेश आहे,** हा केवळ श्रद्धेचा विषय नसून, शुद्ध ऐतिहासिक सत्य आहे. स्वत: त्याचे १४०० वर्षांपासून as it is अस्तित्व, त्याचे सर्व काळांसाठी मार्गदर्शन ठरणारे संदेश, यासाठी साक्ष आहेत. कोणताही माणूस नि:पक्षपातीपणे केवळ आपल्या बुद्धिच्या व ऐतिहासिक तथ्यांच्या कसोटीने (applying the reason & historical facts) स्वत: याविषयी कसून चौकशी करू शकतो. आणि जेव्हा तो या निष्कर्षावर पोहोचेल की, खरोखरच कुरआन हाच ग्रंथ ईश्वराचा अंतिम व सुरक्षित मार्गदर्शनपर संदेश आहे, तेव्हा **ईश्वराची शुद्ध संकल्पना, ईश्वराचा निर्मिती उद्देश, मानवी जीवनाचे सत्य, मृत्यूनंतर मानवाचे काय होणार?** इत्यादी मानवाशी अटळरीत्या निगडित प्रश्नांची उत्तरे प्राप्त करण्याचे कुरआनशिवाय दुसरे साधन असू शकत नाही. कारण मानवाचा निर्माता असलेल्या ईश्वरापेक्षा अधिक चांगल्याप्रकारे दुसरा कोणीही या प्रश्नांची उत्तरे देऊ शकत नाही.

स्वत: निर्मात्याच्या शब्दांत मनुष्याशी निगडीत
**प्रश्नांची उत्तरे म्हणजे कुरआन होय.**

मृत्यूनंतर निर्मात्याच्या न्यायालयात आपल्या जीवनाचे हिशोब देण्यासाठी हजेरी होणार हा एखाद्याला श्रद्धेचा विषय वाटत असला तरी गरजेचा मात्र नक्की आहे. कारण या अर्थपूर्ण सृष्टीचा, अर्थपूर्ण मानवी अस्तित्वाचा अर्थशून्य अंत होणे शक्य नाही.

आता जगभरातील इतर गोष्टींच्या बाबतीत भरपूर चौकशी करणाऱ्या माणसाने, कोणताही पूर्वग्रह न ठेवता कुरआनच्या या दाव्याची सत्यता जरूर तपासून पाहावी.

समस्त मानवतेसाठी निर्मात्याचा अंतिम व सुरक्षित संदेश कुरआन मराठीत प्राप्त करण्यासाठी संपर्क करा : मो. नं. ९६६५०५९०३५ (पुणे) किंवा www.cpsglobal.org या संकेतस्थळावर अवश्य भेट द्या.

# प्रस्तावना

'**द** हंड्रेड' नावाच्या अमेरिकन पुस्तकामध्ये लेखकाने, मानवी इतिहासावरती सर्वात जास्त प्रभाव टाकणाऱ्या, त्याला योग्य वाटलेल्या शंभर व्यक्तींचा उल्लेख केला आहे. पुस्तकाचे लेखक मायकल हार्ट ह्यांचा जन्म ख्रिश्चन कुटुंबात झाला आणि त्यांचे शिक्षण विज्ञान शाखेमध्ये झाले; पण त्यांनी तयार केलेल्या त्यांच्या मानांकनाच्या यादीमध्ये सर्वोच्च स्थान त्यांनी ना येशू ख्रिस्ताला दिले आहे ना न्यूटनला. त्यांच्या दृष्टीने एक माणूस असा आहे की, ज्याचे कार्यकर्तृत्व उरलेल्या सर्वांहून सर्वार्थाने फार मोठे आहे.......तो माणूस म्हणजे पैगंबर मुहम्मद होय. ते लिहितात, 'इतिहासातले ते एकमेव असे व्यक्तिमत्व आहे की, जे धार्मिक व धर्मनिरपेक्ष अशा सर्वच पातळ्यांवर सर्वात जास्त यशस्वी झाले.'

(द हंड्रेड, डॉ. मायकल हार्ट, १९७८)

अमेरिकन असणाऱ्या मायकल हार्ट ह्यांना, ज्याप्रमाणे पैगंबर मानवी इतिहासातले सर्वोत्तम व्यक्तिमत्त्व वाटतात त्याचप्रमाणे, सुप्रसिद्ध इंग्रज इतिहासकार थॉमस कार्लाइल ह्यांना पैगंबर मुहम्मद हे अनेक प्रेषितांचे नायक वाटतात.

प्रागैतिहासिक काळात ज्यावेळी इब्राहीम व इस्माइल मक्केमध्ये काबागृह बांधत होते, त्यावेळी आपल्या वंशामध्ये एक प्रेषित निर्माण व्हावा, अशी त्यांनी ईश्वराची प्रार्थना केली. ह्या प्रार्थनेला २५०० वर्षे होऊन गेल्यानंतर प्रेषितांचा हा नायक, पैगंबर मुहम्मद मक्केच्या लोकांमध्ये निर्माण झाला, ज्याला ईश्वराचे विशेष साहाय्य लाभले. पैगंबर इब्राहीम ह्यांची प्रार्थना सफल झाली आणि त्यातून ह्या जगामध्ये पैगंबरांचे यशस्वी आगमन झाले.

पैगंबरांच्या आधी होऊन गेलेल्या कुठल्याही प्रेषिताच्या आयुष्याची नोंद इतिहासाने व्यवस्थित ठेवलेली नाही. अतिशय कठोर असे शैक्षणिक व ऐतिहासिक निकष जर लावायचे झाले, तर त्यांचे प्रषितत्व सिद्ध होत नाही, असे म्हणावे लागते. प्रेषितांच्या अतिशय प्राचीन अशा शृंखलेमधील सर्वात शेवटचे प्रेषित म्हणजे पैगंबर येशू हे होत; पण पैगंबर येशू यांचे इतिहासातले स्थान इतके वादग्रस्त आहे की, थोर तत्वज्ञ बर्ड्रंड रसेल ह्यांना एका स्थळी म्हणावे लागले की, 'इतिहासाच्या दृष्टिकोनातून पैगंबर यशू झाले होते, अथवा नाही हीच बाब शंकास्पद आहे.' सर्वात शेवटचे पैगंबर, पैगंबर मुहम्मद ह्यांची गोष्ट मात्र अशी नाही. त्यांच्या आयुष्याची बारीकसारीक तपशीलवार नोंद झाली आहे आणि इतिहासातले त्यांचे स्थान इतके सुस्थापित आहे की, त्यांच्या आयुष्याचा अभ्यास करणाऱ्या कुणालाही हे मान्य करावे लागेल, ज्याप्रमाणे प्रोफेसर फिलीप हित्ती म्हणतात, 'मुहम्मद ह्यांचा जन्म इतिहासाच्या पूर्ण प्रकाशात झाला.'

(हिस्ट्री ऑफ अरब्ज, १९७८)

मुहम्मद ह्यांच्या प्रेषितत्वाविषयीचा सर्वात मोठा व महत्त्वाचा पुरावा म्हणजे कुरआन होय. जो स्थायी व शाश्वत असा चमत्कार आहे. कुरआन हा पैगंबरांना ईश्वराकडून प्राप्त झाला. दुसऱ्या पैगंबरांना ज्या तऱ्हेचे चमत्कार ईश्वराकडून प्राप्त झाले, त्याच तऱ्हेचा चमत्कार जर कुरआन असता तर त्याचे परिणाम हे त्यांच्या स्वतःच्या आयुष्याहून जास्त काळ टिकले नसते

आणि पैगंबरांचे प्रेषितत्व हे गेल्या चौदाशे वर्षांमध्ये ज्याप्रमाणे टिकून राहिले त्याप्रमाणे राहिले नसते. दार्शनिक चमत्कार ही एक अशी अद्भुत घटना असते की, तिची नक्कल कुठल्याही मर्त्य मानवाला करता येणे शक्य नसते. कुरआन हा असा दार्शनिक चमत्कार आहे. अशी निर्मिती करणे मानवाला शक्य नाही. कुरआनच्या ईश्वरीपणाविषयी कुठल्याही तऱ्हेची शंका घेतली जाऊ शकत नाही.

मुहम्मदांचे कार्य हे अपवादात्मक अशासाठी ठरले की, ते सर्वात शेवटचे प्रेषित होते. हा ईश्वरी संकेत होता. ईश्वरीय इच्छेचे अंतिम प्रकटीकरण त्यांच्या माध्यमातून लोकांपर्यंत पोहोचविले गेले आणि मानवी वंशाला ह्या प्रकटीकरणाचा वारसा लाभवा म्हणून ह्या धर्मग्रंथाची शब्दशः जपणूक पैगंबरांकडून व त्यानंतरच्या शेकडो वर्षांमध्ये होऊन गेलेल्या त्यांच्या निष्ठावंत अनुयायांकडून केली गेली. हे असे व्हायला हवे म्हणून पैगंबरांना एक फार मोठी क्रांती घडवून आणावी लागली, जिच्यायोगे त्यांना पूर्ण जगातून अनुयायी लाभले.

'मुहम्मद' हे तुमच्यापैकी कुणीही पुरुषाचा पिता नाहीत. ते ईश्वराचे पैगंबर आहेत आणि पैगंबरांमधले शेवटचे पैगंबर आहेत. ईश्वराला फक्त (सर्व) गोष्टींचे ज्ञान आहे.

(कुरआन, ३३:४०)

लोकांना सरळ व गुणात्मक असे आयुष्य जगण्यासाठी ज्या मार्गदर्शनाची गरज होती, त्या तऱ्हेचे मार्गदर्शन देण्यासाठी ईश्वराने पैगंबरांची निवड केली. माणसाच्या स्वतःच्या कृतींवर त्याचे नियंत्रण असते कारण ह्या जगामध्ये त्याची परीक्षा घेण्यात येते. कुठली कृती करावी ह्याचे स्वातंत्र्य माणसाला दिले गेले आहे, हिच मुळात त्याची एक परीक्षा आहे. प्रेषितांचे कार्य हे सर्वार्थाने दैवी असून सुद्धा लोकांनी त्यांच्या सवयी बदलाव्यात म्हणून त्यांना लोकांवर जबरदस्ती करता आली नाही. ईश्वराने विश्वासाने त्यांना जो संदेश दिला तो संदेश लोकांपर्यंत पोहोचविण्याचे काम फक्त त्यांना करता आले.

'पैगंबर लोकांना स्पष्ट सूचना देण्याहून जास्त काय करू शकतात?'

(कुरआन, १६:३५)

ईश्वराने, माणसाने त्याच्या आयुष्याच्या प्रवासात ढळू नये, म्हणून त्याला जे काही करता येईल ते सर्व केले आहे. त्याने माणसाला चांगले व वाईट ह्यामध्ये फरक करण्यासाठी सद्सद्विवेकबुद्धी दिली आहे आणि न्यायाच्या तत्त्वांवर स्थापित झालेल्या जगामध्ये त्याला स्थान दिले आहे; पण जर माणसाने त्याच्या सद्सद्विवेकबुद्धीचे ऐकायचे नाही असे ठरविले किंवा ईश्वराने निर्माण केलेल्या ह्या सृष्टीच्या सृजनातून जो संदेश सातत्याने वाहात आहे, त्या संदेशाचे ऐकायचे नाही, असे ठरविले तर त्याला मार्गदर्शन करण्यासाठी ईश्वराने सातत्याने पैगंबर पाठविले. हे प्रेषित निरनिराळ्या काळी, निरनिराळ्या देशांमधून ईश्वरी सत्य सांगण्यासाठी ईश्वराने पाठविले. ईश्वरीय संदेश आपल्याला समजला नाही, असे लोकांनी म्हणू नये म्हणून पैगंबरांचे संदेश त्या-त्या लोकांच्या त्या-त्या वेळेच्या भाषेमध्ये पाठविले गेले.

इस्लामपूर्व काळातील धार्मिक संस्था मर्त्य असणाऱ्या सृजनाच्या स्तुतीने स्खलन

पावल्या होत्या. पैगंबर मुहम्मद ह्यांनी अमर्त्य असणाऱ्या ईश्वराच्या पूजेवर आधारित अशा धर्माची संस्थापना केली. धार्मिक श्रद्धा या खूप वेळा अंधश्रद्धा ठराव्यात अशा तऱ्हेने नेहमीच निर्माण केल्या गेल्या होत्या; पण पैगंबरांनी मात्र धर्मश्रद्धेची स्थापना वास्तव पायावर केली. त्यांनी माणसाला नैसर्गिक सृजनावर त्याची पूजा करण्याऐवजी विजय मिळवावा, अशी शिकवण दिली व विज्ञानयुगाचा पाया घातला. जिथे राजकीय सत्ता ही राज्याच्या राजपुत्राच्या हाती अनुवांशिक तऱ्हेने पडत होती, तिथे त्यांनी लोकांनी चालविलेल्या सरकारची स्थापना केली. शिक्षण हे ज्या वेळी फक्त अनुमानावर आधारित असायचे त्याकाळी त्यांनी वास्तव निरीक्षणावर आधारित अशा शिक्षणाचा पुरस्कार केला. ज्याकाळी क्रूरता व छळ ह्यांनी मानवी समाजाचा नाश चालविला होता; त्या काळी त्यांनी लोकांना न्याय व शांती ह्यावर आधारित आयुष्य कसे जगायचे ते शिकविले. इस्लामच्या पैगंबरांचे हे सर्व, फार मोठे कार्यकर्तृत्व होय. अगदी खरे सांगायचे तर, त्यांच्या आधी होऊन गेलेल्या कुणालाही असे कार्यकर्तृत्व सर्वार्थाने बहाल करता येणार नाही. त्यांनीच खरे तर मानवी इतिहासाची लाट बदलली आणि त्यांनी निर्माण केलेल्या लाटेबरोबर इतर सर्वजण पोहोले.

इतिहासाकडे कुठल्याही दृष्टिकोनातून जरी पाहिले तरी त्यांनी निर्माण केलेल्या बदलांचा परिणाम आपण सुस्थापित करू शकतो. मानवी संस्कृतीची सर्वोच्च मूल्ये आणि प्रगती ह्यांचा संबंध प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे त्यांनी केलेल्या क्रांतीशी येऊन पोहोचतो.

त्यांचे व्यक्तिगत आयुष्य हे मानवतेसाठी अतिशय परिपूर्ण असा आदर्श आहे. त्यांना स्वतःला सर्व तऱ्हेच्या विशेष परिस्थितीमध्ये आयुष्य कंठावे लागले. वैयक्तिक अथवा सार्वजनिक आयुष्य कसे घालवावे ह्याचा आदर्श ते घालून देऊ शकले. माणसाने ह्या जगातले आयुष्य कशा तऱ्हेने व्यतीत केलेले ईश्वराला आवडेल, ते पैगंबरांनी स्वतः दाखविले. कारण त्यांच्या आयुष्यातल्या घटनांमधली त्यांची प्रत्येक कृती ही ईश्वरीय इच्छेनुसार होती. ईश्वराच्या पूजेचा सर्वोत्तम मार्गच फक्त त्यांनी स्थापन केला; असे नव्हे तर ईश्वर, त्याच्या सेवेमध्ये जे निष्ठावंत आयुष्य घालवितात, त्यांना तो कशी मदत करतो, तेही दाखविले. जर ईश्वराचे भय बाळगले तर दुसऱ्या कशाचेच भय निर्माण होऊ शकत नाही. हे आपल्याला त्यांच्या आयुष्यामधून समजते. प्रक्षुब्धतेसाठी उत्तेजन देऊनसुद्धा जर एखादा संयमी राहिला तर त्याला जणू पाण्याऐवजी महाग असणाऱ्या तेलाचा (स्नेहाचा) लाभ होईल. नकारात्मक भावनांचा पराभव करून जर कुणी उभा राहिला तर तो सर्वांवर, अगदी शत्रूवरसुद्धा विजय मिळवेल. पारलौकिक आयुष्यातल्या भल्यासाठी जर एखाद्याने इहलौकिक आयुष्यात त्याग केले तर त्याला आपोआप दोन्ही आयुष्यातल्या भल्याचा लाभ घडेल.

कुठल्याही काळी पैगंबरांचे अनुयायी दुसऱ्या लोकांहून यशस्वी बनतील. ज्याप्रमाणे दैवी मार्गदर्शनाने ज्याने पेरणी केली आहे, असा शेतकरी उत्तम पीक मिळवितो. दैवी संदेशाने यशस्वी व्हावे, अशीच तऱ्हेची परिस्थिती ईश्वराने निर्माण केली आहे. अशी परिस्थिती असणे आवश्यकसुद्धा आहे. इस्लामी विचाराला समजून घेऊन आणि त्याचा वापर करून ह्या धर्माचे

अनुयायी इस्लामी विचाराला सर्वोच्च प्रतिष्ठा देऊ शकतात.

पैगंबर अब्राहम व पैगंबर मुहम्मद ह्यांचे दरम्यान पंचवीस शतकांचा काळ उलटला. ह्या सर्व काळामध्ये ह्या (शेवटच्या) पैगंबरांच्या निर्मितीसाठी आवश्यक ती परिस्थिती निर्माण केली जात होती. ईश्वरीय इच्छेनुसार ज्या कार्यकर्तृत्वासाठी पैगंबरांची निर्मिती होणार होती, त्यानुसार ते वागले आणि म्हणूनच त्यांचे कार्य हे सर्वात जास्त यशस्वी ठरले.

पैगंबर मुहम्मद ह्यांना सर्वोच्च व्यक्तिमत्व बनवून आणि मानवी इतिहासातले सर्वात सोनेरी पान बनवून ईश्वराने माणसावर खूप मोठे उपकार केले आहेत. ज्याला कुणाला मार्गदर्शक निवडायचा आहे त्याला पैगंबरांना मार्गदर्शक म्हणून निवडावेच लागेल. कारण ते एखाद्या सागरातल्या दीपस्तंभाप्रमाणे, जमिनीवरच्या पर्वताप्रमाणे, एखाद्या प्रकाशझोताप्रमाणे आहेत. ज्याने सत्याचा रस्ता प्रकाशाने झळाळून सोडला आहे! सत्याचा शोध घेणाऱ्या कुणालाही पैगंबर ज्या सर्वोच्च स्थळी आहेत त्या ठिकाणी येऊन पोहोचावे लागते.

पैगंबर मुहम्मद ह्यांच्यानंतर आजवर चौदाशे वर्षे होऊन गेली. ह्या चौदाशे वर्षांमध्ये जे ऐतिहासिक बदल घडले. मानव ज्ञानने जी असामान्य प्रगती केली, त्या सर्व गोष्टी इस्लामला पूरक अशाच पडल्या आहेत. पैगंबरांनी शिकविलेला धर्म त्याच्या उत्तमस्थानी आजही विराजत आहे. इस्लाम विचाराच्या प्रसारासाठी दैवी योजना समजून घ्यायला हवी. ती जशी पैगंबरांनी समजून घेतली त्या तऱ्हेने त्यांच्या अनुयायांनी समजावून घ्यायला हवी.

# अनुवादाची प्रस्तावना

रूढ अर्थाने आपण ज्या तऱ्हेने चरित्र हा शब्द वापरतो, तशा अर्थाने विचार केला तर, ह्या पुस्तकाला चरित्र म्हणणे अवघड आहे. एखाद्या व्यक्तीच्या जन्मापासून मृत्यूपर्यंत घटना काय क्रमाने घडल्या? त्या व्यक्तीच्या घडणीमध्ये कुठल्या गोष्टींचा सहभाग होता? त्या व्यक्तीने 'ते' आयुष्य 'तशाच' तऱ्हेने का व्यतीत केले? आयुष्यातील ध्येयपूर्तीमध्ये ती व्यक्ती कितपत यशस्वी झाली? ह्या आणि अशा प्रश्नांची उत्तरे चरित्राने द्यावीत, अशी अपेक्षा असते. व्यक्तीच्या आयुष्यातील लहान-मोठ्या घटनांचा सुसूत्र संग्रह चरित्राने करावा, अशी अपेक्षा असते.

एखादे चांगले चरित्र लिहिण्यामध्ये चरित्रकाराचा सहभाग हा सर्वात मोठा व महत्त्वाचा असतो. चरित्रकाराकडून एकाच वेळी त्रयस्थ वृत्तीची व थोर व्यक्तीच्या प्रभावामध्ये वाहून न जाण्याची अपेक्षा बाळगली जाते. एखाद्या कसलेल्या डोंबाऱ्याप्रमाणे तारेवरची ही कसरत चरित्रकार करीत असताना, शिवाय त्याच्याकडून शैलीदार व रसाळ लेखन करण्याची सुद्धा अपेक्षा बाळगली जाते.

सर्वसाधारणपणे चांगल्या चरित्रकाराकडून ह्या ज्या अपेक्षा बाळगलेल्या असतात त्या अपेक्षांच्या निकषावर हे चरित्र उतरते का? उत्तर बहुधा नाही असे द्यावे लागेल! कारण ह्या चरित्रामध्ये नायकाच्या आयुष्यातील घटनांची फार उत्तम तऱ्हेने सुसूत्र मांडणी केलेली आहे, असे म्हणता येणार नाही. दुसरे म्हणजे नायकाच्या आयुष्यातील सर्वच महत्त्वाच्या घटना ह्या पुस्तकात आलेल्या आहेत, असेही नव्हे. पुस्तकाचे लेखक हे अतिशय विद्वान, धर्मपंडित व त्याचबरोबर श्रद्धावंत मुसलमान असल्याने, अर्थातच चरित्रनायकाच्या चारित्र्याने ते विलक्षण भारावून गेलेले आहेत. त्यांच्याकडून, चरित्रकाराकडून अपेक्षित असलेल्या 'त्रयस्थ' वृत्तीची जरी अपेक्षा बाळगता येत नसली तरी चरित्र लिहिताना ते वाहवत गेलेले नाहीत, एवढे निश्चितच म्हणता येईल. पुस्तकाचे लेखक 'प्रस्थापित ललित लेखक' नसावेत. कारण ज्या तऱ्हेच्या शैलीदार लेखनाची अपेक्षा विद्वान मराठी लेखक, समीक्षक व सर्वसाधारण मराठी वाचक करतील, तशा तऱ्हेचे शैलीदार लेखन ह्या पुस्तकाचे आहे, असेही कदाचित आपल्याला म्हणता येणार नाही. असे असूनही एक गोष्ट नक्की. लेखकाच्या साध्यासुध्या, सरळ सरळ विषयाला हात घालण्याच्या पद्धतीने पुस्तक जागोजागी रसाळ मात्र बनले आहे.

उत्तम चरित्राचे सर्व निकष पूर्ण करीत नसूनसुद्धा हे चरित्र मराठीतील एक महत्त्वाचे चरित्र ठरणार आहे. ह्याचे कारण चरित्रनायकाच्या चारित्र्यामध्ये नसून, समकालीन परिस्थिती व मूल्यांमध्ये दडलेले आहे. आधुनिक मराठीमध्ये इस्लाम व त्याच्या पैगंबरांसंबंधाने माहिती देणारे हे पहिलेच पुस्तक ठरावे. मुंबई व मिरजहून मुख्यत्वे इस्लामसंबंधाने मराठी प्रकाशने छापली जातात. ह्या प्रकाशनांचे मराठी इतके 'दिव्य' असते की, ह्या लिखाणाला मराठी म्हणणेच बऱ्याच वेळेला अवघड असते. दुसरे म्हणजे, ह्या लेखनाचे लेखक व प्रकाशक हे निरनिराळ्या मुसलमान संघटनांचे प्रतिनिधित्व करीत असल्याने, त्रयस्थ मराठी अभ्यासकाच्या दृष्टीने त्यांची

विश्वासार्हता बऱ्याच वेळेला शंकास्पद असते.

गेल्या साठ वर्षांच्या आपल्या समाजजीवनामध्ये एका गोष्टीचे मी स्वच्छ निरीक्षण केले आहे. ते म्हणजे इस्लाम व मुसलमान ह्यांच्या संबंधाने वास्तवतादर्शी लिखाण मराठी प्रसारमाध्यमांमधून केले जात नाही. जे लिखाण केले जाते, ते बऱ्याच वेळेला विकृत व विपर्यस्त असते. प्रसार माध्यमे ज्यांच्या हातात आहेत, असे लोक मुसलमानांबद्दल चांगले, वास्तवदर्शी लिखाण छापू इच्छित नाहीत, हे ह्याचे कारण खचितच नव्हे. माझ्या पत्रकार-लेखक बंधूंशी चर्चा करीत असताना त्यांची एकच तक्रार प्रकर्षाने असते, 'चांगले लिहिणारी माणसे मिळत नाहीत हो.'

सनातन मुसलमानांशी व त्यांच्या धर्मपंडितांशी कुठल्या ना कुठल्या कारणाने संघर्ष केल्याने असेल कदाचित; पण इस्लामी विचाराचा मुख्य व मध्यप्रवाह सोडून देणारे लेखकच मराठीत मुख्यत्वे लेखन करताना दिसतात. ह्या मराठी मुसलमानांच्या लेखनाने सर्वसाधारणपणे मराठी वाचकांचे इस्लाम व मुसलमानांबद्दल गैरसमज तेवढे वाढतात! ह्या पार्श्वभूमीवर ह्या पैगंबर चरित्राचे वेगळेपण आपण तपासून पाहायला हवे.

मुसलमान कडवे व कट्टर. मुसलमान मध्ययुगीन व मागासलेल्या विचारांचे. मुसलमान सरसकट चार लग्ने करणारे व चार गुणिले चार अशा संख्येने आपली प्रजा वाढविणारे. मनात आल्यानंतर कुठल्याही क्षणी मुसलमान पती तोंडाने तीनदा तलाक हा शब्द उच्चारून आपल्या पत्नीला घरातून हुसकावून लावतो...... सर्वसाधारण मराठी वाचकाच्या मनातले मुसलमानासंबंधाने चित्र हे असे असते! सनातनी इस्लामी विचार पद्धतीने विचार करणाऱ्यांची सुद्धा काही रास्त बाजू आहे, हेच आपण विसरून जातो.

समकालीन संघर्षाच्या घटनांचा प्रत्यक्ष उहापोह न करता हे पुस्तक पैगंबरांच्या चरित्राच्या माध्यमातून अप्रत्यक्षपणे सनातनी इस्लामी विचाराची रास्त बाजू मांडते. हे ह्या पुस्तकाचे सर्वात मोठे वैशिष्ट्य आहे. आपल्याला हिंदू धर्मव्यतिरिक्त दुसऱ्या धर्मांची स्थापना करणाऱ्या बुद्ध, महावीर, येशू ख्रिस्त ह्या थोर माणसांबद्दल प्राथमिक माहिती असते. तशी माहिती इस्लामच्या पैगंबरांबद्दल मात्र आपल्याला नसते. ही आपल्या समाज-जीवनातील एक फार मोठी त्रुटी होय. ह्या पुस्तकातून चरित्रनायकाबद्दल म्हणजेच इस्लामच्या पैगंबरांबद्दल प्राथमिक माहिती जरी आपल्याला मिळू शकली तरी खूप झाले. सनातनी इस्लामी विचारांमध्ये मनाला आकर्षित करू शकेल, असे नक्कीच काही तरी असायला हवे. कारण असे मानल्याशिवाय इस्लामच्या त्रिखंडीय (आशिया, आफ्रिका व युरोप) विस्ताराचे दुसरे काही समर्थन देणे अवघड आहे.

सुमारे सहा कोटी मराठी भाषिकांच्या महाराष्ट्रात सुमारे सत्तर ते ऐंशी लाख, मुसलमान लोक राहातात. ह्यापैकी निम्म्या लोकांची म्हणजेच सुमारे चाळीस लाख लोकांची मातृभाषा मराठी आहे. गेल्या पन्नास वर्षांच्या समाज जीवनामध्ये एक साधेसुधे पैगंबरचरित्र, मराठीतून लिहावे, असे ह्या चाळीस लाख लोकांपैकी एकालाही वाटू नये? सर्वसाधारण भारतीय माणूस हा धार्मिक चरित्र-नायकांबद्दल श्रद्धाळू असतो. तो सरसकट सर्व धर्मांच्या धर्मनायकांबद्दल आदर

बाळगून असतो. मुसलमानांना राजकीय विरोध करणाऱ्या संघटनांमधील एखाद्या कट्टर कार्यकर्त्याला जरी आपण पैगंबरांसंबंधाने एखादा प्रश्न विचारला व तो पैगंबरांसंबंधाने पूर्णपणे जरी अनभिज्ञ असला तरी त्याचे सर्वसाधारण उत्तर असेच असेल की, पैगंबर एक सद्गृहस्थ होते; पण आजचे मुसलमान मात्र बहकलेले आहेत! धर्मपुरुषांविषयी पूज्य व श्रद्धाभाव बाळगणे हा भारतीय मनाचा एक फार मोठा व महत्त्वाचा गुण आहे. ह्या गुणाशी खेळ करण्याचा धोकादायक प्रयत्न, कुठलीही व कितीही कट्टर असणारी संघटना सुद्धा करणार नाही. म्हणजेच, एखादे मराठीतून लिहिलेले पैगंबर–चरित्र लिहिल्याने अथवा छापल्याने, कुठल्याही तऱ्हेची धोकादायक व संघर्षाची परिस्थिती उद्भवणार नव्हती. मग असे असूनही चाळीस लाख लोकांपैकी एखाद्या माणसाला असे करावे असे वाटू नये? स्वतःच्या मुसलमान असण्याबद्दल अभिमान बाळगणाऱ्यांसाठी तरी ही परिस्थिती लाजीरवाणी व शरमेची बाब समजायला हवी.

ह्या पार्श्वभूमीवर पैगंबर–चरित्राचा अनुवाद, आधुनिक मराठीतला, हा अशा तऱ्हेचा पहिलाच प्रयत्न असल्याने आपण स्तुत्य समजायला हवा. महाभारताबद्दल कै. श्री. नरहर कुरुंदकरांनी एके ठिकाणी, महाभारत हा शक्यतांचा आर्णव आहे, असे लिहिल्याचे आठवते. गेली चौदाशे वर्षे पैगंबरांच्या निरनिराळ्या चरित्र–लेखकांनी सुद्धा, पैगंबर–चरित्राला शक्यतांचा आर्णव मानून लेखन केलेले आपल्याला आढळले. जगातील शंभरएक महत्त्वाच्या भाषांमधून अक्षरशः हजारो पैगंबर–चरित्रे गेल्या चौदाशे वर्षांमध्ये लिहिली गेली आहेत. आधुनिक मराठीमध्ये अशा तऱ्हेचे एकही पुस्तक नव्हते, ही त्रुटी ह्या अनुवादाच्या रूपाने काही प्रमाणात भरून निघेल.

मुळात हे पुस्तक, लेखक मौलाना वहीदुद्दीन खान ह्यांच्या मिशनरी कार्यासाठी म्हणून लिहिले गेलेले आहे. त्यामुळे मौलानांच्या मिशनसंबंधाने, उतारेच्या उतारे ह्या पुस्तकातून आढळतील. पुष्कळशा मराठी वाचकांना हे उतारे अस्थानी व अनाठायी वाटतील; पण ह्या गोष्टींबद्दल नाइलाजाची गोष्ट अशी की, इस्लाम संबंधाने मराठीतून लेखन करणाऱ्या अधिकारी व्यक्तीचीच मुळात वानवा आहे. त्यामुळे सध्यातरी उपलब्ध असणाऱ्या ग्रंथाच्या अनुवादावर अवलंबून राहाण्याव्यतिरिक्त काही गत्यंतर नाही.

इंग्रजीतील उपलब्ध असणाऱ्या ग्रंथांपैकी अनुवादासाठी हाच ग्रंथ का निवडला? ह्याची अनुवादकाकडून कळलेली कारणे मला पटली आहेत. एकतर लेखक सर्वार्थाने भारतीय असल्याने, ह्या पुस्तकाची संहिता, भारतीय सामाजिक परिस्थितीचा संदर्भ राखणारी आहे व दुसरे म्हणजे मौलाना वहीदुद्दीन हे स्वतः अतिशय सौम्य व मृदू विचारांचे असल्याने व पैगंबरी मार्गाचा कट्टर पुरस्कार करणारे असल्याने त्यांनी जागोजाग आपल्या देशबांधवांना कानपिचक्या दिल्या आहेत. अशा कानपिचक्यांची ह्या देशातल्या हिंदु व मुसलमानांना, कधी नव्हती एवढी गरज आज निर्माण झाली आहे. ह्या कानपिचक्या काय आहेत? ते आपण पुस्तक वाचत असताना आपल्याला कळेलच. त्यामुळे त्या संबंधाने इथे जास्त काही लिहीत नाही.

पुस्तकाचे लेखक, मौलाना वहीदुद्दीन ह्यांच्या विचारांसंबंधाने इथे थोडे लिहिणे, मला

वाटते अस्थानी ठरणार नाही. वयाची सत्तरी कधीच ओलांडलेले मौलाना, गेली कित्येक वर्षे भारतीयांसाठी अतिशय मोलाचे काम करीत आहेत. विशुद्ध चारित्र्य, सौम्यता, मृदुता, संयम व सातत्याने भारतीय माणसांच्या भल्याचे चिंतन अशा दुर्मिळ गुणांचा समुच्चय मौलानांच्या ठायी झालेला आढळेल. भारतीय समाज–राजकारणाबद्दल त्यांनी घेतलेल्या भूमिका त्यामुळेच खूप वेळा वादग्रस्त ठरलेल्या आहेत. अगदी सुरुवातीपासून बाबरी मशीद प्रश्नाबद्दल मौलानांनी जी भूमिका घेतली होती ती खरोखरच मध्यममार्गी होती. त्यामुळे कट्टरपंथीय मुसलमान संघटनांचा गेली काही वर्षे त्यांच्यावर अघोषित असा बहिष्कार आहे.

प्रस्थापित ताकदींना विरोध करणाऱ्या, काही मूलभूत विचार मांडू इच्छिणाऱ्या, कुणालाही जशा तऱ्हेचा विरोध होतो, तशाच तऱ्हेचा विरोध मौलानांना त्यांच्या समाजातूनच होतो आहे. प्रस्थापित, अशा लोकांना स्वतःची स्वतंत्र चूल मांडायला भाग पाडतात. मौलाना वहीदुद्दीन ह्यांची अशीच अवस्था गेल्या काही वर्षांमध्ये झाली आहे. अर्थात त्यांच्या विचारांवर प्रेम करणारे लोक भारतात व भारताबाहेरही कमी नाहीत. अशा लोकांपर्यंत उर्दू, हिंदी, इंग्रजी अशा भाषांमधून छापल्या जाणाऱ्या 'अल–रिसाला' नावाच्या पाक्षिकातून मौलाना पोहोचत असतात. हिंदू–मुस्लिम प्रश्नांमध्ये संश्लेषणाची भूमिका घेणाऱ्या प्रत्येकाला, मौलानांचे विचार मार्गदर्शन करणारे व प्रेरणा देणारे ठरतील.

मौलानांच्या भूमिकेमुळे कट्टरपंथियांनी जरी त्यांच्यावर अघोषित बहिष्कार टाकला असला तरी त्यांच्या ज्ञानाबद्दल व विद्वत्तेबद्दल त्यांच्या विरोधकांना सुद्धा थोडीशीही शंका नाही. इस्लामी ज्ञानशाखांबद्दलचे त्यांचे अधिकारित्व सर्वांनाच मान्य आहे. समकालीन भारतीय सामाजिक परिस्थितीबद्दल ज्याचे स्वतःचे सौम्य, मध्यममार्गी, संश्लेषक दृष्टिकोन आहेत, अशा समकालीन अधिकारी मुस्लिम विचारवंतांने लिहिलेले हे पैगंबरांचे चरित्र आहे. त्यामुळे पैगंबर–चरित्राचे विश्लेषण व त्यांच्या आदर्शांचे समकालीन आयुष्यात उपायोजन, हाच प्रस्तुत चरित्राचा विषय आहे. दुसऱ्या उपलब्ध असलेल्या चरित्रांमध्ये व ह्या चरित्रामध्ये हाच मूलभूत फरक आहे. हा फरकच ह्या पैगंबर–चरित्राचे बलस्थान आहे.

'फोडा व झोडा' ही ब्रिटिशांची राजनीती दुर्दैवाने स्वराज्यात सुद्धा बदललेली नाही. सहा भारतीयांपैकी एक मुसलमान असतो. असे असूनही हिंदूला मुसलमानांबद्दल व मुसलमानाला हिंदूंबद्दल काही माहिती नसते. जी माहिती असते, ती गैरसमजावर आधारित व निव्वळ विकृत अशी असते. हे गैरसमज व विकृती नाहीशा करण्याच्या कामाची सुरुवात ह्या पुस्तकाने मराठी वाचकांसाठी करावी, अशी अपेक्षा आहे. हिंदू–मुस्लीम प्रश्नांसंबंधाने गेल्या दहा वर्षांमध्ये परिस्थिती झपाट्याने ढासळते आहे. बाबरी मशीदीचा प्रश्न हा अलीकडच्या काळातील, ढासळणाऱ्या परिस्थितीबद्दलचे सर्वात मोठे उदाहरण होय. एका दगड–विटांच्या बांधकामाने, हजारो माणसांचे प्राण घ्यावे, लाखो मानवी तास व्यर्थ जावेत, अब्जावधी रुपयांचा चुराडा व्हावा, हा सारा प्रकारच भीषण आहे. खरेतर भीषण हे विशेषणसुद्धा वापरायचे म्हणून वापरले. सहा डिसेंबर १९९२ नंतर पंधरा–वीस दिवस देशात जे काय घडत होते, त्याचे वर्णन करण्यासाठी

मराठीतल्या शेलक्या व जहाल अशा पंधरा–वीस विशेषणांचा तरी आसरा घ्यावा लागेल व तरीही परिस्थिती पूर्णांशाने व्यक्त होणार नाही!

हजारो माणसांचे प्राण घेणे. लाखो मानवी तास वाया घालविणे. अब्जावधी रुपयांचा चुराडा करणे. म्हणजेच सधन व श्रीमंत असणाऱ्या भारत मातेच्या अंगावरचे अलंकार आपल्या स्वतःच्या हाताने उतरवून उकिरड्यावर फेकून देण्यासारखे आहे. भारताच्या प्रेमाने 'ओथंबून' जे लोकमंचीय आविष्कारांमधून मोठमोठ्याने गळे काढतात, अशा लोकांना कुणीतरी ह्या गोष्टी स्वच्छपणाने सांगायला हव्यात. ब्रिटिशांनी जे बीज रुजविले. ज्याला आपण आपल्या हातांनी खत व पाणी घातले. त्यात जालीम विषारी वृक्षाची फळे पिकलेल्या स्वरूपात आता आपल्याला मिळू लागली आहेत.

ह्या जालीम विषवृक्षाच्या मुळांवर घालण्याचे सामर्थ्य मौलानांच्या विचारात नक्कीच आहे. ह्या वृक्षावर, आपल्या विचारांच्या कुऱ्हाडीने घाव घालण्याचे काम मौलाना गेली कित्येक वर्षे नेमाने करीत आहेत. म्हणूनच कदाचित हिंदू व मुस्लिम कट्टरपंथियांना आवडत नसावेत. हे चरित्र लिहिणाऱ्या लेखकाचे विचार व प्रेरणा ह्या अशा आहेत. ज्यांचे स्वच्छ प्रतिबिंब ह्या पैगंबर चरित्रात आहे. आधीच उल्लेखिल्याप्रमाणे हेच ह्या चरित्राचे बलस्थान आहे. भारतीयांना सर्वात जास्त गरज अशा तऱ्हेच्या चरित्राची आहे.

आता थोडेसे प्रत्यक्ष पुस्तकासंबंधाने. मी आधीच म्हटल्याप्रमाणे हे पुस्तक, साहित्यिक दृष्टिकोनातून पाहिले असता आदर्श चरित्र नव्हे. कारण लेखकाला एक रूढ अर्थाने उत्कृष्ट साहित्यिक मूल्ये असणारे पैगंबरांचे चरित्र लिहायचेच नव्हते! तर पैगंबर चरित्राचे समकालीन उपायोजन कसे करायला हवे? ह्याबद्दलचे स्वतःचे विचार ह्या चरित्राच्या निमित्ताने मांडायचे होते.

लेखकाचा लेखनहेतू हा असा होता, हे एकदा कळल्यावर ह्या चरित्रामध्ये ज्या त्रुटी राहून गेल्या आहेत, त्यांचे स्पष्टीकरण मिळते. पैगंबरांचा जन्म ते मृत्यू, अशी सलग व सुसूत्र मांडणी न करता पैगंबराचे गुण व विचार कसे फुलत गेले? आयुष्य जगण्याचा पैगंबरी मार्ग म्हणजे नेमके काय? विसाव्या शतकातल्या आपण माणसांनी ह्या पैगंबरी मार्गाचा कसा स्वीकार करायला हवा? ह्या प्रश्नांच्या उत्तरांमधून हे पुस्तक विस्तारित होत गेले आहे.

विसाव्या शतकातल्या माणसावर, इतिहासातील निरनिराळ्या क्रांत्यांचा अमीट असा ठसा उमटला आहे. तसा तो लेखकाच्या मनावरसुद्धा आहे. म्हणूनच कदाचित त्यांनी शीर्षक विषय हा क्रांतीसंबंधाने निवडला आहे. आधुनिक क्रांत्यांशी तुलना करून, लेखकाला पैगंबरांची क्रांती ही कशी जास्त यशस्वी होती, हे सिद्ध करायचे आहे. लेखकाची ही तुलना मनोज्ञ आहे, एवढे निश्चित. मात्र, लेखकाला जे सिद्ध करायचे आहे, त्यामध्ये तो किती यशस्वी झाला, हे वाचकांनीच ठरविणे इष्ट.

श्रद्धावंत मुसलमान असल्याने लेखकाला कुरआनची अपौरुषेयता व अक्षरता हे दोन गुण विलक्षण महत्त्वाचे वाटतात. त्या संबंधाने व अरबी विषयी उपाख्यान लेखकाने मांडले आहे,

ते बऱ्याच वेळा कंटाळवाणे व विषयाला सोडून वाटते. दुसरे म्हणजे त्यातील काही भाग भाषा शास्त्राच्या दृष्टीने काही ठिकाणी विसंगतींनी भरलेला आहे, असे भाषा शास्त्रज्ञांना वाटणे शक्य आहे.

पुस्तक मुख्यत्वे मुसलमान वाचक डोळ्यासमोर ठेवून लिहिले गेले असल्याने त्यांच्या दृष्टीने अनावश्यक वाटणारा तपशील लेखकाने गाळला आहे. त्यामुळे सर्वसाधारण मराठी वाचकाला मधूनमधून अपुरेपणाची व तुटकपणाची जाणीव होते. ह्या जाणीवेतून कुणाला, जर दुसऱ्या भाषांमधून उपलब्ध असणारी विस्तृत पैगंबर–चरित्र वाचण्याची इच्छा झाली किंवा एखाद्या अधिकारी विद्वानाला, मूळ मराठीतच विस्तृत चरित्र लिहायची इच्छा निर्माण झाली, तर अशा इच्छा हे ह्या अनुवादाचे यश मानता येईल.

प्रत्यक्ष विज्ञानासंबंधाने लेखकाने मांडलेले काही विचार किंवा बऱ्याच वेळी लेखक ज्या तऱ्हेचे निष्कर्ष एखाद्या माहितीवरून काढतो तसे निष्कर्ष काढण्याची लेखकाची पद्धत, ह्या गोष्टी काटेकोरपणे वाचन करणाऱ्या काही वाचकांना खटकतील; पण ह्या गोष्टींनी मूळ लेखनहेतूशी प्रतारणा केलेली नाही. तसेच मूळ लेखनहेतूला विकृत बनविलेले नाही. त्यामुळे ह्या गोष्टींकडे आपण कानाडोळा करू शकू.

आता थोडेसे अनुवादासंबंधाने. अनुवादकाचा आकाराने इतका मोठा असा हा पहिलाच अनुवाद. अनुवादशैलीची बाल्यावस्था जर कुणाला ह्या अनुवादामध्ये जाणवली तर ते नैसर्गिकच म्हणायला हवे. मोठमोठी लांबलचक वाक्ये ही इंग्रजीची एक शैली असल्याने इंग्रजीत सहज खपून जातात. लांबलचक वाक्ये ही मराठीची नैसर्गिक शैली खचितच नव्हे. कित्येक लांबलचक इंग्रजी वाक्ये, मराठीत जशीच्या तशी शब्दशः भाषांतरित झाली आहेत. थोड्या प्रयत्नाने हा दोष सहजच टाळता आला असता. काही ठिकाणी वाक्ये ही मराठीची नैसर्गिक शैली हरवून बसलेली आढळतात. अर्थातच हा दोष भाषांतरामधून पूर्णांशाने काढून टाकणे किती अवघड असते व कधी कधी तर कसे अशक्य बनते ह्याची जाणीव भाषांतराचे किचकट व जिकिरीचे काम करणाऱ्या कुणालाही येऊ शकेल. बेठाव आकाश, ठणठणीतपणे सांगितले, अशा तऱ्हेच्या रचनांमधून अनुवादकाने सातत्याने मराठीच्या जवळ राहण्याचा प्रयत्न केला आहे, हे वाचकालाही जाणवत राहाते. अनुवादकामध्ये अनुवादशक्ती आहे व भविष्यात अनुवादकाकडून अजून चांगल्या कामाची अपेक्षा, हा अनुवाद निश्चितच निर्माण करतो. त्यामुळे अनुवादामधल्या अशा छोट्या छोट्या त्रुटींबद्दल आपण अनुवादकाला माफ करूयात.

भारतामध्ये इस्लाम व मुसलमानांबद्दल वास्तवदर्शी लिखाण श्री. एम. एन.रॉय व श्री. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशींनी केलेले आढळते. अर्थातच समाज–राजकीय परिस्थितीचे विश्लेषण हाही हेतू अशा लेखनामागे होताच. श्रद्धाळू मुसलमानाचे इस्लामबद्दल व इस्लामच्या पैगंबरांबद्दलचे वास्तवदर्शी लिखाण मराठीत प्रथमच ह्या अनुवादाच्या निमित्ताने होत आहे.

उभ्या महाराष्ट्राचे ज्यांची विद्वत्ता नमनपूर्वक स्वीकारली अशा प्रकांड पंडितांचे इस्लाम विषयक अज्ञान त्यांच्या लेखनात जागोजागी आढळेल. आयुष्यातल्या दुसऱ्या ज्ञानशाखांवर

रास्त अधिकार गाजविणाऱ्या ह्या लोकांना, इस्लामविषयक आपण अज्ञानी आहोत, हे ध्यानी येऊ नये, हे त्यांचे व आपलेसुद्धा दुर्दैव. ह्या अनुवादाचे महत्त्व हे असे आहे. मराठी वाचकाचे इस्लामविषयक अज्ञान, अगदी थोडे जरी ह्या पुस्तकाने दूर झाले, तरीसुद्धा तोही एक प्रगतीचा टप्पा म्हणायला हवा.

भारताचे काही भले व्हावे, असे आजच्या तरुणांना वाटण्याची गरज आहे. स्वतंत्र भारताच्या तीन पिढ्या माझ्या पिढीने पाहिल्या. सर्वात तरुण पिढीचे वर्तन हे माझ्यासारख्याला क्लेशकारक वाटत राहाते. वातावरणात सर्वत्र अंधार भरत चालला आहे. विघटनाचे काळेकुट्ट ढग क्षितिजावर जमत आहेत, अशी साधार भीती वाटते. अशा वेळी कुणा तरुणाला मळलेली पायवाट सोडून पैगंबर–चरित्राचा अनुवाद करावासा वाटतो, ही गोष्ट आश्वासक व दिलासा देणारी आहे. अर्थातच असे दिलाशाचे क्षणही हळूहळू कमी होऊ लागले आहेत. असे दिलाशाचे क्षण आमच्या पिढीच्या विझणाऱ्या दिव्यांमध्ये तेल घालणारे असल्याने ते आम्हाला फार आवश्यक वाटतात. त्यामुळेच अनुवादकाने ज्यावेळी अनुवादासाठी प्रस्तावना लिहिण्याचा प्रस्ताव माझ्यासमोर ठेवला, त्या वेळी त्याचा तात्काळ स्वीकार मी केला.

इतिहासामध्ये ज्याचे महानायक म्हणून स्थान आहे. जगभर ज्याचे सुमार सव्वाशे करोड अनुयायी आहेत. अशा इस्लामच्या पैगंबरांच्या, चरित्राच्या मराठी अनुवादाची, ओळख करून देताना मला फार आनंद वाटतो.

**द्वा. भ. कर्णिक**
औरंगाबाद, १९.११.९५

# अनुवादकाचे दोन शब्द

**मौ**लाना वहीदुद्दीन खान व श्री. द्वा. भ. कर्णिक ह्यांच्यासारख्या बुजुर्गांनंतर मी काही लिहिणे म्हणजे लहान तोंडी मोठा घास होय. तरीही हे धारिष्ट्य करीत आहे, कारण वाचकांना अनुवादकाची भूमिका माहीत असणे आवश्यक वाटले.

माझा जन्म व शिक्षण पुण्याला मोतीबागेच्या परिसरात घडले! आई व वडील सुरुवातीपासून प्रजासमाजवादी पक्षाच्या विचाराचे असल्याने कदाचित, प्रत्यक्ष मोतीबागेचे संस्कार झाले नाहीत; पण वातावरण तेच. पुण्यात असेपर्यंत मला मुसलमान व इस्लामविषयी उत्सुकता वाटण्याचे कोणतेच कारण नव्हते. कारण तोपर्यंत मी मुसलमानच बघितलेला नव्हता!

दहा वर्षांपूर्वी नोकरीच्या निमित्ताने औरंगाबादमध्ये आल्यावर मी माझ्या आयुष्यात पहिला मुसलमान बघितला. नंतर अनेक मुसलमान माझे मित्र बनले. सुरुवातीला निव्वळ उत्सुकतेपोटी मी इस्लामबद्दल माहिती मिळवायला सुरुवात केली. चार-दोन पुस्तके वाचल्यावरच, गेली शेकडो वर्षे आपल्या समाजाने जपलेले व्यंग लक्षात आले. काही काळ व्यंग जपले की, त्याच्याविषयी प्रेम वाटू लागते. ह्या व्यंगामुळे येणाऱ्या अपंगपणाबद्दलसुद्धा मग प्रेम वाटू लागते. अपंगपणा हे रोगीपणाचे लक्षण आहे, हेच मुळी तो अपंग विसरून जातो.

हिंदू-मुसलमान संबंध हे आपल्या भारतीय समाजाचे फार मोठे व्यंग आहे. समाज-राजकीय पातळीवर प्रत्येकजण ह्या व्यंगाचे मूल्य स्वतःच्या फायद्याकरिता वटवून घेतो आहे, अशी वस्तुस्थिती आहे. ह्या व्यंगावर वेदनारहित उपचार करता येतील, असेच मुळात कुणाला वाटेनासे झाले आहे. ह्या सर्व वस्तुस्थितीमुळे विलक्षण निराशा वाटत असे. मराठीत इस्लामसंबंधाने व पैगंबरासंबंधाने माहिती देणाऱ्या पुस्तकांचा शोध घ्यायचा प्रयत्न केला गेला. १९१३ अथवा १५ च्या सुमारास एक पैगंबर चरित्र लिहिले गेल्याचे समजले, पुस्तकाचे व लेखकाचे नाव उपलब्ध झाले नाही. ह्यानंतरच्या काळात कै. साने गुरुजींनी इस्लामी संस्कृती नावाचे पुस्तक लिहिले. इस्लामबद्दल माहिती देणाऱ्या मराठी पुस्तकांचा माझा शोध इथेच संपला. वाचकांनी कृपया हे लक्षात घ्यावे की, मला इस्लामी प्रचारक व इस्लामी विरोधक ह्यांनी आपापल्या राजकीय, सामाजिक अथवा धार्मिक भूमिका सिद्ध करण्यासाठी लिहिलेली पुस्तके, इथे अभिप्रेत नाहीत. तसा शोध घेऊन गेल्यास, एखाद्याला कदाचित खूप पुस्तके मराठीत इस्लामसंबंधाने लिहिलेली आढळतील!

किचकट धार्मिक तत्त्वज्ञानात्मक बाबी सोडून देऊयात. एखादे साधेसुधे पैगंबर-चरित्र उपलब्ध होऊ नये? ह्याबाबत माझ्या मुसलमान मित्रांवर मी येथेच्छ टीका करीत असे. मग एक दिवस मनात विचार आला की, आपणच असा प्रयत्न का करू नये? ह्या विचाराचेच फळ म्हणजे हा अनुवाद होय

इंग्रजीत (नेहमीप्रमाणे) इस्लाम संबंधाने अक्षरशः अगणित लिखाण झाले आहे. मी स्वतः ह्या पुस्तकांपैकी तीन पैगंबर चरित्रे वाचली. मार्टिन लिंग्ज ह्यांनी लिहिलेले पैगंबर-चरित्र

फार सुंदर इंग्रजीत लिहिलेले गेले आहे. काळाच्या कसोटीवर हळूहळू त्या चरित्राची वाङ्मयीन मूल्येसुद्धा सिद्ध होऊ लागली आहेत.

अनुवादासंबंधाने माझी पुस्तकाची निवड ही अजिबात सोपी बाब नव्हती. अनुवादक म्हणून माझा स्वतःचा आवाकाच तपासून बघणे आवश्यक होते. अशा आवाक्याच्या विचार केला तर मार्टिन लिंग्ज ह्यांच्या पुस्तकाचा अनुवाद ही निश्चित अवघड गोष्ट होती; पण हे पुस्तक न निवडण्यामागे माझा आवाका एवढेच कारण नक्कीच नाही. मला अपेक्षित असणारा वाचकवर्गही तेवढाच महत्त्वाचा होता. ह्या वाचकाला माफक स्वरूपात पैगंबर–चरित्राची ओळख करून देणे, एवढाच माफक हेतू माझ्या ह्या अनुवादामध्ये आहे.

अतिशय विस्ताराने व तपशीलवार अशी जी पैगंबर–चरित्रे उपलब्ध आहेत, त्यांच्या मराठी अनुवादाची पृष्ठसंख्याच छापील किमान पाचशे पृष्ठे भरली असती. मराठी वाचकाला एकदम इतका मोठा 'डोस' द्यावा हेही मला पसंत नव्हते. जो विषय मराठीत हाताळला गेला नाही, त्या विषयावर इतके मोठे पुस्तक कदाचित वाचक मिळविण्याच्या दृष्टीने यशस्वी होणार नाही, असे वाटले.

तिसरे म्हणजे पैगंबर चरित्रातून ज्या गोष्टी विसाव्या शतकातल्या आपण माणसांनी शिकायला हव्यात, त्यावर स्वच्छ प्रकाश पडणे, मला आवश्यक वाटले. मुसलमानांची श्रद्धा अशी आहे की, माणसासाठी आदर्श नमुना म्हणून ईश्वराने पैगंबरांची निर्मिती केली, ऐतिहासिक व धार्मिक नायकांना वंदनीय मानण्याची भारतीय परंपरा फार जुनी आहे. माणसासाठीचा आदर्श म्हणून पैगंबरांकडे फक्त मुसलमानांनीच बघावे, असे अजिबात नाही. पैगंबरांच्या आयुष्याकडे हिंदू सुद्धा 'आदर्श जीवन' म्हणून पाहू शकतात.

पैगंबरांच्या आयुष्याचे अनेक अंगांनी निरनिराळ्या क्षेत्रांमधील विद्वानांनी परिशीलन केले आहे. धार्मिकदृष्ट्या मुसलमानांच्या विरोधात असणाऱ्या विद्वानांनीसुद्धा पैगंबरांच्या निर्मळ व आदर्शवत चरित्राची ग्वाही दिली आहे. ह्या विषयावर स्वतंत्र पुस्तके लिहिली गेली आहेत.

भारतीय समाजाचे, हिंदू–मुस्लिम संबंध हेच मुळात एक मोठे व्यंग आहे. भारताचे भले इच्छिणाऱ्या कुठल्याही दुसऱ्या भारतीय नागरिकासारखाच मीही एक आहे. सर्वशक्तीनिशी मिळेल ती संधी वापरून हे व्यंग दूर करण्याचा प्रयत्न करणे, हे मी माझे कर्तव्य समजतो. माझ्या ह्या अनुवादातून असाही काही प्रयत्न व्हावा, असे मला वाटत होते. तेवढ्यात मौलाना वहिदुद्दीन ह्यांचे पुस्तक माझ्या हातात पडले. ते जवळ–जवळ एका बैठकीत वाचून संपले आणि तत्क्षणी, मी ह्या पुस्तकाचा अनुवाद करणार, असा निर्णय मी घेऊन टाकला. हा निर्णय कितपत बरोबर होता? ह्या प्रश्नाचे योग्य उत्तर वाचकच देऊ शकतील.

मौलानांचे इंग्रजी पुस्तक हे मूळ उर्दू पुस्तकाची एक आवृत्ती आहे, अनुवाद नव्हे. मौलानांच्या साध्यासुध्या व सोप्या शैलीने मला आकर्षित केले. अनुवाद करीत असताना मला सर्वात जास्त अडचण अरबी विशेषनामे मराठीत आणताना पडली. अरबीमधील काही वर्ण इंग्रजीत व मराठीतसुद्धा नाहीत. मी भाषाशास्त्र व ध्वनिशास्त्र शास्त्रीय तऱ्हेने शिकलेला

नसल्यामुळे ह्या भाषांतरामध्ये तज्ज्ञांना जर त्रुटी आढळल्या, तर त्याची जबाबदारी माझ्या अज्ञानावर येऊन पडेल. विरामचिन्हांच्या वापराबाबत मौलानाच्या मूळ इंग्रजी पुस्तकातच सातत्य नाही. अनुवादापूरती अशी एखादी स्वतंत्र पद्धत विकसित करणे मला शक्य झाले नाही. त्यामुळे शक्यतोवर मूळ इंग्रजी पुस्तकाबरहुकूम विरामचिन्हे वापरण्याचा प्रयत्न केला आहे. अनुवादामध्ये शक्यतोवर शब्दशः अनुवाद केला आहे. अनुवादामध्ये 'अनुवादकाचे स्वातंत्र्य', अतिशय अपवादात्मक परिस्थितीत फक्त वापरले आहे.

अरबी अथवा उर्दूमधले काही वर्ण मराठीत आहेत; पण त्यांची स्वतंत्र ओळख करून घ्यायची, काही स्वतंत्र पद्धत मराठीत नाही. जसे की, जर जहाज, जोम, जाड, जरा (थोडा) ह्या शब्दांमधील ज ह्या वर्णाचा उच्चार एक तऱ्हेने होतो आणि जेव्हा, जरा (म्हातारपण), जिव्हा, जाड्या ह्या शब्दांमधल्या ज ह्या वर्णाचा उच्चार, आधीच्या ज पेक्षा वेगळ्या तऱ्हेने होतो. मराठीत च व झ ह्या दोन वर्णांचे उच्चारही असेच दोन स्वतंत्र तऱ्हांनी केले जाऊ शकतात. हिंदी व उर्दूमध्ये ह्या दोन वर्णांचे स्वतंत्र उच्चार दाखविण्यासाठी एका टिंबाचा वापर केला जातो, त्याला नुक़्ता म्हणतात. मराठी वाचक सर्वसाधारणपणे, एकाच चिन्हाने व्यक्त होणारे हे दोन स्वतंत्र वर्ण, संदर्भाने शिकतात व वाचू शकतात. मराठी शिकण्याचा प्रयत्न करणाऱ्या कुठल्याही अमराठी माणसाला, हा फरक सतावतो. नुक़्त्याची पद्धत मराठीत वापरायची की नाही? हा मराठीच्या भाषाशास्त्रज्ञांसाठी वादाचा विषय राहिलेला आहे. मराठी शब्द जिथे-जिथे वापरले आहेत तिथे-तिथे नुक़्ते वापरलेले नाहीत. कारण जी गोष्ट प्रमाण मराठी भाषेत नाही अशी कुठलीही नवी गोष्ट ह्या पुस्तकामध्ये वापरायची नाही, असे ठरविले आहे.

अरबी विशेषनामे मराठीत लिहीत असताना मात्र शक्य तिथे नुक़्ते वापरले आहेत. जफर हा शब्द ज़फर असा लिहायला हवा कारण ह्या शब्दामधल्या ज चा उच्चार जहाज, जोम मधल्या ज सारखा आहे; जेव्हा, जिव्हामधल्या ज सारखा नाही. मराठीत काही वेळा हा शब्द झफर असासुद्धा लिहिलेला वाचण्यात आला. जो सर्व तऱ्हांनी चुकीचा आहे! इफ्तेक़ार, क़मर, कुला हे अरबी शब्द मराठीत लिहिताना दोन तऱ्हा वाचनात आल्या. एका तऱ्हेत हे शब्द इफ्तेकार, कमर, कुला असे लिहिले जातात तर दुसऱ्या तऱ्हेत हे शब्द इफ्तेखार, खमर, खुला असे लिहिले जातात. दोन्ही तऱ्हा चुकीच्या आहेत! अरबी व्यंजन क़ लिहिताना नुक़्त्याचा वापर करणे, मला योग्य वाटते. अजूनही ह्या व्यंजनाचा उच्चार मला स्वतःला येत नाही. दहा प्रयत्नांमधले सात प्रयत्न चुकतात! पण अशा व्यंजनांची स्वतंत्र ओळख किमान अरबी विशेषनामांमधून शिल्लक राहाणे, भाषिक शास्त्रशुद्धतेसाठी आवश्यक वाटते. त्यामुळे अनुवादाच्या संहितेमध्ये अशा ठिकाणी नुक़्ते वापरले आहेत. संहितेमध्ये अशी व्यंजने शेकडो वापरली गेली असल्याने, एखाद्या ठिकाणी असा नुक़्ता देणे राहून गेले असल्याची शक्यता आहे. अशा नजरचुकीबद्दल मनःपूर्वक क्षमा इच्छितो.

मला उर्दू लिहिता-वाचता येत नाही. मला ज्या-ज्या वेळी उर्दू संदर्भ वापरण्याची गरज निर्माण होई, त्या-त्या वेळी व इतरही, कुठल्याही तऱ्हेच्या सल्लाच्या प्रसंगी, माझे सेवाज्येष्ठ

सहकारी डॉ. अब्दुल रऊफ खान व श्री. मिर्ज़ा फरहतुल्ला बेग ह्यांची अमूल्य मदत मला लाभली. अगदी खरे तर ह्या दोन मित्रांमुळेच अनुवादाचा हा प्रयत्न वास्तवात येऊ शकला. परिशिष्टांमधून उर्दू संदर्भ वापरून दिलेली माहिती, ह्या दोघांच्या मदतीवाचून देणे शक्य झाले नसते. ह्या परिशिष्टांसाठी काही माहिती मिळविताना, औरंगाबादच्या 'काशिफुल उलुम' शाळेचे अधिष्ठाता, मौलाना रियाज़ुद्दीन फारूक़ी ह्यांचीही बहुमोल मदत झाली.

मुद्रितशोधनाचे कामी माझी पत्नी सौ. इला व मित्र, श्री. नंदकुमार पांडे, डॉ. आयूब खान व श्री. नसिरुद्दीन फारुक़ी ह्यांचे सहकार्य लाभले. त्यामुळे मुद्रण प्रत जलद बनू शकली.

परिशिष्टांसह अनुवाद छापण्याची परवानगी मौलाना वहिदुद्दीन खान ह्यांनी दिली. तसेच अनुवादाचे सर्व हक्कही दिले. ह्याबाबत त्यांचे आभार मी कुठल्या शब्दात मागणार? त्यांच्या ऋणात राहणेच इष्ट!

दुर्दैवाने माझे आई-वडील, दोघेही आज हयात नाहीत. ते दोघे जर असते, तर त्यांना होणारा आनंद कल्पनातीत असता. अगदी सुरुवातीला ज्या वेळी आईला, मी नमाज पढू का? असे विचारले होते, त्या वेळी तिचे उत्तर होते, 'तू जोपर्यंत ईश्वराच्या पाया पडत आहेस, तोपर्यंत तू ती कृती मंदिरात करतोस की मशिदीत, ह्याच्याशी मला कर्तव्य नाही.' (मी प्रत्यक्ष नमाज़ पढला अथवा नाही हा प्रश्नच अलाहिदा!) माझे सुदैव हे की, अशा निर्मळ चारित्र्याच्या आई-वडिलांचे संस्कार मला लाभले. माझे आजचे सर्व अस्तित्त्व, हेच मुळी त्यांच्यामुळे असल्याने, त्यांचा उल्लेख इथे करणे, हे विषयाला सोडून होईल, असे वाटत नाही.

पैगंबर-चरित्र छापणे, हा प्रकाशकाच्या दृष्टीने आतबट्याचा व्यवहार ठरू शकतो! असे असूनही हे पुस्तक छापण्याचा निर्णय घेऊन 'लोकपत्र' समूहाने आपले 'विचारच' दाखविले आहेत. 'लोकपत्र' समूहाचे सर्व कुटुंबीय व त्यांचा स्नेह ह्या पुढेही टिकावा, अशी मनात तीव्र इच्छा आहे. समाज-राजकीय मंचावर अशा तऱ्हेच्या संश्लेषणात्मक कृती घडणे आवश्यक आहे. कारण अशा तऱ्हेच्या कृतींमधून प्रत्येकवेळी भौतिक लाभाची अपेक्षा धरता येतेच, असे नाही. भौतिक लाभाची अपेक्षा न ठेवता असे काम करणे हा एक प्रकारे त्याग झाला. भारतात जोपर्यंत असे लोक आहेत तोपर्यंत भारताबद्दल आशादायी चित्र रंगविण्यास हरकत नाही असे वाटते.

वाचकांनी जर अनुवादाला प्रतिसाद दिला तर केलेले श्रम कारणी लागतील.

**विघ्नराजेंद्र साने**
१६, धनेश, आकाशवाणी, चौक,
औरंगाबाद, ४३१००६

# १ आदमपासून पैगंबरांपर्यंत

**पृ**थ्वीवरती आजवर होऊन गेलेल्या प्रेषितांचा जीवनहेतू हा अगदी एक सारखा होता. माणसाच्या शाश्वत आयुष्यापैकी, त्याचे ह्या पृथ्वीवरचे आयुष्य हा अत्यल्प भाग होय अशीच त्या सर्वांची शिकवण होती.

पृथ्वीवरचे आयुष्य माणसाला त्याची परीक्षा बघण्याकरिता दिले गेले. ह्याचे बक्षीस अथवा शिक्षा ही पुढील आयुष्यात दिली जाणार आहे. माणसाने ईश्वरी मार्गाचा अवलंब केला असला तर मृत्यूनंतर त्याला त्याचे स्वर्गातील शाश्वत वास्तव्य लाभेल; परंतु जर तो ह्या मार्गापासून ढळला असेल तर मात्र त्याला थेट नरकात ढकलून दिले जाईल. त्याचा नरकवास हा शाश्वत होऊन बसेल. सर्व प्रेषितांपैकी प्रत्येकाने आयुष्याचे हे (शाश्वत) सत्य शिकविले.

आदम हे सर्व माणसांपैकी आणि प्रेषितांपैकीही पहिले प्रेषित. त्यांच्या नंतर प्रेषितत्व मिळालेल्यांची केवढी तरी मोठी साखळी अगदी शेवटच्या प्रेषितांपर्यंत दाखविता येते. एकूण एक लाख चोवीस हजार जण ईश्वराचे निरोप्ये म्हणून ह्या पृथ्वीवरती होऊन गेले. त्यापैकी तीनशे पंधरा जण फक्त प्रेषित होते. ते निरनिराळ्या प्रदेशांमध्ये व निरनिराळ्या प्रकारच्या लोकांमध्ये होऊन गेले. त्या सर्वांनी लोकांना ईश्वरी मार्गाचा उपदेश केला आणि अत्याग्रहाने, ईश्वराला भिऊन आयुष्य जगायला सांगितले. अर्थात हा उपदेश ते ज्यांना करीत होते त्यापैकी फारच थोड्या जणांनी ईश्वराकरिता स्वत:च्या स्वातंत्र्यावरती पाणी सोडायची तयारी दाखविली. प्रेषित याह्या (जॉन द बॅप्टिस्ट) ह्यांच्या (अनुयायी होण्याची) एकालाही इच्छा झाली नाही आणि शेवटी त्यांना हुतात्म्याचा मृत्यू आला. जेव्हा लूत हे त्यांच्या समाजातून बाहेर पडले त्यावेळी त्यांची साथ त्यांच्या दोन मुलांनी फक्त केली. तौराह (जुन्या करार) नुसार नोआह ह्यांच्याबरोबर त्यांच्या गलबतात फक्त आठ लोकांनी प्रवेश केला. ज्यावेळी इब्राहीम ह्यांनी त्यांचा राहाता देश, इराक सोडला त्यावेळी त्यांच्याबरोबर फक्त त्यांची बायको साराह आणि पुतण्या लूत एवढी दोन माणसेच होती. नंतर मात्र त्यांची दोन मुले इस्माईल व इसाक त्यांना येऊन मिळाली. त्यागवृत्तीने प्रचंड प्रयत्न आयुष्यभर केल्यानंतर प्रेषित इसा (येशू) ह्यांना फक्त बारा शिष्य लाभले. ज्यावेळेला त्यांच्याकडून सत्यवादित्वाची अपेक्षा केली गेली, नेमक्या त्याच वेळी हे सर्व इसा ह्यांना सोडून गेले.

बहुतेक सर्व प्रेषितांच्या वाट्याला हा असा आयुष्याचा अप्रिय हिस्सा आला. जे थोडेफार नशीबवान होते ते त्यांच्या आप्तेष्ट व सोयरेधायरे यांच्या संबंधातून मूठभर अनुयायी मिळवू शकले. अर्थात नेहमीच असे घडत नसे. भावनाहीनता व दुर्लक्ष एवढ्याच गोष्टी राहात्या समाजाकडून मिळाल्याने कित्येक प्रेषितांना त्यांचे आयुष्य हे कठोर एकांतवासात कंठावे लागले. माणसाच्या संपूर्ण इतिहासात प्रेषितत्वाकडे बघण्याचे सर्वसामान्य दृष्टिकोन कसे होते, ह्याचे सुरेख चित्रण कुरआनातील पुढील आयातीमध्ये केले आहे:

'माझ्या सेवकांकरिता हाय हाय (केवढे त्यांचे दुर्दैव)! त्यांच्याकडे पाठविल्या गेलेल्या प्रेषितांची ते हसून उपहास व हेटाळणीच करतात.'(३६:३०)

ईश्वराच्या दृष्टीने प्रेषित हे मानवी वंशाचे खांदे व मस्तक होत. असे असूनही इतिहासामध्ये त्यांनाच सर्वात कमी महत्त्व दिले गेले आहे, ही केवढी विचित्र गोष्ट आहे. इतिहासाने राजे आणि शिपायांच्या इतिहासाची बारकाईने कालिक नोंद केली आहे. पण एकाही प्रेषिताला त्याचे स्वतःचे स्थान जे मिळायले हवे ते इतिहासातल्या बखरींनी (इतिवृत्तांनी) दिलेले नाही. ॲरिस्टॉटल (ख्रि.पू. ३८४-३२२), मूसा ह्यांच्यानंतर हजार वर्षांनी झाला, तरीसुद्धा मूसा ह्यांचे नावसुद्धा त्याला माहीत नव्हते. ह्याचे कारण शोधून काढणे अजिबात अवघड नाही. जवळ जवळ सर्व प्रेषितांना त्यांच्या समाजांनी नाकारले होते. त्यांची घरे नष्ट करण्यात आली होती. त्यांना वाळीत टाकून समाजातून हाकलून दिले गेले होते. अर्थातच अशा क्षुल्लक वाटणाऱ्या माणसांचा उल्लेखसुद्धा करण्याची गरज कुणालाच वाटली नाही (तर नवल नव्हे!)

प्रेषितांना अशी वागणूक का दिली गेली? ह्याचे एकमेव कारण म्हणजे तत्कालीन समाजाच्या वर्तणुकीवर त्यांनी केलेली सडकून टीका हे होय. माणसाचे स्तुतीवर तेवढे प्रेम असते आणि कुठल्याही प्रकारच्या टीकेचा त्याला सर्वात जास्त तिटकारा असतो. प्रेषितांनी त्यांच्या समाजाशी कुठल्याही प्रकारची तडजोड न करता बरोबर व चूक ह्यातील फरक स्पष्ट केला. ते सातत्याने माणसांच्या श्रद्धा व वर्तणुकीमधल्या त्रुटी सांगत राहिले. ह्याचा परिणाम म्हणजे लोक त्यांच्या विरोधात गेले. प्रत्येक माणसाला जे ऐकायचे होते, (सोयीनुसार जसे वागायचे होते) तेच प्रेषितांनी शिकविले असते तर त्यांच्यावर अशी वागणूक मिळायची वेळ येतीना!

जवळ जवळ सर्वच प्रेषितांच्या दैवत असे लिहिलेले असले तरी ह्याला काही अपवाद होते. चटकन मनात भरणारी नावे म्हणजे युसुफ, सुलेमान व दाऊद ही होत. ह्या प्रेषितांना मिळालेल्या सत्तेचा व प्रतिष्ठेचा स्त्रोत हा त्यांच्या शिकवणुकीच्या सार्वजनिक प्रसिद्धी व प्रचारात नसून, सर्वस्वी वेगळा असा आहे.

दाऊद हे सूल नावाच्या इस्रायली राजाच्या सैन्यातले तरुण शिपाई होते. त्यावेळी इस्रायल व पॅलेस्टीन ह्यांच्यात युद्ध सुरू झाले होते. पॅलेस्टीनींच्या फौजात महाकाय गोलिआथ होता. त्याच्यासारख्या अतिरथीशी युद्ध करायला कोणी तयार होईना. शेवटी सूल ह्यांनी जाहीर केले की, जो कोणी गोलिआथचा वध करेल त्याला ते त्यांची कन्या स्वयंवरात देतील. त्यावेळी दाऊद पुढे धावले. त्यांनी गोलिआथला आव्हान दिले आणि त्या महाकाय वीराचा वध त्यांनी केला. ह्या तऱ्हेने ते इस्रायलच्या राजाचे जामात झाले. त्यानंतरच्या एका युद्धात राजे सूल व त्यांचे वारस होऊ शकणारे मारले गेले. त्यानंतर दाऊद हे इस्रायलचे अभिषिक्त राजे बनले. सुलेमान हे दाऊद ह्यांचे पुत्र आणि त्यामुळे ते दाऊद ह्यांच्यानंतर इस्रायली गादीचे वारस बनले. ईश्वराने स्वप्नचिकित्सा हा विशेष गुण बहाल केलेला असल्याने युसूफ हे इजिप्तच्या राजाचे सल्लागार बनले. राजा त्यांच्या ह्या दैवी गुणांने एवढा प्रभावित होता की, तो राज्यनियंत्रणातसुद्धा युसूफ ह्यांना आपला विश्वासू मानत असे. एवढे सगळे असून सुद्धा इजिप्तचा हा राजा व त्याचा

प्रजाजन समाज ह्यांनी त्यांचा मूर्तिपूजक धर्म काही सोडला नाही.

इतिहासात प्रेषितांना सर्वकाळी त्यांच्या स्वतःच्या लोकांनी दिलेली वैराची वर्तणूक भोगावी लागली. ज्यामुळे लोकांना खरा सदुपदेश घडू शकला नाही. ह्याहून जास्त गंभीर बाब म्हणजे प्रेषितांनी सांगितलेला श्रौतधर्म (अपौरुषेय, ईश्वरीय धर्म) व त्यांची शिकवण ह्या गाष्टींचे रक्षण अशक्य बनले. प्रेषितांच्या शिकवणुकीची जपणूक ही त्यांच्यानंतर त्यांच्या अनुयायी समाजानेच करायची असते, पण ह्या प्रेषितांना एकतर अनुयायीच नव्हते किंवा ज्या प्रेषितांना अनुयायी मिळाले ते अनुयायी संख्येने एवढे कमी होते की, त्यांच्या समाजाची आव्हाने पेलून प्रेषितांच्या अपौरुषेय श्रुतींचे (म्हणजेच ईश्वराने प्रेषितांना दिलेल्या संदेशाचे), रक्षण करणे त्यांना जमले नाही.

ईश्वराचे ज्ञान शाश्वत होय. फक्त ईश्वरच भविष्य घडवितो, ज्याप्रमाणे तो भूतकाळ घडवितो. मानवी वंशाच्या दुर्दैवीपणाची जाणीव ईश्वराला प्रेषितांना पाठविण्यापूर्वीपासूनच होती. म्हणूनच त्याने असा ठाम निर्णय घेतला होता की, प्रेषित युगाच्या शेवटी तो त्याचा स्वतःचा अगदी खास दूत पाठवेल व परिस्थितीमध्ये सुधारणा घडवून आणेल. ज्या प्रेषिताचे काम हे फक्त ईश्वरी धर्म शिकवणे न असता, त्या ईश्वरी धर्माची पृथ्वीवरच्या सर्व धर्मांमध्ये सर्वोच्चपदी प्रतिष्ठापना करणे हे असेल. ज्याला ईश्वर विशेष मदत देईल, ज्यामुळे सत्यापुढे झुकायला तो त्याच्या समाजाला भाग पडू शकेल. तो राहात असलेल्या समाजातील विकृती तो नाहीशा करे पर्यंत ईश्वर त्याला पृथ्वीतलावर ठेवेल. ईश्वराची महत्ता त्याला त्याच्या शत्रूंचा पाडाव करताना मदत करेल. अशा रीतीने खऱ्या धर्माची पुनर्प्रतिष्ठापना अत्यंत खंबीर पायावर होईल आणि ईश्वरी धर्म चिरस्थायी होईल. ज्याप्रमाणे बायबलमध्ये म्हटले आहे, 'संपूर्ण पृथ्वी ईश्वराच्या सत्तेच्या ज्ञानाने भरून जाईल, ज्याप्रमाणे पाणी समुद्रांना पांघरूण घालत असते, भरून टाकत असते.'(हबाक्कुक, २:१४)

भाषांतरे आणि उत्तरकालीन प्रक्षेप ह्यांनी आज उपलब्ध असलेल्या बायबलला त्याच्या मूळ संहितेपासून फार दूर नेले आहे. तरीसुद्धा त्यामध्ये प्रेषित मोहम्मद ह्यांच्या भविष्यकालीन प्रेषितत्त्वाविषयी केवढे तरी उल्लेख आहेत. जर कुणी बायबलचा निरपेक्ष अभ्यास सुरू केला तर त्याला निश्चित काही संदर्भ असे सापडतील जे प्रेषित मोहम्मद ह्यांच्या व्यतिरिक्त कुणाशीही जोडता येणार नाहीत. प्रेषित इसा ह्यांच्या जीवन कार्याचा अत्यंत महत्त्वाचा भाग म्हणजे, सर्व जगाला व विशेषतः ज्यू राष्ट्राला शेवटच्या प्रेषिताचे भविष्य जाहीर करणे हा होता. 'नव्या कराराचा' त्यांनी केलेला उल्लेख हा खरे तर इस्लामचा उल्लेख होय. कारण ह्या उल्लेखाने ज्यू (यहुदी) धर्माच्या धुरीणत्वाचा शेवट केला आणि इस्माईल ह्यांच्या वंशजांची ईश्वरी संदेशाचे खरे ग्राहक म्हणून योजना केली. म्हणूनच पुढे प्रेषित मोहम्मद ह्यांचा उदय झाला.

प्रेषित इसा हे सर्वात शेवटच्या प्रेषिताच्या आधी सुमारे सहाशे वर्ष होऊन गेले. इसा ह्यांच्या विषयीच्या एका उल्लेखात कुरआन पुढीलप्रमाणे सांगते:

'आणि प्रेषित इसा ह्यांची आठवण करा ज्यांनी इस्रायली लोकांना सांगितले की, 'मला

ईश्वराने तौराह्च्या सत्यतेची खात्री तुम्हाला पटावी म्हणून पाठविले आहे. त्याचबरोबर मला तुम्हाला ही बातमी द्यायची आहे की, माझ्यानंतर ईश्वर एक धर्मसुधारणाग्रणी पाठवेल ज्याचे नाव अहमद असे आहे.'(६१:६)

अहमद आणि मोहम्मद हे समानार्थी शब्द आहेत. दोन्हींचा अर्थ एकच, 'ज्याची स्तुती करावी असा', असा आहे. बार्नाबसच्या गॉस्पेलमध्ये (गॉस्पेल, इथे ख्रिस्त चरित्राचे निरुपण) होणाऱ्या प्रेषिताचा उल्लेख स्पष्टपणे मोहम्मद असा केला आहे. बार्नाबसचे गॉस्पेल ख्रिस्ती लोक प्रक्षिप्त व अनाधिकृत मानत असल्याने आम्हाला त्यातील संदर्भ उद्‌धृत करणे प्रशस्त वाटत नाही. आपण इसा ह्यांनी त्यांच्या प्रेषित-संदेशात मोहम्मद वा अहमद असा उल्लेख केला होता अथवा नाही हे ठामपणाने सांगू शकत नाही. बहुतेक करून त्यांनी ह्या नावाचा समानार्थी शब्द वापरला असावा.

प्रेषितांच्या चरित्राचा लेखक इतिहासकार इब्न हिश्शाम, इतिहासकार मोहम्मद इब्ने इसहाक़, जे स्वतः प्रेषित चरित्राचे अधिकारी समजले जातात, त्यांना उद्‌धृत करून म्हणतो की, इसा ज्यावेळेला त्यांच्या मातृभाषेत, सिरियनमध्ये बोलत होते त्यावेळेला, ज्यावेळेला त्यांच्या भविष्यकालिन प्रेषिताविषयी त्यांनी मुन्हामान असा शब्द वापरला, ज्याचा अर्थ 'स्तुती करावी असा' असा होता. परंपरेने मान्य केलेली ही गोष्ट मोहम्मद इब्ने इसहाक़ला बहुदा पॅलेस्टिनी ख्रिस्ती लोकांनी सांगितली असावी, जे त्यावेळी इस्लामी राज्यसत्तेखाली आले होते. ज्यावेळी बायबल ग्रीकमध्ये भाषांतरित झाले त्यावेळी हाच शब्द 'पवित्र आत्मा' (पॅराक्लीट) असा भाषांतरित केला गेला.

# २ पैगंबर मुहम्मद ह्यांची परंपरा व उदय

**आ**फ्रिका, आशिया व युरोप ह्या तीन खंडांचा समतोल साधणारे, त्यांच्या केंद्रस्थानी असणारे, अरेबियन द्वीपकल्प हे पुरातन जगाचे हृदय होय. असे असूनही कुणा सम्राटाने ह्या प्रदेशावरती कधी आक्रमण केले नाही अथवा कुणा राज्यकर्त्याने हा प्रदेश आपल्या साम्राज्याला जोडण्याचा कधी प्रयत्न केला नाही. सर्व सैनिकी कारवाया ह्या अरेबियन प्रदेशाच्या सीमावर्ती भागांमध्ये म्हणजेच इराक, सिरिया, पॅलेस्टीन, लेबानन पुरत्या मर्यादित राहिल्या. अरेबियन द्वीपकल्पाला 'लढवून मिळवायचा प्रदेश' एवढे महत्त्व कुणी दिले नाही. एक गोष्ट खरी की, या भूमीचा किनारा तीनही बाजूंनी समुद्राने वेढलेला होता. पण त्याचबरोबर अंतर्भागात निर्जीवन वाळवंट उघडे–बोडके डोंगर ह्यांव्यतिरिक्त देण्यासारखी कुठलीच गोष्ट ह्या भूमीकडे नव्हती; हे विसरता कामा नाही.

मक्का हे अनेक वाड्यांचे मिळून बनलेले शहर ह्या प्रदेशाच्या केंद्रस्थानी होते. इस्लामचे प्रेषित मुहम्मद (ईश्वर त्यांना शांती देवो) हे ह्या 'नाउपच दरीतल्या' गावात जन्माला आले. त्यांचे वडील, अब्दुल्ला इब्ने अब्दुल मुत्तलिब, त्यांच्या जन्माच्या आधीच काही महिने असताना वारले. त्यांची आई अमिना, ह्या ते सहा वर्षांचे असताना वारल्या. त्यानंतरची दोन वर्षे त्यांचा सांभाळ त्यांचे आजोबा अब्दुल मुत्तलिब ह्यांनी केला आणि मग त्यांचा ही अंत झाला. ह्यानंतर त्यांचे काका अबू तालिब हे त्यांचे पालक बनले. पुढे प्रेषित मक्केचा त्याग करून मदिनेला आश्रयार्थ गेले, त्याआधी सुमारे तीन वर्षे अबू तालिब ह्यांचाही अंत झाला. आयुष्यातल्या अत्यंत अवघड व कसोटीच्या काळात अशा रीतीने प्रेषित हे पालकहीन बनले. निसर्गाने त्यांना नजरेत भरणारे व्यक्तिमत्व बहाल केले होते. जो जो त्यांना ऐन जवानीत बघायचा तो तो म्हणायचा की, 'ह्या मुलाला खूप मोठे भवितव्य आहे.' वाढत्या वयाबरोबर त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा भारदस्तपणा व छाप वाढत गेली. अली (प्रेषितांचे चुलतबंधू व जावई) एकदा म्हणाले, 'जे त्यांना प्रथमच बघायचे त्यांना जाणवायचा तो फक्त त्यांचा आदर उत्पन्न करणारा दरारा आणि जे त्यांच्या थोडे जवळ जायचे ते त्यांच्यावर प्रेम करू लागायचे.' प्रेषितांचे महाकुलीन उमदे चारित्र्य वादातीत होते. तरीसुद्धा वयाच्या चाळीसाव्या वर्षी त्यांनी आपले प्रेषितत्त्व जाहीर केले त्यावेळी लोकांचा त्यांच्याकडे बघण्याचा दृष्टिकोन सर्वस्वी बदलला. त्यांच्या प्रेषितत्वाची लोकांनी भरभरून हेटाळणी व उपहास केला. ते म्हणायचे, 'अरे बघा बघा ह्या खेडवळ माणसाकडे, त्याची अशी कल्पना आहे की, त्याचे स्वर्गाची नाते जुळले आहे.'

त्यांचे धर्म प्रचाराचे कार्य एकुण तेवीस वर्षे फक्त टिकले. ह्या तेवीस वर्षांच्या अत्यंत छोट्या काळात जगाने पूर्वी कधी वा त्यानंतरही कधी न बघितलेली क्रांती त्यांनी अरब टोळ्यांमध्ये घडवून आणली. शंभर वर्षांतच ह्या क्रांतीने सास्सानियन व बिझंटाईन साम्राज्याचा कब्जा घेतला. जगातल्या महत्त्वाच्या अशा ह्या दोन साम्राज्यांच्या अस्ताबरोबर इस्लामने पुढील

प्रदेश खालसा केले. पूर्वेकडे इराण, इराक व बुखारा. पश्चिमेकडे सिरिया, पॅलेस्टीन व इजिप्त आणि त्यानंतर सर्व उत्तर आफ्रिका. इस्लामचा हा लोंढा इथेच थांबला नाही. इ. सन ७११ मध्ये इस्लाम जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीतून इबेरियन द्वीपकल्पाकडे घुसला. इ.स. ७३२ मध्ये फ्रँकिश युवराज चार्ल्स मार्टेर ह्याने इस्लामची घोडदौड तोर्स येथे अडविली. नंतर जवळ जवळ दोनशे वर्षे पॅलेस्टीनसाठी छोटी–मोठी युद्धे चालू राहिली. ह्या युद्धानंतर तार्तार टोळ्यांकडून जोराचे हल्ले झाले. बाहेरून हे हल्ले होत राहिले तरी इस्लामी साम्राज्य पंधराव्या शतकापर्यंत टिकले. आपसातल्या भांडणामुळे पंधराव्या शतकात स्पेन इस्लामी साम्राज्याला गमावायला लागले.

इस्लामच्या आत्मतत्त्वाने उभारी घ्यायची वेळ ह्यानंतर तुर्क व मुघलांची आली. इ.स. १४५३ मध्ये तुर्कांनी कॉन्स्टँटिनोपल जिंकले आणि पूर्व युरोपात त्यांनी युगोस्लाव्हियापर्यंत मुसंडी मारली. तुर्कांची एक सैनिकी तुकडी व्हिएन्ना शहरा बाहेर इ.स. १६८३ पर्यंत तळ ठोकून होती. सोळाव्या शतकात मुघलांनी अफगाणिस्तानात व हिंदूस्तानात इस्लामी सत्ता उभ्या केल्या. गेल्या तेरा शतकांमध्ये जगाच्या कानाकोपऱ्यातून मुस्लिम पसरले. आशिया व आफ्रिकेतील जवळ जवळ चार डझन राष्ट्रे मुस्लिम राष्ट्रे आहेत. मौतामार–अल्– आलम–अल्–इस्लामीने १९७१ मध्ये प्रकाशित केलेल्या 'वर्ल्ड मुस्लिम गॅझेटर' नुसार जगात ९० कोटी मुसलमान राहतात. (२०२१ च्या आकडेवारीनुसार संपूर्ण जगात मुस्लिमांची लोकसंख्या सुमारे १.९ बिलियन (१९० कोटी) ऐवढी झाली आहे. विकिपीडिया).

हे सर्व त्या तेवीस वर्षांमध्ये प्रेषितांच्या मार्गदर्शनानुसार अरेबियामध्ये झालेल्या प्रयत्नांचे फळ होय. ह्या अतिशय छोट्या कालखंडामध्यल्या इस्लामी क्रांतीने मानवी इतिहासात अढळ स्थान प्राप्त करून घेतले. त्याहून महत्त्वाचा भाग म्हणजे ही क्रांती स्वतःच एक नवीन इतिहास बनली. इतके मोठे काम करण्याची पात्रता माणसामध्ये नाही. ईश्वराव्यतिरिक्त असे काम दुसरा कुणीच करू शकत नाही. इस्लामी क्रांती हे खरोखर देवाचे कार्य होय. ज्यावेळी बदर मध्ये युद्ध जिंकून मुस्लिम परतत होते त्यावेळी त्यांना काही लोक रौहा नावाच्या जागी भेटले. बदरच्या विजयाबद्दल त्यांनी मुस्लिमांचे अभिनंदन केले. 'तुम्ही अभिनंदन कशाची करीत आहात?' सल्मा इब्ने सलामा सांगत होता, 'शत्रू हा जणू दावणीला बांधलेल्या उंटा सारखा होता आणि म्हणूनच की काय आम्ही शत्रूची कत्तल केली.' (दावणीला बांधलेल्या जनावराला मारण्यात पुरुषार्थ तो काय? ज्याचे तुम्ही अभिनंदन करीत आहात?) (तहेजीब, सीरत इब्ने हिश्शाम, पृ.१५३)

हे सर्व नक्कीच ईश्वराच्या पूर्वेच्छेनुसार घडत होते. अजिबात महत्त्व नसलेल्या अरेबियन वाळवंटामधून त्याने दुर्दम्य धारणाशक्ती असणारी माणसे घडविली. ह्या माणसांच्या स्वभावाचे विशिष्ट व विचित्र मिश्रण त्यांच्या वातावरणाने घडविले होते. एखाद्या गोष्टीसाठी फक्त होकार अथवा नकार ह्या दोन पर्यायांव्यतिरिक्त तिसरा पर्याय त्यांना ठाऊक नव्हता. एखाद्या कारणासाठी, समर्पण करण्यासाठी, लागणाऱ्या सर्व नैसर्गिक वृत्ती त्यांच्यामध्ये होत्या. ह्या

व्यतिरिक्त सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे ह्या देशाच्या सीमेला लागून त्याकाळी दोन महासत्ता वावरत होत्या. आपल्या उंबरठ्याला लागून अजून एका सत्तेला वाढू देणे हे रोमच्या व पर्शियाच्या तत्कालीन साम्राज्यांना परवडणारे नव्हते. इस्लामची दौड रोखण्याकरिता त्यांनी मुस्लिमांशी युद्ध मोलले. असे करताना त्यांनी, प्रत्युत्तर युद्धानेच देण्याची जबरदस्ती मुसलमानांवरती केली. अर्थात ह्यामुळे मुसलमानांना रोम व पर्शियाची साम्राज्य जिंकून घेण्याची संधी निर्माण झाली. ह्या साम्राज्यांच्या तत्कालीन सीमा, ह्या त्यावेळी माहीत असलेल्या जगाच्या सीमा होत्या. एका गोष्टी विषयी इतकीही शंका नसावी की, इस्लामी विजय हे कुठल्याही प्रकारे दुसऱ्यांवरचे अतिक्रमण नव्हते. तर दुसऱ्यांनी केलेल्या हल्ल्याची ती एक प्रतिक्रिया होती. ह्या दोन साम्राज्यांशी झालेली ही युद्धे स्वसंरक्षणाकरिता झाली होती आणि जगातल्या कुठल्याही देशात अशा प्रकारच्या युद्धांविषयीच्या समर्थनाबद्दल मतभिन्नता नाही.

या घटनांच्या राजकीय फलश्रुतीपेक्षाही सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे इस्लामी क्रांतीने माणसाला आजवर त्याने ज्यांचा शोध घेतला नव्हता अशा संध्या उपलब्ध करून दिल्या. ह्या क्रांतीने, ईश्वराने निर्माण केलेला साक्षात्कारित धर्म हे एक ऐतिहासिक सत्य बनले जे आजवर कधी घडले नव्हते.

छापखाणन्यांच्या काळात इस्लामची वर्दी दिली गेल्याने कुरआनच्या सर्वकालिक संरक्षणाची ग्वाही मिळाली. इस्लामने जगाला लोकशाही युग व भाषण स्वातंत्र्य दिले. सत्याची हाक द्यायला, सत्याच्या उपासकांकरिता जे जे कृत्रिम अडथळे रस्त्यात होते ते ते सर्व ह्या क्रांतीने दूर केले. विज्ञानक्षेत्रात हिच्यामुळे नवीन शोध शक्य झाले. ज्यामुळे धार्मिक सत्यांची पडताळणी शक्य झाली व त्यांचे स्पष्टीकरण तर्काच्या व विद्वत्तेच्या पातळीवर करता येऊ लागले.

प्रेषितांच्या माध्यमातून, त्यानंतरच्या जगात काय घडणार आहे हे ईश्वराने दाखवून दिले, हा ह्या क्रांतीचा एक अत्यंत महत्त्वाचा पैलू होय. पुढच्या विश्वातील घटनांचा पूर्वालेख माणसाला पैगंबरांच्या जीवन व कार्यामध्ये मिळू शकतो. ज्यांनी प्रेषितांनी आणलेले सत्य मान्य करून, त्याचे अवलंबन करून आपल्या आयुष्याला त्याप्रमाणे वळण लावले, ते सर्वोच्च पदावर विराजमान झाले आणि त्यानंतरही त्यांचे ते स्थान अढळ राहणार आहे. पाप्यांना मानखंडना चाखायला मिळाली जिचे ते इथून पुढच्या आयुष्यात कायम शिकार बनणार आहेत.

इतिहास असे दाखवितो की, जे लोक स्वतःचे आयुष्य ईश्वराला समर्पित करतात त्यांना बरेच सोसावे लागते व ते दुर्बल वाटतात. त्याचवेळी ज्यांच्याकडे पैसा व सत्ता असते तीच माणसे ह्या दुनियेत यशाचा रस्ता सापडलेली अशी वाटतात. संतांच्या व प्रेषितांच्या आयुष्याचा इतिहास हा असा काळा आहे. वास्तविक पाहता प्रत्यक्षात मात्र घटनांची स्थिती अगदी उलट असते. कारण ईश्वर त्याच्या खऱ्या सेवकांना असणारा सन्मान व तेज देणार आहे, तर स्व–पूजकांना व दुनिया–पूजकांना मानहानी व पतनाचा नरक कायमचा देणार आहे.

पृथ्वीवरचे हे आयुष्य मनुष्याची चाचणी आहे. इथे, ह्या आयुष्यात माणसाला हवे तसे वागायची मुभा आहे आणि म्हणूनच माणसाच्या कृतीवरती ईश्वर इथल्या आयुष्यात कुठलेही नियंत्रण ठेवीत नाही. पण ह्या दुनियेत किमान एकदातरी, इस्लामच्या प्रेषितांच्या माध्यमातून, पुढच्या दुनियेतील संपूर्ण व शाश्वतपणे टिकणारी स्थिती ईश्वराने दाखवली आहे.

प्रेषितांचे जे सोबती होते त्यांना फार वाईट भोगायला लागले त्यांची घरे नष्ट करण्यात आली. समस्त पृथ्वी ही त्यांच्याकरिता कठोर गांजणूक बनली होती. त्यांची सगळी मालमत्ता लुटली गेली. त्यांना सामाजिक बळी बनविण्यात आले. समूळ नाशाच्या भीतीबरोबर सततच्या दहशतीखाली त्यांना आयुष्य कंठावे लागले. ह्या अशाच माणसांचा सन्मानपूर्वक अभ्युदय ईश्वराने घडविला. कुरैश आणि ज्यू, रोमन व इराणी, येमेनी व घस्सानी, अशांसारख्या ज्यांना ज्यांना सत्तेचा व पैशाचा माज होता, ते ते अत्यंत लाजिरवाण्या व अप्रतिष्ठेच्या स्थितीला पोहोचले.

ईश्वराच्या प्रत्येक प्रेषित दैवी न्यायाचे काही निकष माणसाला देत असतो. पुढच्या जगात ईश्वर जे निर्णय घेणार आहे ते निर्णय या जगात, प्रेषिताच्या माध्यमातून ईश्वर सांगत असतो. इस्लामच्या प्रेषितांनी ह्या दैवी न्यायाचे असे काही अभूतपूर्व प्रदर्शन घडविले की, तो एक जागतिक अनुभव बनला. त्याचबरोबर जगमान्य ऐतिहासिक सत्य बनला. माणसाला ईश्वरी न्यायाचे दर्शन घडले. जे ईश्वराचे सेवक होते त्यांना सन्मान लाभला व ज्यांनी त्याच्याविरुद्ध बंड केले त्यांचे पतन झाले. स्वर्ग व नरक ही शाश्वतस्थाने पुढल्या जगात प्रकट केली जातील. ह्या गोष्टीचे अवधान यावे म्हणून ह्या जगातच माणसाला पुढील जगाची प्राथमिक झलक दाखविण्यात आली आहे.

इस्लामचे प्रेषित मुहम्मद ह्यांच्या उदयानंतर खरे तर देवाचे दिव्यत्वच उदय पावले म्हणावयाला हवे. म्हणूनच नव्या करारामध्ये त्यांच्या प्रेषितत्वाचे भाकीत 'ईश्वराचे साम्राज्य' अशा शब्दांत केले आहे. प्रेषितांनी केलेल्या क्रांतीची राजकीय व धोरणविषयक गुंतागुंत फार मोठी होती. याविषयी कुणालाच शंका असण्याचे कारण नाही. पण तिचा सर्वात महत्त्वाचा भाग म्हणजे तिने घडविलेला ईश्वरी न्यायाचा साक्षात्कार. ईश्वरी तेजाचे ह्या मातीच्या दुनियेत झालेले प्रकटीकरण. पुढच्या जगात येणारी निखालस व परिपूर्ण अशी सत्ये, प्रेषित मोहम्मद ह्यांच्या क्रांतीने कितीतरी आधी माणसाला दाखविली.

# ३ अनुकरणीय आचरण

**इ**स्लामचे प्रेषित मुहम्मद (त्यांना शांती मिळो) ह्यांचा जन्म अरबस्तानात २२ एप्रिल इ.स. ५७० रोजी झाला व मृत्यू ८ जुन इ.स. ६३२ रोजी झाला. ते शरीर कमावलेले व कमालीचे देखणे होते. त्यांच्या उन्नत, उदात्त व शक्तिमान चरित्राची चाहूल त्यांच्या बालपणातच लागली होती. त्यांचे वय जसे वाढू लागले तसे त्यांच्याकडे पाहणाऱ्या कुणालाही प्रथमदर्शनी त्यांचा अतिशय दरारा वाटत असे. परंतु त्यांची वाणी गोड होती व वागणूक सुप्रसन्न होती. ह्यामुळे त्यांच्या संबंधात येणारी माणसे त्यांच्यावर प्रेम करू लागत. अतिशय संतुलित व्यक्तिमत्व, सहिष्णुता, सत्यवादित्व, बुद्धिमत्ता व औदार्य ह्या खरोखरच्या मानवी उच्च गुणांचे सर्वोच्च उदाहरण त्यांच्यामध्ये आढळते. दाऊद इब्ने हसीन म्हणतो, 'वाढत्या वयाबरोबर लोक त्यांना त्यांच्या पुढील गुणांकडे ओळखू लागले. ते म्हणजे, अनुकरणीय आचरण, शेजारधर्म, सहिष्णुता, धैर्य व सहनशीलता, सत्यवादित्व व विश्वसनीयता.' सर्व भांडणे व शब्दच्छल ह्यांपासून ते दूर राहायचे आणि बीभत्स भाषण, कुणाची निंदा व शिवीगाळ ह्या गोष्टी त्यांना कधीच आवडल्या नाहीत. प्रेषित आपला विश्वासघात कधीही करणार नाहीत हे माहित असल्याने लोक बिनदिक्कतपणे आपल्या मौल्यवान गोष्टी त्यांच्याकडे सुरक्षिततेसाठी सोडून जात. त्यांच्या संशयातीत विश्वासार्हतेने त्यांना लोक 'अल्-अमीन' (विश्वासू रक्षक अथवा कधीही न चुकणारा विश्वस्त) म्हणू लागले.

वयाच्या पंचविसाव्या वर्षी ज्या वेळेला प्रेषितांनी विवाह केला, त्यावेळी पौरोहित्य करणारे त्यांचे चुलते अबू-तालिब म्हणाले, 'माझ्या पुतण्या, 'मोहम्मद इब्ने अब्दुल्ला' याच्याशी तुलना होऊ शकेल असा दुसरा कुणीही नाही. उदात्तता, सौजन्य, दाक्षिण्य, प्रतिष्ठा व प्रतिभा ह्यांमध्ये सर्वांहून वेगळाच चमकतो. देवाशपथ ह्या मुलाचे भविष्य उज्ज्वल आहे व देवदयेने तो सर्वोच्च पदाला पोहोचणार आहे.' अबू-तालिब असं ज्यावेळेला बोलले त्यावेळी त्यांना ही कल्पना सुद्धा नव्हती की, भविष्यात खरोखरच ते म्हणाले अशा घटना घडणार आहेत. निसर्गाने त्यांच्या पुतण्याला आकर्षक व बहुपेडी व्यक्तिमत्त्व बहाल केले होते. अबू-तालिबच्या लोकांनी अशा गुणांची कदर करून त्यांच्या पुतण्याला नक्कीच एखादी सन्मान्य जागा देऊ केली असती. अबू तालिब हे ज्या भविष्याचा संदर्भ त्यांच्या भाषणामध्ये देत होते, त्यामध्ये त्यांना 'उज्वल भवितव्य' म्हणजे भौतिक यश व त्याची पूर्तता अभिप्रेत होत्या.

हे सुद्धा खरेच आहे की, प्रेषितांना भौतिक प्रगतीच्या असलेल्या संध्या संशयातीत होत्या. एकतर त्यांचा जन्म मक्केतल्या मोठ्या घराण्यात झाला होता व दुसरे म्हणजे त्यांचे गुण त्यांच्या यशाची गुरूकिल्ली होते. एक गोष्ट खरी की, त्यांच्या वडिलांकडून त्यांना फक्त एक उंट व एक नोकर एवढाच वारसा मिळाला होता. पण त्यांच्या अंगाच्या गुणांमुळे व्यापारी कुटुंबात जन्म घेतलेली मक्केतील सर्वश्रीमंत स्त्री खदिजा ह्या प्रभावित झाल्या होत्या. प्रेषित ज्यावेळेला

पंचवीस वर्षांचे झाले त्यावेळेला खदिजांनी त्यांना लग्नाची मागणी घातली. खदिजांबरोबर लग्न झाल्याने प्रेषितांना संपत्ती व स्थावर मालमत्ताच मिळाली असे नव्हे तर त्यामुळे त्याहून मोठा फायदा म्हणजे त्यांना अरेबिया व अरेबियाच्याही पलीकडली व्यापाराचे दरवाजे मोकळे झाले. त्यानंतर त्यांना एक यशस्वी व सुखासीन आयुष्य जगण्याची प्रत्येक संधी उपलब्ध होती. असे असूनही त्यांनी ह्या सर्व गोष्टींचा त्याग केला व स्वतःकरिता सर्वस्वी वेगळा असा मार्ग निवडला. अगदी हेतुत: तर त्यांनी असा मार्ग पत्करला की जो केवळ भौतिक नाशाकडे नेणारा होता. प्रेषितांच्या विवाहापूर्वी त्यांनी निरनिराळ्या मार्गांनी आपली रोजी रोटी कमावली होती. आता त्यांनी हे सर्व उद्योग सोडून दिले व स्वतःला, आयुष्यभर ज्याचा त्यांनी ध्यास घेतला होता, त्या सत्याच्या शोधार्थ झोकुन दिले. तासन्‌तास एकाजागी बसून उत्पत्तीच्या रहस्यांचे ते चिंतन करीत. सामाजिक सभा–समारंभांमधून भाग घेऊन, मक्केतील आपली प्रतिष्ठा उंचावायचा प्रयत्न करण्याऐवजी ते वाळवंटातील दऱ्याखोऱ्यांमधून एकटेच विचार करीत हिंडणे पसंत करीत. फुरसत मिळाली की नेहमी ते हिरा पर्वतावरच्या एका गुहेत एकांतवासासाठी जात. बरोबर आणलेला थोड्याशा अन्नाचा व पाण्याचा साठा संपेपर्यंत तिथेच राहात. अन्न पाणी परत नेण्यापुरतेच ते घरी येत व परत निसर्गाच्या एकांतवासामध्ये प्रार्थना व ध्यान करण्याकरिता निघत असत. मनात उफाळून येणाऱ्या प्रश्नांची उत्तरे देण्याकरिता, पृथ्वी व स्वर्गांच्या निर्मात्याला ते याचना करीत. माणसाची आयुष्यातील खरी भूमिका काय? ईश्वराचे विनम्र सेवक म्हणून त्याच्या आपल्याकडून काय अपेक्षा असतात? मनुष्य कुठून आला व मृत्यूनंतर तो कुठे जाणार आहे? माणसांच्या सामाजिक संबंधांमधून निर्माण होणाऱ्या घटनांमध्ये ह्या प्रश्नांची उत्तरे न मिळाल्याने त्यांनी वाळवंटातील अचलपणाकडे धाव घेतली. कदाचित तिथे तरी आपल्या प्रश्नांची उत्तरे मिळतील, ह्या अपेक्षेने.

रुमानियातील प्राच्यज्ञ, कॉन्स्टन व्हर्जिल जॉर्ज (जन्म:१९१६) आपल्या 'द प्रॉफेट ऑफ इस्लाम' ह्या पुस्तकात म्हणतो, 'अरेबिया व मध्यपूर्वेतील अनागरी एकटेपणाच्या वातावरणात जोपर्यंत एखादा माणूस काही काळ घालवत नाही, तोपर्यंत त्याला वाळवंटाची भीषण रौद्रता व त्याचबरोबर असणारी अक्षुब्धता माणसाच्या बुद्धिचा विकास कशी करते व कल्पना शक्ती कशी बळकट बनवते हे कळणारच नाही. युरोपियन व अरेबियन वनस्पतींमध्ये फार फार फरक आहे. इथल्या वाळवंटातल्या रखरखीत अशा कोपऱ्यांमधली एकही वनस्पती अशी नाही की, जी सुगंधाची पखरण करीत नाही. अगदी इथल्या बाभळी सुद्धा सुगंधी असतात. ह्या वाळवंटाचे पूर्ण क्षेत्र हे ३,०००,००० चौ. कि.मी. इतकी आहे. जणूकाही इथे आल्यावर माणूस देवाच्या प्रत्यक्ष संपर्कातच येतो'.

'दुसरे देश अशा इमारतींसारखे आहेत की, ज्यामध्ये भल्या थोरल्या भिंती एखाद्याच्या दृष्टीला अडथळा आणतात. अरेबियाची लांबच लांब मोकळी वाळवंटी मैदाने मात्र त्यांच्या दूरवर पसरलेल्या सत्याचे नेत्रसुख घेताना काहीच अडथळा आणीत नाहीत. जिकडे बघावे तिकडे अंतहीन वाळू व मोजमापरहित बेठाव आकाश. देव आणि त्याच्या दूतांशी भागीदारी (!) करताना

थांबविणारे इथे कुणीच नसते.'

एका तरुण माणसाने अत्यंत उभारणीच्या वयात आयुष्याचा असला मार्ग स्वीकारणे काही लहान गोष्ट नव्हती. भौतिक सुखे मन:पूर्वक व हेतुतः नाकारून तो अडचणी व दु:खाने भरलेला रस्ता निवडीत होता. सुखासीन आयुष्य जगण्याचे मार्ग व संध्या पूर्णतया उपलब्ध असताना ह्या माणसाला त्याचा धगधगून उसळणारा आत्मा ह्या असल्या गोष्टींमध्ये समाधान देत नव्हता. त्याच्या दृष्टीने ह्या गोष्टींना काहीच किंमत नव्हती आणि जोपर्यंत आयुष्याचे रहस्य त्याला कळणार नव्हते, तोपर्यंत त्याला शांती मिळणार नव्हती. बाह्य रुपांच्या पलीकडे जाऊन जीवनाची अंतस्थ सत्यता मिळवायची असे त्यांनी ठरविले होते. भौतिक आय व व्यय, आराम आणि संकटे ह्यांविषयी काही वाटण्यापेक्षा त्याला शाश्वत अशा सत्य असत्याच्या प्रश्नाने ग्रासून टाकले होते.

प्रेषितांच्या आयुष्यातील ह्या अवस्थेचे यथार्थ वर्णन कुरआनमध्ये पुढीलप्रमाणे केले आहे: 'आणि काय मग त्याने (ईश्वराने) तुम्ही (प्रेषित) वाट शोधण्यासाठी भटकत असताना मार्गदर्शन केले नाही?'(९३:७)

ह्या आयातीमध्ये भटकणे, ह्या शब्दाकरिता वापरल्या गेलेल्या ज़ाल्लन ह्या शब्दाचा अर्थ ओसाड वाळवंटात उभे असलेले एकच एक झाड असाही होऊ शकतो. महाप्रचंड ओसाड अज्ञान, असे वर्णन केले जाऊ शकेल, अशा त्या वेळेच्या अरेबियामध्ये प्रेषित हे खरोखरच एकुलता एक, अशा तऱ्हेचा वृक्ष होते. अशा समाजात स्वतःचे स्थान बनविणे ही कल्पनाच त्यांच्याकरिता तिरस्करणीय होती. त्यांना सत्यच हवे होते आणि सत्याव्यतिरिक्त दुसरी कोणतीच गोष्ट त्यांच्या आत्म्याला समाधान देऊ शकणार नव्हती. त्यांचा शोध अशा पातळीला पोहोचला होता की, जिथे आयुष्य हे दु:सहनीय ओझे बनले होते. कुरआनमध्ये ह्याचा उल्लेख पुढीलप्रमाणे केला आहे:

'(हे पैगंबर!) काय आम्ही तुमचे उर (हृदय) तुमच्यासाठी उघडले नाही? आणि तुमच्यावरचे ते भारी ओझे उतरविले, जे तुमची कंबर मोडत होते?' (९४:१-३)

ईश्वराने खरोखरच त्यांना ओझेमुक्त केले. ईश्वराने त्याच्या प्रेषितावरती कृपा करून त्याचा मार्ग उजळून टाकला व त्याच्या प्रवासाकरिता मार्गदर्शन केले. १२ फेब्रुवारी इ.स.६१० रोजी प्रेषित त्यांच्या गुहेमध्ये एकटेच बसले होते. ईश्वराचा देवदूत त्यांच्यासमोर मानवी स्वरूपात प्रकट झाला व त्याने त्यांना कुरआनच्या ९६ व्या अध्यायाच्या (सूऱ्याच्या) प्रारंभीचे शब्द शिकविले. प्रेषितांच्या शोधाचे योग्य असे बक्षीस शेवटी त्यांना मिळाले. त्यांचा अस्वस्थ आत्मा ईश्वराशी तादात्म्य पावला. ईश्वराने त्यांना फक्त मार्गदर्शनच केले असे नव्हे तर त्यांना स्वतःचा प्रेषित व ह्या दुनियेतील विशेष दूत म्हणून निवडले. प्रेषितांचे प्रेषित म्हणून जीवितकार्य पुढची तेवीस वर्षे अखंड सुरू होते. ह्या सर्व काळामध्ये कुरआनचे सर्व भाग, 'सर्वात शेवटचा व एकमेव दिव्य संदेश', त्यांच्या समोर प्रकट करण्यात आले.

अत्यंत कष्ट साध्य अशा चाळीस वर्षांच्या प्रवासानंतर इस्लामच्या प्रेषितांना सत्याचा

शोध लागला. ही अशी मिळकत होती, की जी सोपी आणि भौतिकदृष्ट्या सुखकारक अशी नव्हती. कारण हे असे सत्य होते की, ज्यात माणूस ईश्वरासमोर प्रत्यक्ष सामोरा गेला होता. हा शोध ईश्वराच्या शक्तिसमोर माणसाच्या तोकडेपणाचा होता. स्वतःच्या अतिशय चिमुकल्या अस्तित्त्वासमोर ईश्वराच्या अतिप्रचंड, अतिनैसर्गिक अस्तित्वाचा होता. ह्याच शोधाबरोबर हे ही सुस्पष्ट झाले की, ईश्वराच्या विश्वासू सेवकाला ह्या दुनियेत जबाबदाऱ्यांव्यतिरिक्त दुसरे काहीच मिळणार नव्हते. त्याला कुठल्याही प्रकारचे विशेष हक्क मिळणार नव्हते.

प्रेषितांना हे सत्य उमगल्यावर त्यांनी ज्या तऱ्हेचे आयुष्य घालविले; त्यांचा ज्या तऱ्हेच्या आयुष्याने ताबा घेतला, त्याचे वर्णन पुढीलप्रमाणे करता येईल:

ईश्वराने मला नऊ आज्ञा दिल्या;
ईश्वराचे भय, खाजगीत व सार्वजनिकरीत्या;
न्यायीपणा, मग तो संतापात असो वा शांततेत;
सुवर्णमध्य दोहींमध्ये, गरिबीत वा संपन्नतेत;
आणि त्यांच्याबरोबर हात मिळवणी जे मला तोडून दूर जात आहेत;
आणि दातृत्व, त्यांना, ज्यांनी मला वंचित केले;
आणि क्षमा, त्यांना, जे माझ्याशी वाईट वागले;
आणि माझी शांतता ही ध्यान असायला हवी;
आणि माझे शब्द, ईश्वराची आठवण;
आणि माझी दृष्टी, सूक्ष्म निरीक्षण.

**– राझिन**

हे काही फक्त नुसतेच कवितेचे अस्खलित शब्द नव्हते, तर प्रेषितांच्या उभ्या आयुष्याचे स्वच्छ प्रतिबिंब म्हणायला हवेत. अत्यंत सुस्पष्टपणे झोंबणारे व परिणामकारक असे शब्द एखाद्या रित्या आत्म्यामधून जन्म घेत नसतात तर ते अशा कवीच्या उच्च मन:स्थितीचे निदर्शक असतात. अंतःप्रेरणा उत्पत्ती करायला लागली की, असे साहित्य जन्माला येते. एखाद्या अतृप्त आत्म्याची शक्ती असे 'भाषिक स्वरूप' घेऊन प्रकट होते.

प्रेषितत्वाचा उष:काल व्हायच्या आधीही प्रेषितांच्या आयुष्याचा मार्ग हा तसाच होता, वेगळा नव्हता. इतके दिवस अंतर्मनात अव्यक्त असणारी प्रेरणा आता व्यक्ताच्या पातळीवर आली एवढेच.

अंत:प्रवृत्तींच्या आविष्कारांमुळे इतके दिवस ज्या कृती होत होत्या त्यांना आता सुव्यवस्थित व विशालकाय चिंतनाचा पक्का पाया लाभला होता. अशी अवस्था त्यांना शक्य होते, जे स्वतःच्या भौतिक गरजा किमान, जवळ जवळ शून्य करतात. ज्यांच्या आयुष्याचे स्वरूप सर्वांचे आयुष्याहून वेगळे असते, जे शरीराने ह्या जगात वावरत असतात परंतु ज्यांचा आत्मा वेगळ्याच जगात वावरत असतो.

प्रेषित एकदा म्हणाले होते,
'दृष्ट्या व्यक्तीकडे (स्वतःचे) विशेष क्षण हवेत;
क्षण ईश्वराशी तादात्म्यतेचा;
क्षण स्वपरीक्षेचा;
क्षण उत्पत्तीच्या रहस्यांच्या परावर्तनाचा;
आणि एक क्षण जो, तो खाण्यापिण्यासाठी
वेगळा काढून ठेवतो.'

**(इब्न हिश्शाम)**

दुसऱ्या शब्दात म्हणजे ईश्वराचा सच्चा सेवक त्याचे आयुष्य असे घालवितो. ज्याचा तळमळणारा, तळपणारा आत्मा त्याला ईश्वराच्या इतके जवळ नेतो की जणू तो ईश्वराशी तादात्म्य पावतो. त्या दिवसाची, ज्या दिवशी केलेल्या कर्मांचा झाडा त्याला ईश्वरापुढे द्यायचा आहे, त्या दिवसाच्या भीतीने तो स्वतःलाच हिशेब द्यायला लागतो. कधी कधी ईश्वरी सृजनाच्या आश्चर्यांनी तो जास्तच थरारून जातो आणि त्यात परावर्तित होणारे सर्वशक्तिमान सृजनाचे सौंदर्य न्याहाळू लागतो. ह्याप्रमाणे त्याचा सर्वकाळ तो ईश्वराबरोबर, स्वतःबरोबर व आजूबाजूच्या निसर्गात घालवतो. ह्यातून फारच थोडा वेळ स्वतःच्या दैनंदिन नैसर्गिक गरजा भागविण्यासाठी त्याला उपलब्ध होतो.

हे वर्णन काही कुणा अशक्यप्राय अशा व्यक्तीचे नव्हे; तर प्रेषितांच्या व्यक्तिमत्त्वाचे प्रतिबिंब होय. ज्या विश्वासाने, श्रद्धेने त्यांचे अंतःकरण उजळून निघाले त्या प्रकाशाचीच ही एक झलक होय. हे 'सर्व क्षण' हे प्रेषितांच्या आयुष्याचे अविभाज्य घटक होते. ज्याने ह्या अवस्थांचा अनुभव घेतला नाही त्याला त्यांचे इतके वैभवशाली वर्णन करताच येणार नाही. ज्या जीवाने हे शब्द उच्चारले तो नक्कीच त्या वर्णन केलेल्या अवस्थेत होता. शब्दांमधून ह्या आत्मिक पूर्णतेच्या स्थितीचे वर्णन, केवळ इतरांकरिता करण्यात आले आहे.

ईश्वराकडून निरोप (उपदेश) मिळेपर्यंत, प्रेषितांना हे जग त्याच्या त्रुटी व मर्यादांमुळे अर्थशून्य वाटत आले होते. पण आता मात्र ईश्वरी संदेशामुळे त्यांना कळून चुकले की ह्या दुनियेव्यतिरिक्त आणखी एक शाश्वत आणि परिपूर्ण अशी दुनिया आहे, जी खरोखर मानवाचे अंतिम ध्येय आहे. आणि हे कळाल्याबरोबर लगेचच ह्या बाह्य आयुष्य व विश्वाला एक नवीन अर्थ प्राप्त झाला. आता प्रेषितांना एक असे जग लाभले की, त्यांचा आत्मा बळकटपणे निर्वाह करू लागला. एक असे आयुष्य की ज्यामध्ये ते आता तन व मनाने रस घेऊ लागले. त्यांना आता नवीनच, जग प्राप्त झाले की, त्यामध्ये कायावाचामने, करून झिजू लागले. त्यांच्या सर्व आशा व स्फूर्तींचे लक्ष्य, त्यांच्या आयुष्यातील सर्व प्रयत्न व कष्टांचे ध्येय म्हणजे हे नवीन जग बनले.

अशा प्रकारच्या सत्याचा शोध हा केवळ बौद्धिक पातळीवर घेतलेला नसतो. ज्यावेळी ते मूळ पकडते त्यावेळी माणसाला सर्वस्वी बदलून टाकते. ह्या बदलांमुळे त्या व्यक्तीच्या अस्तित्वाची पातळी उंचावते. इस्लामच्या, प्रेषितांच्या आयुष्यामधून अशा प्रकारच्या

आयुष्यांमधील सर्वोच्च जीवनाचे उदाहरण आपल्याला आढळते. या जीवनापासून घ्यायचा सगळ्यात मोठा धडा म्हणजे मनुष्य; जोपर्यंत आपल्या अस्तित्वाची पातळी बदलत नाही; तोपर्यंत आपल्या कृतीची पातळीही बदलू शकत नाही.

ह्या पुढील जगाचे सत्य जेव्हा प्रेषितांना कळले, त्यानंतर त्या सत्याने त्यांच्या संपूर्ण आयुष्यावर प्रभाव गाजविला. त्यांनी ज्या स्वर्गाची वार्ता सर्वांना दिली, तोच स्वर्ग आपल्याला मिळावा अशी त्यांची आत्यंतिक इच्छा होती. व त्यांनी ज्या नरकाचा इशारा इतरांना दिला; त्याची सर्वांत जास्त भीती त्यांनाच वाटत असे. पुढे भविष्यात येणाऱ्या जीवनाविषयीची आस्था त्यांच्यामध्ये सतत वाहत असे. एखाद्या झऱ्यासारखी उचंबळून येत असे. ही आस्था त्यांच्या ओठावरती कधी ईश्वराला केलेल्या विनंतीच्या रूपाने तर कधी हृदयापासून वाटणाऱ्या पश्चात्तापाच्या शब्दांनी उसळून येत असे. खरोखर एखाद्या सामान्य माणसापेक्षा वेगळ्या अशा पातळीवर पैगंबर आयुष्य जगले. हे स्पष्ट करणाऱ्या शेकडोशे घटना सांगता येतील. ज्यातल्या काही इथे मांडल्या आहेत.

एकदा प्रेषित उम्म सलमांबरोबर घरामध्ये होते. त्यांनी नोकराणीला बोलविले, जिने यायला थोडा जास्तच वेळ घेतला. प्रेषितांच्या चेहऱ्यावरचा राग बघून उम्म सलमा खिडकीपाशी गेली आणि त्यांनी बाहेर बघितले. बाहेर ती मुलगी खेळत होती. ती जेव्हा परत आली त्यावेळी प्रेषित तिला म्हणाले, 'जर मला प्रलयाच्या दिवशी द्यायच्या हिशोबाची भिती नसती तर ही मिसवाक (दात कोरण्याची काडी) मी तुला नक्कीच फेकून मारली असती'. म्हणजे इतकी सौम्य शिक्षा सुद्धा प्रेषितांच्या दृष्टीने टाळायला हवी होती.

बदरच्या युद्धात झालेले कैदी हे प्रेषितांचे अक्षम्य व कडवे दुष्मन होते; पण तरीही त्यांची त्या कैद्यांशी असलेली वागणूक पूर्णतः निर्दोष व पापरहित अशी होती. या कैद्यांनपैकी एकाचे नाव 'सुहैल इब्न अम्र' असे होते. हा जळजळीतपणाने भाषण करण्यात पटाईत होता आणि सार्वजनिकरीत्या अत्यंत हिरिरीने व सर्व शक्तीनिशी प्रेषितांची निंदा करण्यात पटाईत होता. ज्या योगे लोक, प्रेषित व त्याच्या कार्याविरुद्ध भडकाविले जावेत. हजरत उमर ह्यांनी अशी सूचना केली की, त्याच्या खालच्या जबड्यातील दोन दात उपटण्यात यावेत, की ज्यामुळे त्याच्या कर्तृत्वाचा (?) धबधबा थांबेल. प्रेषितांना या सूचनेमुळे जबरदस्त धक्काच बसला. उमर ह्यांना ते म्हणाले की, 'मी जर असे केले तर प्रलयाच्या दिवशी, ईश्वराच्या पुढे, मी जरी त्याचा पैगंबर असलो तरी अप्रतिष्ठित ठरेन'.

ह्या सर्व घटनांमधून भविष्यातले बीजक्षेत्र कसे असायला हवे, याचा अर्थबोध होतो. ज्याला हे सत्य कळते तो भविष्याशी निगडित असे आयुष्य जगायला सुरुवात करतो. असे आयुष्य, ज्या मध्ये पुढे येणाऱ्या शाश्वत जगातील यशासाठी प्रयत्न केले जातात. जीवन असे जगले जाते; ज्यामध्ये या क्षणभंगुर आयुष्याला खरी मूल्य चिकटवण्याऐवजी मृत्यूपश्चात येणाऱ्या शाश्वत जीवनाला चिटकवली जातात. हे आयुष्य म्हणजे अंतिम गंतव्यस्थान नव्हे. तर भविष्यात येणाऱ्या खऱ्या अंतिमाकडे जाण्याच्या तयारीचा आदिबिंदू होय, याची जाणीव माणसाला ह्या

सत्याचे ज्ञान झाल्यावर होते. ज्याप्रमाणे ह्या भौतिक जीवनात रस घेणाऱ्या प्रत्येक माणसाची कृती ही एखाद्या भौतिक फायद्यावरती डोळा ठेवून केलेली असते; त्याप्रमाणे श्रद्धावान सेवकाची प्रत्येक कृती ही पारलौकिकाची अभिलाषा धरून केलेली असते. आयुष्यातील परिस्थितीबरोबर त्याची होणारी प्रतिक्रिया ही त्याच्या त्या दृष्टिकोनाचे प्रतिबिंब असते; जो दृष्टिकोन प्रत्येक गोष्ट ही, मृत्यूपश्चात असणाऱ्या जगातल्या अवस्थेशी, तो ताडून पाहत असतो. त्याचप्रमाणे हा दृष्टिकोन त्याच्या मृत्यूपश्चात येणाऱ्या जीवनावर ही प्रतिक्रिया काय परिणाम करेल ते तपासून बघत असतो. आनंद वा दुःख, यश वा अपयश, वरचढपणा अथवा दबलेपणा, स्तुती अथवा निंदा, प्रेम वा संताप अशा कुठल्याही क्षणी अशा माणसाच्या आत्म्याला पारलौकिकाच्या जाणीवेने व विचारांनी मार्गदर्शन केले जाते. हे सर्व विचार व जाणीव जोपर्यंत त्याच्या अंतर्मनाचा पूर्णतया ठाव घेत नाहीत तोपर्यंत हे चालूच राहते. त्याची मर्त्यतेपासून मुक्तता होत नाही; परंतु त्याचे मन मात्र अमर्त्य व शाश्वत जगाशी संबंधित गोष्टींवरती काम करायला लागते; ज्यामुळे त्याचा मर्त्य अशा भौतिक गोष्टींमधला रस तो जवळ जवळ विसरूनच जातो.

## विनम्रता व संयम

प्रेषित हे दुसऱ्या कुठल्याही माणसासारखेच माणूस होते. आनंद देणाऱ्या गोष्टींनी त्यांना आनंद होई व दुःख देणाऱ्या गोष्टींनी दुःख. आपण सर्वप्रथम ईश्वराचे सेवक आहोत ह्या गोष्टीची उमज, त्यांना ईश्वरी इच्छांपुढे, आपल्या स्वतःच्या इच्छांना जास्त महत्त्व देऊ देत नसे.

प्रेषितांच्या आयुष्याच्या शेवटच्या काळात हजरत मारिया क़िब्तिया ह्यांच्यापासून त्यांना एक अतिशय सुंदर, चपळ व तरतरीत मुलगा झाला. आपल्या सर्वात आदरणीय ठळक पूर्वजाची आठवण म्हणून प्रेषितांनी त्याचे नाव इब्राहीम ठेवले. ही अत्यानंदाची बातमी अबू रफी ह्याने प्रेषितांना सांगितली. प्रेषितांना इतका आनंद झाला की, त्यांनी अबू रफी ह्याला एक नोकर भेट म्हणून दिला. त्या मुलाला मांडीत घेऊन बसणे व त्याच्याशी खेळणे ह्या गोष्टी त्यांना अतिशय आवडत. अरब चालीरीतीप्रमाणे इब्राहीमची दूध आई म्हणून 'उम्म बुर्दा बिंत मुंज़िर इब्न ज़ैद अन्सारी' ह्यांच्याकडे त्याला स्वाधीन करण्यात आले. त्या एका लोहाराची पत्नी होत्या व त्यांचे घर सदैव धुराने भरलेले असे. असे असूनही आपल्या राजस तब्येतीचा विचार न करता, डोळे व नाक, धूर व पाण्याने भरत असताना, प्रेषित वारंवार आपल्या मुलाला भेटण्यासाठी तिथे जात असत. इब्राहिम फक्त दीड वर्षांचा असताना हिजरी शतकाच्या दहाव्या वर्षी (जानेवारी इ.स.६३२) त्याचा मृत्यू झाला. एकुलत्या एक मुलाच्या मृत्यूनंतर कुठलाही बाप जसा रडेल तसेच प्रेषित रडले. असा विचार करता प्रेषित हे दुसऱ्या कुठल्याही सामान्य माणसाप्रमाणेच होते. त्यांचा आनंद व दु:खही एखाद्या सामान्य बापाप्रमाणे होते. असे सारे असूनही दृढ निश्चयाने त्यांनी आपले हृदय ईश्वराच्या इच्छेवरती केंद्रित केले. इतक्या दुःखाच्या प्रसंगीही ते जे काही बोलले ते पुढीलप्रमाणे होते.

'इब्राहीम तू आम्हाला सोडून जातो आहेस, त्यानंतरचे आमचे दुःख ईश्वरालाच ठाऊक

आहे. आमचे डोळे रडताहेत आणि हृदय तळमळते आहे; पण आम्ही ईश्वर नाखूश होईल असे काहीही बोलणार नाही.'

योगायोगाने इब्राहीमच्या मृत्यूच्या वेळीच एक सूर्यग्रहण घडले. अगदी प्राचीन काळापासून लोकांचा असा समज होता की, एखाद्या अतिमहत्त्वाच्या व्यक्तीचा मृत्यू हे सूर्य अथवा चंद्रग्रहणाचे कारण असते. मदिनेचे लोक इब्राहीमचा मृत्यू व सूर्यग्रहण ह्यांचा संबंध जोडू लागले. प्रेषित ह्या गोष्टीने अतिशय नाराज झाले. कारण माणसाच्या ह्या दुनियेतील असलेल्या क्षुद्र स्थानाची त्यांना जाणीव होती व असे समज ह्या जाणीवेच्या केवढे विरोधी आहेत हे त्यांना कळत होते. त्यांनी सर्व लोकांना एकत्र केले व त्यांना पुढीलप्रमाणे संबोधित केले:

'सूर्य व चंद्रग्रहण एखाद्या मानवी व्यक्तीचा मृत्यू ह्यांचा अर्थाअर्थी काहीही संबंध नाही. ही दोन्ही ग्रहणे, ईश्वराच्या खुणा होत. ज्या ज्या वेळी तुम्ही ग्रहण पाहाल त्यानंतर प्रत्येकवेळी तुम्ही ईश्वरचरणी लीन व्हायला हवे. ईश्वराची प्रार्थना करायला हवी.'

एकदा प्रवासामध्ये प्रेषितांनी त्यांच्या सहकाऱ्यांना एक बकरा भाजायला सांगितले. एकाने बकऱ्याला कापायचे काम घेतले. दुसऱ्याने त्याला साफ करण्याचे आणि तिसऱ्याने त्याला शिजवण्याचे. प्रेषितांनी सांगितले की, ते लाकडे गोळा करतील. सर्व सोबती एकसुरात म्हणाले, 'ईश्वराच्या प्रेषिता, आम्ही सारे सर्व काम करू.' प्रेषित म्हणाले, 'हे मला माहीत आहे की, तुम्ही सर्व काम कराल; पण जर असे झाले तर तो आपल्यात फरक करणे होईल, त्याला मी मान्यता देऊ शकत नाही. ईश्वर विनाकारण त्याच्या सेवकांपैकी एखाद्याला त्याच्या सोबत्यांपेक्षा श्रेष्ठत्व देऊ इच्छित नाही.'

प्रेषित इतके विनयशील होते की ते एकदा म्हणाले, 'देवाशपथ, मला खरोखरच माहीत नाही की भविष्यात माझे अथवा तुमचे काय होईल? अगदी मी ईश्वराचा विनम्र निरोप्या असलो तरीसुद्धा!' (बुखारी)

एक दिवस अबू ज़र्र ग़िफ्फारी एका वर्णाने काळा असलेल्या मुस्लिम माणसाच्या पुढ्यात बसला होता. अबू ज़र्रने त्याला हाक मारताना, 'अरे काळ्या' अशी हाक मारली. प्रेषितांना हे अजिबात आवडले नाही. त्यांनी अबू ज़र्रला सुधारणा करण्यास सुचविले व ते पुढे म्हणाले, 'गोरे काळ्यांहून अजिबात श्रेष्ठ नसतात.' प्रेषितांनी कानउघाडणी केल्यावर अबू ज़र्रला त्याची चूक कळून आली. त्याने जमिनीवर लोळण घेतली व तो त्या माणसाला, ज्याला त्याने विनाकारण दुखविले होते त्याला म्हणाला, 'उभा राहा आणि तुझ्या पायाचा तळवा माझ्या चेहऱ्यावरती घास'.

एकदा प्रेषितांनी एका श्रीमंत माणसाला आपल्या कपड्यांचा घोळ खेचून घेताना पाहिले. ह्याच माणसापुढे एक अगदी गरीब मुसलमान बसला होता. त्याचा स्पर्श होऊ नये म्हणूनच त्या श्रीमंत माणसाने असे केले होते. प्रेषित फक्त एवढेच म्हणाले की, 'त्याची गरीबी तुला दंश करेल अशी भीती तुला वाटते आहे का?'

ज़ैद इब्न सना नावाच्या एका ज्यू माणसाकडून प्रेषितांना एकदा काही पैसे उधार घ्यावे

लागले. पैसे द्यायचा वायदा ज्या दिवसाचा झाला होता त्या दिवसाच्या काही दिवस आधीच तो ज्यू त्याचे पैसे परत मागण्यासाठी आला. तो प्रेषितांच्या जवळ गेला, त्याने त्यांचे कपडे पकडले व आत्यंतिक कठोरपणे म्हणाला, 'अरे मोहम्मद, तू माझे देणे का देऊन टाकत नाहीस? माझ्या माहितीप्रमाणे मुत्तालिबचे वंशज तर ऋण फेडून टाकण्यात अजिबात कसूर करीत नाहीत.' उमर त्यावेळी प्रेषितांबरोबर होते. त्यांना अतिशय राग आला. त्यांनी त्या ज्यूला चांगलेच खडसावले आणि त्याला मारणेच तेवढे बाकी राहिले होते. ह्या सर्व प्रसंगात प्रेषितांच्या चेहऱ्यावरती एक स्मितरेषा होती. ते ज़ैदला फक्त एवढेच म्हणाले, 'माझे वचन पूर्ण करण्याकरिता अजून तीन दिवस शिल्लक आहेत.' इतके म्हणून ते उमरना म्हणाले, 'ज़ैदला आणि मला, तुमच्याकडून ह्यापेक्षा चांगल्या वर्तणुकीची अपेक्षा होती. तुम्ही मला माझी कर्जे मी चांगल्या रीतीने फेडायला हवीत असे सांगायला हवे होते आणि ज़ैदला त्याने त्याची मागणी चांगल्या रीतीने करायला हवी, असे सांगायला हवे होते. उमर, ज़ैदला तुमच्या बरोबर घेऊन जा, त्याचे कर्ज फेडून टाका आणि त्या व्यतिरिक्त त्याला २० सा (सुमारे ४० किलो) खजूर द्या. कारण तुम्ही त्याला विनाकारणच तुमच्या धमक्यांनी घाबरवून सोडले आहे.' हा सर्व प्रसंग वाचताना एकच गोष्ट आपण लक्षात ठेवायला हवी. ती म्हणजे प्रेषित हे ह्या प्रसंगी मदिनेचे सर्वसत्ताधीश होते आणि तरीही ते इतक्या विनम्रपणे व संयमाने वागत होते.

प्रेषितांचे आयुष्य इतके यशस्वी झाले की, त्यांच्या हयातीमध्येच ते पॅलेस्टीनपर्यंतच्या अरेबियाचे शासक बनले. ईश्वराचा दूत म्हणून ते जे जे म्हणत ते ते कायदा म्हणूनच स्वीकारले जाई. त्यांच्या समाजाने त्यांना असा आदर दाखविला की तसा आदर आजवरच्या कुठल्याच व्यक्तीला मिळाला नव्हता. उर्वा इब्न मसूदला जेव्हा (हिजरी शक, ६) कुरैशांनी त्यांचा दूत म्हणून पाठविले तेव्हा मुस्लिम लोक प्रेषितांना देत असलेला आदर बघून तो थक्क झाला. प्रेषित ज्यावेळेला नमाजापूर्वी स्वतःचे हात व तोंड धुवत त्यावेळी आजूबाजूचे मुस्लिम त्यांच्या अंगावरून खाली पडणारे पाणी खाली पडू न देता ओंजळींमध्ये घेऊन आपल्या अंगाला घासत. अशी त्यांची प्रेषितांविषयी आत्यंतिक आदर बुद्धी होती. अनस हे प्रेषितांचे अत्यंत जवळचे सोबती ह्या विषयी म्हणतात की, लोकांना त्यांच्याविषयी इतके विलक्षण प्रेम असूनदेखील त्यांच्याविषयी वाटणाऱ्या आदराने त्यांच्या नजरेला नजर कुणी भिडवीत नसे. हजरत मुघीरा सांगतात की, प्रेषितांच्या एखाद्या सहकाऱ्याला त्यांना बोलवावयाचे असेल तर हातांच्या नखांनी ते त्यांच्या घराच्या दरवाजावरती टकटक करीत असत. एकदा एका पौर्णिमेच्या दिवशी प्रेषित लाल रंगाचे पांघरून घेऊन झोपले होते. हजरत जाबीर इब्ने सम्रा सांगतात की, ते सारखे त्या पूर्णचंद्राकडे एकदा व प्रेषितांच्या चेहऱ्याकडे एकदा असे पाहत होते. असे बऱ्याच वेळेला घडल्यानंतर त्यांनी स्वतःशी असा निर्णय केला की, त्या पौर्णिमेच्या पूर्णचंद्रपेक्षा प्रेषितांचा चेहरा नक्कीच जास्त सुंदर होता!

युद्धांमध्ये शत्रूकडून अनेक वेळा प्रेषितांवरती बाणांचा वर्षाव झाला पण, प्रेषितांभवती त्यांच्या अनुयायांनी नेहमीच कडे केले आणि प्रषितांवरती फेकलेले बाण स्वतःच्या अंगावरती

झेलले. हे सर्व जणूकाही ते रक्तामासांचे बनले असण्याऐवजी लाकडाचेच बनले असावे अशा रीतीने घडत असे. एखाद्या निवडुंगाचे काटे जसे दिसावेत तसे हे बाण त्यापैकी काही जणांच्या शरीरावरती शोभायमान (!) होत असत.

अशा प्रकारचे समर्पण व अत्युच्च कोटीचा आदर नक्कीच दांभिक आढ्यता निर्माण करू शकतो आणि त्यातूनच स्वतःच्या श्रेष्ठत्वाची खोटी भावना निर्माण होऊ शकते. प्रेषितांच्या बाबत असे कधीच घडले नाही. ते सर्वांच्या बरोबर मिळून–मिसळून बरोबरीच्या नात्यानेच वागत. कडवट आणि प्रक्षोभक टीका त्यांचा मानसिक तोल कधीच ढळवू शकली नाही. एकदा एक वाळवंटातील भटक्या त्यांच्याकडे गेला आणि त्यांनी पांघरलेले वस्त्र त्याने इतक्या जोरात ओढले की त्यांच्या मानेवरती वळ उमटला. तो ओरडला, 'मोहम्मद! दोन उंटांच्या पाठीवरती लादला जाईल इतका माल मला तू तुझ्या कोठीतून दे. कारण तो माल काही तुझ्या मालकीचा नव्हे; ना तुझ्या बापाचा.' 'प्रत्येक गोष्ट ईश्वराच्या मालकीची आहे आणि मी तर फक्त ईश्वराचा विनम्र सेवक आहे,' प्रेषित म्हणाले, 'पण काय रे? तू माझ्याशी जे काही वागलास त्याबद्दल तुला भीती नाही वाटत?' तो नाही म्हणाला. प्रेषितांनी कारण विचारल्यावर त्याने फक्त एवढेच उत्तर दिले, 'वाईटपणाचा बदला तू वाईटाने घेत नाहीस हे मला चांगले माहीत आहे!' प्रेषित ऐकून फक्त हसले आणि त्यांनी त्याला एक उंटाच्या पाठीवरती मावेल एवढे जव व तेवढेच खजूर दिले.

ईश्वराच्या भययुक्त आदराने प्रषित जगले आणि ते नेहमीच विनम्रपणा व ईश्वरचरणी लीनत्वाचे चित्र बनून राहिले. ते अगदी मितभाषी होते आणि त्यांच्या चालण्यामधूनसुद्धा ईश्वरावरचा आदर व्यक्त होत असे. टीका त्यांना कधीही संताप आणू शकली नाही. कपडे परिधान करीत असतानासुद्धा ते म्हणत की, 'मी ईश्वराचा विनम्र सेवक आहे आणि त्याला शोभेल अशीच माझी वेशभूषा असायला हवी.' अन्न ग्रहण करीत असताना ते आटोपशीरपणे बसत आणि म्हणत की, 'ईश्वराच्या सेवकाने अशाच तऱ्हेने अन्न ग्रहण करायला हवे.'

स्वतःच्या ईश्वराचे सेवक असण्याबद्दल ते अतिशय भावनाशील होते. एकदा एक सहकारी म्हणाला, 'जर ही ईश्वराची व त्याच्या पैगंबरांची इच्छा असेल तर...' हे ऐकून प्रेषितांचा चेहरा रागाने लाल बुंद झाला. 'काय, तू माझी ईश्वराशी बरोबरी करू लागलास?' आत्यंतिक संतापाने त्यांनी त्या माणसाला विचारले, 'एकट्या ईश्वराची इच्छा असेल तरच, असेच तू म्हणायला हवे' ते म्हणाले. दुसऱ्या एका अशाच प्रसंगी दुसरा एक सहकारी म्हणाला, 'जो ईश्वर व त्याच्या पैगंबरांच्या आज्ञा पाळतो तोच खरा मनुष्य व जो असे करीत नाही तो बहकलेला माणूस होय.' 'तू एक सर्वात वाईट वक्ता आहेस,' प्रेषित चिडून त्या माणसाला म्हणाले. स्वतःचा उल्लेख ईश्वराच्या बरोबरच्या पातळीत व्हावा हे त्यांना कधीही पटले नाही.

प्रेषितांना तीन पुत्र झाले, जे तिनी तान्हे असतानाच मृत्यू पावले. हजरत खदिजांपासून झालेल्या त्यांच्या चारही मुली मात्र चांगल्या प्रौढावस्थेपर्यंत जगल्या. हजरत फातेमा, ह्या मुलींपैकी सर्वांत लहान व त्यांच्यावर प्रेषितांचा विशेष जीव होता. कुठल्याही प्रवासाहून परत आल्यावर, दोन रकात नमाज़ पढल्यावर मशिदीतून ते प्रथम फातेमा जिथे असतील तिथे जात व

त्यांचे हात व कपाळ चुंबीत. जुमै इब्न उमैरा ह्यांनी हजरत आयेशांना, प्रेषितांचे सर्वात जास्त प्रेम कुणावर आहे असे विचारले. त्या उत्तरल्या, 'फातेमा.'

असे असूनही प्रेषितांचे उभे आयुष्य हे भविष्यातील विश्वाच्या विचारांनीच भरलेले असायचे. त्यांनी त्यांच्या मुलांवरती प्रेम केले; पण भौतिक अर्थाने खचितच नव्हे. हजरत अली (फातेमांचे पती) ह्यांनी इब्न अब्दुल वहिद ह्यांना एकदा प्रेषितांच्या 'लाडक्या लेकीबद्दल' एक कहाणी सांगितली. दळण दळून फातेमा ह्यांच्या हाताला फोड आले होते. पाण्याच्या पखाली वाहून त्यांच्या मानेचा काटा ढिला झाला होता. जमिनी झाडून त्यांचे कपडे दररोज मळून जात. एकदा प्रेषितांकडे एक ठिकाणाहून खूपच गुलाम आले. आलींनी त्यांच्या बायकोला, आपल्या वडिलांकडे जाऊन एखादा नोकर मिळतो का ते पाहण्यास सुचविले. फातेमा त्याप्रमाणे आपल्या वडिलांकडे गेल्या; पण त्यांच्या आजूबाजूला असलेल्या लोकांमुळे त्या काहीच बोलू शकल्या नाहीत. प्रेषित दुसऱ्या दिवशी त्यांच्या घरी आले व फातेमा काय निमित्ताने त्यांना भेटायला आल्या होत्या त्याची चौकशी त्यांनी केली. आलींनी त्यांना सर्व कथा सांगितली व हेही सांगितले की, त्यांनीच फातेमांना पाठविले होते. 'ईश्वराचे भय बाळग फातेमा. तुझी ईश्वराविषयीची सर्व कर्तव्ये तू पूर्ण कर आणि चालू असलेले घरकाम करीत राहा. रात्री झोपताना ईश्वराची तेहेतीस वेळा स्तुती कर. तेहेतीस वेळा त्याच्या सृजनाचे उदात्त स्मरण करून स्तुती कर आणि चौतीस वेळा आत्यंतिक आदराने त्याची प्रशंसा कर. असे तू केलेस की शंभरचा आकडा पूर्ण होतो. (घरकाम करण्याची शक्ती तुला ह्यातून मिळेल) तुझे असे वागणे नोकर ठेवण्यापेक्षा नक्कीच तुझ्या कामी येईल,' प्रेषितांनी तिला सांगितले. 'ईश्वर आणि त्याच्या प्रेषिताची अशी इच्छा असली तर असेच घडो,' फातेमा उत्तरल्या. फातेमांच्या मागणीवरती त्यांचे उत्तर हे असे होते. त्यांनी फातेमांना नोकर नाहीच दिला.

प्रेषितांना जे सत्य गवसले होते ते असे होते की, विश्वाची निर्मिती ही विश्वातूनच झालेली नसून अथवा यदृच्छया झालेली नसून ईश्वराने केलेली आहे व त्याचे त्या सृजनावरती लक्ष आहे. प्रत्येक मनुष्य हा त्याचा सेवक आहे आणि स्वतःच्या प्रत्येक कृतीकरता ईश्वराला जबाबदार आहे. मृत्यू हा जीवनाचा शेवट नसून, एका नव्या जीवनाची सुरुवात आहे, जे शाश्वत जीवन होय. ह्या शाश्वत जीवनात चांगली माणसे स्वर्गसुखात (सच्चिदानंदात) निमग्न होतील व दुष्ट माणसांना होरपळून काढणारा अनावर उसळता नरक लाभेल. सत्याच्या ह्या प्रकटीकरणा बरोबर ईश्वरी आज्ञा अवतरल्या ज्यांचा प्रसार जवळ आणि दूर सर्वत्र करायचा होता. त्याप्रमाणे सफाच्या खडकावर चढून प्रेषितांनी ओरडून व हाका मारून सर्व लोकांना गोळा केले. प्रथम त्यांनी ईश्वराची महती गायली व ते पुढे म्हणाले.

'देवाशपथ, तुम्ही जसे झोपी जाता तसे मृत्यू पावाल व झोपून जसे जागे होता इतक्या सहजतेने, तसेच प्रलयाच्या दिवशी मृत्यूनंतर उठवले जाल. तुमच्या प्रत्येक कृतीचा हिशेब घेण्यासाठी असे केले जाईल. चांगल्याचे फळ चांगलेच मिळेल व वाईटाचे वाईट आणि त्यानंतर अनंत काळापर्यंत स्वर्गात 'चांगले' राहील व 'वाईट' नरकात.'

एखादी व्यक्ती स्वतःच्या खाजगी आयुष्यात ज्या वेळेला तिच्या काळाहून वेगळी वागायला लागते त्यावेळी तिला प्रत्येक पायरीवर अडचणींचा सामना करावा लागतो; पण ह्या अडचणी प्रत्येक वेळेला 'जखमा' करणाऱ्याच असतात असे नव्हे. फार तर असे घडल्यामुळे एखाद्या व्यक्तीच्या भावना दुखावल्या जाऊ शकतात. शारीरिक दुःख होईलच असे नाही. कधीकधी अशी वर्तणूक ही शांत संयमाने हाताळायची परीक्षा असते. हे झाले एखाद्याच्या वैयक्तिक वर्तणुकीतील बदलाबाबत. पण तेच जर एखाद्याने सामाजिक परंपरांना सार्वजनिकरित्या विरोध करायचा ध्यास घेतला तर संपूर्ण परिस्थिती बदलून जाते. अशी परिस्थिती त्यावेळेला उद्भवते ज्यावेळी एखादा, लोकांना त्यांनी काय करायला हवे व काय करायला नको ह्याचा 'उपदेश' (!) करायला लागतो. प्रेषित हे फक्त स्वत:चीच ईश्वराची श्रद्धा बाळगणारे नव्हते; तर त्यांच्यावर विश्वासाने ईश्वरी संदेश इतरांपर्यंत पोहोचविण्याची जबाबदारी टाकण्यात आली होती. त्यांच्या ह्या जबाबदारीनेच त्यांना त्यांच्या देशातील लोकांशी वैर पत्करायला लावले. प्रत्येक प्रकारच्या संकटाचा अगदी अन्नाला मोताद होण्यापासून ते थरकांप उडविणाऱ्या युद्धांपर्यंत त्यांच्यावरती वर्षाव करण्यात आला. असे असूनही तेवीस वर्षांच्या, त्यांच्या प्रेषित म्हणून जीवितकार्यात त्यांनी प्रत्येक कृती न्यायीपणाने, चारी बाजूंनी विचार करून दूरदर्शित्वानेच केली. ह्याचा अर्थ असा नव्हे की, मानवी मनाला दुःख देणाऱ्या भावनांपासून ते अलिप्त होते; असलाच अर्थ तर एवढाच की, त्यांची वर्तणूक ही ईश भयामुळेच केवळ अशी होती. त्यांच्या प्रत्येक कृतीवर ईशभयाचे नियंत्रण होते.

प्रेषितांच्या मदीनेतील स्थलांतरानंतर तीन वर्षांनी मक्कावासीयांनी मदीनेवरती जोरदार हल्ला केला, जो इतिहासात, उहदचे युद्ध म्हणून प्रसिद्ध आहे. सुरुवातीला ह्या युद्धात मुसलमानांची सरशी होत होती; पण त्यानंतर प्रेषितांच्या सहकाऱ्यांपैकी काही जणांनी चूक केल्याने शत्रूला युद्धपिछाडीवरून हल्ला करण्याचा अवसर मिळाला आणि मग युद्धाचे पारडे फिरले. अशा आणीबाणीच्या वेळी काही सहकारी युद्धभूमी सोडून पळून जाऊ लागले. शत्रूच्या शस्त्रसज्ज वर्तुळात एकटे प्रेषितच काय ते शिल्लक राहिले. भुकेल्या कोल्ह्या-लांडग्यांप्रमाणे ते सर्व त्यांच्यावर तुटून पडण्याकरिता पुढे झाले. प्रेषितांनी त्यांच्या सहकाऱ्यांना हाका मारायला सुरुवात केली, 'ईश्वराच्या निष्ठावान सेवकांनो, माझ्याकडे परत फिरा,' ते जोराने ओरडले, 'काय असा एकही नाही? जो माझ्याकरिता हुतात्मा होऊन ह्या आक्रमणाविरुद्ध शस्त्र चालवेल आणि ह्या आक्रमणापासून मला दूर नेईल आणि स्वर्गामध्ये माझा सोबती होईल?'

प्रेषित अशा रीतीने मदतीची याचना करीत आहेत, अशा आणीबाणीच्या प्रसंगी आक्रोश करीत आहेत, ही कल्पनाच मोठी भीषण आहे. त्यांचे काही साथीदार त्यांच्या मदतीला धावलेही; पण परिस्थितीच मोठ्या गोंधळाची असल्याने हे महारथी योद्धेही प्रेषितांचे पूर्ण संरक्षण करू शकले नाहीत. उत्बा इब्ने अबी वक्कास ह्याने प्रेषितांच्या दिशेने एक मोठा दगड जोरात भिरकावला; ज्यामुळे त्यांच्या खालच्या जबड्यातील काही दात निखळून पडले. अब्दुल्ला इब्ने कुमैय्या, जो कुरैशांचा खंदा वीर म्हणून प्रसिद्ध होता, त्याने परशूने प्रेषितांच्या शिरस्त्राणावरती घाव घातले. ज्यामुळे शिरस्त्राणाच्या दोन शिवणी त्यांच्या चेहऱ्यामध्ये घुसल्या. त्या इतक्या

खोल घुसल्या होत्या की अबू उबैदाने ज्यावेळी त्या ओढून काढण्याचा प्रयत्न केला त्यावेळी अजून दोन दात उपटून बाहेर आले. ह्यानंतर अब्दुल्ला इब्ने शाहाब झुअ्रीची पाळी होती, ज्याने दगड मारुन प्रेषितांच्या चेहऱ्याला जखम केली. अतिरक्तस्त्रावाने प्रेषित एका खड्ड्यात पडले. बऱ्याच वेळ त्यांचे दर्शन न घडल्याने, ते शहीद झाले, अशी बातमी सर्वत्र पसरली. ह्यानंतर एका सहकाऱ्याने त्यांना त्या खड्ड्यात पडलेले बघितले. त्यांना जिवंत बघून हर्षातिरेकाने नाचायला लागून तो ओरडायला लागला की, 'प्रेषित इथे आहेत!' आपण कुठल्या खड्ड्यात आहोत हे शत्रूला कळू नये म्हणून त्यांनी त्याला हळूच चूप राहण्यासाठी खुणाविले.

अशा ह्या घोर व भीषण प्रसंगी त्यांच्याकडून शत्रूला व त्यातले त्यातही सफ्वान, सुहैल व हरिसकरिता शाप उच्चारले गेले, 'जे लोक प्रत्यक्ष त्यांच्या प्रेषितांना शस्त्रांनी जखमा करतात, त्यांचा उत्कर्ष कसा बरे होऊ शकेल?' ते तळतळाटाने उद्गारले. ईश्वराला हीसुद्धा गोष्ट आवडली नाही आणि जिब्रिल पुढील प्रकटीकरण घेऊन आला.

'ईश्वर त्यांना क्षमा करेल अथवा शिक्षा करेल; ह्या गोष्टीचा व तुमचा थोडाही, कवडीचाही संबंध नाही. ते वाईट मार्गावर चालणारे आहेत.' (कुरआन ३:१२८)

असे खडसाविणे प्रेषितांकरिता पुरेस होते व त्यांनी त्यांचा राग गिळून टाकला. जखमांनी विच्छिन्न अशा तशाही अवस्थेत, ज्यांनी त्यांच्यावर हल्ला केला होता, अशा लोकांकरिता ते ईश्वराकडे प्रार्थना करू लागले. अब्दुल्ला इब्ने मसूद ह्यांनी ह्या प्रसंगाची आठवण नंतर सांगितली ती अशी: प्रेषित एकीकडे आपल्या कपाळावरून ओघळणारे रक्त पुसत होते व दुसरीकडे प्रार्थना करीत होते, 'हे ईश्वरा ह्या 'माझ्या लोकांना' तू क्षमा कर कारण ते काय करत आहेत हे त्यांना माहीत नाही.' (मुस्लिम)

प्रेषितांची निरनिराळ्या लेखकांनी लिहिलेली चरित्रे ही अशा प्रसंगांनी भरलेली आहेत. प्रेषितांचे आयुष्य, हे इतरांनी आयुष्य कसे जगावे? ह्या करिताचे परिपूर्ण मार्गदर्शन होय. ते आपल्याला असे सांगत की, माणूस हा ईश्वराचा सेवक आहे व कुठल्याही परिस्थितीत त्याने ईश्वराचा सेवक म्हणूनच जगावे. ईश्वराचा विनम्र सेवक म्हणून माणसाने ईश्वराच्या व तो आपल्याकडून घेणार असल्याच्या हिशेबाच्या, थरकाप उडविणाऱ्या भीतीसह, त्याने सांगितलेल्या मार्गावर जीवन जगावे. ह्या विश्वामधील प्रत्येक गोष्टीच्या अनुभवाने त्याला ईश्वराचीच आठवण व्हायला हवी. प्रत्येक घटनेमधील ईश्वराचा सहभाग माणसाला कळावा व प्रत्येक वस्तूमध्ये ईश्वराच्या अस्तित्वाची खूण त्याला सापडावी. व्यवहारी दुनियेतील प्रत्येक गोष्टीचा हिशेब सर्वात शेवटी ईश्वराला द्यायचा आहे हे त्याच्या कायम लक्षात हवे. नरकाच्या भीतीने त्याने आपल्या मित्र बांधवांमध्ये विनम्रपणाने जगावे आणि स्वर्गाची इच्छा बाळगताना, त्याला ह्या जगातील आयुष्याचे महत्त्व कळावे. ईश्वराच्या महत्तेची प्रत्येकाला अशी जाणीव असायला हवी की, 'स्वतःच्या महत्तेविषयीचा' प्रत्येक विचार त्याला भयंकर व अवाजवी वाटायला हवा. कुठल्याही टीकेने त्याचा प्रक्षोभ होऊ नये आणि कुठल्याही स्तुतीने त्याने बढाईखोर बनू नये, माजू नये.

अशा सर्वगुणसंपन्न आदर्श चरित्राचे ईश्वराने त्याच्या प्रेषिताच्या जीवनाच्या रूपाने आपल्याला दाखविले आहे.

# ४ उदात्त चारित्र्य

कुरआनमध्ये प्रेषित मोहम्मद ह्यांचा 'उदात्त चारित्र्याचा' असा उल्लेख करण्यात आला आहे. (६८:५) पुढे प्रेषितांची दोन अवतरणे दिली आहेत, ज्यायोगे उदात्त चरित्र म्हणजे काय? ह्याच्यावर थोडा प्रकाश पडावा.

'एखाद्याने माझे भले केले तर मी त्याचे भले करीन व एखाद्याने माझे वाईट केले तर त्याचे वाईट, असे म्हणून स्वतःच्या चारित्र्याचा पाया कधीच उखणून टाकू नका. ह्यापेक्षा अशी सवय लावून घ्या की, जे आपले भले करतील त्यांचे भले करणे व जे आपल्याला हानी पोहोचवतील त्यांच्या होताहोईतो वाईट न करणे.' (मिश्कात अल् मसाबिह्)

'जे तुमच्याशी नाते तोडून टाकतील त्यांच्या हातात हात मिळवा. जे तुमच्याशी चुकीचे वागतील त्यांना क्षमा करा व जे तुमचे नुकसान करतील त्यांच्याशी चांगले वागा.' (राझिन)

उदात्त चारित्र्याचे वर दिलेले वर्णन त्याच्या सर्वोच्च स्वरूपामध्ये आपल्याला खुद्द प्रेषितांमध्येच आढळते. अशा चारित्र्याची एखाद्या मुस्लिमाकडून केवळ एक वाढीव चांगली बाब म्हणून अपेक्षा आहे; पण एखाद्या प्रेषिताची तर ती मूलभूत गरज असते.

चारित्र्याच्या दोन पातळ्या असतात. एक सामान्य व दुसरी उच्च कोटीतील. सामान्य चारित्र्य हे पुढील तत्त्वावर आधारित असते. तुम्हाला जसे वागविले गेले, त्याचे उत्तर म्हणून तसेच वागा. अशा चारित्र्याला आपण 'गुडघ्याचा हिसका (!)' चारित्र्य म्हणूयात. कारण अशी माणसे ही केवळ त्यांना मिळणाऱ्या वागणुकीची प्रतिक्षिप्त क्रिया म्हणून वागत असतात. एखाद्याने आपल्याशी तोडून टाकले म्हणून त्याच्याशी तोडून टाकणे. एखादा चुकीचा वागला म्हणून त्याच्याशी तसे चुकीचे वागणे. ज्यांनी नुकसान केले त्यांचे नुकसान करणे, ह्या प्रमाणे अशा लोकांची वर्तणूक असते.

ह्याहून उच्च पातळीवरचे चारित्र्य हे पुढील तत्त्वावर आधारित असते: असेच वागा, जसे तुम्हाला वागायला हवे. अशा चारित्र्याची माणसे मित्र व शत्रूंशी आपल्याला मिळणाऱ्या वर्तणुकीची दखल न घेता एकाच तऱ्हेने वागत असतात. ती जुळवणूक करणारी असतात. अगदी त्यांच्याशी तोडणाऱ्यांबरोबरसुद्धा अशी माणसे जुळवून घेतात. जी माणसे त्यांचे नुकसान करतात अशांशीही ही उच्च चारित्र्याची माणसे दयाबुद्धी दाखवितात. चुकीचे वागणाऱ्यांचीही अशी माणसे अतिशय संयमाने व धीराने वागतात.

फ्रेंच तत्त्वज्ञ व्हॉल्तेर (१६९४–१७७८) म्हणतो की, 'स्वतःच्या हुजऱ्याशी कुणीच उदात्तपणे वागत नाही. तुमच्या हुजऱ्याला तुम्ही कधीच नायक वाटत नाही.' ह्याचे कारण म्हणजे तुमच्या खाजगी व व्यक्तिगत आयुष्याशी तुमचे हुजरे संबंधित असतात आणि स्वतःच्या खाजगी आयुष्यात कुणीच परिपूर्ण नसतो. अत्यंत जवळची माणसे, व्यक्तीचे मूल्यमापन, उच्च कोटीतले व्यक्तिमत्व म्हणून कधीच करू शकत नाही. जितके ते लांबची माणसे करतात. ह्यामुळेच जवळची

माणसे एखाद्याला 'नायक' म्हणून पाहू शकत नाहीत. सोरेन स्मिथने लिहून ठेवल्याप्रमाणे, ही गोष्ट इस्लामच्या प्रेषितांबद्दल मात्र खरी नाही. इतिहास साक्ष देतो की, जी माणसे प्रेषितांच्या थोडीशी जवळ यायला लागली, ती त्यांच्या एकेका बारीक सारीक गुणांमुळे अजूनच जवळची होऊन जाऊ लागली.

बनोमान नावाच्या 'ताई' टोळीच्या एका शाखेवरती एकदा कैन इब्ने जस्त्र नावाच्या टोळीने हल्ला केला. लुटालूट करीत असताना त्यांनी ज़ैद नावाच्या एका आठ वर्षांच्या मुलाला पकडले. त्यानंतर येणाऱ्या उक्काझच्या यात्रेत त्यांनी त्याला गुलाम म्हणून विकून टाकले. महत्त्वाच्या योगायोगाने गोष्ट अशी घडली की, तो मुलगा प्रेषितांच्या सेवेमध्ये दाखल झाला. कारण त्याला विकत घेतलेल्या लोकांनी त्याला हजरत खदिजांना, त्यांचा प्रेषितांशी विवाह होण्याच्या थोडेच दिवस आधी, भेट म्हणून दिला होता. मुलाच्या वडिलांना व चुलत्यांना त्याचा ठावठिकाणा कळल्यावर ते त्याला परत मिळवून घरी नेण्यासाठी मक्केला आले. प्रेषितांना भेटून ते म्हणाले की, 'प्रेषित जर मुलाला परत द्यायला तयार असतील तर ते म्हणतील ती भरपाई द्यायला ते तयार आहेत.' प्रेषितांनी त्यांना सांगितले की ज़ैदची जर त्यांच्याबरोबर परत जाण्याची इच्छा असेल तर त्यांना कुठल्याही प्रकारची भरपाई नको. त्यांनी ज़ैदला बोलाविले व तो ह्या माणसांना ओळखतो का म्हणून विचारले. ज़ैदने ते दोघे, आपले वडील व चुलते असल्याचे सांगितले, 'ते तुला परत न्यायला आले आहेत,' प्रेषित म्हणाले. 'मला तुम्हाला सोडून दुसरीकडे कुठेही जायचे नाही' ज़ैद उत्तरला. ज़ैदच्या ह्या उत्तराने त्याचे वडील व चुलते क्रोधायमान झाले. 'काय तुला स्वातंत्र्याहून गुलामी बरी वाटते? स्वतःच्या कुटुंबकबिल्यापासून दूर दुसऱ्या लोकांच्यात राहायला आवडते तुला?' त्यांनी विचारले. 'मला एका मोहम्मद व्यतिरिक्त दुसऱ्या कुणाहीबरोबर राहायचे नाही. आता इतके दिवस त्यांच्याजवळ राहून, त्यांचे गुण बघितल्यावर तर नाहीच नाही,' ज़ैदने उत्तर दिले. असे घडल्यावर, मुलानेच अशी नाचक्की केल्यावर, घरी परत जाण्याव्यतिरिक्त दुसरा पर्याय त्या बिचाऱ्या दोघांकरिता शिल्लक राहिला नाही. प्रेषितांची आकर्षित करून घ्यायची शक्ती ही अशी उच्च कोटीतली व फार मोठी अशी होती.

हा प्रसंग प्रेषितांना प्रेषितत्व बहाल केले जाण्याआधीचा आहे, जो त्यांच्या अंगभूत मृदुता व सौम्यतेवर प्रकाश टाकतो. कुरआनने त्यांच्या ह्या गुणाचा उल्लेख पुढीलप्रमाणे केला आहे:

'ईश्वराच्या कृपेचे आभार मानायला हवेत आणि तुम्ही (प्रेषित) त्यांच्याशी (लोकांशी) दयाबुद्धीने वागलात. तुम्ही जर (थोडेसेही) क्रूर अथवा कठिण हृदयी असता तर नक्कीच त्यांनी तुम्हाला कधीच घालवून दिले असते.' (३:१५९)

प्रेषितांच्या उदात्त औदार्याने त्यांना लोकांची हृदये जिंकण्याची शक्ती मिळाली. त्यांच्या सात्त्विक गुणांनी, एखादा त्यांच्या जितक्या जवळ यायचा तेवढा जास्त जिंकला जायचा.

प्रेषित एकदा म्हणाले, 'नात्याचे बंध मजबूत करणे ह्याचा अर्थ असा नव्हे की, तुम्ही तुमचे बंध त्यांच्याशी दृढ करावेत जे त्यांचे बंध तुमच्याशी दृढ करतात. तर ह्याचा अर्थ असा की,

अशांशी तुमचे बंध जोडण्याचा प्रयत्न करणे, जे त्यांचे तुमच्याशी असलेले बंध तोडून टाकतात.' बहुचर्चित अशी आयेशांवरच्या (प्रेषितांच्या पत्नी व हजरत अबू बकर ह्यांच्या कन्या) व्यभिचाराच्या आरोपानंतरची एक घटना ही अशी तत्त्वाच्या वर्तणुकीचे सुयोग उदाहरण होय.

बनो अल् मुस्तालिकच्या मोहिमेनंतर (६, हिजरी शक) परतत असताना हजरत आयेशा मागे राहिल्या व मग असा आरोप केला गेला. त्यांचे संरक्षण प्रेषितांच्या एका 'सफ्वान इब्न मुआत्तल' नावाच्या तरुण सहकार्याने केले होते. खरे तर हा आरोप म्हणजे निव्वळ कुटाळखोरपणा होता. इस्लामच्या इतिहासात हा साराच प्रसंग, 'कुटाळकीची घटना' म्हणूनच प्रसिद्ध आहे. मिस्ताह् नावाचा अबू बकर ह्यांचाच एक नातेवाईक ह्या 'कथेचा' रचयिता व प्रचारक होता. अबू बकर ह्यांच्या कानावरती जेव्हा ही गोष्ट पडली की, मिस्ताह् हा आपल्या निरागस मुलीच्या चारित्र्यहननात भाग घेणाऱ्यांपैकी होता, त्यावेळी ते त्याला गरजू नातेवाईक म्हणून देत असलेली मदत त्यांनी थांबविली. अबू बकर ह्यांनी असे पाऊल उचलल्यावर ईश्वराने कुरआनातील पुढील आयाती प्रकट केल्या:

'तुमच्यापैकी आदरणीय व श्रीमंत लोकांनी, त्यांच्या गरीब बांधवांना, जे ईश्वरासाठी स्थलांतरित होऊन आले आहेत, त्यांना मदत न देण्याची शपथ घेता कामा नये. उलट त्यांना क्षमा करून त्यांच्याकडे विशेष लक्ष द्यायला हवे. ईश्वराने तुम्हाला क्षमा करावी अशी तुमची इच्छा नाही काय? ईश्वर क्षमाशील व दयावान आहे.'(२४:२२)

ह्याचा अर्थ एवढाच की, एखाद्याच्या वाईट वर्तणुकीकरिता त्याला आर्थिक मदतीपासून वंचित केले जाऊन नये. त्याच्या चुकांकडे थोडेसे दुर्लक्ष करून त्याला देत असलेली मदत आपण चालू ठेवली पाहिजे.

एक मनुष्य एक दिवस अचानक कुठूनसा आला व हजरत अबू बकर प्रेषितांबरोबर असताना त्यांना अपमानास्पद काही बोलला. अबूबकरनी ऐकून न ऐकल्यासारखे केले व ते शांत बसले. तरीही त्याचा शिव्यांचा पट्टा चालूच. अबूबकर शांतच होते. इतके होऊनही त्या माणसाच्या शिव्या संपेचनात. मग मात्र एकाक्षणी त्यांचा तोल ढळला व त्यांनी प्रत्युत्तर केले. ते ऐकल्यावर प्रेषित झटक्यात उठले व निघून गेले. 'ईश्वराच्या प्रेषिता, आपण असे उठून का गेलात?' अबू बकरांनी चौकशी केली. 'ईश्वराचा दूत तुमच्याकरिता उत्तर देत होता; पण तुमचा एकेक्षणी भडका उडाला व ईश्वराचा दूत निघून गेला.' प्रेषितांनी सांगितले. जोपर्यंत तुम्ही स्वतःच एखाद्याचा सूड घ्यायचा निर्णय घेत नाही तोपर्यंत तुम्हाला केल्या जाणाऱ्या हानीचा बदला ईश्वर स्वतःच घेत असतो. प्रेषितांना हाच महत्त्वाचा धडा ह्यातून शिकवायचा होता. जो स्वतः सूड घ्यायची इच्छा धरतो, त्याच्यावरती त्याचक्षणी ईश्वर ही जबाबदारी टाकून मोकळा होतो. अर्थातच बदला जर ईश्वराने स्वतः घेतला तरच तो पूर्ण असणार ह्यात शंकाच नको.

एका ज्यू पंडिताकडून प्रेषितांनी एकदा काही रक्कम उधार घेतली. काही दिवसांनी तो ज्यू त्याच्या रकमेची मागणी करीत आला. 'ह्या क्षणी तरी माझ्याकडे तुला परत देण्यासाठी काहीही नाही,' प्रेषितांनी त्याला सांगितले. 'तू मला पैसे देईपर्यंत मी तुला जाऊ देणार नाही,'

तो ज्यू कडाडला. आणि प्रेषितांना कैदी बनवून तो तिथेच सकाळपासून रात्रीपर्यंत बसून राहिला. एव्हाना प्रेषित मदिनेचे सर्वसत्ताधीश बनले होते व जर त्यांनी मनात आणले असते तर कुठल्याही प्रकारची शासकीय कृती ते त्या ज्यूविरुद्ध करू शकत होते. प्रेषितांच्या सहकाऱ्यांची अर्थातच त्या ज्यूला धमकावून हाकलून द्यावे अशी इच्छा होती. प्रेषितांनी त्यांना अशी कृती करण्याची मनाई केली. 'पण एका ज्यूने तुम्हाला कैदी बनवावे?' त्यांनी चिडून विचारले. 'खरे आहे, पण ईश्वराने आपल्याला एखाद्याला हानी पोहोचविण्याची बंदी केली आहे,' प्रेषित उद्गारले. रात्री नंतरचा दिवस उगवला. पहाटेच्या प्रकाशाबरोबरच त्या ज्यूचेही डोळे उघडले. सत्ता असूनही ती न वापरण्याची शक्ती, सहनशीलता ह्या प्रेषितांच्या गुणांनी तो मुळापासून इतका बदलला की त्याने इस्लामचा स्वीकार केला. हा ज्यू अतिश्रीमंत आसामी होता. कालपर्यंत तो प्रेषितांच्या मागे काही 'कवड्यांकरिता' लागला होता व त्यांना पकडून ठेवले होते; पण आज मात्र प्रेषितांच्या वर्तणुकीने तो इतका भारावून गेला होता की स्वतःची अमाप संपत्ती प्रेषितांना द्यायला तयार होता व म्हणत होता, 'तुम्हाला हवा तसा ह्या संपत्तीचा विनियोग करा.'

अब्दुल्ला इब्ने अबू अल् हस्मा एकदा प्रेषितांशी काही पैशाचा व्यवहार करीत होते. पैशाचे व्यवहार पूर्ण होण्याआधीच त्यांना काही अत्यंत निकडीच्या कामाकरिता घरी जावे लागले. 'इथे जरा थांबा', ते प्रेषितांना म्हणाले, 'मी घरी जाऊन आल्यावर आपण आपला व्यवहार पूर्ण करू.' घरी गेल्यानंतर ते अशा काही कामांमध्ये गुंतले की आपण दिलेल्या वचनाची आठवण त्यांना राहिली नाही. तीन दिवसानंतर (!) त्यांना आठवण झाली आणि परत ते ठरलेल्या स्थळी गेले. त्याच जागी अजूनही प्रेषित वाट पाहत आहेत असे त्यांना आढळले. प्रेषित अब्दल्ला इब्ने अबू-अल् हस्मांना एवढेच म्हणाले, 'तू मला एकुण फारच त्रास दिलास. भल्या गृहस्था मी तुझी तीन दिवस वाट पाहतो आहे.' अगदी पाषाण हृदयी माणसालाही पाझर फुटेल अशी आकर्षणशक्ती ह्या वर्तनात दिसून येते.

एकदा काही राबी (यहुदी धर्मशास्त्र शिकविणारे लोक) प्रेषितांना भेटायला आले. ज्यावेळी ते घरामध्ये शिरले, तेव्हा नेहमीच्या 'अस्सलामु अलैकुम' (ईश्वर तुम्हाला शांती देवो) अशा शुभेच्छा देण्याऐवजी ते म्हणाले, 'अस्सलामु अलैकुम' (तुमच्याकरिता मृत्यू /लवकर मर मेल्या!) हजरत आयेशांनी हे ऐकले व त्यांना राहविले नाही. त्या म्हणाल्या, 'त्यापेक्षा तुम्हीच मरा, ईश्वर तुमचे तळपट करो.' प्रेषितांनी आयेशांना असे उलट उत्तर न देण्याविषयी बजावले. 'ईश्वर अतिशय सौम्य व दयाळू आहे आणि प्रत्येक गोष्टीत आपणाकडून त्याचीही अशी अपेक्षा असते,' ते म्हणाले. कठोर आणि कडू भाषेचा जबाब सौम्य व मिठास वाणीने देणे, ह्या सारखा एखाद्या व्यक्तीचे मन जिंकण्याचा खरोखर दुसरा चांगला मार्ग नाही. शस्त्रसज्ज जोरदार हल्ल्याचा सुद्धा एखादेवेळी प्रतिकार करता येतो; पण उदात्त वर्तणूक ही स्वतःच एक अशी शक्ती असते की तिचा प्रतिकार कुणालाच करता येत नाही. कुठल्याही परिस्थितीत जिंकण्याकरिता हिच्यासारखा खरोखरच दुसरा पर्याय नाही.

'ताएफ' मधली वात्रट आणि दुष्टपोरे ज्यावेळी एका संध्याकाळी, प्रेषितांना दगडांनी व

चिखलाने मारा करून सडकत होती, गावातून हाकलून देताना पाठलाग करीत होती, त्यावेळी प्रेषितांसारख्या उच्च कोटीतल्या माणसाला किती भयंकर परिस्थितीला तोंड द्यावे लागले त्याची आपण कल्पनाच न केलेली बरी. हिजाज़च्या राजघराण्यातील माणसे उन्हाळा घालविण्यासाठी ताएफला येत असत आणि त्यांना इस्लामच्या दीक्षेचे निमंत्रण देण्यासाठी प्रेषितांनी मक्केपासून ही पन्नास मैलांची सफर आखली होती. ताएफच्या सरदारांनी प्रेषितांचे गोड आणि चांगले भाषण ऐकले तर नाहीच; उलट ताएफच्या वात्रट आणि द्वाड पोरांना त्यांच्या पाठीमागे लावून दिले. ताएफमधून हाकलून देताना ह्या पोरांनी त्यांचा पाठलाग सुरू केला. अगदी चांगली रात्र पडल्यावर, रात्रीनेच अडथळा आणल्याने, पोरांचा पाठलाग थांबला. प्रेषितांचे सर्वांग जखमांनी, पायाच्या नखापासून डोक्यापर्यंत रक्ताळले होते. धावून धावून दमल्याने ते थकले होते. अशा परिस्थितीत त्यांनी रस्त्यावरच्या एका मळ्याचा आश्रय घेतला. कुठल्याही सामान्य माणसाकरिता ह्याहून धक्क्याचा आणखी कुठला प्रसंग असू शकतो? पुढे हजरत आयेशांशी बोलताना प्रेषित म्हणाले की, ती त्यांच्या आयुष्यातली सर्वात अवघड रात्र होती; पण अशा जिवावर उठलेल्या प्रसंगीही प्रेषितांनी त्यांच्या वैऱ्याच्या नाशाची इच्छा केली नाही. ते फक्त एवढेच म्हणाले की, 'ईश्वरा, त्यांना योग्य मार्गदर्शन कर. कारण ते काय करताहेत हे त्यांना ठाऊक नाही.' प्रेषितांचे सर्व चरित्र हे असे उदात्त होते आणि शेवटी ह्या चरित्रानेच त्यांच्या सर्व विरोधकांचा कब्जा घेतला आणि सर्व अरेबियाने इस्लामची दीक्षा घेतली. प्रेषितांचे उदात्त आत्मतत्त्व हेच सर्वकाही जिंकण्यास समर्थ होते. कुठल्याही प्रकारचा पूर्वग्रह, विरोध, वैमनस्य, दुराग्रह प्रेषितांमध्ये असलेल्या जादूभऱ्या सत्‌च्या शक्तीशी कधीच सामना करू शकले नाहीत.

## खवचटपणा व कडवटपणाचा अभाव

हुदाय्‌बिय्या येथे प्रेषितांनी कुरैशांशी तीन अटींवर तह (हि.श.६) केला होता. त्यातली एक अशी होती की, मक्केच्या कुठल्याही इसमाने इस्लाम स्वीकारून तो मदिनेला स्थायिक होऊ इच्छित असला तरी मुस्लिमांनी त्याला परत कुरैशांच्या स्वाधीन करायला हवे; पण हेच जर मदिनेचा एखादा मुस्लीम मक्केला गेला तर त्याला परत कधीही मक्केचे लोक मदिनेला पाठविणार नाहीत. ह्या तहाची शाईही वाळली नसेल एवढ्यात अबू जंदल नावाचा एक तरुण हुदाय्‌बिय्या येथे पळून आला. त्याचे सर्व शरीर काठीच्या वळांनी व दगडांच्या चेचण्याने भरलेले होते. साखळदंडांच्या जखमांनी त्याचे शरीर भरले होते. 'माझे शत्रूंपासून संरक्षण करा,' असा आक्रोश त्याने मुस्लिमांकडे केला. सर्वांच्या भावनांना हात घालणारा असा हा क्षण होता. प्रेषितांच्या सहकाऱ्यांनी त्यांच्या तलवारी सरसाविल्या. अबू जंदलची ती भयानक अवस्था पाहून तह मोडून टाकण्याकरिता सर्वच मुस्लिमांच्या भावना चेतावल्या गेल्या. त्यांना अबू जंदलचा जीव वाचवायचा होता. आपल्या दरम्यान केल्या गेलेल्या तहाची अंमलबजावणी करण्याची ही एक उत्तम संधी आहे ह्याची आठवण ह्या दरम्यान कुरैशांनी प्रेषितांना करून दिली. ज्या अटींनिशी तह झाला त्या अटींपासून माघार घेणे बरोबर नाही असा निर्णय प्रेषितांनी दिला. अबू जंदलला परत कुरैशांच्या स्वाधीन करण्यात आले. वरवर पाहता प्रेषित एका निष्पाप माणसाला त्याच्या

छळवाद्यांपासून सोडविण्याऐवजी परत त्यांच्याच पंजात देत होते. पण खरे पाहता ते नैतिकतेच्या सर्वोच्च पातळीवर कृती करीत होते. ह्या उच्च प्रकारच्या नैतिक वागणुकीने, जी आजवर दुसरीकडे कुठेच पाहण्यात आली नव्हती. पिळवणूक करणारे गडबडून गेले आणि आश्चर्याने चकित झाले. एवढे सगळे झाल्यावर अबू जंदलला बरोबर घेऊन जाऊन तुरुंगात कैद करण्याव्यतिरिक्त त्यांना दुसरे काहीच करता आले नाही. उलट हा प्रसंग मक्कावासियांच्या स्खलनाचा व नाचक्कीचा आणि इस्लामच्या उच्च नैतिकतेच्या उदयाचा प्रतिनिधिक प्रसंग बनला. ह्या प्रसंगाने अनेक मक्कावासी इस्लामच्या उच्च व उदात्त नैतिक मूल्यांनी जिंकले गेले व उघड–उघड इस्लामचा पुरस्कार करून स्वीकार करू लागले. अबू जंदलचे मक्केतील अस्तित्व प्रेषितांच्या उच्च श्रद्धेची जिवंत खूण बनून गेले. कैदी असूनसुद्धा अबू जंदलचे अस्तित्व त्याच्या विरोधकांना त्यांच्या राष्ट्रीय सुरक्षेला धोक्याचे वाटू लागले. अत्यंत सावध व दूरदर्शीपणाचा विचार करून त्यांनी अबू जंदलची मुक्तता केली व त्याला मक्केतून घालवून दिले.

मदिनेचे धार्मिक व राजकीय नेतृत्व करीत असताना प्रेषितांनी एकदा काही स्वार नज्दला पाठविले, जिथले लोक शपथ खाऊन त्यांचे वैरी बनले होते. वाटेमध्ये त्यांना यमामा शहराचा राजा, समामा इब्ने उसाल भेटला, त्याला कैद करून त्यांनी मदिनेत आणले व मशिदीच्या एका खांबाला दोऱ्यांनी बांधून टाकले. प्रेषित त्याची चौकशी करीत आले. 'जर तुम्ही मला मारून टाकले तर माझे लोक माझ्या रक्ताचा बदला घेतील; पण जर तुम्ही मला सोडून दिले तर मी नेहमीच तुमचा उपकृत राहीन आणि जर तुम्हाला पैसेच हवे असेल तर मी वाटेल तेवढी संपत्ती द्यायला तयार आहे,' तो म्हणाला. प्रेषितांनी जरी त्याला शरीराने मारले नाही तरी आपल्या सौम्य व गोड वागण्याने आणि संपूर्णतः मानवी वर्तणुकीने त्याचा आत्मा जिंकून टाकला. त्याला सोडून दिल्यावर समामा प्रथम एका बागेत गेला, तिथे त्याने अंघोळ केली. आंघोळ करून तो शरीराने पवित्र झाला व मग परत मशिदीत परतला. तो परत कशासाठी आला आहे असा प्रश्न पडून लोकांनी आश्चर्य व्यक्त केले; पण जेव्हा जोराजोराने कलमा पढून, त्याने इस्लाम स्वीकारल्याची घोषणा केली; त्यावेळी लोकांना कळाले की त्याला सोडून देऊन प्रेषितांनी त्याला इस्लामचा कायमचा गुलाम (!) बनविला होता. समामा नंतर मक्केला यात्रेसाठी गेला. मक्कावासियांना हे जेव्हा कळाले त्यावेळी ते त्याला म्हणाले की, इस्लाम स्वीकारून तू आपल्या धर्माचा त्याग केलास. 'मी धर्माचा त्याग अजिबात केलेला नाही. उलट आता मी खरोखरच्या ईश्वराच्या व त्याच्या प्रेषिताच्या धर्माचा अवलंब करीत आहे,' समामा म्हणाला. ह्याहून महत्त्वाची गोष्ट म्हणजे समामाच्या इस्लामीकरणाने इस्लामी लष्करी व इतर सर्व प्रकारची ताकद अजूनच बळकट झाली. यमामा ही एक अशी मुख्य जागा होती की, जिथून मक्कावासी वर्षभराचे धान्यधुन्य गोळा करीत. समामाने त्यांना सांगून टाकले की, प्रेषित हजरत मोहम्मद (स.) ह्यांच्या परवानगी विना मक्कावासियांना यमामातून धान्याचा एक दाणासुद्धा मिळणार नाही. उदात्त वर्तणूक, जरी कधी कधी तिला व्यवहारी मूल्य नसले तरीसुद्धा सर्व जग जिंकू शकते हे आपल्याला समामाच्या उदाहरणावरून स्पष्ट होते.

उदात्त नैतिक आचरण पत्करणे ह्या वाक्याचा थोडक्यात अर्थ सांगायचा तर तो पुढील प्रमाणे होईल. दुर्बळ आणि सबळ ह्यांना एकाच समबुद्धीने वागणूक द्यायची. स्वतःकरिता अशीच मूल्ये ठरवायची जी दुसऱ्यांकरिता आधी आपण ठरविलेली असतात. तत्त्वच्युती कधीही होऊ द्यायची नाही. दुसऱ्याने स्खलनाच्या खोल डोहात जरी बुडी मारली तरी आपण स्वतः आपली उच्च नैतिक वर्तणूक सोडायची नाही. असा विचार जर केला तर आपल्या लक्षात येईल की, प्रेषित हे मानवी नैतिकतेच्या कळसावर होते आणि ज्या उच्च व उदात्त मूल्यांचा त्यांनी 'ओरडून' पुरस्कार केला, त्यांचा त्यांनी स्वतः कधीही त्याग केला नाही. कुठल्याही प्रकारची मोहीम अथवा वाद त्यांना अनैतिकतेकडे वळवू शकला नाही अथवा अनैतिकतेचा आसरा देऊ शकला नाही. त्यांचे सर्वात जवळचे सहकारी आणि त्यांची वर्तणूक ही आपण ह्या गोष्टीचा निखालस पुरावा म्हणून देऊ शकतो. ह्याहून दुसऱ्या पुराव्याची गरज ती काय?

सईद इब्ने हिश्शाम (त्यांना शांती लाभो) हे प्रेषितांच्या लगोलग नंतरच्या पिढीतले होते. त्यांनी एकदा हजरत आयेशांकडे त्यांच्या मृत पतीच्या चरित्राविषयी माहिती विचारली. 'प्रेषित म्हणजे कुरआनचे मूर्तीमंत मानवीकरण' त्या उत्तरल्या. कुरआनाच्या स्वरूपात लोकांपुढे त्यांनी जीवनाच्या ज्या स्वरूपाचा पुरस्कार केला, त्याप्रमाणे त्यांनी आपल्या जीवनाचा मार्ग तंतोतंत तसा आखून घेतला होता, असा ह्या बोलण्याचा अर्थ होय. हजरत अनस इब्ने मलिक ह्यांनी प्रेषितांची दहा वर्षे चाकरी केली. ते सांगतात, 'प्रेषितांनी त्यांना कधी दटावले सुद्धा नाही. मी एखादी गोष्ट का केली नाही? त्यावेळी मी ती का केली नाही अथवा तशीच का केली नाही, असेही ते कधी बोलले नाहीत. आणि ज्यावेळी मी एखादी गोष्ट केली, त्यावेळी मी ती का केली म्हणूनही कधी ते मला बोलले नाहीत. ते मी पाहिलेल्या सर्व माणसांमध्ये चांगल्या स्वभावाचे असे होते.' आयेशा सांगतात की, 'त्यांनी नोकरांना, बायकांना किंवा इतर कुणालाही कधीही मारले नाही.' जे बरोबर, त्याचकरिता ते कायम झगडले. ज्यावेळी एखाद्या गोष्टीला दोन पर्याय असायचे त्यावेळी पापाचा जर नसला तर नेहमीच ते सोपा पर्याय पत्करीत. पापाला टाळण्यात त्यांच्याइतकी काळजी दुसऱ्या कुणी कधी घेतली नसेल. त्यांच्या स्वतःशी वाईट वागल्याबद्दल केवळ स्वतःसाठी त्यांनी कधीच कुणाचा सूड उगविला नाही; पण ईश्वरी आज्ञांचा जर कुणाकडून भंग झाला असेल तर ईश्वराकरिता ईश्वराचा प्रतिनिधी म्हणून मात्र अशा आज्ञाभंगाचे ते यथायोग्य मोजमाप करीत.'

प्रेषितांच्या अशा वागण्याने ते त्यांच्या शत्रूंच्या नजरेतही आदरणीयच ठरले. त्यांचे अनुयायी सर्व प्रकारच्या, अत्यंत कठीण व कमनशिबी परिस्थितीत असतानाही म्हणूनच त्यांच्याबरोबर उभे राहिले. त्यांना दुःख दबावाच्या व जिंकल्यावर मिळालेल्या उच्च अशा सर्व परिस्थित्यांमध्ये सारखेच प्रेम मिळाले. त्यांच्या जवळच्या सहकाऱ्यांना ते नेहमीच कलंकविरहित चंद्रासारखे भासले, जसे ते दुरून पाहिल्यावरही दिसत. त्यांनी मानव्याला आत्यंतिक उदात्ततेच्या जीवनाचे उदाहरण घालून दिले. त्यांच्या वर्तणुकीतून जी नेहमी दिसत असत, अशा उच्च मूल्यांवरच त्यांनी त्यांचे सर्व आयुष्य घडविले होते. त्या तत्त्वांमध्ये ते कधीही इतकेही

ढळले नाहीत. ही तत्त्वे त्यांच्या आयुष्याचा कायमस्वरूपी भाग होती. त्यांनी त्यांचा अवलंब, त्यांच्या अनुयायांशी व ज्यांनी त्यांना त्रास व दुःख दिले अशा सर्वांशीच एकाच मोजमापने केला.

इस्लामपूर्वकाळातही जे अज्ञान व अंधारयुग म्हणून ओळखले जाते, पवित्र काबाचे द्वारपाल असणे, ही मोठ्या मानाची गोष्ट समजली जाई. अत्यंत प्राचीन काळापासून ही गोष्ट एका कुटुंबाकडे सोपविली गेली होती. प्रेषित मोहम्मद (स.) ह्यांच्यावेळी ह्या कुटुंबातील कर्ती व्यक्ती प्रेषितांच्या ताब्यात आली.

प्रेषितांच्या परंपरांचे, हदीसचा, सर्वात मोठा संग्रह करणारे, विद्वान बुखारी ह्या सर्व प्रसंगाचे वर्णन पुढीलप्रमाणे करतात. मदिनेला स्थलांतर करण्याआधी प्रेषितांना एकदा काबामध्ये जाऊन प्रार्थना करण्याची इच्छा झाली. त्यांनी उस्मानकडे काबाचा दरवाजा उघडण्यासाठी किल्ल्या मागितल्या. उस्मानने त्यांना किल्ल्या तर दिल्या नाहीच उलट त्यांचा अपमान केला. प्रेषित म्हणाले, 'उस्मान, कदाचित एक दिवस असा येईल की, ज्या दिवशी ह्या किल्ल्या माझ्याकडे असतील व त्यांचा सर्वाधिकारी मी असेन. तो दिवस कदाचित तूही पाहशील'. 'तुझ्यासारख्या एखाद्याच्या हाती काबागृहाच्या किल्ल्या जाण्याचा दिवस कुरैशांकरिता खरोखर उपमर्दाचा व अनर्थाचा असेल,' उस्मान उत्तरला.

मग तो दिवस खरोखर आला, ज्या दिवशी प्रेषितांनी मक्का जिंकली व मक्केचे सर्वोच्च नेते म्हणून त्यांनी मक्केत प्रवेश केला. पवित्र शहरात प्रवेश केल्यावर पहिले काम त्यांनी काबागृहात (ईश्वराचे घर) जायचे ठरविले. त्यांनी काबागृहाला सात प्रदक्षिणा घातल्या. मग त्यांनी उस्मान इब्ने तल्हाला पुकारले. एक परंपरेनुसार असे मानले जाते की, हुदाय्बिय्याचा तह ते मक्केवरचा अंतिम विजय ह्या दरम्यान उस्मानने इस्लाम स्वीकारला होता. प्रेषितांनी त्याच्याकडून किल्ल्या घेतल्या, काबागृह उघडले व ते आत मध्ये गेले. काबागृहाच्या भिंतींना चिटकून उभ्या असलेल्या देवतांच्या मूर्तीभंजनामध्ये त्यांचा वेळ गेला.

नंतर ते बाहेर आले. त्यांच्या हातामध्ये काबागृहाच्या किल्ल्या होत्या आणि ओठावर कुरआनची पुढील आयात होती: 'ईश्वर तुम्हाला आज्ञा देतो की, त्यांचा तो हक्क विश्वस्तपणे तुम्ही परत करावात.'(४:५८)

ह्यानंतर प्रेषितांचा चुलतभाऊ व जावई असलेले हजरत अली उभे राहिले व म्हणाले, 'ईश्वराच्या आशीर्वाद तुम्हाला लाभो; पण आमच्या बनो हाशिम कुटुंबाकडे यात्रेकरूंना पाणी पुरविण्याचे काम असे व आता तर अशी वेळ आली आहे की, काबागृहाच्या किल्ल्याही आमच्याकडे सुपुर्द व्हाव्यात'. प्रेषितांनी आलींना काहीच उत्तर दिले नाही आणि उस्मान इब्ने तल्हा कुठे आहे ह्याची चौकशी केली. ज्या वेळी तो पुढ्यात आला तेव्हा त्यांनी काबागृहाच्या किल्ल्या त्याला सुपूर्द केल्या. 'उस्मान, ह्या तुझ्या किल्ल्या. हा दिवस खरोखर भल्याच्या भलाईचा व दिलेल्या वचनांच्या परिपूर्तीचा आहे. ह्या किल्ल्या तुझ्या कुटुंबाकडे पिढीजात राहतील. एखादा वाईट करणारा नतद्रष्टच ती तुमच्याकडून काढून घेऊ शकेल.'

एखाद्या मुस्लिमाने उपकाराची फेड करताना व आपल्याकडे विश्वासाने सोपविलेल्या

ठेवीची जबाबदारी वाहताना किती डोळ्यात तेल घालून असायला हवे, त्याची ही वर्तणूक म्हणजे आदर्श होय. जरी एखादा आपल्याशी वागताना कडवटपणाने वागला तरी त्याच्या वागण्यातला कडवटपणा विसरून आपण त्याला त्याचे न्याय्य देणे द्यायलाच हवे. स्वतःला कितीही जरी दुःख झाले, ठेच पोहोचली, तरी मुसलमानाने एखाद्याचा हक्क डावलता कामा नये.

ज्यावेळेला अतिसामान्य माणसे सत्ताधीश बनतात, त्यावेळी ती पहिले काम करतात, आपल्या विरोधकांना शिक्षा करण्याचे. अशा तऱ्हेने त्यांना नेस्तनाबूत केल्यावर दुसरे काम असते, त्यांना त्यांच्या पदावरून हाकलून, त्यांच्या जागी आपल्या पित्त्यांची स्थापना करण्याचे. प्रत्येक सत्ताधारी, समर्थक अथवा विरोधक अशा दोनच अंगांनी विचार करीत असतो. समर्थकांना बढती व विरोधकांना अधोगती. पण इस्लामच्या प्रेषितांनी अरेबियामध्ये सत्ता हस्तगत केल्यावर अगदीच वेगळे धोरण अवलंबिले. त्यांनी समर्थक व विरोधक असा विचार न करता केवळ न्याय्य व अन्याय्य एवढाच विचार केला. त्यांनी सर्व पूर्वग्रह गाडून टाकले आणि प्रत्येकाला न्याय व करुणेची, अशी गरज भासेल त्याप्रमाणे वागणूक दिली.

# ५ प्रेषितांच्या जीवनापासून घ्यायचे धडे

### आत्मसंयमनाची बक्षीसे

कुरआनमध्ये श्रद्धावंतांकरिता (मुसलमानाकरिता) पुढील संदेश दिला आहे.

'आमच्या प्रेषितांच्या माध्यमातून आम्ही तुम्हाला, जे ईश्वराकडे व प्रलयाच्या दिवसाकडे पाहातात व नेहमीच ईश्वराची आठवण करतात, त्यांच्याकरिता एक उत्तम उदाहरण दिले आहे.' (३३:२१)

ह्या आयातीमधून हे स्पष्ट होते की, प्रेषित मोहम्मद (स.) ह्यांच्या आयुष्यातून प्रत्येक मानवाकरिता एक परिपूर्ण उदाहरण प्रकट केले गेले आहे. अर्थात ह्या उदाहरणाचा खरा फायदा त्यांनाच होऊ शकतो ज्यांची ईश्वरावरची श्रद्धा आधीच अतिशय तीव्र आहे, ज्यांच्या आशा व स्फूर्तीचे केंद्रस्थानी ईश्वर आहे. ईश्वर शिक्षा देईल ह्या भयासह जे जीवन जगतात, सच्चिदानंदाचा विचार जे हृदयात कवटाळून ठेवतात आणि अस्तित्त्वाच्या प्रत्येक धाग्यातून त्याचीच फक्त तीव्र इच्छा बाळगतात. अशांनाच प्रेषितांच्या उदाहरणांपासून काही शिकता येईल.

पण हे असे का असावे? ह्याचे कारण कदाचित असेही असेल की, ज्याला सत्याचा शोध घ्यायचा आहे आणि जर त्याला सत्य सापडणार असेलच तर त्याला अतिशय कष्टाने प्रामाणिक प्रयत्न करावे लागतात. जर कुणी ईश्वर व प्रलयाच्या दिवसाकडे पाहात असेल तरच तो त्यांच्या विषयी निर्भेळ व विशुद्ध भावना बाळगू शकेल. ही विशुद्धताच एखाद्याला प्रेषितांच्या जीवनाकडे जसे पाहायला हवे तसे पाहायला शिकवेल व त्याला त्यापासून योग्य धडेसुद्धा मिळतील.

हा मुद्दा एक उदाहरणातून स्पष्ट होईल. प्रेषितांचे हदीसमधील एक वक्तव्य वरील गोष्टीशी पुढीलप्रमाणे संबंधित आहे.

'जो स्वतःच्या संपत्तीचे रक्षण करताना 'मारला गेला' तो हुतात्मा होय. आयुष्याचे रक्षण करताना जो मारला गेला तो हुतात्मा होय. कुटुंबाचे रक्षण करताना मारला गेलेला हुतात्मा होय.' (तिर्मिज़ी, नसाई, अबू दाऊद)

वर दिलेल्या उताऱ्यातून एक गोष्ट स्पष्ट होते, ती म्हणजे हदीस 'मारला गेल्याचा' उल्लेख करते. मारण्याचा किंवा हल्ला करण्याचा उल्लेख कुठेही नाही! ह्याचा अर्थ, एखाद्याची मालमत्ता, आयुष्य, धर्म अथवा कुटुंब नष्ट होण्याचा धोका उत्पन्न झाल्यावर लगेच शस्त्र हाती घेऊन स्वतः मेलो तरी चालेल; पण लढाईच करा, असे प्रेषितांना म्हणायचे आहे असा होत नाही. त्यांना एवढेच म्हणायचे आहे की अशा एखाद्या प्रसंगी एखादा खरा श्रद्धावान मारला गेला, तर त्याच्या मृत्यूला हौतात्म्य समजावे. हदीस शस्त्रसज्ज हल्ल्याला अजिबात उत्तेजन न देता फक्त अशा प्रसंगी झालेल्या मृत्यूला हौतात्म्य बहाल करते.

ज्याचा धर्माविषयीचा दृष्टिकोन विशुद्ध नाही व जो स्वतःच्या व्यक्तिगत लहरींना प्रेषितांच्या परवानगीचा शिक्का मारून घेऊ इच्छितो अशा कुणाच्याही हातात ही हदीस पडली,

तर तो त्याच्या स्वतःच्या व्यक्तिगत भांडणांकरिता व राष्ट्रीय वादांकरिता तिचा वापर करू शकेल. तो फार जोरात सांगेल की, इस्लाम असा धर्म आहे, जो माणसाला स्वतःच्या हक्कांकरिता उभे राहायला शिकवितो. स्वतःच्या श्रद्धेकरिता, आयुष्य व मालमत्तेकरिता आणि कुटुंबाकरिता लढायची वेळ आली तर बेधडक लढा असे जोरात शिकवितो; जर तुम्ही विजयी झालात तर तुमचे ईप्सित साध्य झाले व न पेक्षा मेलात तर हुतात्मा झालात! मरूनसुद्धा एका अशा नशीबवान अल्पसंख्याकांपैकी तुम्ही बनता ज्यांनी हौतात्म्याचे शिखर गाठले.

ज्याला ईश्वराचे भय आहे तो मात्र ह्या सर्व गोष्टीकडे अतिशय सौम्यपणे पाहील. तो स्वतःला असा प्रश्न विचारेल की, काय खरोखरच एखाद्याला स्वतःच्या मालमत्तेचे, आयुष्याचे धर्माचे व कुटुंबाचे संरक्षण शस्त्रसज्ज होऊनच करायला हवे काय? जर असे असेल तर अशाच परिस्थितीचे वेळी प्रेषितांनी असे काहीच केले नाही हे कसे? अत्यंत उघड–उघड दबाव व छळ असूनसुद्धा अशा अनेक प्रसंगी प्रेषितांनी स्वतः इतका कृतीहीन दृष्टिकोन कसा काय स्वीकारला? एवढेच नव्हे तर दुसऱ्याही अनेकांचे मन त्यांनी असाच दृष्टिकोन बाळगण्यासाठी कसे काय वळविले?

अबू उस्मान अल् नाहदींचा दाखला देऊन इब्ने हिश्शाम ह्यांनी पुढील प्रसंग नोंदविला आहे. सुहैब ह्यांनी जेव्हा मक्का सोडून मदिनेकडे आश्रयार्थ स्थलांतर करायचे ठरविले तेव्हा कुरैश त्यांना म्हणाले, ‘हे बघ, तू आमच्याकडे जेव्हा आलास तेव्हा अतिशय हीन, कंगाल व निराश्रित परिस्थितीमध्ये आलास. आमच्याबरोबर राहूनच तू तुझी आजची अतिशय उत्तम सांपत्तिक परिस्थिती मिळवली आहेस. तुला काय वाटले की, ही सगळी संपत्ती बरोबर घेऊन आम्ही तुला पळून जाऊ देऊ? जर तुला असे वाटले असेल तर तू निव्वळ मूर्ख आहेस.’ सुहैबने चौकशी केली की तो त्याची सर्व संपत्ती त्यांना सोडून द्यायला तयार असला तर कुरैश त्याला जायची परवानगी देतील काय? कुरैश आनंदाने तयार झाले. प्रेषितांना ही सर्व हकीगत कळल्यावर ते हर्षाने म्हणाले, ‘वा! सुहैबकरिता हा फारच छान सौदा झाला! त्याने अतिशय नफा कमविला आहे.’

जर ह्या आधी उद्‌धृत केलेल्या हदीसचा वाच्यार्थच घ्यायचा ठरविला, तर एखाद्याने त्याच्या मालमत्तेच्या संरक्षणाकरिता वेळप्रसंगी युद्ध करून जीवच द्यायला हवा; पण मालमत्तेचे संरक्षण करायलाच हवे, असा होईल. मग असे असेल तर प्रेषितांनी सुहैबने तसे केले नाही, म्हणून त्याची खरडपट्टी काढायला हवी होती; पण त्यांनी तर उलट ’यशस्वी’ झाला म्हणून त्याचा सत्कार केला!

अबू जंनदलचे उदाहरण (पाहा, भाग २, प्रकरण ४) सुद्धा हाच मुद्दा स्पष्ट करते. हिजरी सनाच्या सहाव्या वर्षी ज्यावेळी हे हुदाबियूचे युद्ध संपून तह होत होता त्यावेळी रक्ताने माखलेला व साखळदंडांनी बांधलेल्या अबू जंदल मुस्लिमांकडे आक्रोश करीत होता. ‘मी इस्लाम स्वीकारला आहे. आता मला परत ह्या क्रूर मूर्तिपूजकांकडे पाठवू नका’. प्रेषितांनी मात्र तहाच्या अटी मान्य करण्याचे ठरवून, अशी आज्ञा दिली की, अबू जंदलने परत मक्केला जावे. ते

म्हणाले, 'अबू जंदल, धीर धर. तुला जे काही भोगायला लागते आहे त्यातून ईश्वरच, तुला आणि तुझ्याबरोबर पाखंडी समजून ज्याना छळण्यात येत आहे, अशांना सुटका देईल.'

आधीच्या हदीसने, परिस्थिती न बघता एखाद्याला लढून हुतात्मा बनायची परवानगी दिली असती, तर प्रेषितांनी इतक्या शांतपणे अबू जंदलला शत्रूच्या तावडीत सोडलेच नसते. उलट त्यांनी त्याला हौतात्म्य पत्करायला सांगितले असते आणि त्यांनी व त्यांच्या सर्व सहकाऱ्यांनी अबू जंदलच्या बाजूने अटीतटीचे युद्ध केले असते.

ह्या हुदायबिय्याच्या घटनेवेळीच कुरैशांनी प्रेषितांना सांगितले की, त्यांना त्यावर्षी मक्केत पाऊल टाकू देणार नाहीत. हे मान्य करून, मक्केला जाऊन काबागृहाला भेट देण्याविषयी विशेष आग्रह न धरता प्रेषित मदिनेला परत निघून आले. मक्केला भेट, ही खरे तर सर्वार्थाने धार्मिक बाब होती. ईश्वरी प्रेरणा झाल्यामुळे प्रेषित, त्यांच्या सहकाऱ्यांबरोबर मक्केला निघाले होते. असे असूनही त्यांनी माघार घेतली. जर वरच्या हदीसचा परत वाच्यार्थच घ्यायचा ठरविला, तर प्रेषितांनी उलट त्याचवर्षी काबागृहाला भेट द्यायचा आग्रह धरायला हवा होता. मग ते त्यांच्या हेतूमध्ये यशस्वी तरी झाले असते किंवा हुतात्मा तरी झाले असते.

अम्मार इब्न यासिर व त्याचे आईवडील, ज्यावेळी त्यांनी इस्लाम स्वीकारला, त्यावेळी बनो मकज़ूम टोळीचे गुलाम होते. त्यांचे इस्लामीकरण पूर्ण बनी मकज़ूम टोळीला भयंकर शाप वाटत होते. त्या सर्व कुटुंबाला भर दुपारी वाळवंटात नेले जाई आणि तळपणाऱ्या वाळूत झोपवून अत्यंत रानटी नग्नतेने त्यांचा छळ केला जाई. अम्मारच्या आईचा खून करण्यापर्यंत त्यांची मजल गेली. ह्या संदर्भात प्रेषितांचे चरित्रकार इब्ने हिश्शाम लिहितातः

मी जे ऐकले आहे त्यानुसार, प्रेषित ज्या ज्यावेळी त्यांच्या जवळून जात त्या त्या वेळी म्हणत, 'यासिरच्या कुटुंबियांनो धीर धरा. तुमचे खरेखुरे स्थान स्वर्ग आहे.'

वरच्या हदीसचा वाच्यार्थ घ्यायचा ठरविले तर, प्रेषितांनी यासिरच्या कुटुंबियांना, भोंदूपणाला उत्तेजन देणाऱ्यांना त्यांच्याच भाषेत जबाब द्याचा सल्ला द्यायला हवा होता. प्रेषितांनी मग, आधी दिलेला सल्ला कधीच द्यायला नको होता. उलट त्यांनी यासिरला लढून हौतात्म्य पत्करायला सांगायला हवे होते. ते स्वतः अशा पवित्र व धार्मिक कारणासाठी, यासिरच्या सुटकेसाठी, लढले असते अथवा हुतात्मा झाले असते.

खरी गोष्ट अशी आहे की प्रेषितांची वर्तणूक ही एकाहून अधिक निरनिराळ्या दृष्टींनी पाहिली जाऊ शकते आणि असेही होऊ शकते की, बरोबर अथवा चूक दोन्ही अर्थ काढले जाऊ शकतात. जर एखादा विशुद्ध बुद्धीने परिस्थितीचा अर्थ शोधू लागला तरच त्याचा अर्थ बरोबर येईल आणि वास्तविकता अशी आहे की, ईशभय बाळगले तरच ही विशुद्धता येऊ शकते.

एखादा विशुद्धतेची इच्छा धरणारा मनुष्य ज्यावेळी प्रेषितांच्या जीवनाकडे पाहू लागतो त्यावेळी इथे ह्याआधी जसे प्रश्न निर्माण केले आहेत तशा प्रश्नांची भाऊगर्दी त्याच्या डोक्यात होते. तो त्याच्या समस्येचे उत्तर त्याच्या सोयीने प्रेषितांच्या वर्तनातून काढण्याचा प्रयत्न करीत नसतो, तर त्याला प्रेषितांच्या उदाहरणातून आपल्या समस्येला सर्वयोग्य असे उत्तर शोधायचे असते. हा

दृष्टिकोन अशा माणसाला गैरार्थ काढण्यापासून दूर ठेवतो. तो समस्येकडे निरपेक्ष बुद्धीने पाहतो आणि ईश्वराच्या देयेने समस्येच्या थेट मुळापर्यंत पोहोचतो. त्याला एका गोष्टीची ठळठळीत जाणीव होते. ती म्हणजे, माणसाने कधीकधी भविष्यात येणाऱ्या फायद्यांची वाट पाहता क्षुल्लक व क्षुद्र असे तोटे सहन करायला हवेत.

श्रद्धावान मुसलमानाच्या मनात एका गोष्टीला सर्वोच्च स्थान हवे. ती म्हणजे, स्वतःच्या व्यक्तिगत हितापेक्षा इस्लामचे हित कशात आहे? इस्लामची शिकवणूक जाहीररित्या सांगण्यासाठी त्याच्याकडे भरपूर वेळ हवा. ते त्याचे पहिले कर्तव्य असायला हवे. जर व्यक्तिगत धार्मिक उपदेशाच्या हितात काही विरोधी अडचणी उद्भविल्या तर धार्मिक अडचणी प्रथम सोडविल्या जाव्यात. धार्मिक उपदेशाच्या हितावरती नजर ठेवूनच प्रेषितांनी वरील उदाहरणांमध्ये धीर धरण्याचा सल्ला दिला. ईश्वरावरच्या श्रद्धेचा प्रसार करण्याच्या प्रयत्नांना खात्री देण्याच्या प्रत्येकवेळी प्रेषितांनी वैयक्तिक, आर्थिक व कौटुंबिक तोटे सहन केले. अत्यंत श्रद्धेने व उदात्त ध्येयाने प्रेरित धार्मिक कामांमध्येच एखाद्या मुस्लिमाच्या ह्या व ह्यापुढच्या आयुष्याचे हित दडलेले आहे; हे त्यांना पक्के ठाऊक होते.

एखाद्याला ज्यावेळी आयुष्याचे ध्येय गवसते; त्यावेळी व त्यानंतर ध्येयच आयुष्याचे केंद्रस्थान बनते. माणूस वाटेल ती हानी पत्करून ते ध्येय साध्य करायचा प्रयत्न करतो आणि जर असे ध्येय असेल तर मनुष्य अगदीच नेहमीच्या त्याच त्या छोट्या गोष्टींमध्ये गुंतून पडतो. अगदी कमी हानी व्हावी अशी इच्छा धरली तर बऱ्याच वेळा खूप मोठ्या हानीलाही तोंड द्यावे लागते. ईश्वरी संदेशाचा प्रसार करू इच्छिणाऱ्याला आयुष्यात फारच मोठे ध्येय असते. तो त्याचे उच्च साध्य साधण्यासाठी छोटे तोटे सहज सहन करू शकतो. तो दुसऱ्याशी विनाकारण कुठल्याही गोष्टींवरून भांडणे टाळतो. कारण असे भांडण त्याच्या उच्च साध्याला बाधक असते. तो अशाच वेळी कृती करतो; ज्यावेळी स्वसंरक्षणाकरिता ती त्याला करणे आवश्यक बनते. अर्थातच अशी कृती त्याच्या उच्च ध्येयामध्ये व्यत्यय अणणारी नसते. ह्या सर्व गोष्टी ध्यानात ठेऊन आता प्रेषित हजरत मोहम्मद (स.) ह्यांच्या आयुष्यातील त्या घटनांकडे पाहूयात ज्यांमध्ये नैतिकतेची अतिशय उच्च मूल्ये आढळतात.

## निराशेने कधीही खचून न जाणे

प्रेषितांचे काळी सामाजिक व्यवहारांची जी टोळीपद्धती अस्तित्वात होती ती व्यक्तीला संरक्षण देत असे. ह्या व्यवस्थेवाचून कुणीच स्वतंत्रपणे जगू शकत नसे. मक्केमधल्या पूर्वायुष्यात हजरत मोहम्मदांना (स.) त्यांचे काका अबू तालिब जे बनो हाशिम ह्या टोळीचे प्रमुख सरदार होते, त्यांचे संरक्षण लाभले. प्रेषितत्व मिळाल्यानंतर दहाव्या वर्षी अबू तालिब निर्वतले आणि सरदारकीचे खोगीर अबू लहब ह्याच्या खांद्यावरती आले. अबू लहबने झिडकारल्यावर ते दुसऱ्या टोळीच्या आश्रयार्थ गेले ज्या योगे त्यांचे इस्लाम प्रसाराचे कार्य चालू राहावे. ह्याच कामाकरिता ते ताएफला गेले.

ज़ैद इब्ने हरिसा ह्या आपल्या नोकराबरोबर ताएफ नावाच्या मक्केपासून ६५ मैल

अंतरावर असलेल्या सुपीक ओॲसिसमध्ये ते गेले. त्या गावात त्यांचे काही नातेवाईकही होते; पण गावाचे नेतृत्व मात्र पुढील तीन व्यक्तींकडे होते. अब्द यालैल, मसूद आणि हबीब. प्रेषित तिघांनाही भेटले. तिघांनीही इस्लाम स्वीकारण्याचे तर सोडाच पण त्यांना संरक्षण देण्याचेही नाकारले. 'ईश्वराने तुला प्रेषित बनविले असेल तर मी पवित्र काबागृहाचे पडदे फोडून टाकीन,' एकजण म्हणाला. 'ईश्वराला तुझ्याव्यतिरिक्त दुसरा कोणी प्रेषित म्हणून पाठवायला मिळाला नाही का?' आत्यंतिक उपहासाने दुसरा ओरडला. 'मी शपथ घेतो की, मी तुझ्याशी एक शब्द सुद्धा बोलणार नाही,' तिसरा म्हणाला, 'त्या शिवाय म्हणजे, असे करणे तू ईश्वराचा खरा प्रेषित असतास तर तुझा अपमान होय; पण जर तू खोटा प्रेषित असलास तर माझा अपमान होईल त्याचे काय?' (सीरत इब्ने हिश्शाम, खंड दुसरा, पृ.२९)

अत्यंत निराश अंतःकरणाने प्रेषितांनी ताएफ सोडले; पण ताएफच्या लोकांनी इतक्या सुखासुखी त्यांना एकट्याला जाऊ दिले नाही. त्यांच्यामागे द्वाड, वात्रट व उनाड पोरांची फौज धाडण्यात आली आणि अशा रीतीने शिव्या व दगड धोंड्यांच्या जबरदस्त माराने त्यांची पाठवणी करण्यात आली. ज़ैदने एका घोंगड्याने प्रेषितांचे संरक्षण करण्याचा प्रयत्न केला; पण काहीच उपयोग झाला नाही. तळपायापासून डोक्यापर्यंत, प्रेषित जखमांनी भरून गेले.

उत्बा आणि शेबा नावाच्या दोन भावांचा मळा गावापासून दूर काही अंतरावर होता. प्रेषित त्या मळ्यात आश्रयार्थ जाईपर्यंत चांगलाच काळोख दाटून आला होता. सर्व शरीर जखमांनी व रक्ताने भरलेले असताना ओठावर मात्र आक्रोशाची प्रार्थना दाटली होती, 'ईश्वरा, मला मदत कर. अशा परिस्थितीत माझ्यासाठी, मला टाकून दूर जाऊ नकोस. माझ्या संकटाचे निवारण कर.'

उत्बा आणि शेबा दोघेही मूर्तीपूजक होते; पण प्रेषितांची अवस्था पाहून त्यांना त्यांची दया आली व त्यांनी प्रेषितांना आश्रय दिला. त्यांच्याकडे उद्दास नावाचा एक ख्रिस्ती गुलाम होता. त्याला त्यांनी 'पाहुण्यांकरिता' द्राक्षांचे काही घड तोडून आणून थाळीत ठेवायला सांगितले. उद्दासने त्याप्रमाणे करून प्रेषितांपुढे द्राक्षे आणून ठेवली आणि ती ग्रहण करण्याची विनंती केली. ती खाण्यासाठी हातात घेतल्यानंतर त्यांनी ईश्वराच्या नावाचा पुकारा केला. उद्दासने त्यांचा चेहरा पाहिला व म्हणाला, 'देवाशपथ, इकडच्या लोकांना असे शब्द उच्चारताना मी क्वचितच ऐकले आहे.' प्रेषितांनी उद्दासला तो कुणीकडचा व कुठल्या धर्माचा ते विचारले. उद्दासने सांगितले की, तो ख्रिस्ती असून इराकमधल्या नैनवा नावाच्या प्रदेशातला आहे. 'अच्छा, तर तू भल्या जोनाहच्या, मॅथ्यूच्या पुत्राच्या गावाचा आहेस,' प्रेषितांनी पृच्छा केली. 'तुम्हाला मॅथ्यूचा पुत्र जोनाह कसा काय ठाऊक?' उद्दासने प्रतिप्रश्न केला. 'तो सुद्धा प्रेषित होता आणि मी सुद्धा तसाच आहे,' प्रेषित उद्गारले. हे ऐकल्यावर उद्दासने प्रेषितांना आदराने प्रणिपात केला व त्यांच्या हातापायांचे व डोक्याचे चुंबन घेतले.

उत्बा आणि शेबा बघतच होते. ते म्हणाले, 'पाहा ह्याने आमच्या नोकराला भ्रष्ट केले.' उद्दास प्रेषितांना निरोप देऊन परत आले तेव्हा ते त्याला म्हणाले, 'बैलोबा, तुला लाज वाटायला

हवी. तू त्या चेटक्या माणसाचे हात, पाय व डोके ह्यांचे चुंबन कशाकरिता घेतलेस?' गुलाम उत्तरला, 'मालक, या समस्त पृथ्वीच्या वर पाठीवरती त्याच्याएवढा मोठा माणूस सध्या कुणीच नाही. त्यांनी मला एक अशी गोष्ट सांगितली की जी केवळ एखादा प्रेषितच सांगू शकतो.' 'निर्लज्ज माणसा, एक गोष्ट लक्षात ठेव. त्याला तुझ्या धर्मात ढवळाढवळ करू देऊ नकोस, कारण तुझा धर्म त्याच्या धर्माहून केवढा तरी श्रेष्ठ आहे,' भाऊ म्हणाले.

एकाच प्रवासात प्रेषितांना तीन निरनिराळ्या गटांकडून निरनिराळी वागणूक मिळाली. एकाने त्यांच्यावर दगडांचा मारा केला. दुसऱ्याने त्यांना आश्रय व अतिथ्य देऊ केले, तर तिसऱ्याने त्यांचे प्रषितत्व ओळखून त्याला मान्यता दिली.

ह्या प्रसंगातून खरोखर फार मोठा धडा घेण्यासारखा आहे. तो म्हणजे ही दुनिया म्हणजे, शक्यतांचा आर्णव आहे. जर तुम्ही खुल्या दिलाने खुल्या मैदानात उभे राहिलात तर आपल्या छायेत विश्रांती देणारे एखादे तरी झाड तुम्हाला मिळेलच. तुम्हाला क्रूरतेची वागणूक मिळाल्यास अजिबात निराश होऊ नका. जर तुम्ही सत्याच्या मार्गावर पक्के उभे राहिलात व जर तुम्हाला मिळालेल्या वागणुकीचा तुम्ही नकारार्थी पद्धतीने जर प्रतिकार केला नाहीत तर ईश्वर स्वतः तुमच्या मदतीला धावून येतो. तुमच्या ध्येयाकरिता काही लोक कदाचित धावून येणार नाहीत. पण तुम्हाला दुसऱ्या काही लोकांच्या हृदयात मात्र नक्कीच स्थान लाभेल.

**प्रेषितांवर लादला गेलेला विजनवास**

इ.स. ६०९ मध्ये इस्लामच्या प्रेषितांना त्यांनी त्यांचे धर्मप्रसाराचे काम सुरू केल्यावर अत्यंत उग्र विरोध झाला. इस्लामचा संदेश त्यांनी मक्केच्या अश्रद्धाळू मूर्तीपूजकांना सांगितल्यावर अत्यंत गर्वाने ते सांगू लागले की,ते तर आधीच ह्याहून महत्त्वाच्या धार्मिक कार्यात गुंतलेले आहेत. 'आम्ही आधीच काबागृहाची सर्व प्रकारची काळजी घेत असताना व यात्रेकरूंना पाणी पुरवित असताना, आम्ही मुस्लिम का बनावे?' त्यांनी विरोध केला. त्यांच्या वाद विधानाचा समाचार घेण्यासाठी कुरआन मधील पुढील आयात समूह प्रकटला.

'जो यात्रेकरूंना पाणी पुरवितो व काबागृहाला भेट देतो, तो ईश्वरावर खरोखरची श्रद्धा बाळगणाऱ्या, शेवटच्या दिवसावर विश्वास ठेवणाऱ्या व ईश्वरी कारणाकरिता झगडणाऱ्या माणसा इतका योग्यतेचा आहे अशी खोटीच समजूत तुम्हाला करून घ्यायची काय? (काय ही घोर प्रतारणा!) ही दोन प्रकारची माणसे ईश्वराकडून कधीच एक प्रकारची समजली जाणार नाहीत. चुकीचे वागणाऱ्यांना ईश्वर कधीच मार्गदर्शन करीत नाही. ज्यांनी श्रद्धेचा (इस्लामचा) स्वीकार केला आहे. ज्यांनी (इस्लामकरिता) स्वतःचे घरदार सोडून दिले आहे आणि जे स्वतःच्या संपत्तीनिशी आणि मनुष्यबळानिशी ईश्वरी कारणाकरिता (इस्लामकरिता) झगडले आहेत ते ईश्वराच्या लेखी उच्च कोटीतील लोक होत. शेवटी विजय ह्याच लोकांचाच होणार आहे.'

(कुरआन ९:१९–२०)

अगदी सुरुवातीला इस्लामच्या प्रेषितांच्या संदेशात फक्त सांकल्पनिक सत्यच होते. तो फक्त अमूर्त तऱ्हेचा संदेश होता. ज्याला व्यवहाराचे मूल्य तोपर्यंत चिकटलेले नव्हते.

मक्केतील काबागृह उलट एक बडी संस्था बनली होती. जिला भल्या मोठ्या वास्तुरचना आणि शिल्पकला ह्यांचा व भल्या थोरल्या ऐतिहासिक परंपरांचा वारसा व पाठिंबा होता. काबागृहाशी नाते सांगणे ही सामाजिकदृष्ट्या आवश्यक गोष्ट होती. हे नातं एका सामाजिक गर्वयुक्त गोष्टीचे प्रतीक होते. इस्लामच्या प्रेषितांच्या संदेशाशी नाते सांगणे हे एका अशा धर्मात विश्वास ठेवणे होते की, जो स्वतःच पूर्णपणे अवतरला नव्हता आणि त्याच्यापासून काहीही व्यावहारिक फायदेही नव्हते.

मक्कावासियांनी म्हणूनच त्यांना ज्या प्रकारे मोडता घालता येईल त्या प्रकारे मोडता घातला व एकापाठोपाठ एक यातना व पीडा दिल्या. असे असूनही पैगंबरांच्या धर्मकार्याला क्षेत्र मिळत गेले व सरतेशेवटी इस्लामचा संदेश मदिनेतल्या लोकांपर्यंत पोहोचला. जिथल्या बहुसंख्य लोकांनी इस्लामचा स्वीकार केला. प्रेषितांबरोबर दुसऱ्याही मुसलमानांचा मक्कावासियांनी मनसोक्त छळ केला. प्रेषितांनी त्यांना मदिनेला जायला सांगितले. मदिनेतल्या त्यांच्या मुस्लिम बांधवांनी अत्यंत प्रेमाने त्यांना आपल्यात सामावून घेतले व शिवाय त्यांच्या निर्वाहाचीही व्यवस्था करून दिली. एकामागून एक मुस्लिम मदिनेला जाऊ लागला. कुरैशांना जेव्हा ह्या योजनेची कुणकुण लागली तेव्हा त्यांनी मुस्लिमांना मक्का सोडण्यापासून रोखले, प्रतिबंध केला. काहींना त्यांनी मार दिला. काहींना कैद केले; पण असे करूनही बरेचसे मुस्लिम मदिनेला आश्रयार्थ पोहोचू शकले.

अगदी शेवटी (इ.स.६२२) प्रेषितांची पाळी आली. कुरैशांना हे समजून चुकले जवळ जवळ सर्व मुसलमानांनी मदिनेत आश्रय घेतला असताना, प्रेषित त्यांना जाऊन मिळणे आता काही फार दूर राहिलेले नाही. बनू हाशिमांची टोळी वगळता कुरैशांच्या इतर सर्व टोळ्यांचे नेते कुसय इब्ने किलाबच्या घराच्या भल्या थोरल्या सभागृहात जमले, जिथे अशा सर्व सभा भरत असत. निरनिराळ्या योजना मांडल्या गेल्या, ज्यातली एक सर्वसंमत झाली. प्रत्येक टोळीच्या एकेका माणसाने एकत्र येऊन प्रेषितांवरती हल्ला करायचा व त्यांना ठार मारायचे. अशा रीतीने त्यांचे रक्त उरलेल्या अकरा टोळ्या वाटून घेतील. बनू हाशिम एकटे पडल्याने त्यांच्या टोळीतील एकाचा खून करण्यात येऊनही ते उरलेल्या अकरा टोळ्यांचा बदला घेऊ शकणार नाहीत. उलट भरपाई स्वीकारायला तयार होतील. दुसऱ्या दिवशी त्यांनी प्रेषितांच्या घराला वेढा घातला. प्रेषित बाहेर येतील आणि मग त्यांच्यावर आपण झडप घालून हल्ला करू आणि त्यांना ठार करून टाकू अशा अपेक्षेने ते सारे वाट पाहात होते.

प्रेषितांना मात्र काय शिजले आहे त्याची चांगलीच कल्पना होती. अत्यंत गुपचूप निघून जायची सर्व तयारी त्यांनी केली होती. त्याच रात्री अबू बकर ह्यांच्याबरोबर मदिनेला जाण्या करिता त्यांनी मक्का सोडली. प्रेषितांना ह्याची पूर्ण कल्पना होती की, त्यांच्या निघून जाण्याची बातमी कळताच कुरैश त्यांच्या पाठीमागे माग काढणारे मारेकरी पाठवतील. म्हणूनच अबु बकर व त्यांनी सूर पर्वताच्या एका गुहेत लपून बसायचे ठरविले होते. ही गुहा मक्केपासून चार मैल दूर होती. त्यांनी त्या गुहेत कुरैशांचे 'सर्व शोधकार्य' संपेपर्यंत राहायचे ठरविले होते. हे शोधकार्य

संपल्यावर मगच ते सुखेनैव मदिनेच्या प्रवासाला जाऊ शकले असते.

कुरैशांचे घोडेस्वार प्रेषितांचा सर्वत्र शोध घेऊ लागले. पर्वताच्या त्या गुहेजवळ त्या घोडेस्वारांची एक तुकडी येऊन पोहोचली. होय, ते स्वार त्या गुहेच्या तोंडाजवळ शस्त्रसज्ज असे उभे होते. प्रेषित आणि अबू बकर ह्यांना त्यांचे पायसुद्धा दिसत होते. अत्यंत आणीबाणीच्या संकटातून जात आहोत, अशी जाणीव होऊन अबू बकर म्हणाले, 'शत्रू तर आपल्या डोक्यावरतीच आहे.' 'अजिबात काळजी करू नका. आपण दोघेच दिसतो आहोत पण ईश्वर आपल्या बरोबर आहे. इतर कुणाशीही त्या दोघांची, ज्यांचा तिसरा सहकारी ईश्वर आहे, अशांची तुलना तुम्ही करताच कशी?' चित्त अजिबात विचलित होऊ न देता अत्यंत हळू आवाजात पुटपुटले. प्रेषितांचा आत्मविश्वास पुढे घडत गेलेल्या प्रसंगांनीच सिद्ध केला. कारण अशाच प्रकारच्या घटना घडत असतानाही ते खरोखर पुढे मदिनेला येऊन पोहोचले.

## ईश्वरावरती पूर्ण श्रद्धा व विश्वास

असाच एक प्रसंग एका मोहिमेच्या वेळी घडला. ही मोहीम ज़ात अल् रिकाऽची (हिजरी सन ४) मोहीम म्हणून ओळखली जाते. जाबिरनी सांगितलेली ही हकीगत बुखारी व प्रेषितांच्या इतर चरित्रकारांनीही नोंदवली आहे. 'तुम्हाला मोहम्मदचा (स.) वध करायला आवडेल काय?' बनु घत्फान टोळीतल्या एकाने हा भयंकर प्रश्न विचारला. तसाच तो घौरस इब्न अल् हारिसने त्याच्या टोळीच्या लोकांना विचारला. ह्या प्रश्नाचे उत्तर अत्यंत उसळत्या उत्साहात होकारार्थी आले; पण लोकांना हे शक्य कसे होईल (!) हे जाणून घ्यायचे होते. घौरसने अत्यंत आत्मविश्वासाने सांगितले, 'मी त्याला बेसावध असताना पकडेन व त्याचा वध करीन.' आणि खरोखरच त्याची सर्व योजना ही असेच सगळे करायची होती. जेव्हा तो, मोहम्मद व त्यांच्या सहकाऱ्यांच्या तंबूजवळ आला त्यावेळी त्याने खरे तर क्षणही उत्तम निवडला. प्रेषित व त्यांचे सहकारी वृक्षांच्या सावलीमध्ये ज्यावेळी निःशस्त्र होऊन विश्रांती घ्यायला बसणार, त्याच क्षणाची तो वाटच पाहात होता. प्रेषित अगदीच एकटे पहुडले होते व त्यांची तलवार झाडांच्या फांद्यामध्ये लटकत होती. अशा 'सुयोग' वेळी घौरस झेपावून पुढे आला, त्याने तलवार हिसकावून घेतली आणि प्रेषितांवरती आरूढ झाला. 'तुला माझ्यापासून कोण वाचू शकेल?' 'अर्थात ईश्वर', प्रेषित अतिशय शांतपणे उत्तरले. त्यांचा शांतपणा पाहून घौरस घाबरून गेला व त्याने विचारले, 'माझ्या हातातल्या तलवारीकडे पाहा! तुला भीती वाटत नाही?' 'अर्थातच नाही. जर मला खात्रीच आहे, ईश्वर माझे संरक्षण करणार आहे, तर तलवारीची भिती मी का बाळगू?' प्रेषित म्हणाले. प्रेषितांचा ईश्वराविषयीचा सर्वोच्च विश्वास भरलेले शांत उत्तर ऐकून घौरसचे अवसान गळाले. प्रेषितांचे ते शांत स्वरूप त्याच्या क्रूर व दुष्ट मनाला फारच तीव्र अशी जालीम मात्रा होती! प्रेषितांवर हल्ला करायच्या ऐवजी त्याने तलवार म्यान केली व प्रेषितांना परत दिली. प्रेषितांनी त्याला बसवून घेतले आणि इतर सहकाऱ्यांना बोलावून घेतले. जेव्हा ते आले तेव्हा त्यांनी त्यांना संपूर्ण कथा सांगितली. घौरस आता आपण कुठल्याही क्षणी मारले जाऊ, ह्या भीतीने गर्भगळित झाला होता; पण प्रेषितांनी त्याला कुठल्याही प्रकारची शिक्षा न फर्माविता परत

धाडून दिले.

(सीरत इब्ने हिश्शाम, खंड ३, तफसिर इब्ने कसिर खंड १)

ज्याचा ईश्वरावरती सर्वोच्च विश्वास असतो तो कुठल्याही वस्तूला अथवा व्यक्तीला कधीच घाबरत नाही. ईश्वर नावाचे चैतन्यमय व सर्वशक्तिमान अस्तित्व हे प्रत्येकवेळी आपली मदत करेल ही श्रद्धाच त्याला जगातल्या दुसऱ्या कुठल्याही शक्तीला तोंड द्यायचे सामर्थ्य देते. शत्रू भेटल्यावर माणसाची सर्वात मोठी शक्ती ही त्याचा निर्भयपणा ही असते. एखाद्या प्राण्याची भीती बाळगू नका आणि मग तो प्राणी तुमची भीती बाळगू लागेल.

### ऐकमत्याचा आग्रह व तिथवर पोहोचणे

बदरचे युद्ध (हिजरी शक, २) सुरू व्हायच्या फक्त थोडे दिवस आधी कुरैशांनी साठ माणसे असलेला एक भला मोठा व्यापारी तांडा सिरियाला पाठविला होता. जरी पुढे बदरमध्ये मुस्लिमांनी कुरैशांचा पराभव केला होता, तरी त्यांचा नेता अबू सुफ्यान हा, ह्या तांड्याला, ज्यामध्ये कुरैशांनी स्वतःची सर्व संपत्ती ओतली होती, घरी म्हणजे मक्केला, सागरी किनाऱ्याच्या मार्गाने पळवून आणण्यात यशस्वी झाला होता. बदरच्या पराभवाने कुरैश ह्या पराभवाचा वचपा घेण्यासाठी, मोहम्मद (स.) व त्यांच्या सहकाऱ्यांचा सूड घेण्यासाठी आसुसले होते. कुरैशांचे सर्व नेते दारुल नद्वा (जमातीचे सभागृह) मध्ये भेटले आणि एकमताने असा निर्णय घेण्यात आला की व्यापारी तांड्यामध्ये गुंतविलेले भांडवल ज्याचे त्याने परत घ्यावे व सर्व नफा युद्धाच्या तयारीसाठी जमा केला जावा. सर्व मिळून हा नफा ५०,००० दीनार झाला होता. काळाचा विचार करता ही महाप्रचंड अशी रक्कम होती.

कुरैशांनी सर्व बाजूंनी परिपूर्ण तयारी केली आणि हिजरी शकाच्या तिसऱ्या वर्षी मदिनेकडे कूच केले.

ह्याचवेळी उहदचा संग्राम घडला, जो प्रेषितांच्या स्थलांतरानंतर केवळ तीन वर्षांनी घडला होता. ज्यावेळी कुरैशांनी कूच केले आहे, ही बातमी प्रेषितांपर्यंत पोहोचली त्यावेळी त्यांनी सर्व सहकाऱ्यांना पाचारण केले. जवळ–जवळ सर्वांचा कल, हल्ला मदिना शहरातच लढून परतविण्याकडे होता. तरुण रक्त मात्र ह्या विचाराच्या विरोधात होता. त्यांनी असे तीव्र मत मांडले की त्यांचे शहरात राहाणे, ह्याचा अर्थ शत्रू, ते भेकड आणि दुबळे आहेत असा करेल. ह्या उलट शत्रूला शहराबाहेर भेटूनच त्याचा हल्ला आपल्याला परतवायला हवा. अब्दुल्ला इब्ने उबय ह्याच्या मताची बहुतेक सर्व प्रौढांनी मान्यता दिल्याने सरशी झाली.

(सीरत इब्ने हिश्शाम, खंड ३, पृ.७)

हल्ला शहरात राहूनच झेलावा ह्या मताला तशीच सबळ कारणे होती. मदिनेच्या भूगोलातचे तिचे सर्व संरक्षण सामावलेले होते. दक्षिणेकडे खजूराच्या झाडांचे दाट मळे होते आणि ते इतके दाट होते की त्या बाजूने हल्ला सर्वथैव अशक्य होता. पूर्व व पश्चिमेला इतके उंच पर्वत मजबूतपणे उभे होते की, आक्रमकाने त्या बाजूने येताना शंभरदा विचार केला असता, म्हणजे शिल्लक राहिलेली, उत्तरेची एकच बाजू अशी होती, जिकडून मदिनेवरती हल्ला होऊ शकला

असता. शहर हेच मुळी एक नैसर्गिक आश्रयाचे ठिकाण (मजबूत किल्ला) होते. शहर सोडून बाहेर पडणे म्हणजे शत्रूच्या चौफेर हल्ल्याला आपणच निमंत्रण केल्यासारखे होते. ह्याउलट शहरात राहून आघाडीची एकच बाजू सांभाळायचीच तेवढी जबाबदारी होती आणि मदिनेच्या भौगोलिक परिस्थितीचा फायदा, खरोखरच पुढल्या एका युद्धात घेतला गेला, जे खंदकाचे युद्ध म्हणून प्रसिद्ध आहे. ह्या खंदकाच्या युद्धात संपूर्ण शहराचे संरक्षण हे फक्त वायव्य दिशेला एक भला मोठा खंदक खणण्यासाठी मोहीम आखून, शहराची तेवढीच एक उघडी बाजू सांभाळून करण्यात आले.

जरी बिनीच्या सर्व सहकाऱ्यांचे, ज्यामध्ये अब्दुल्ला इब्ने उबय हा ही होता, त्याचे मत हे हल्ला शहरात राहूनच परतवावा असे होते, तरीसुद्धा तरुण मुसलमानांच्या मनासारखे वागायचे प्रेषितांनी ठरविले. हजार वीरांची तुकडी घेऊन शहर सोडून ते स्वतः व बरोबरचे हजार जण उहदकडे रवाना झाले. आपला उघड–उघड हुशारीचा व बरोबर असा सल्ला झिडकारला गेल्याने अब्दुल्ला इब्ने उबय अगदी खोल दुखावला गेला. अतिशय जड अंतःकरणाने तो फौजेबरोबर गेला; पण मध्येच उहदला पोहोचण्यापूर्वीच तीनशे अनुयायी सैनिकांबरोबर तो परत फिरला. अत्यंत शोकाकुल होऊन तो म्हणाला, ‘त्यांनी त्यांचे (तरुण मुसलमानांचे) म्हणणे मान्य केले आणि माझे बरोबर असूनही नाही. मग जर असे असेल तर ह्या युद्धभूमीवरती आमचा स्वतःचा नाश (मूर्खपणाने) आम्ही का करावा, हेच मला कळत नाही.‘

(सीरत इब्ने हिश्शाम, खंड २, पृ.२९)

मुस्लिमांचा उहदमधला पराभव, हा त्या लोकांच्या मताची, ज्यांनी शहर लढविण्याचा सल्ला दिला होता, त्यांच्या मताची सत्यता स्थापन करणारा होता. हा सल्ला पुढे खंदकाच्या युद्धात (हिजरी शक, ५) वापरण्यात आला. आपल्या मताची कदर झाली नाही, हे विसरून जाऊन प्रेषितांचे सर्व बिनीचे सहकारी ह्या युद्धात प्रेषितांच्या बाजूने घनघोर लढले. युद्धाच्या भयंकर तडाख्यांनी अतिशय गंभीर नुकसान होऊन ह्या सर्वांनी प्रेषितांच्या बाजूने घनघोर संग्राम केला. फक्त अब्दुल्ला इब्ने उबयच्या फौजेने मुस्लिम फौजेपासून फारकत घेतली, ज्यामुळे तो ‘ढोंग्यांचा पुढारी‘ म्हणून ओळखला जाऊ लागला. खरे पाहता अब्दुल्ला इब्ने उबयचे मत अतिशय बरोबर होते. प्रत्यक्ष युद्धभूमीवर त्याचा प्रत्ययसुद्धा आला. त्याचे बरोबर असूनही, त्याच्या अवज्ञेमुळे त्याच्यावर ईश्वरी कोप झाला आणि त्याचे वर्तन धर्मच्युती समजले गेले.

इस्लाम मध्ये सल्लामसलतीला अतिशय महत्त्व आहे. प्रत्येकाला आपापले मत मांडण्याचा अधिकार आहे, मग तो पुरुष असो अथवा स्त्री; पण प्रत्येकाने परिस्थिती विचारात न घेता आपलेच मत पुढे दामटले तर अर्थातच धोरणात्मक निर्णय घेता येणार नाहीत अथवा त्यांची अंमलबजावणी करता येणार नाही. एखादाच पर्याय व्यवहारात अवलंबिता येतो. म्हणूनच ज्यावेळी एखाद्या समस्येला अनेक पर्याय असताना एखादा पर्याय निवडण्याची वेळ येते, त्यावेळी प्रत्येकाच्याच पर्यायाचा विचार करता येत नाही. खऱ्या मुसलमानांनी अशावेळी स्वतःचे मत बाजूला ठेवून, निर्णय करणाऱ्यांनी घेतलेला निर्णयच आपला निर्णय आहे असे मानून निर्णय

घेणाऱ्यांच्या आज्ञा पाळायला हव्यात.

स्वतःच्या, अगदी स्वतःच्या मताचा त्याग करणे, ह्याहून दुसरा कुठला मोठा त्याग असू शकतो? एखादी उंच इमारत बांधण्यासाठी ज्याप्रमाणे शेकडोशे विटा जमिनीत पुरल्या जातात त्याचप्रमाणे एखादा समर्थ समाजही त्याचवेळी निर्माण होतो ज्यावेळी त्यातल्या अनेक व्यक्ती स्वत:ची व्यक्तिगत मते पुरायला तयार होतात. अशा व्यक्ती दुसऱ्यांबरोबर त्यांचा विरोध असताही एकतेने काम करू लागतात. व्यक्ती समुच्चयातून निर्माण होणाऱ्या समाजाकरिता ही गोष्ट अत्यावश्यक असते. असे झाले नाही तर मानवी समाज उभाच राहू शकणार नाही, ज्याप्रमाणे विटांच्या पायाशिवाय इमारत उभी राहू शकणार नाही.

मोअताची मोहीम हिजरी शकाच्या आठव्या वर्षी घडली. मोहम्मद इब्ने जरीर अल् तबरीने ह्या मोहिमेचे जे वर्णन केले आहे त्यापैकी काही अंश हा पुढील प्रमाणे आहे:

'अबू क़तादा आम्हाला सांगतो की पैगंबरांनी मोअताला एक फौज पाठवीली. त्यांनी ज़ैद इब्ने हरिसाला तिचा सेनापती बनविले. जर तो पडला तर जाफर इब्ने अबी तालिबने आधिपत्य पत्करायचे होते आणि मग तो जर पडला तर आधिपत्य अब्दुल्ला इब्ने रवाहाने पत्करायचे होते. जाफरने पैगंबरांचा निर्णय ऐकून संतापाने उडीच मारली आणि सांगून टाकले की तो ज़ैदच्या सेनापतीत्वाखाली लढण्यास तयार नाही. पैगंबरांनी त्याला सैन्याबरोबर जायची आज्ञा केली व पुढे हेही सांगितले की, 'त्याचे कारण असे आहे की, तुझ्याकरिता सर्वोत्तम काय ते तुला माहीत नाही.' आणि मग सैन्याने कूच केले.

श्रद्धाळू माणूस म्हणजे काही देवदूत नव्हे. तो इतर सर्व मर्त्य माणसांसारखा माणूस तर असतो. तरीही एका श्रद्धावान (मुस्लिम) माणसामध्ये व दुसऱ्या कुठल्याही सामान्य माणसामध्ये एक महत्त्वाचा फरक असतो. अश्रद्ध लोकांना एकदा त्यांनी चूक केली व चुकीची विकृत मते मनामध्ये बनवून टाकली की, परत चांगल्या दिशेला कसे जायचे हे ठाऊक नसते. बरोबर अथवा चूक, ती आपल्याच मताला चिकटून राहतात. एखाद्या सबळ कारणापेक्षा स्वतःच्या इच्छेनुसार ती वागत असतात व स्वतःच्या इच्छांचेच पालन करतात

श्रद्धावान माणसाचा दृष्टिकोन मात्र ह्याहून बराच वेगळा असायला हवा. चुकीच्या मार्गाला गेलाहेस हे दाखवून दिल्यावर जो सरळ मार्ग पत्करतो आणि स्वतःच्या चुका दाखवून दिल्यावर जो त्या नेहमी सुधारतो तोच खरा श्रद्धावान माणूस होय. स्वतःवरच्या टीकेला त्याने खुल्या मनाने स्वीकारायला हवे आणि स्वतःमध्ये सुधारणा घडवून आणायला तयार असायला हवे. कधी कधी तर अशी परिस्थिती उद्भवेल की जे करायची त्याची इच्छा नाही तेच नेमके त्याला करावे लागेल.

श्रद्धावान फक्त सत्यासमोर समर्पण करतो व अश्रद्धावान हा स्वतःच स्वतःसमोर समर्पण करतो.

## भांडणे टाळणे

खंदकाच्या युद्धानंतर (हिजरी शक, ६) पुढच्या वर्षी प्रेषित मोहम्मद (स.) ह्यांना मदिनेत एक स्वप्न पडले. त्यामध्ये त्यांनी ते स्वतः व त्यांचे सहकारी काबागृहात गेले आहेत, असे पाहिले. ह्या स्वप्नाचा वृत्तांत ऐकून सहकारी अतिशय आनंदून गेले. कारण ह्याचा अर्थ, सहा वर्षांच्या मोठ्या काळानंतर ते लवकरच मक्केला जाणार होते व काबागृहाला भेट देणार होते. ह्या स्वप्नानंतर प्रेषितांनी चौदाशे लोकांना बरोबर घेऊन मक्केला जायचे ठरविले. ज्यावेळी ते घदीर अश्तातपर्यंत पोहोचले, त्यावेळी ते मक्केला जायला निघाले आहेत, हे कुरैशांना कळाले असल्याची बातमी त्यांच्यापर्यंत पोहोचली. मुस्लिम काबागृहाला भेट देणार ह्या नुसत्या कल्पनेनेच क्रुद्ध झालेल्या कुरैशांनी एका फौजेची निर्मिती केली व अशी शपथ घेतली की ते मोहम्मद (स.) व त्यांच्या सहकाऱ्यांना मक्केत पाऊल टाकू देणार नाहीत. काबागृहाला भेट देण्यापासून एखाद्याला रोखणे हे अरब परंपरेमध्ये अजिबात बसत नसले, परंपरेच्या अगदी विरोधी असले तरी त्यांनी अशी शपथ घेतली खरी. प्रेषित दैवी प्रेरणेनुसार वागत होते; म्हणूनच कदाचित कुरैशांची ही प्रतिक्रिया ऐकल्यावरही ते शांत राहिले. त्यांच्या हेरांनी येऊन त्यांना सांगितले की, मुस्लिमांचा मार्ग रोखण्याकरिता खालिद इब्ने वलीद, ह्याने दोनशे घोडेस्वारांना घेऊन घमीमकडे कूच केले आहे. हे ऐकून प्रेषितांनी आपला मार्ग बदलला. नेहमीचा गजबजलेला रहदारीचा रस्ता सोडून देऊन त्यांनी जरा कमी माहीत असलेला व दुर्गम आणि कठीण असा रस्ता निवडला. ज्याने ते हुदायबिय्या येथे येऊन पोहोचले. अशा रीतीने त्यांनी खालिदच्या फौजेशी उडणारा खटका टाळला. इतिहासकार इब्ने हिश्शाम ह्या घटनांचे वर्णन पुढीलप्रमाणे करतो:

'आम्हाला कुरैशांनी न व्यापलेला मार्ग कोण दाखवेल?' प्रेषितांनी विचारले. एकाने असा मार्ग दाखविण्याचे कबूल केले. मुस्लिमांना असा रस्ता दाखविण्याकरिता तो पुढे होऊन सर्वांच्या पुढे चालू लागला. तो दाखवित असलेला रस्ता अतिशय दुर्गम आणि खडकाळ व डोंगरांनी भरलेला असा होता. मुस्लिमांना हा डोंगरांनी भरलेला रस्ता पार करून जाताना निव्वळ त्रास झाला, पण त्यांनी हा रस्ता पार करून ज्यावेळी ते खुल्या मैदानात आले, त्यावेळी प्रेषितांनी त्यांना ईश्वराकडे वळून त्याची करुणा भाकायला व नमाज़ पढायला सांगितले. त्यांनी तसे केले, त्यांनी तसे केल्यावर प्रेषितांनी त्यांना सांगितले की, 'अगदी अशाच तऱ्हेने इस्रायलींना क्षमेची प्रार्थना म्हणण्यासाठी बोलविले गेले पण त्यांनी अशी प्रार्थना कधीच केली नाही.'

(पाहाः कुरआन, २:५८) (सीरत इब्ने हिश्शाम, खंड ३, पृ.३५७)

हा खरोखरच मुस्लिमांच्या कसोटीचा काळ होता. पण ही कसोटी त्यांना अत्यंत धीराने व संयमाने द्यायची होती. हाच मार्ग त्यांच्याकरिता ईश्वराने नेमून दिला होता. ह्या आखून दिलेल्या मार्गावर चालत असताना एवढीशीही नाराजी दाखविणे म्हणजे धर्मच्युती समजली जाणार होती, ज्याकरता नंतर त्यांना क्षमेची याचना करायला लागणार होती. म्हणूनच प्रेषितांनी त्या अत्यंत कठीण कालखंडात आपल्या अनुयायांना एवढ्याशाही दुबळेपणाकरता अथवा

चिडचिडेपणाकरता पश्चात्ताप व्यक्त करायला लावून, ईश्वराची क्षमा मागायला लावली. संकटांचा सामना सहनशक्तीने करायचा होता. कुठल्याही प्रकारच्या तीव्र भावनांमुळे एखाद्याला ह्या मार्गापासून ढळू देणे परवडणारे नव्हते.

मक्केपासून नऊ मैल अंतरावर असलेल्या हुदाय्बिय्या येथे प्रेषितांनी परिस्थितीचा अंदाज व आढावा घेण्याकरिता तळ ठोकला. तेथून त्यांनी खराश इब्ने उमय्या ह्याला उंटावर कुरैशांकडे पाठवून दिले. त्याला कुरैशांना हे सांगायचे होते की, मुस्लिम काबागृहाला भेट देऊ इच्छितात. त्यांची युद्ध करण्याची अजिबात इच्छा नाही. मक्केला पोहोचल्यावर खराशच्या उंटाची कत्तल करण्यात आली आणि त्याचाही खून करण्याचे प्रयत्न झाले; पण कसेतरी प्रयत्न करून तो हुदाय्बिय्याला परत पळून आला. प्रेषितांनी नंतर उस्मानना मक्कावासियांकडे आक्रमण थोपविण्याचे आवाहन करण्यासाठी पाठविले. उस्माननी कुरैशांना हे सांगितले की, मुस्लिम फक्त उमरा* करण्याच्या उद्देशाने आले आहेत आणि उमऱ्याचे सर्व विधी संपले की, ते शांतपणे मदिनेला परत निघून जातील. कुरैशांनी त्यांच्याकडे लक्षही दिले नाही व त्यांना कैद केले. नंतर रात्री उशिरा मिक्राझ इब्ने हफ़सने पन्नास लोकांना बरोबर घेऊन मुसलमानांच्या तळावरती हल्ला केला. दगडधोंडे ह्यांचा यात्रेकरूंवर वर्षाव करण्यात आला. मिक्राझला पकडण्यात आले; पण कुठल्याही प्रकारची शिक्षा न करता त्याला सोडून देण्यात आले. तेही कुठलीही अट न घालता. त्यानंतर मुस्लिम पहाटेची नमाज़ पढत असताना तनीमकडून ऐंशी लोकांनी त्यांच्यावर हल्ला केला. त्यांनासुद्धा कैदी बनवून, मग सोडून देण्यात आले.

अगदी रट्टाळ व वेळ खाणाऱ्या वाटाघाटी कुरैशांशी झाल्या. शेवटी एक तह करण्यात आला. प्रथमदर्शनी हा तह म्हणजे कुरैशांकरिता एक प्रचंड विजय व मुसलमानांकरिता पराभव आहे असेच कुणालाही वाटले असते. प्रेषितांबरोबर आलेल्या लोकांना हे कळालेच नाही की, जर स्वतः ईश्वराने दिलेल्या प्रेरणेने ते मक्केला आले होते तर प्रेषितांनी तहाच्या विचित्र अटी मान्य केल्याच कशा? तहाच्या एका अटीनुसार मुसलमानांनी त्याचवेळी मक्केला भेट न देता हुदाय्बिय्या येथूनच मदिनेकडे परत फिरायचे होते. दुसरी अट अशी होती की पुढील वर्षी त्यांना मक्केला येऊ दिले जाईल; पण फक्त तीनच दिवस. तीन दिवस संपले की परत त्यांना गाशा गुंडाळून मदिनेला जावे लागेल. कुठल्याही प्रकारची कारणेसुद्धा न विचारता, अत्यंत अपमानकारक व मुसलमानांना चीड आणणाऱ्या अटी प्रेषितांनी मान्यही करून टाकल्या. हे जणूकाही पराभवाला मान्यता देणे होते.

कुरैशांनी जाणूनबुजून प्रत्येक ठिकाणी आक्रमकपणे प्रेषितांचा अपमानच होईल अशी वर्तणूक ठेवली. ते त्यांना आक्रमणासाठी चिथावत होते; म्हणजे उलट आक्रमणासाठी त्यांना कारण सापडले असते. काबागृहात जायला बंदी घालणे हे अरब टोळ्यांच्या परंपरेच्या अगदीच

***उमरा – छोटी यात्रा, मोठी यात्रा हज, ज्याप्रमाणे वर्षाच्या एका विशिष्ट काळात करावी लागते तशी कोणतीही अट हिला नसते व शिवाय मोठ्या यात्रेहून ह्या यात्रेत काही धार्मिक विधी कमी असतात.**

विरोधात होते. शिवाय तो महिना झू अल् ज़िकदचा होता. ज्या चार महिन्यांमध्ये अरब टोळ्या युद्ध निषिद्ध समजत असत त्यापैकी हा महिना होता. कुरैशांना मुसलमानांशी युद्ध तर करायचे होते पण पवित्र महिन्याचा उपमर्द मात्र होऊ द्यायचा नव्हता. आक्रमणाचा आरोप त्यांना मुस्लिमांच्या माथी मारायचा होता. मुस्लिम हे संख्येनेही अगदी लहान होते व त्यांची आक्रमणाची पूर्ण तयारी सुद्धा झाली नव्हती. ते घरापासून २५० मैल अंतरावर शत्रूच्या दारात उभे होते. अशा वेळी अत्यंत क्रूर तऱ्हेची कत्तल मुस्लिमांच्या अंगावर सोडायची उत्तम संधी कुरैशांना मिळाली होती. आपल्या वैराचे शमन करण्याचा एक उत्तम मार्ग त्यांना मिळाला होता. त्यामुळे मुसलमानांना चिथावण्यासाठी जे काही करता येईल ते ते सर्व त्यांनी, लढाई सुरू करण्यासाठी केले. अर्थातच प्रेषितांनी ह्या सर्व चिथावण्यांकडे दुर्लक्ष केले व काटेकोरपणे ह्या सापळ्यात अडकायचे टाळले.

परिस्थिती इतकी गंभीर होती की, सहकाऱ्यांपैकी अबू बकर हे फक्त एकटेच असे होते की, ज्यांना तहाच्या अपमानास्पद अटी मान्य करताना, मुसलमानांनी शत्रूसमोर गुडघे टेकले आहेत असे वाटत नव्हते. हे सर्व सहकारी आश्चर्याने थक्क झाले, ज्यावेळी कुरआनच्या त्या आयाती प्रकट झाल्या, ज्यांमध्ये ह्या तहाचे वर्णन 'उघड–उघड विजय' असे करण्यात आले होते. 'हा काय प्रकारचा विजय आहे?' एकजण संतापाने म्हणाला, 'आम्हाला काबागृहाच्या दर्शनापासून वंचित करण्यात आले आहे. आमच्या बलीच्या उंटांना पुढे जाऊ देण्यात आलेले नाही. ईश्वराच्या प्रेषिताला हुदाय्बिय्यापासून परत फिरावे लागत आहे. आमच्या दोन बंधूंना, अबू जंदल आणि अबू बसीर ह्यांना त्यांच्या छळवाद्यांकडे परत करण्यात आले आहे....' असे असूनही ह्या अपमानकारक तहानेच मुसलमानांच्या महाप्रचंड विजयाचा पाया घातला.

हुदाय्बिय्याचा तह जरी शत्रूपुढे शरणागती पत्करून केलेला तह वाटत होता, तरी ह्याच तहाने मुसलमानांना त्यांची शक्ती वाढवायची संधी मिळाली. पूर्वीपेक्षा सबळ होऊन एकत्र यायची संधी मिळाली. प्रेषितांनी एका अत्यंत महत्त्वाच्या अटीवर, कुरैशांच्या बाकी सर्व अटी मान्य करून टाकल्या. ती महत्त्वाची अट अशी होती की, पुढील दहा वर्षे दोन्ही बाजूंनी अनाक्रमण पाळावे! सातत्याने छापे आणि आक्रमणे ह्यांमुळे मुसलमानांना शांततेने करायच्या धार्मिक कृत्यांकरिता वेळच मिळत नव्हता. हुदाय्बिय्याहून परत आल्यावर प्रेषितांनी अरेबिया व अरेबियाच्या सभोवतालच्या प्रदेशांमध्ये धर्मप्रचार व प्रसार करण्यावर मुख्यत्वे भर दिला. ह्याकरिता करावयाची पूर्वतयारी आधीच झालेली होती. आता युद्धांना विराम मिळाला असल्याने इस्लामचा संदेश एखाद्या भडकलेल्या वणव्यासारखा संपूर्ण अरेबियामध्ये पसरत चालला होता.

हजारोंमागून हजारो लोक त्यांच्या टोळ्यांसह पटापट इस्लाममध्ये प्रवेश करते झाले. मक्केच्या मूर्तिपूजकांपासून अवसर मिळाल्याने खैबरच्या ज्यूंविरुद्ध कृती करून त्यांना हाकलून देण्यात पैगंबर यशस्वी झाले. ह्याच ज्यूंनी एकदाही इस्लामच्या शत्रूंना मदत करण्याची संधी सोडली नव्हती. प्रेषितांनी मदिनेला मुस्लिमांचे बळ वाढविण्यावरही ह्या काळात लक्ष केंद्रित केले. फक्त दोनच वर्षात हुदाय्बिय्या तहानंतर इस्लाम शिखरस्थानी पोहोचला. कुरैशांनी

युद्धसुद्धा न करता शरणागती पत्करली. ह्या शरणागतीनंतर प्रेषितांच्या विजयपूर्ण मक्का प्रवेशाला कुठलाच अडथळा उरला नाही. एक अत्यंत अपमानास्पद वर्तणूक जी मक्केकडून लादली गेली, तिच्यामुळे पुढच्या प्रचंड विजयाचा राजरस्ता खुला झाला.

सध्याच्या काळातले लोक, थोड्याशाही चिथावणीने शस्त्रसज्ज लढ्यासाठी सिद्ध होतात. ज्या वेळेला अर्थशून्य युद्धांमुळे होणारे तोटे, त्यांना कुणी सांगू लागतो त्यावेळी ते त्यांचा बचाव पुढीलप्रमाणे करतात:– ते स्वतः आक्रमक नव्हते. त्यांच्या शत्रूंनी अत्यंत क्रुरपणे मुद्दाम त्यांना ह्या युद्धात गुंतविले आहे. ह्या लोकांना एका गोष्टीची जाणीवच नसते की, अहिंसेने फक्त तेवढाच वेळ जगायचे नसते जोवर तुमच्यावर कुणी हल्ला करत नाही. हिंसा समोर दिसत असतानाही हिंसेपासून शक्य तितके दूर राहणे हीच खरी अहिंसा. कुठल्याही चिथावणीने चिथावून न जाता शांत राहणे हीच खरी अहिंसा. कावेबाज आणि कपटी योजनांचा सामना मुद्दाम शांत राहूनच केला जाऊ शकतो. शत्रूच्या वैराची मुळे कितीही खोलवर रुजली असली तरी माणसाने त्यांचे वैर हे आपल्या कृतीची प्रेरणा होऊ देऊन आपले निर्दोषित्व सिद्ध करता कामा नये.

शत्रूंशी युद्ध करणे हा जीवनातील यशाचा मार्ग होऊ शकत नाही. झगडे टाळूनच आपण आपली शक्ती संरक्षित ठेवून बळकट करू शकतो. आपल्या अशा वागण्याने आश्चर्यचकित करुनच मग आपण आपल्या शत्रूहून सामर्थ्यवान ठरतो. क्षुल्लक चिथावण्यांकडे दुर्लक्ष न करून लढणे, शांतपणे आपली शक्ती वाढवीत न राहता लढणे म्हणजे आपण करत असलेल्या नाशाबद्दल आपली निंदा करून घेणे. अशी वर्तणूक ईश्वराने निर्मिलेल्या ह्या जगामध्ये कधीच यशस्वी होऊ शकत नाही. प्रेषितांनी न भांडण्याचे न झगडण्याचे धोरण स्वीकारून यश प्राप्त केले. असे जर असले तर त्यांचे अनुयायी भांडण्याचा मार्ग पत्करून कसे काय यशस्वी होऊ शकतील? जर ते प्रेषितांचे उदाहरण सोयिस्कर आंधळेपणाने बाजूला ठेवू लागले तर त्यांना अनुयायी तरी कसे म्हणता येईल? अशा लोकांना, प्रलयाच्या दिवशी प्रेषित त्यांची वकिली करतील, अशी अपेक्षा तरी बाळगता येईल?

# ६ प्रेषितांचा मार्ग

## क्रांती नव्हे उत्क्रांती

**सु**न्ना ह्या अरेबिक शब्दाचा अर्थ रस्ता असा होतो. ह्या शब्दाचा धार्मिक अर्थ म्हणजे, जीवनाचा असा मार्ग जो ईश्वराला आवडतो आणि माणसाला ईश्वराने तो त्याच्या सर्व प्रेषितांच्या माध्यमातून प्रकट केला. आजवरच्या इतिहासात ईश्वराने प्रकट केलेल्या सर्व प्रकारच्या ईश्वरी कायद्यांचे स्वरूप विशद करण्यासाठी ईश्वराने हा शब्द कुरआनमध्ये वापरला आहे.

ज्यावेळेला ईश्वराने ही दुनिया बनवली त्याच वेळेला तिने कसे चालावे हे सांगणारे नियम बनविले. निसर्गातल्या बाकी साऱ्या वस्तूंवर इतक्या कडकपणे हे नियम चालतात की त्यातली कुठलीही वस्तू ह्या नियमांपासून इतकीही ढळत नाही; पण ईश्वराने मानवावर मात्र त्याच्या इच्छा लादलेल्या नाहीत. त्याने मानवाला विचार व कृती स्वातंत्र्य दिले आहे. जे ईश्वरी मार्गावर स्वेच्छेने नियमितपणे चालतात त्यांना बदल्यात स्वर्गसुख मिळेल व जे हा मार्ग सोडून भरकटतात त्यांना नरकाग्नीची शिक्षा मिळेल.

'ईश्वरेच्छा अशी आहे की, हे सर्व (पूर्वेतिहास) माहीत करून देऊन, तुम्हाला (माणसांना) तुमच्या आधी होऊन गेलेल्या (चांगल्या) लोकांच्या (चांगल्या) रस्त्याचे मार्गदर्शन करावे आणि तुमच्यावर दयेचा वर्षाव करावा. तो सर्वज्ञानी व सर्व गोष्टींची सर्व माहिती राखणारा आहे.' (कुरआन, ४:२६)

ईश्वराचे प्रषित हा मार्ग लोकांना स्पष्ट व्हावा म्हणूनच या दुनियेत आले. त्यांनी त्यांच्या प्रत्येक कृती व उक्तींमधून ईश्वरेच्छेप्रमाणे कसे वागावे हे माणसाला दाखवून दिले. जीवनाचा हा असा मार्ग इस्लाममध्ये सुन्ना म्हणून ओळखला जातो. ह्याचाच दुसरा अर्थ 'प्रेषितांचा रस्ता' असाही होतो. जीवनाच्या प्रत्येक अंगाला सुन्ना स्पर्श करते. अगदी व्यक्तिगत व्यवहारांपासून, सामाजिक चळवळी व सुधारणा आणि राष्ट्राची उभारणीसुद्धा. ज्यांना खरोखरच स्वतःला ईश्वराचे निवडलेले लाडके, म्हणवून घ्यायचे असते त्यांनी नेहमीच ह्या प्रेषितांच्या रस्त्यावरून चालायला हवे. आयुष्याच्या कुठल्याही वळणावर, आपल्याला हवे तसे चालायला आपण मोकळे आहोत असे त्यांना वाटता कामा नये.

प्रेषितांच्या आयुष्यातील सर्वात महत्त्वाची ठळक बाब म्हटली तर ती म्हणजे ईश्वरी संदेशाचा प्रचार करणे. त्यांच्या आयुष्याचा अभ्यास केला असता सर्वात महत्त्वाची गोष्ट लक्षात येते ती ही की, त्यांना सर्वच माणसांना ईश्वराच्या रस्त्यावरती आणायचे होते. त्यांची ही मोठी आकांक्षा मनोवेदनेमध्ये बदलली होती, हे कुरआनच्या पुढील आयातीतून स्पष्ट होते.

'कदाचित त्यांच्या अश्रद्धाळूपणाने (तुम्हाला होणाऱ्या मनोवेदनेमुळे) तुम्ही स्वतःला झिजवून झिजवून माराल.'(२६:३)

प्रेषित एकदा म्हणाले होते की, जे त्यांच्या सुन्नाकडे दुर्लक्ष करतील ते त्यांच्या

अनुयायांपैकी नव्हेत. विवाहविषयक अथवा दुसऱ्या कुठल्याही सामाजिक बाबीला ही गोष्ट जेवढी लागू पडते, तेवढीच ती लोकांना ईश्वरी मार्गावरती बोलविण्याच्या कर्तव्यालाही लागू पडते. प्रेषितांचे अनुयायी म्हणवून घ्यायला केवळ तेच लोक लायक होत, जे प्रेषितांनी नेमून दिलेली इतर कामे करीत असताना, त्यांचे सर्वात महत्त्वाचे धर्मप्रचार करण्याचेही काम करतात. सामाजिक चळवळीकरिता वास्तवाची कास धरून एकेक पायरी करत पुढे जायचे, हे प्रेषितांच्या सामाजिक कार्याचे महत्त्वाचे अंग असे. तात्त्विक कल्पना व्यवहारात उपयोगी आणताना त्यांनी नेहमीच त्यांना व्यवहारी सोप्पेपणाची जोड दिली. सामाजिक स्थित्यंतर घडवून आणताना ते सावकाश होईल, ह्याची दक्षता त्यांनी नेहमीच घेतली. 'आधुनिक परिभाषेत' सांगायचे तर त्यांचा मार्ग क्रांतीचा असण्यापेक्षा उत्क्रांतीचा होता. हजरत आयेशांनी हा मुद्दा अगदी व्यवस्थित स्पष्ट केला आहे.

'कुरआनचे सुरुवातीचे सूरे (अध्याय) छोटे असून त्यात स्वर्ग व नरकाविषयाचे उल्लेख असत. नंतर मग लोक खरोखरच इस्लामी शिकवण स्वीकारायला तयार झाल्यावर कायदेशीर व बेकायदेशीर, नैतिक व अनैतिक वर्तणूकीसंदर्भातल्या आयाती प्रकट होऊ लागल्या. 'दारू पिऊ नका' किंवा 'व्यभिचार करू नका' अशा प्रकारच्या निषेधात्मक आज्ञा आधीच अवतरल्या असत्या तर लोकांनी ह्या सर्व गोष्टी सोडून द्यायला चक्क नकार दिला असता.' (बुखारी)

मक्केवरती विजय (हिजरीशक, ८) मिळवल्यावर प्रेषितांना अरेबियाच्या राजधानीची पूर्ण सत्ता लाभली. असे असूनही मक्केमध्ये व काबागृहमध्ये लगेचच इस्लामी कायदे लागू करणे त्यांनी टाळले. जे काही करायचे होते ते त्यांनी सावकाश केले. हिजरी शक, ८ मधली यात्रा ज्यावेळी आली, त्यावेळी खरे तर मक्केमध्ये मुस्लिम राज्य होते, तरीही ती यात्रा जुन्याच इस्लामपूर्व चालीरितीप्रमाणे घडली. पुढच्या वर्षीची यात्रा मूर्तिपूजकांनी त्यांच्या प्रथांप्रमाणे व मुस्लिमांनी त्यांच्या प्रथांप्रमाणे केली. तिसऱ्या वर्षी मात्र जाहीर करण्यात आले की, त्या वर्षीची यात्रा संपूर्णपणे मुस्लिम पद्धतींप्रमाणे होईल. ही यात्रा इस्लामी इतिहासात हज्जतुल् विदा म्हणून प्रसिद्ध आहे कारण ही प्रेषितांची शेवटची यात्रा ठरली.

मूर्तिपूजकांनी काबागृहात येऊन त्यांच्या मूर्तिपूजक प्रथांप्रमाणे विधी करावेत हे प्रेषितांना पसंत पडणे अगदी नैसर्गिकपणे शक्यच नव्हते. असे असूनही इस्लामी सत्तेचा दिमाख ते पूर्णपणे दाखवू शकत असूनही त्यांनी इस्लामी पद्धत लागू करण्याची घाई केली नाही. उलट त्यांनी स्वतः मक्केच्या विजयानंतर दोन वर्षे हज्जच्या यात्रेला जाण्यापासून स्वतःला रोखून धरले. 'मी अशा यात्रेला जाऊच शकत नाही, ज्या यात्रेमध्ये मूर्तिपूजक यात्रेकरू नग्नावस्थेत त्यांचे यात्राविधी करीत असतील.' हज्जचा काळ आल्यावर ते म्हणत असत.

मक्केवरच्या विजयानंतर काही मुस्लिम हज्जच्या यात्रेला गेले होते; पण पैगंबर त्यांच्याबरोबर गेले नाहीत (हिजरी शके, ८). दुसऱ्याच वर्षी (हिजरी शक, ९) अबू बकर ह्यांच्या नेतृत्वाखाली मुस्लिम यात्रेकरूंचा जथ्था यात्रेला जाऊन आला. ह्या यात्रेनंतरच मूर्तिपूजकांना यात्रेची बंदी करण्यात आली. ही बंदी कुरआनच्या पुढील आयातीतून प्रकट झाली.

'श्रद्धावानांनो (मुसलमानांनो) लक्षात घ्या की, मूर्तिपूजक घाणेरडे, अस्वच्छ आहेत. हे वर्ष संपल्यावर त्यांना पवित्र मशिदीमध्ये (काबागृहात) पाऊल टाकू देऊ नका.'(९:२८)

प्रेषितांनी हजरत अलींना अशी आज्ञा देऊन पाठविले की, त्यांनी यात्रेकरूंच्या सर्व तांड्यामध्ये मिसळावे आणि जाहीर करावे की, त्या वर्षानंतर कुठल्याही मूर्तिपूजकाला हज्जच्या यात्रेला येऊ दिले जाणार नाही. तसेच तवाफ (काबागृहाला प्रदक्षिणा घालणे) करीत असताना कुणालाही नग्न राहण्याची परवानगी दिली जाणार नाही. मग तिसऱ्या वर्षी, अनेकेश्वरवादाला हळूहळू नष्ट केल्यावर प्रेषित काबागृहाकडे हज्जच्या यात्रेला निघाले, जी त्यांची शेवटची यात्रा ठरणार होती.

ह्या सर्व उदाहरणावरून प्रेषित सामाजिक सुधारणा सावकाश करण्यावर कसा भर द्यायचे ते स्पष्ट होते. इस्लामची लष्करी सत्ता प्रस्थापित झाल्यावरसुद्धा त्यांनी इस्लामी कायदा लागू करण्याची घाई केली नाही. उलट घटना नैसर्गिकरीत्या प्रवाही होऊन आपल्याला हव्या तशा, कशा घडतील ह्याकडे लक्ष दिले. त्यांनी स्वतःला, एखादी आवश्यक वाटणारी कृती करण्यापासून रोखले; पण अनेकेश्वरवादी स्वतःहूनच आपल्या अनेकेश्वरवादासंबंधित असलेले विधी व कृती सोडून देतील असा काळ येईपर्यंत त्यांनी वाट बघितली आणि मग आवश्यक ती कृती केली.

प्रेषितांच्या अशा अनेक गोष्टी सांगता येतील की, ज्यांच्याकडे आजवर, त्या महत्त्वाच्या आहेत म्हणून बघितलेच गेलेले नाही. उदाहरणार्थ: त्यांचा एखाद्या गोष्टीकडे पाहण्याचा वास्तवतावादी व धीमा दृष्टिकोन हा आजवर कधीही फार महत्त्वाची गोष्ट म्हणून समजला गेलेला नाही. ह्याचेच एक उत्तम उदाहरण म्हणजे प्रेषितत्व मिळाल्यावर एकूण तेरा वर्षे प्रेषित मक्केत राहिले; पण ह्या तेरा वर्षांमध्ये एकदाही त्यांनी काबागृह अपवित्र केले जाते आहे म्हणून त्याविरुद्ध मोहीम उघडली नाही. मक्केवरती विजय मिळवल्यानंतरसुद्धा त्यांनी अर्थशून्य, मूर्खपणाच्या व पोरकटपणाच्या रूढी नष्ट करण्याची घाई केली नाही. संपूर्ण कृती करण्याची सत्ता व स्वातंत्र्य असतानाही ते दोन वर्षे थांबले. तिसऱ्या वर्षी मात्र त्यांच्या मनात असलेल्या सुधारणा त्यांनी घडवून आणल्या.

धीमी पद्धत अनेक फायदे मिळवून देते, जे फायदे, दुसरी कुठली ही पद्धत देत नाही. आपले ईप्सित साध्य करण्यात ही पद्धत यश मिळवून देते. जोपर्यंत, ह्यापूर्वी आपली मिळवलेली जागा बळकट झाली आहे हे जाणवत नाही, तोपर्यंत ह्या पद्धतीमध्ये माणूस पुढचा प्रवास सुरू करीत नाही. स्वतःच्या उत्साहाबरोबर असा मनुष्य वाहावून जात नाही. उलट बाह्य परिणामांचा विचार करून नेहमीच एक पाऊल पुढे टाकतो आणि काळाबरोबर राहतो. आपल्या वाटचालीमध्ये इतकी काळजी घेणारा माणूस आपल्या अंतिम ध्येयापर्यंत आरामात जाऊन पोहोचतो, ह्यात शंका घेण्याचे काहीच कारण नाही.

वाढीव अनावश्यक तोटे व जबाबदाऱ्या अशा पद्धतीमुळे कोठेही अंगावर घ्यायला लागत नाहीत. ज्यांना फार मोठ्या गोष्टी फार थोड्या काळात मिळवायच्या असतात त्यांना

अर्थातच असे लक्षात येते की, त्यांना फार मोठे अडथळे फार लवकर पार करायचे आहेत आणि हे सर्व, ते स्वतःची तशी पात्रता मिळवायच्या आधीच करायचे आहे. असे प्रयत्न जवळ जवळ नेहमीच आयुष्याचा न मोजता येणारा व भरून न निघणारा नाश करतात व ह्याशिवाय मालमत्तेची हानी होते ती वेगळीच! अशा अदूरदर्शित्वाने केलेल्या कृतींमुळे घडणारे नुकसान भरून काढण्याकरिता कधी कधी शतकांचा काळसुद्धा अपुरा पडू शकतो.

**दृढ आज्ञापालन**

अरेबियाच्या सरहद्दीला लागून असलेले सुपीक प्रदेश, प्रेषितांच्या आयुष्याच्या शेवटच्या काळात, त्यावेळेच्या दोन साम्राज्यवादी सत्ता म्हणजेच सासानियन व बिझंटाईन, ह्या दोघांच्या ताब्यात होता. उत्तरेला बसरा आणि घसासिना ही संस्थाने होती. त्याशिवाय रोमन साम्राज्याचा पेत्रा नावाचा सुभा होता. ज्याच्यावर खरा अंमल अरब सुभेदाराचा असे. त्या सुभ्यातल्या रोमन वर्चस्वामुळे तिथल्या बऱ्याच लोकांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला होता. दक्षिणेला व ईशान्येला बाहरीन, यमामा, येमेन आणि ओमानची संस्थाने होती. ह्यातले शेवटचे, मझुनचा सुभा म्हणून ओळखले जात असे. ही संस्थाने पर्शियन (सासानियन) अंमलाखाली होती आणि त्यांचा धर्मही पर्शियनांचाच म्हणजे 'झरत्रुष्टी धर्म' होता.

हिजरी सनाच्या सहाव्या वर्षी (इ.स. ६२८) प्रेषितांनी हुदाय्बिय्या येथे कुरैशांशी शांतीचा तह केला होता. घरच्या आघाडीवर शांती मिळवल्यावर त्यांनी अरेबियाच्या सरहद्दीवरील सर्व लहान–मोठ्या सत्ताधाऱ्यांना इस्लाम स्वीकारण्याविषयी पत्रे पाठविली. असेच एक पत्र, प्रेषितांचे विशेष दूत शुजा इब्ने वहब हे घसासिनाच्या हारिस इब्ने अबी शिम्रकडे घेऊन गेले. पत्रातली पुढील वाक्ये वाचून अरब सरदार चिडला. 'ईश्वरावरती श्रद्धा ठेव. असे केल्यास तुझे सार्वभौमत्व टिकून राहील.' संतापाने चिडून जाऊन त्याने पत्र फेकून दिले व तो म्हणाला, 'माझे राज्य माझ्यापासून कोण हिरावून नेणार आहे?'

बसराचा राजा शूरजिल् इब्ने अम्र घस्सानी हा जास्तच तिरस्कार करणारा निघाला. प्रेषितांनी हारिस इब्ने उमैर अझदी ह्याला एक पत्र घेऊन ह्या रोमन प्रशासकाकडे पाठविले. दूताने सिरीयाच्या सरहद्दीवरच्या मोता शहरात प्रवेशही केला नसेल एवढ्यात रोमन प्रतिनिधीच्या आज्ञेवरून एका अरबाने त्याचा खून केला.

आंतरराष्ट्रीय संकेतानुसार दूताचा खून करणे हे एका राष्ट्राचे दुसऱ्या राष्ट्रावरती आक्रमण समजले जाते. ह्याशिवाय रोमन सैन्य मदिनेवरती हल्ला करण्यासाठी जमवाजमव करीत आहे असे समजायला भरपूर वाव होता, नव्हे तशा खुणा दिसायला लागल्या होत्या. बिझंटाईन लोकांना अरब भूमीवरती एका स्वतंत्र व सार्वभौम सत्तेचा उदय व प्रगती होणे परवडण्याजोगे नव्हते.

ज्या वेळेला दूताच्या खुनाची वार्ता मदिनेमध्ये प्रेषितांना समजली, त्यावेळी, इतक्या थंडपणे रक्त खाण्याची तयारी ठेवणाऱ्यांविरुद्ध युद्ध करण्याचा निर्णय प्रेषितांना घ्यावा लागला. हर्क नावाच्या ठिकाणी सर्व मुस्लिमांनी आपापल्या शस्त्रांसह जमावे अशी आज्ञा त्यांनी दिली.

तीन हजारांची फौज ज़ैद इब्ने हारिसा ह्यांच्या नेतृत्वाखाली तयार झाली. जाताना काही बहुमूल्य सल्ले देऊन त्यांनी फौजेची सिरियाकडे पाठवणी केली.

सिरियामध्ये मान नावाचे गावी मुस्लिम फौजा आल्यावर, त्यांनी तळ ठोकला, बसराच्या सुभेदाराने युद्धाची पूर्ण तयारी केली होती आणि रोमन सम्राट हेराक्युलस हा एक लाखाच्या फौजेनिशी जवळच्या माराब ह्या जागी आला आहे ह्या बातमीने तो अजूनच उत्तेजित झाला होता. लख्म, जुझाम, कैन, बाहर आणि बल्ली ह्या स्थानिक ख्रिस्ती टोळ्यांनी बिझंटाईन, स्वधर्मी लोकांच्या बाजूने, बनी बल्ली ह्या टोळीच्या मालिक इब्ने ज़ाफिलाह् ह्या सरदाराच्या आधिपत्याखाली मुसलमानांशी लढायचे कबूल केले. त्याप्रमाणे त्यांनी तयारीसुद्धा केली. ही रोमन साम्राज्याची एक लाखाहून अधिक संख्येची फौज सिरीयन सरहद्दीवरती मुस्लिमांच्या फक्त तीन हजार सैनिकांशी लढणार होती.

ज़ैद इब्ने हारिसा हा युद्धात मृत्युमुखी पडला. त्याच्या नंतरचे दोन्ही सेनापती, जाफर इब्ने अबी तालिब व अब्दुल्ला इब्ने रवाहा हेसुद्धा युद्धात हुतात्मे बनले. सेनापतींच्या मृत्यूने मुस्लिम फौजेमध्ये निर्नायकी माजली व पूर्ण फौज उधळली गेली. ह्यानंतर साबित इब्ने अक्रम नावाचा सैनिक पुढे झाला व त्याने सेनापतित्वाची धुरा अंगावर घेतली. सेनापतीपदाचा ध्वज हाती घेऊन तो जोरजोरात ओरडू लागला, 'एकच सेनापती मान्य करा!' 'आम्ही तुला सेनापती मानले आहे!' बाकी सारे ओरडले. साबितने मात्र सेनापतित्व नाकारले आणि सेनापतित्वाची धुरा खालिद इब्ने वलीदकडे दिली. मुस्लिमांनी ह्या नेमणुकीला जोरजोरात ओरडून मान्यता दिली. हे सर्व ऐकून खालिद इब्ने वलीद पुढे झाले, त्यांनी ध्वज उंचावून धरला आणि ते रोमनांवरती तुटून पडले. बिझंटाईन सैन्याची ह्यानंतर थोडीशी पळापळ झाली.

हे युद्ध मात्र अनिर्णायक ठरले आणि त्यानंतर कायम एक अशी शक्यता शिल्लक राहिली की, पेत्राचे अरब, रोमन मदत घेऊन मदिनेवरती कधीही स्वारी करतील आणि इस्लामची नवजात व अनाघ्रात शक्ती नष्ट करून टाकतील. हा धोका, हिजरी शकाच्या पाचव्या वर्षापासूनच वाटायला लागला होता. उमर इब्ने खत्ताबना ज्या वेळेला दुसऱ्या सहकाऱ्याने विचारले की, त्यांनी काही बातमी ऐकली का त्यावेळी प्रतिक्षिप्तपणे त्यांनी प्रश्न विचारला, 'काय? घसासिनाची फौज इथवर पोहोचली आहे?'

पैगंबरांना ह्या धोक्याची पूर्ण जाणीव होती व शेवटच्या काही दिवसांमध्ये त्यांनी ह्या गोष्टीची पक्की तयारी केल्याची खात्री करून घेतली की, ज्या योगे पेत्राच्या रोमन साम्राज्याशी संबंधित फौजेचा मुसलमानांना प्रतिकार करता यावा. ह्याकरिता ज्या फौजेची नेमणूक केली होती, त्यामध्ये अबू बकर व उमरसारखे ज्येष्ठ सहकारी होते, अर्थातच फौजेचे नेतृत्व मात्र ते करणार नव्हते. उलट अत्यंत दूरदृष्टीने पैगंबरांनी ह्या फौजेचे नेतृत्व उसामा इब्ने ज़ैद ह्याच्याकडे दिले होते, ज्याच्या वडिलांचा, ज़ैद इब्ने हारिसांचा वध मोताच्या युद्धात झाला होता व जो स्वतः अतिशय शूर व तरुण योद्धा होता. शिवाय वडिलांच्या मृत्यूचा बदला त्याला घ्यायचा होता, ते वेगळेच. ही फौज प्रेषितांच्या जीवनकाळात कधीही सिरियाच्या दिशेने जाऊ शकली नाही.

प्रेषितांच्या मृत्यूनंतर (हिजरी शक, १०) अबू बकर हे ख़लिफ़ा म्हणून नेमले गेले आणि सिरियावरच्या आक्रमणाची आज्ञा प्रेषितांऐवजी, शेवटी त्यांनी दिली.

प्रेषितांच्या मृत्यूनंतर मदिनेमध्ये, सर्व अरेबियामध्ये लोक स्वधर्माचा (इस्लामचा) त्याग करीत आहेत अशा बातम्या येऊ लागल्या. प्रेषितांच्या अगदी सुरुवातीच्या काळातल्या सहकाऱ्यांनी, इस्लाम स्वीकारताना दाखविलेला तीव्र विश्वास हा त्यांच्यामध्ये इस्लाममुळे घडलेल्या बौद्धिक व आत्मिक बदलाचा परिपाक होता. हिजरी शक, ८ मध्ये मका जिंकल्यावर ज्या लोकांनी इस्लाम स्वीकारला होता; त्यांच्यामध्ये असे कुठलेच बदल घडले नव्हते. त्यांच्या इस्लाम स्वीकारण्यामागे इस्लामचे वाढलेले राजकीय वर्चस्व व महत्त्व तेवढेच होते. त्यांना अतिस्वतंत्र व कुठल्याही नियमांनी न बांधलेले आयुष्य जगायची सवय होती. काही मुस्लीम कायदे व त्यातले त्यात ज़कातचा* कायदा त्यांना सहन होणे शक्य नव्हते. येमेन आणि नज्दमध्ये काही 'लोकपुढारी' निर्माण झाले होते ज्यांनी ह्या परिस्थितीचा फायदा उठवीत, एका नव्या इस्लामची निर्मिती केली होती. पैगंबरांच्या मृत्यूच्या काही महिने आधीच हा 'नवा इस्लाम' निर्माण झाला होता. ह्या 'नव्या' धर्मात ज़कात द्यायची गरजच नव्हती. अस्वद आणि मुसैलेमा ह्या दोन लोक पुढाऱ्यांनी स्वतःच्या शब्दांना वजन यावे म्हणून प्रेषितत्त्वाचा सुद्धा दावा केला होता. कारण त्याशिवाय ते ज़कातच्या व्यवस्थेला आव्हान देऊच शकले नसते. ज़कात हा, पैगंबर मोहम्मदांना (स.) प्रकट झालेल्या धर्माचा एक भाग होता. तेवढ्याच अधिकारवाणीने त्या व्यवस्थेला विरोध करायचा, म्हणजे त्यांना प्रेषितत्वाचा खोटा दावा करणे भाग होते. त्यांचे प्रेषितत्व भलते लोकप्रिय ठरले. ज्या लोकांना ज़कात फार मोठे ओझे वाटत होते ते सर्व लोक व टोळ्या ह्या खोट्या प्रेषितांच्या पाठिंब्याखाली गोळा झाले. पैगंबरांच्या मृत्यूनंतर (हिजरी शक, १०) ह्या लोकांच्या उत्साहाला उधाण आले आणि लोक पटापट इस्लामचा त्याग करू लागले. ही गोष्ट एखाद्या वणव्यासारखी पसरू लागली. फक्त मक्का, मदिना व ताएफ ही तीनच, ठिकाणे ह्या धार्मिक त्यागाच्या घटनांपासून दूर राहिली. अशाही बातम्या होत्या की, हा उठाव म्हणजे मदिनेवरती करायच्या हल्ल्याची तयारी होती.

पहिले खलिफा म्हणून अबू बकर ह्यांना असे वाटत होते की, हे बंड मोडून टाकण्याकरिता फौजच पाठवायला हवी. बहुतेक सहकाऱ्यांचे मत मात्र ह्याहून वेगळे होते. ह्या अरब टोळ्या बदल्याच्या तिडीकेने पेटल्या आहेत. मदिनेवरती त्या कधीही हल्ला करू शकतात. ह्याकरिता, फौजा, मदिनेच्या संरक्षणाकरिता मदिनेतच राहायला हव्यात. त्यांना दूरदेशी पाठविण्यात हशील नाही असे त्यांचे मत होते.

त्यांना दुसरी गोष्ट, जी आवडली नव्हती व पटली नव्हती, ती म्हणजे युद्धाचे नेतृत्व उसामाकडे देण्यात आले होते, जो फक्त सतरा वर्षांचा होता व महत्त्वाची 'वाईट' गोष्ट म्हणजे एका गुलामाचा मुलगा होता. एका नुकत्याच मिसरूड फुटलेल्या पोराच्या नेतृत्वाखाली पैगंबरांच्या मोठ्या सहकाऱ्यांनी काम करावे, हे इतरांना पटले नव्हते. कुरैशांपैकी, जे आता

***ज़कात: संपत्ती मधला दरवर्षी विशिष्ट प्रमाणात गरीब लोकांसाठी म्हणून द्यायचा कर.**

मुसलमान बनले होते, कुणातरी एखाद्या खंद्या योद्धाची नेमणूक त्याच्या जागी व्हावी असे त्यांना वाटत होते.

उमर, जे उसामाच्या सैन्याबरोबर होते, ते ह्या सहकाऱ्यांचा असा निरोप घेऊन, तो अबु बकरना देण्यासाठी मदिनेला आले होते. 'पैगंबरांनी ज्या फौजेची नेमणूक केली आहे, ती फौज मदिना सोडून गेल्यावर, मला एकट्याला जरी मदिनेत जंगली जनावरांच्या तावडीत सोडून देण्यात आले, तरी, अशा परिस्थितीतसुद्धा, पैगंबरांनी नेमून दिलेल्या फौजेचे युद्धावर जाणे मी रोखू शकत नाही,' एवढे बोलून खलिफांनी पहिली गोष्ट निकालात काढली. उसामाच्या वय व अधिकारासंबंधीचा मुद्दा त्यांनी पुढील शब्दात निकाली काढला, 'मुसलमानांमध्ये एवढा अहंकार व मस्ती असली तर ते इस्लामपूर्व अंधःकाराच्या काळातच वावरत आहेत, असे म्हणावे लागेल!' असे म्हणून ते स्वतः पायी चालत उसामाच्या नेतृत्वाखाली फौजेला निरोप देण्यासाठी गेले. उसामा आपल्या घोड्यावरती स्वार होता व मुस्लिमांचे खलिफा (सर्वोच्च शासक) त्याच्या बाजूने पायी चालता चालता त्याच्याशी मोहिमेसंदर्भात बातचीत करीत होते व सूचना देत होते. उसामानेसुद्धा त्याच दोन्ही मुद्यांकरिता विनंती केली; पण अबूबकरनी दोन्ही गोष्टींना नकार दिला. त्यांना मुस्लिमांचे ओसामाच्या नेतृत्वासंबंधीचे सर्व गैरसमज संपुष्टात आणायचे होते व त्यांनी, ते जसे वागले, तसे वागून अत्यंत तीव्र व वास्तविक रीतीने ते सारे गैरसमज दूर केले. उसामा घोड्यावरती स्वार असताना मुसलमानांचे खलिफा त्याच्या बाजूने पायी चालत आहेत हे पाहून मुसलमानांच्या सर्व शंका आपोआपच दूर झाल्या.

उसामाच्या फौजांनी प्रयाण केले आहे, ही बातमी सर्व अरेबियाभर वाऱ्यासारखी पसरली. त्यांच्या विरोधकांना, ह्यामध्ये मुस्लिमांचा स्वतःविषयीचा प्रचंड विश्वास दिसला. त्यांनी हे गृहीत धरले की, पैगंबरांच्या अनुयायांकडे नक्कीच भरपूर राखीव फौजा असणार, कारण अशा कसोटीच्या क्षणी मुस्लिम इतक्या दूर आपल्या फौजा पाठवीत आहेत. मदिनेवरती हल्ला करण्यापूर्वी सिरियाच्या मोहिमेमध्ये काय घडते ते पहावे म्हणून ते थांबले. सिरियाच्या युद्धात जर मुसलमान हरले, तर त्यांच्या राजधानी मदिनेवरती हल्ला, ते ह्या युद्धात पुरेसे दुबळे झाल्यावर करणे, सोपे जाणार होते.

उसामाच्या फौजांनी रोमनांवरती फार मोठा विजय प्राप्त केला. ही मोहीम एकूण चाळीस दिवसांची होती. ओसामाच्या वडिलांना मोता येथे रोमनांशी लढताना हौतात्म्य प्राप्त झाल्याने तो सूडाने पेटला होता आणि म्हणूनच की काय ह्या मोहिमेमध्ये त्याचे नेतृत्व हे अगदी योग्य नेतृत्व ठरले. मुस्लिमांबरोबर मदिनेला फार मोठ्या संख्येने कैदी व प्रचंड मोठी लूट परत आली. हे पाहिल्यावर बंडखोरांचे अवसान गळाले आणि मग त्यांच्या बंडांचा फडशा तौलनिक दृष्ट्या जास्त सहजपणे पडला. पैगंबरांनी सांगितल्याप्रमाणे वागल्याने मुसलमानांना दोन्ही आघाड्यांवरती असे प्रचंड यश मिळाले.

मुस्लिमांच्या येणाऱ्या पिढ्यांनकरिता ह्या उदाहरणाने फार मोठा धडा मागे ठेवला गेला. तो म्हणजे, मुस्लिमांनी त्यांची शक्ती बाहेरच्या जगात आजमावायला हवी; आपापसात लढून

नव्हे. मुस्लिमांच्या पुढच्या पिढ्या हा धडा शिकण्यात फसल्या व आज तर असे चित्र आहे की, प्रत्येक आघाडीवरती आपापसात लढण्यातच मुस्लिम मश्गुल आहेत, जणू त्यांनी स्वतःला ह्या भांडणांसाठीच कुलूपबंद करून घेतले आहे. आज कुणीही मुस्लिमजगाताच्या बाहेरील आव्हाने स्वीकारायला तयार नाही. उलट प्रत्येकजण आपल्या मुस्लिमबांधवांशीच लढण्याची इच्छा बाळगून आहे. निःशंकपणे, आजच्या मुस्लिम जगतापुढचे खरे आव्हान हे मुस्लिमबाह्य जगतामध्ये इस्लामी विचाराचा प्रसार करणे हे आहे; पण ते आपापसातच भांडत असल्याने, खरे तर ह्या गोष्टीचे अजिबात आश्चर्य वाटायला नको की, इस्लामच्या प्रसाराकरिता त्यांना वेळ व शक्ती लाभत नाही.

ही फौज धाडण्यामागे प्रेषितांचा अजून एक महत्त्वाचा उद्देश होता. अरब टोळ्या पिढ्यान्‌पिढ्या आपापसातच भांडत बसल्या होत्या. तर त्यांना स्वतःची शक्तीपरीक्षा करण्याकरिता बाह्यजगातही शत्रू असतो हे जर दाखविले नाही तर ते परत आपापसातच लढण्याची जास्त शक्यता होती. आयुष्याच्या शेवटच्या काळात पैगंबरांनी अरबांची समर्थ रोमनांशी झुंज लाऊन देऊन हा धोका टाळला. अरबांना आता स्वतःची मर्दुमकी दाखविण्याकरिता चांगला आखाडा उपलब्ध झाला. भ्रातृहत्या व निव्वळ लुटालूट एवढ्याच गोष्टी जे आजवर करीत होते; त्यांना अशा गोष्टींकरिता एवढा वेळच मिळेनासा झाला. ह्यापेक्षा वेगळी व दूरवरची क्षितिजे आता त्यांना त्यांच्या धर्मप्रसारासाठी मोकळी झाली. फक्त शंभर वर्षांतच ते अशा विजयप्राप्तीसाठी निघाले जिने पुढे पृथ्वीवरची तीन खंडे (आशिया, आफ्रिका व युरोप) व्यापली.

# ७ पैगंबरांची क्रांती

**ई**श्वराची अशी इच्छा आहे की त्याचा धर्म जगातला सर्वोच्च धर्म असावा. त्याची अशी इच्छा आहे की, ह्या धर्माने जगातल्या उरलेल्या सर्व बौद्धिक विचारप्रणालीवरती वर्चस्व गाजवावे. पण असे होण्यासाठी एक विशिष्ट परिस्थिती असणे आवश्यक आहे. हजारो वर्षांपासून चालू असलेल्या एका प्रक्रियेचा शेवट, जिच्यायोगे पैगंबरांना त्यांचे कार्य करण्याकरिता परिपूर्ण पाया घातला गेला, सर्वात शेवटी पैगंबरांच्या अवतरण्याने झाला. अशी परिस्थिती निर्माण केली गेली की, ज्यायोगे त्यांचे धर्मकार्य यशस्वी व्हावे. प्रेषितांना फक्त ही परिस्थिती समजून घ्यायची होती व तिचा हुशारीने वापर करायचा होता. पैगंबरांनी अगदी असेच करून इस्लामला बौद्धिक वरचढपणाची जागा मिळवून दिली.

आता परत एकदा, गेल्या हजार वर्षांमध्ये इस्लामच्या पुनरुत्थानाला सुयोग्य आणि साधक अशी परिस्थिती ईश्वराने निर्माण केली आहे. तिचा सुयोग्य वापर जर खरोखर करून घेतला तर भूतकाळात जसे घडले त्या प्रमाणे जागतिक विचारामध्ये परत एकदा इस्लामला वर्चस्व मिळू शकेल.

ह्या परिस्थितीपासून खरोखरच सर्वोत्तम असे काही मिळवायचे असेल, तर ज्याला समकालीन स्थितीचा योग्य अंदाज व पुरेपूर माहिती आहे. अशा एखाद्याला तीव्र लढा द्यावा लागेल. प्रतिक्रियात्मक मानसशास्त्रीय कृतींपेक्षाही पुढे जाऊन खरोखरच्या सकारात्मक व सर्जक कृतींवरती जे लक्ष केंद्रित करतात, अशीच माणसे हे काम करू शकतील. पूर्ण अंतःकरण ओतून इस्लामची प्रगती, एवढेच एक ध्येय बाळगून दुसऱ्या कुठल्याही गोष्टीकडे एवढेही लक्ष न देणारी माणसेच हे काम करू शकतील. अशी माणसे मानवी विचारातील सर्व प्रकारच्या गुंतागुंती टाळतात आणि त्यांना त्यांच्या प्रत्येक कृतीकरिता ईश्वरी बुद्धीचे मार्गदर्शन लाभते. राष्ट्राचे मान सन्मान अथवा भौतिक सुखांची मिळकत, अशा गोष्टी त्यांच्या विचारांचे प्रेरणास्थान नसतात, तर ईश्वराची थोरवी एवढी एकच गोष्ट सिद्ध करून मिळवायची असते व तेवढी एकच गोष्ट त्यांचे स्फुर्तिस्थान असते. भूतकाळामध्ये इस्लामला महत्पदाला नेणारी माणसे अशीच होती, ज्यांनी इस्लामला बौद्धिक महत्ता मिळवून दिली आणि आजही तसेच घडण्यासाठी तशाच माणसांची गरज आहे. हेच जर वरवरच्या घोषणांना आपण बळी पडलो आणि निर्माण होणाऱ्या सटर–फटर प्रश्नांनी जर सैरभर होणार असलो, तर ईश्वराने निर्माण केलेल्या परिस्थितीचा आपण योग्य तो फायदा घेऊ शकणार नाही. शक्यतांना वास्तवात बदलण्यामध्ये आपण यशस्वी होणार नाही.

### एक तुलना

पैगंबरांच्या काळात जी इस्लामी क्रांती घडली, ती घडविताना एकुण १०१८ मानवी जीव मारले गेले. एकुण तेवीस वर्षे ही क्रांती घडत असताना सुमारे ८० मोहिमा काढण्यात आल्या. प्रेषितांनी ह्यातल्या २७ मोहिमांमधून भाग घेतला व ह्याहूनही कमी संख्येच्या मोहिमांच्या

वेळी, प्रत्यक्ष युद्ध लढले गेले. आणि ह्या प्रत्यक्ष लढलेल्या युद्धातही २५९ मुसलमान व ७५९ मुसलमान नसणारे मिळून १०१८ एकूण मारले गेले. एवढ्या मोठ्या क्रांतीमध्ये घडून येणाऱ्या मृत्यूंचा जर विचार केला, तर १०१८ हा फार फार छोटा आकडा म्हणायला हवा. एक अशी क्रांती जिने सर्व मानवी इतिहासाला वळण देऊन फार मोठे बदल केले. सर्व हेतू व ध्येयाचा साकल्याने विचार केला तर पैगंबरांनी घडवून आणलेली क्रांती ही रक्तहीन क्रांती म्हणायला हवी.

पैगंबरांनी केलेली क्रांती व आधुनिक काळातल्या गैर इस्लामी क्रांत्या ह्यांच्यामध्ये तुलना करीत असताना समकालीन मुस्लिम लेखक व भाषणकर्ते इस्लामी क्रांतीची चुकीच्या तऱ्हेने स्तुति करत असतात. ते अभिमानाने सांगतात की इस्लामी क्रांतीमध्ये फक्त हजारएक माणसे मेली तर आधुनिक काळातील इ. सन १९१७ मध्ये घडलेल्या रशियन क्रांतीचे फक्त एक उदाहरण घ्यायचे ठरविले, तरी तिच्यात एक कोटी तीस लाख माणसे मारली गेली. फ्रान्समध्ये लोकशाहीकरिता जी क्रांती घडली तिनेही भरपूर माणसांची आहुती घेतली, जिचा आकडा हजारोंमध्ये जातो.

मुसलमानांना, अशी तुलना फार आवडते कारण ती त्यांच्या अभिमानाला खतपाणी घालते. खरे पाहता इथे अजून एक तुलना करायला हवी, असा विचारही हे लेखक वगैरे लोक करीत नाहीत. अशा प्रकारची तुलना करण्याचा विचार त्यांच्या डोक्यात येत नाही कारण अशी तुलना त्यांची खरडपट्टी काढणारी ठरते आणि कुणालाही स्वतःची खरडपट्टी निघालेली आवडत नाही.

ह्या तुलनेमध्ये, इस्लामी क्रांतीच्या सुरुवातीच्या काळात घडलेल्या मृत्यूंची तुलना आजच्या आधुनिक मुस्लिम चळवळींमध्ये घडलेल्या मृत्यूंशी करावी लागते. दुसऱ्या शब्दात म्हणजे मूळच्या इस्लामी क्रांतीमध्ये घडलेले मृत्यू व आधुनिक विसाव्या शतकातील इस्लामी क्रांतीच्या प्रयत्नांमध्ये घडलेले मृत्यू ह्यांचे आकडे तपासायला लागतात. विसाव्या शतकाने मुस्लिम जगतामध्ये होणाऱ्या कितीतरी मोठ्या क्रांतिकारी चळवळी, ज्यांना 'पवित्र धर्मयुद्ध' असे नाव दिले गेले, पाहिल्या आहेत. पहिल्या मुस्लिम पैगंबरांच्या क्रांतीची जशी आधुनिक युगातील धर्मनिरपेक्ष गैरइस्लामी क्रांतीशी तुलना करतात, तशीच तुलना अशा 'क्रांतिकारी लोकांनी', पैगंबरांची क्रांती व स्वतः ते करीत असलेल्या चळवळी ह्यांमध्ये करायला हवी, म्हणजे तुलनेमध्ये ते कुठे उभे आहेत? हे त्यांना चांगलेच कडून येईल!

अशी तुलना जर खरोखर केली तर मुसलमानांना धक्का बसेल; पण त्यांच्या स्वतःच्या चळवळी, पैगंबरांच्या क्रांतीशी तुलना केली असता, आधुनिक गैरमुस्लिम जगतातील क्रांतिकारी चळवळींहून फार वेगळ्या व चांगल्या नाहीत. गैरइस्लामी क्रांत्यांमध्ये ज्याप्रमाणे अपरिमित हानी झाली, तशीच अपरिमित मानवी हानी मुस्लिम क्रांतिकारी चळवळींमध्येही झाली आहे. अल्जिरियन स्वातंत्र्ययुद्धामध्ये २५ लाख लोक मरण पावले. हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्ययुद्धात ५ लाख मुस्लिम लोक शहीद झाले. पाकिस्तान ह्या राष्ट्राची निर्मिती होताना सर्व मिळून एक कोटी मानवी प्राण आपण गमाविले. सिरिया, इराण, इराक, इजिप्त, पॅलेस्टाईन व इतर काही देशांमधून

इस्लामसाठी ज्यांनी आपले प्राण वेचले, अशांचा आकडा कोटींमध्ये जातो. आणि मुख्य म्हणजे इतक्या साऱ्या माणसांना मारून आपण विशेष काही साध्य केलेले नाही. पैगंबरांच्या क्रांतीचे परिणाम, तिच्यामध्ये फक्त हजार लोक मरूनही संपूर्ण जगभर दिसले. आधुनिक काळात आपण कोट्यावधी लोकांचे बळी, इस्लामी चळवळीच्या नावाखाली देऊनही, आज आपण असे एक अगदी छोटेसुद्धा क्षेत्र दाखवू शकत नाही, ज्यामध्ये इस्लामी क्रांती खरोखरच परिणामकारक व यशस्वी झाली आहे.

गोष्ट इथेच संपली असती तर बरे झाले असते; पण तसे घडलेले नाही. क्रांतीची यशस्विता तर सोडाच, पण लगतच्या इतिहासातील चळवळींनी इस्लामच्या अगदी विरोधी, वाईट व उलट परिणाम घडून आणला आहे. आधुनिक काळातील आपल्या चळवळीचे अगदी यथार्थ वर्णन बायबलच्या पुढील समर्पक शब्दांत करता येईल.

'तुम्ही तुमचे बीच अगदी रिकामेपणात व निरर्थकतेत रुजवाल, कारण तुमचा शत्रू ते खाऊन टाकील. जे तुमचा तीव्र, द्वेष करतात ते तुमच्यावर राज्य करतील आणि तुमची सर्व शक्ती अगदी रिकामेपणात वाया घालवली जाईल. कारण तुमची जमीन कधीही तिची, तिने द्यायला हवी असलेली, जास्तीची उपज देणारी नाही आणि त्या जमिनीवरची झाडेही त्यांनी द्यायला हवीत ती त्यांची फळे देणार नाहीत.' (लव्हिटीकस, अध्याय २६)

आधुनिक मुस्लिम इतिहास हा असा आहे. फार मोठ्या रुचीने व आत्यंतिक पोटतिडिकेने आपण 'खिलाफत' व 'मुस्लिम तेवढा एक' ह्या चळवळी केल्या आणि खरोखरच त्या चळवळींकरिता सांगता येणार नाही एवढे त्याग केले, ते कदाचित, मुस्लिम जग अनेक राष्ट्रीय सरकारांमध्ये विभागले गेलेले पाहण्यासाठीच! आपण आपला देश स्वतंत्र व्हावा म्हणून लढलो, पण स्वातंत्र्य ज्यावेळी मिळाले, त्यावेळी दुसऱ्याच पक्षांनी (लोकांनी) सत्तासूत्रे हाती घेतली होती. पाकिस्तानचे इस्लामी राज्य स्थापताना आपली फार मोठी हानी झाली; पण पाकिस्तान ज्यावेळी निर्माण झाले त्यावेळी त्याचा ताबा स्वतःला 'धर्मनिरपेक्ष' म्हणवणाऱ्या नेत्यांनी घेतला. इजिप्तमध्ये इस्लामी शासन यावे म्हणून आपण आपले सर्वस्व वेचले; पण शेवटी सत्ता धार्मिक गटांच्या हातात पडण्याऐवजी लष्करी हुकूमशहांच्या हातात पडली. इस्रायलचा नाश व्हावा म्हणून गेली जवळ जवळ चाळीस वर्षे त्या प्रक्रियेमध्ये आपण प्रचंड मानवी व वित्तहानी केली; पण ह्यातून खरोखरची निष्पन्न झालेली गोष्ट म्हणजे, इस्रायलच्या राज्याचा विस्तार व मजबुतीकरण. आणि आता ईराणच्या लोकांचे अपरिमित व वर्णनसुद्धा न करता येण्याजोगे हाल झाल्यानंतर, आपल्याला जर असे ऐकायला आले की, इस्लामी गणराज्य हे गैर इस्लामी शक्तीच्या शासनाच्या, मार्गावरची फक्त एक पायरी होती, तर आपल्याला अजिबात आश्चर्य वाटायला नको.

ही आपल्या काळातली कठोर सत्य आहेत. आपण आपल्या सुख व सोयीकरिता कदाचित डोळ्यावरती कातडे पांघरू शकू; पण भविष्यातील इतिहासकारही असेच करतील, अशी अपेक्षा आपल्याला नक्कीच बाळगता येणार नाही. त्यांना असे म्हणावेच लागेल, खरोखर रशियन क्रांतीने लक्षावधी माणसांचा बळी घेतला; पण त्याबरोबर हेही खरे आहे की, ह्या क्रांतीने

जगाचा विचार व दिशा बदलली. तिने झारच्या एकतंत्री अंमलाचा नाश केला व त्या जागी संघगणराज्य प्रकारच्या सरकारची स्थापना केली. भांडवलशाहीवर समाजवादी आर्थिक रचना आरूढ होणे, हे ह्याच क्रांतीने शक्य झाले. इस्लामी क्रांतिकारी चळवळींमध्ये ह्याहून जास्त मानवी बळी जाऊनही, जागतिक विचारसरणीवरती ह्या चळवळींनी आपला कुठलाही ठसा उमटविलेला नाही

पैगंबरांच्या इस्लामी क्रांतीने, आपल्याला हे दाखवून दिले आहे की, फक्त हजार लोक जर त्याचे सारसर्वस्व इस्लामला वाहाण्यास तयार असेल, तर त्यांच्या प्रयत्नांना ईश्वर कधीच निष्फळता देत नाही. उलट चांगले फळ देतो. इस्लामची सर्वोच्चता, तो ह्या पृथ्वीवर स्थापित करतो. आधुनिक काळात लक्षावधी मुस्लिमांनी हरप्रकारचे त्याग करण्याची तयारी दाखवली आहे. तरीसुद्धा ईश्वराने मात्र आपल्या बाजूने कौल दिलेला नाही. आपण सर्व प्रकारचे त्याग करूनही आपले सारे प्रयत्न वैफल्यपूर्णच ठरले आहेत. ह्याचा अर्थ नक्कीच आपल्या प्रयत्नांची दिशा चुकते आहे. जर आपण खरोखरच ईश्वराने घालून दिलेल्या सरळ मार्गावरती चालत असतो, तर त्याने नक्कीच आपल्याला यशस्वी केले असते. ह्याचा दाखला कुरआनच्या ह्या आयातीमध्ये सापडेल.

'आम्ही तुम्हाला फार प्रचंड विजय दिला, ज्या योगे ईश्वर तुमच्या भूतकाळातल्या व भविष्यकाळातल्या पापांना माफी देऊ शकेल, आणि तुमच्याकडे झुकला असलेला त्याचा कल व आवड अधिक परिपूर्ण करू शकेल; ज्या योगे तो तुम्हाला योग्य मार्गाचे मार्गदर्शन करेल व स्वतःची सामर्थ्यवान मदत तुम्हाला बहाल करेल.' (कुरआन, ४८:१–३)

जो शेतकरी गव्हाचे पीक पेरतो त्याला गव्हाचेच पीक मिळते. मी गहू पेरले होते; पण त्यातून काट्यांची उपज झाली, असे जर तो सांगायला लागला तर तो खरोखरच सत्य सांगत नाही. असे कधी होऊच शकणार नाही. ईश्वराने निर्मिलेल्या ह्या जगामध्ये वस्तूमात्रांना असे स्वातंत्र्यच नाही. आधुनिक काळातल्या आपल्या प्रयत्नांमध्ये अगदी असेच घडत आहे. जर आपण खरोखरच पैगंबर व त्यांच्या सहकाऱ्यांच्या मार्गाने गेलो असतो, आपण आपले त्याग, त्यांनी त्यांचे त्याग ज्या पद्धतीने केले, त्याचप्रमाणे जर केले असते, तर शंकाच नको की आपल्या भीमकाय प्रयत्नांचा निकाल आपल्याला हवा तसा लागला असता. आपण इस्लामच्या मार्गावरती चळवळ करीत आहोत अशी आपलीच फसवणूक करण्यात अर्थ नाही. कारण खरोखरच्या इस्लामी झगड्याला, जे फळ द्यायचे ईश्वराने वचन दिले, ते फळ नाहीतर एव्हाना आपल्याला कधीच मिळून गेले असते. ह्या जगामध्ये एखाद्याने ठरविले तर तो नक्कीच मूर्खांच्या स्वर्गात राहू शकतो! पुढील जगातील स्वर्ग मात्र त्यांच्याकरित आहे, जे ह्या जगातले आयुष्य वास्तवाला सामोरे जाऊन घडवितात, भ्रम आणि कल्पनाविकारांना सामोरे जात नाहीत.

## ईश्वरी कुमक

ईश्वर कुरआनमध्ये म्हणतो,'ईमानधारकांनो (श्रद्धावंतांनो) जर तुम्ही ईश्वराला मदत केली; तर तो तुम्हाला मदत करेल व सामर्थ्यवान घडवेल.'(४७:७) इथे ईश्वराला मदत करणे

ह्याचा अर्थ ईश्वराच्या योजनेमध्ये भाग घेणे. ह्या दुनियेत गोष्टी घडाव्यात म्हणून ईश्वराने काही योजना बनविली आहे. त्याने निर्माण केलेल्या परिस्थितीचा योग्य तो फायदा जर आपण उठविला तर त्याचे योग्य ते परिणाम आपल्याला आढळून येतील. आपण त्या योजनेत त्याचवेळी भाग घेऊ शकतो ज्यावेळी आपले प्रयत्न त्या योजनेबरहुकूम असतात. अशा रीतीने प्रयत्न करणारांना ईश्वर मदत करून सामर्थ्यवान बनवितो.

असे न केले तर त्याचे काय होते, ह्याचे आता एक उदाहरण पाहू. एक पुजारी होता. त्याला आपल्या अंगणात चांगला जोमदार, हिरवागार वृक्ष पाहायचा होता. जर मी झाडाचे बी लावले, तर त्याचा भलाथोरला वृक्ष व्हायला, किमान दहा वर्षे तरी लागतील, त्याने विचार केला. म्हणून त्याने अनेक मजूर गोळा करून एक भला थोरला वृक्ष मुळापासून खणून काढला व त्याच्या मूळ जागेपासून उखणून आपल्या अंगणात आणून लावला. 'वा! फारच छान! मी एका दिवसाच्या कामात दहा वर्षांचा फायदा मिळविला आहे,' त्याने विचार केला. दुसऱ्या दिवशी सकाळी उठल्यावर त्याला धक्काच बसला; कारण वृक्षाच्या पानांची टवटवी निघून जात चालली होती. संध्याकाळपर्यंत त्याच्या फांद्या (निर्जीवपणे) लोंबू लागल्या होत्या आणि काही दिवसांतच सर्व पाने सुकून जाऊन गळून पडली होती. त्याच्या घरासमोर जे काय उभे होते; ते म्हणजे कोरड्या लाकडाचा निव्वळ ओंडका होता. ह्यानंतर काही दिवसांनी, पुजाऱ्याच्या एका मित्राने, त्याला आपल्या परसबागेत अस्वस्थपणे येरझाऱ्या घालताना पाहिले. 'तुला काय झाले आहे?' मित्राने विचारले. 'तू इतका दुःखीकष्टी का दिसतो आहेस?' त्या मित्राला सर्व कहाणी सांगून पुजारी म्हणाला, 'मला फार घाई झाली आहे; पण देवाला मात्र अजिबात घाई नाही.' ह्या जगामध्ये घडणाऱ्या प्रत्येक घटनेमध्ये ईश्वराचा व माणसाचा सहभाग असतो. यंत्राची दोन दातेरी चाके ज्यावेळी एकमेकांत अडकून व्यवस्थित वेगाने फिरतात त्याचवेळी ते यंत्र व्यवस्थित चालते, त्याप्रमाणे हे आहे. एक चाक ईश्वराचे व दुसरे चाक माणसाचे. माणसाला त्यावेळी यश मिळते ज्यावेळी त्याचा वेग बरोबर ईश्वराच्या वेगाएवढा असतो. जर त्याने स्वतःच्या वेगाने जायचा प्रयत्न केला तर त्याचे चाक मोडून पडते कारण ईश्वराचे चाक त्याच्या चाकाहून मजबूत आहे.

कोट्यावधी वर्षांमध्ये ईश्वराने वृक्ष व वनस्पती ह्यांच्या वाढीकरिता सुविधा निर्माण केल्या आहेत. ह्या पृथ्वीवरती सुपीक जमिनीचे आवरण तयार केले आहे. त्यांच्या वाढीला लागणारी उष्णता त्यांना सूर्यापासून मिळते. त्यांना पाणीसुद्धा मिळते व ऋतूबदलांमुळे त्यांच्या वाढीला वाव मिळतो. मुळांना लागणारा नत्रवायू पुरविणारे अब्जावधी सूक्ष्म जीव ह्याच योजनेचा भाग होत. ह्या सगळ्या योजना म्हणजे ईश्वराचे दातेरी चाक, असे म्हणता येईल. माणसाने करायची गोष्ट तेवढी एकच, ती म्हणजे आपले दातेरी चाक, ईश्वराच्या दातेरी चाकात योग्य रीतीने बसेल, इतके पाहणे, ज्या योगे प्रचंड मोठा वृक्ष तयार होऊ शकेल. त्याने बी घेऊन ते सुपीक जमिनीत रुजवायला हवे. आता त्याचे चाक ईश्वराच्या चाकाशी मिळून जाईल. निसर्गाचे यंत्र काम करू लागेल व उत्पादनाची हमी मिळेल. ह्या उलट त्याने जर त्याचे बी खडकावरती रुजविण्याचा प्रयत्न केला किंवा जर खऱ्या बीऐवजी तिच्याचसारखी दिसणारी कृत्रिम प्लॅस्टिकची बी

रुजविण्याचा प्रयत्न केला किंवा गोष्टीतल्या पुजाऱ्याप्रमाणे पूर्ण वाढ झालेले अख्खे झाडच उपटून दुसऱ्या जागी लावायचा प्रयत्न केला, तर तो त्याचे चाक ईश्वराच्या चाकाशी गुंतवत नाही व ईश्वराच्या योजनेबरहुकूम त्या योजनेमध्ये काम करीत नाही, असे म्हणावे लागेल. अर्थातच मग त्याने 'जोमदार व हिरवागार वृक्ष' आपल्या अंगणात वाढेल अशी अपेक्षा बाळगू नये.

इस्लामी क्रांतीचेही असेच आहे. ईश्वराने निर्माण केलेल्या परिस्थिती व योजनांचा योग्य रीतीने समजाऊन घेऊन, त्यांचा योग्य तो वापर केला, तरच ही क्रांती घडून येऊ शकते. खरी इस्लामी क्रांती ही अशा वाटेल तशा दिशाहीन कृतींमधून घडणे शक्यच नाही. अगदी सुरुवातीच्या, अगदी थोड्या मुसलमानांची क्रांती यशस्वी झाली, कारण त्यांचे चाक ईश्वराच्या चाकाशी त्यांनी जुळविले होते. ईश्वरी योजनांचा विचार न केल्याने आधुनिक काळातले आपले सर्व त्याग वाया गेले आहेत. आपण आपल्याच इच्छांच्या रस्त्यावरती पावले टाकीत राह्यलो. ईश्वराने निर्मिलेल्या योजनेचा हुशारीने वापर करून न घेता निरर्थक, असंबद्ध आणि मूर्खपणाचे लढे लढत राहिलो. मग इस्लामी क्रांती यशस्वी कशी होणार?

आदम (पृथ्वीवरचे पहिले मानव व पहिले पैगंबर) नंतरच्या माणसांच्या काही पिढ्या एकाच ईश्वराची पूजा करीत होत्या. 'माणूस, ही एकच जमात व समाज होता,' जसे कुरआनमध्ये सांगितले आहे (२:२१३). हे असेच काही शतके चालू राहिले. पण नंतर लवकरच वैश्विक घटनांची पूजा किंवा अनेकेश्वरवाद निर्माण झाला. माणूस न दिसणाऱ्या अमूर्त ईश्वरावरती आपले लक्ष केंद्रित करू शकला नाही; म्हणून त्याने ते दुसरीकडे, दिसणाऱ्या वस्तूंवरती केंद्रित केले व अशा रीतीने महत्तम अमूर्त अस्तित्वाला त्याने अत्यंत हीन व बिनमहत्त्वाचा दर्जा दिला. हा तोच काळ होता, ज्या काळी, चंद्र, सूर्य व तारे पूजेची साधने बनले व पर्वत आणि समुद्र ह्यांना देव (ईश्वर) समजले गेले. माणसांमध्ये निर्माण होणाऱ्या मर्त्य माणसांनासुद्धा ह्याच काळात देव ठरविले गेले. माणसाच्या निर्मितीनंतर फक्त हजार वर्षांतच एकेश्वरवादाच्या सांकल्पनिक महत्तेचा नाश झाला व मानवी मनातली बुद्धिमत्ता अनेकेश्वरवादाच्या विचारांच्या ढगांनी भरून गेली.

अगदी सुरुवातीच्या, एकेश्वरवादाच्या ह्या पडतीच्या काळानंतर ईश्वराने त्याच्या प्रेषितांना पृथ्वीवर पाठवायला सुरुवात केली. ह्या प्रेषितांना एवढी प्रसिद्धी कधीच मिळाली नाही की, त्यांनी अनेकेश्वरवाद नष्ट करून एकेश्वरवादाची पुनर्स्थापना करावी. ह्या सर्व काळात, जगातल्या प्रत्येक कानाकोपऱ्यात मनुष्य असलेल्या ठिकाणी प्रेषित पाठविण्यात आले. एका हदीसनुसार त्यांचा एकूण आकडा हा १,२४,००० इतका फार मोठा आहे; पण ह्या सर्वांपैकी प्रत्येकाच्या वाट्याला तिरस्कारच आला आणि त्यांची टिंगलटवाळी उडविली गेली.

(कुरआन, ३६:३०)

ज्या वेळेला एखादा माणूस सत्याला नकार देतो, त्यावेळी तो तसे काही कारणाकरिता करतो. त्याच्या आयुष्यात सत्याची जागा एखादी दुसरी अशी गोष्ट व्यापून टाकते की, तो तिच्यासाठी उघड उघड सत्यसुद्धा नाकारतो. प्रेषितांपासून मिळणाऱ्या खऱ्या संदेशाशी माणसे कशा प्रकारे वर्तणूक करीत त्याचे योग्य वर्णन कुरआन पुढीलप्रमाणे करते.

'प्रेषितांनी आणलेल्या खुणा बघून लोक त्यांना त्या खुणांची (ज्ञानाची) जाणीव असल्याने अत्यानंदाने टाळ्या पिटू लागत; पण दैवी आपत्तीचा तिटकारा त्यांना लवकरच घेरून टाकीत असे.' (४०:८३)

धर्माचे भ्रष्ट स्वरूप हेच फार काळ त्यांना पवित्र स्वरूप वाटत आले असल्याने ह्या आयातीमध्ये ज्या ज्ञानाचा उल्लेख केला आहे, त्याने, लोकांनी धर्माला जे स्वरूप चिकटवले होते त्याचा उल्लेख केला गेला आहे. धर्म हा एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे संक्रमित होत असताना ज्या प्रकारे संक्रमित केला जातो, त्याचप्रमाणे लोकांच्या मनात बसतो. ज्यावेळी ते धर्माचा विचार करतात त्यावेळी त्यांच्या डोक्यात धर्माशी संबंधित संतांचा विचार येतो. लोकांच्या राष्ट्रीय जीवनातील उभारणीचा व राष्ट्रीय व्यवस्थेचा, हा विचार एक अविभाज्य भाग असतो. उदात्त परंपरेच्या अवगुंठनात ह्या विचाराला समाजामध्ये प्रतिष्ठित स्थान प्राप्त होते.

अनेकेश्वरवादी परंपरांना चिकटणाऱ्या ह्या लोकांना प्रेषित ज्यावेळी भेटायला जात त्यावेळी त्यांच्या एकेश्वरवादाची शिकवण हा त्या वातावरणात एकमेव आवाज असे. ते त्यांच्या शिकवणुकीची सत्यता ठामपणाने सांगत; पण त्याला इतिहासाची साक्ष अजून मिळायची असे. आपल्या लोकांना तार्किक रीतीने पटवून देऊन, (खऱ्या धर्माचा) प्रकाश त्यांनी पाहावा म्हणून आग्रह धरत. आजूबाजूला, प्रस्थापित धर्माचा गलबला असताना असा शांत तार्किक युक्तिवाद आत्यंतिक बहिरेपणाने ऐकला जातो. लोकांच्या पूर्वपारंपरिक श्रद्धांच्या चकचकाटाच्या तुलनेत प्रेषित अगदीच क्षुद्र लोक भासत. येशू ख्रिस्ताचे उदाहरण आपण पाहू. त्याला अनिकेत होऊन झाडाखाली झोपायला लागायचे. तर त्याचवेळी ज्यूंचा प्रमुख धर्मगुरू, हैकलच्या ऐश्वर्यसंपन्न राजवाड्यात राहत असे. हैकलच्या राजवाड्यात राहणाऱ्यांच्या तुलनेत झाडाखाली राहणारी व्यक्तीच खऱ्या सत्याचे प्रतिनिधित्व करते, हे लोकांनी तरी खरे कसे मानावे? म्हणूनच लोकांनी त्यांच्या प्रेषितांवर टिंगल-टवाळी व तिटकाऱ्याचा मारा केला. प्रस्थापित आदरणीय व्यक्तींना सोडून देऊन ह्या अत्यंत क्षुल्लक व कुठल्याही प्रकारची सामाजिक प्रतिष्ठा नसलेल्या माणसांचे त्यांनी का ऐकावे? एक गोष्ट खरी की, हे लोक जुन्या काळच्या प्रेषितांना अत्यंत उच्च स्थान देत असत, कारण अशा लोकांच्या नजरेमध्ये हे प्रेषित, सत्याची उच्चरवाने स्थापना करणारी माणसे असण्यापेक्षा राष्ट्रीय नायक बनलेले असत.

एखाद्याने खऱ्या संदेशाशी नाते सांगणे ही वेगळी गोष्ट आहे आणि एखाद्या प्रस्थापित संस्थेशी नाते सांगणे ही वेगळी गोष्ट आहे. खऱ्याखुरा संदेशानुसार केली जाणारी सेवा आणि प्रस्थापित संस्थेच्या नावाखाली केली जाणारी सेवा ह्यांमध्ये महंदतर आहे. संस्थेची सेवा जास्त सोपी असते. संदेशांना फक्त बौद्धिक व सांकल्पनिक सत्याची जोड असते तर संस्थांना मात्र सर्व प्रकारचे, भौतिक ऐश्वर्याच्या सामर्थ्याचे पाठिंबे असतात. ईश्वराच्या नजरेमध्ये त्याच लोकांना आदर व वरिष्ठ दर्जा मिळतो, जे लोक संदेशाला त्यातले साधे सत्य पाहून फक्त पाठिंबा देतात आणि त्या संदेशाला त्यावेळी दुसऱ्या कशाचीही जोड नसते. हा संदेश पुढे संस्था बनल्यावर जर एखाद्याने त्याला पाठिंबा दिला तर ईश्वर ह्या पाठिंब्याला विशेष किंमत देत नाही. इस्लामच्या

संदेशाशी असलेली निष्ठा एवढी एकच कृती ईश्वराकरिता केली जाऊ शकते. इस्लाम ह्या संस्थेशी निष्ठा दाखविणारेच फार आढळतात; कारण असे केल्याने त्या 'निष्ठेमुळे' मिळणारे भौतिक लाभ त्या प्रत्येकाच्या डोळ्यासमोर असतात.

**ईश्वराच्या वाणीतील उच्च अत्यानंद**

दोन जोडणाऱ्या रस्त्यांवरती रहदारीचे दिवे, हे रहदारीला मार्गदर्शन व नियंत्रित करण्यासाठी उभे केलेले असतात. नरकाकडे जाणाऱ्या रस्त्याबद्दल धोक्याची सूचना देऊन दूर करण्यासाठी व स्वर्गाकडे जाणारा रस्ता स्पष्ट तऱ्हेने दाखविण्यासाठीच, ह्या दिव्यांप्रमाणेच ईश्वराने त्याच्या प्रेषितांना, जीवनाच्या रस्त्यावरती उभे केलेले असते. कुरआन ह्याचे वर्णन पुढीलप्रमाणे करते.

'ह्याप्रमाणे, न्यायाचा समतोल बांधलेली माणसे आम्ही तुमच्यात निर्मिली आहेत, ज्या योगे तुम्ही राष्ट्रांचे साक्षीदार बनता आणि प्रेषित अशाकरिता (बनविले आहेत) की, ते तुमचे साक्षीदार असतील.' (२:१४३)

अगदी ह्याच हेतूने, अनेकेश्वरवादाने एकेश्वरवादावर वर्चस्व गाजवून, ज्यावेळी तो माणसाचा प्रमुख धर्म बनला त्यावेळी प्रेषित पाठवायला सुरुवात झाली. त्यांना सत्याचे योग्य असे ज्ञान देऊन लोकांना खऱ्या जीवनमार्गाचे ज्ञान देण्याकरिता आणि असत्यापासून दूर राहण्याची तंबी देण्याकरिता पाठविले गेले. सर्व प्रेषितांनी त्यांच्या जबाबदाऱ्या परिपूर्ण रीतीने पार पाडल्या. त्यांनी सांगितलेले ज्ञान हे सहजसुलभ समजण्याजोगे व तर्कशुद्ध होते. सत्य सांगण्यासाठी त्यांनी एकही दगड हलवायचा बाकी ठेवले नाही. ज्यांनी त्यांच्यावर विश्वास ठेवून वागायला सुरुवात केली, त्यांना स्वर्गप्राप्ती झाली आणि ज्यांनी त्यांना नाकारले त्यांनी स्वतःकरिता नरकाचे दरवाजे उघडले.

असे असूनही, सत्याची पृथ्वीवर दवंडी पिटली जावी, ह्याहूनही अधिक काही ईश्वराला अभिप्रेत होते. ह्या सत्यामध्ये उच्च प्रकारचा आनंद परत एकदा शोधला जावा अशी त्याची इच्छा होती. सत्याची दवंडी पिटायची तर त्याचे अंतर्बाह्य स्वरूप माणसांना उघड करून दाखवावे लागते. सर्व श्रोत्यांना सत्य पूर्णपणे उघड करून ऐकवावे लागते. आणि हे सर्व अत्यंत 'हुशार व सौम्य प्रकारच्या आग्रही उपदेशाने' जसे कुरआनने (१६:१२५) सत्याच्या प्रचारकांना, ते करायला सांगितले आहे त्याप्रमाणे करावे लागते. असे जर केले तर सत्याला न स्वीकारण्याचे कोणतेच कारण मग माणसांना मिळत नाही. त्यांना असे म्हणताच येत नाही की, ते अज्ञान व अंधारात वावरत होते. सत्याला न स्वीकारण्याचे एकच कारण माणसे सांगू शकतात आणि ते म्हणजे, 'आम्हाला त्याची जाणीव नव्हती.' ज्यावेळेला प्रत्येक मुद्दा त्यांना पुराव्यानिशी सांगितला जातो त्यावेळी अशा सत्याला नाकारण्याच्या कारणाची सर्व पूर्वतयारीच नष्ट होते!

ईश्वरी वाणीतला अत्यानंद हा ह्याहूनही अधिक काही वेगळा आहे. ह्यामध्ये, खऱ्या धार्मिक विचाराला दुसऱ्या कुठल्याही विचारापेक्षा महत्तम स्थान मिळते. कुठल्याही सांसदीय अथवा राजकीय योजनांमुळे ईश्वरी वाणीतला आनंद ह्या पृथ्वीवर अवतरू शकत नाही. हा आनंद

फक्त बौद्धिक पातळीवरच्या झगड्यातूनच निर्माण होऊ शकतो. असे फक्त त्याचवेळी होते, ज्यावेळी सत्याचा निर्दोष ठसा माणसाच्या मनावरती उमटविला जातो व ती ईश्वरी वाणीच्या आनंदात निमग्न होऊ लागतात. एखाद्या शासकीय नियम पुस्तिकांमध्ये लिहून ठेवल्याने हा आनंद निर्माण होत नसतो. आजकालच्या आधुनिक युगात 'आधुनिक ज्ञानाने' जुन्या स्वरूपातील ज्ञानाचा इतके दिवस लखलखीत असणारा प्रकाश हिरावून नेला आहे. उदाहरणात्मक व प्रतिकात्मक तत्त्वज्ञानाची जागा, प्रयोगात्मक विज्ञानातून मिळणाऱ्या ज्ञानाने हिरावून घेतली आहे आणि स्वतःला उच्च स्थान प्राप्त करून घेतले आहे. समाजवादाने भांडवलशाहीहून मोठे स्थान प्राप्त केले आहे, तर राजेशाही राजकीय व्यवस्थेची जागा लोकशाहीने घेतली आहे. ही सर्व सांकल्पिक उत्थानाची व एका व्यवस्थेने दुसऱ्या व्यवस्थेवर कुरघोडी करून तिची जागा घेतल्याची उदाहरणे आहेत. ईश्वराच्या वाणीला सर्वोच्च स्थान प्राप्त करुन देण्यासाठी अशाच प्रकारच्या सत्याने असत्यावर सांकल्पनिक वर्चस्व मिळवण्यासाठी केलेल्या प्रयत्नांची गरज आहे.

ईश्वर सर्व काही करायला समर्थ आहे. सत्याला दुसऱ्या सर्व गोष्टींहून महत्तम बनविणे खरोखरच सहज सोपे आहे; ज्या प्रमाणे त्याने सूर्याला प्रकाशाच्या दुसऱ्या कुठल्याही स्वरूपाहून मोठे बनविले आहे. पण ह्या जगामध्ये ईश्वर माणसाची परीक्षा घेत असल्याने, तो गोष्टींना कार्यकारण परंपरांच्या मर्यादेत घडू देतो. घटना जर चमत्कारानुसार घडल्या तर त्या घटनांमधला ईश्वराचा सहभाग मान्य करण्यावाचून माणसाला पर्यायच शिल्लक राहणार नाही. मग त्याची परीक्षा घेणे कसे काय शक्य होईल? ह्या कार्यकारण भावाच्या मर्यादेत राहूनच ईश्वरी वाणीचे वर्चस्व पृथ्वीवर स्थापले जावे अशी ईश्वराची इच्छा आहे. त्याने असे घडण्याकरिता, आवश्यक असणारी सर्व तऱ्हेची परिस्थिती निर्माण केली आणि मग पैगंबरांना, ह्या इच्छेला फळ यावे म्हणून विशेष प्रकारच्या शक्ती देऊन, ह्या खूप मोठ्या कामाकरिता पाठविले. प्रेषितांना फक्त सत्याची दवंडीच पिटायची नव्हती तर ईश्वरी सत्याला, ह्या पृथ्वीवरची सर्वात मोठी शक्ती बनवायचे होते. माणसाच्या प्रवाहपतित्वामुळे ईश्वरी कुमक मिळण्यापासून तो जो वंचित झाला होता, ते दूर करून, माणसाच्या ईश्वराकडे असणाऱ्या लाडकेपणाची यथार्थता सिद्ध करण्यासाठी पैगंबरांना पाठविले गेले.

'आपल्या स्वतःच्या तोंडाच्या वाफेने ते ईश्वरी प्रकाश विझवू इच्छितात; पण ईश्वर त्याच्या प्रकाशाला परिपूर्ण बनवेल, इतका की, अश्रद्धावंतांना हा प्रकाश अजिबात आवडणार नाही. स्वतः ईश्वराने त्याच्या प्रेषितांना मार्गदर्शन व सत्याविषयीची तीव्र श्रद्धा (ईमान) देऊन पाठविले आहे, ज्या योगे त्याला इतर सर्व धर्मांपेक्षा ह्या धर्माला अत्युच्च आनंदस्थानी बसवायचे आहे, जे मूर्तिपूजकांना कधीही अजिबात आवडणार नाही.' (कुरआन, ६१:८–९)

### एका नवीन राष्ट्राचा जन्म

मोहम्मद पैगंबर (स.) एकदा म्हणाले, 'मी इब्राहीमची प्रार्थना आहे.' त्यांना त्या प्रार्थनेचा संदर्भ द्यायचा होता, जी हजरत इब्राहीम ह्यांनी, ते मक्केमध्ये काबागृह (पाहा पृ.२११)

बांधीत असताना केली होती.

'ईश्वरा, त्यांना त्यांच्यातूनच निपजलेला (हजरत इस्माईल ह्यांची प्रजा, अनुवंश) पैगंबर पाठव, जो त्यांना तू प्रकट केलेल्या पुस्तकातून व स्वतःच्या प्रतिभा व प्रज्ञावंत वर्तणुकीतून मार्गदर्शन करेल आणि त्यांचे पाप शुद्ध करेल, पाप नष्ट करेल. तूच सर्वशक्तिमान व सर्वज्ञानी आहेस.' (कुरआन : २-१२९)

तरीसुद्धा हजरत इब्राहीम ह्यांची ही प्रार्थना व मोहम्मद पैगंबरांचा (स.) जन्म ह्यांमध्ये जवळ जवळ अडीच हजार वर्षांचा काळ लोटावा लागला. प्रेषित हजरत ज़करिया यांनी आपल्याला होणारा पुत्र प्रेषित व्हावा अशी प्रार्थना केली (कुरआन: ३-३०) व त्यांच्या पत्नीला एकाच वर्षात प्रेषित असलेला पुत्र, 'जॉन दि बॅप्टिस्ट' (याह्या) झाला. असे का घडले असावे? की, इब्राहीम ह्यांनीसुद्धा अशाच प्रकारची प्रार्थना केली असताना त्यांच्यासुद्धा तशाच प्रकारच्या प्रार्थनेला मात्र ईश्वराकडून उत्तर मिळायला इतका वेळ लागावा?

ह्याचे कारण असे होते की, 'जॉन दि बप्टिस्ट' ह्यांना लगोलग करण्यासाठी महत्त्वाचे कार्य होते. ज्यूंचा धार्मिक खोटारडेपणा त्यांना उघड करायचा होता व त्यांच्या हातून शहीद व्हायचे होते. असे झाल्याने, ईश्वरी प्रकटीकरणाचे संरक्षण म्हणून ज्यूंचे मिरविणे थांबायचे होते व त्यातूनच एका नवीन राष्ट्राचा, ज्यू राष्ट्राची जागा घेत, जन्म व्हायचा होता. ह्या उलट मोहम्मद पैगंबरांना (स.) एकेश्वरवादाचे, अनेकेश्वरवादावरती वर्चस्व सिद्ध करून, प्रस्थापित करायचे होते. हे सर्व, जोपर्यंत ह्याकरिता साधक असणारी परिस्थिती निर्माण होत नव्हती, तोपर्यंत शक्य नव्हते. एका ताठ राष्ट्राच्या अस्तित्वनिर्मितीची गरज होती. ज्यायोगे पैगंबर, आपले हे कार्य पूर्ण करू शकले असते. हे सगळे घडविण्याकरिता व पैगंबरांचे येणे कार्यकारण परंपरेच्या चौकटीत बसण्याकरिता, जो ईश्वराचा नेमून दिलेला मार्ग आहे, अडीच हजार वर्षे मध्ये जावी लागली.

ह्या योजनेनुसार, हजरत इब्राहीमना इराकची सुसंस्कृत व सुपीक भूमी सोडून अरेबियाच्या कोरड्या, ओसाड वाळवंटामध्ये जाऊन राहायची आज्ञा झाली. जिथे त्यांना आपल्या पत्नी हजरत हाजेरा व पुत्र इस्माईल ह्यांच्याबरोबर राहायला जायचे होते. (कुरआन:१४-३७) हा एक अतिशय नापीक असा भूभाग होता व उर्वरित जगापासून तुटलेला होता. 'संस्कृतीचे सर्व सापळे' टाळून निसर्गाच्या कुशीत एका अशा समाजाच्या निर्मितीची शक्यता होती, जिच्यामध्ये सर्व नैसर्गिक पात्रतांचे संरक्षण होईल. इब्राहीम ह्यांनी ईश्वराला सर्वसमर्पण करणारे लोक निर्माण व्हावेत अशी प्रार्थना केली होती आणि अरेबियाची ही भूमी अशा लोकांच्या उदयाकरिता सुयोग्य अशी होती.

'ईश्वरा, आम्हाला तुला सर्वस्व समर्पण करणारे बनव. आमच्या वंशाजांमधून असे राष्ट्र उभे कर जे तुला सर्वसमर्पण करेल.' (कुरआन : २-१२८)

ईश्वराच्या धर्माची पुनर्स्थापना करून त्याला वर्चस्व मिळवून देण्याकरिता ह्या पूर्वी कधीही निपजले नसतील अशा 'उत्साहपूर्ण चळवळ्या' लोकांची गरज होती. पूर्वीच्या पिढ्या, ज्या मानवी संस्कृतीच्या कृत्रिम वातावरणामध्ये वाढलेल्या होत्या त्यांच्यामध्ये असे महत्त्वपूर्ण

काम करायला लागणाऱ्या 'उत्साहपूर्ण चळवळेपणाचा' व विजिगीषू वृत्तीचा पूर्ण अभाव होता. हेच कारण होते की, पूर्व प्रेषितांना चांगली वागणूक व प्रतिक्रिया मिळाली नाही. त्यांचे कार्य यशस्वी झाले नाही. एका नव्या राष्ट्राच्या निर्मितीची गरज होती, ज्यामध्ये ह्या गुणांची उपज होऊन त्यांची योग्य अशी जोपासना व जपणूक केली जाईल. ह्याकरिता अर्थातच, मानवी पुनरुत्पादनाचा वेग बघता कित्येक पिढ्यांचा जन्म होणे आवश्यक होते. हे सर्व होण्यामध्ये, इब्राहीम ह्यांची प्रार्थना व तिला फळ येणे, ह्यामध्ये वर उल्लेखिलेल्या २५०० वर्षांचा काळ गेला. सर्व तयारी पूर्ण झाल्यावर, मक्केतील बनी हाशीम कुटुंबातील, वहब ह्यांच्या कन्या, अमिना ह्यांच्या पोटी, हजरत इब्राहीम ह्यांनी प्रार्थिलेल्या पैगंबरांचा जन्म झाला.

कोरडी वैरण भूमी, आसरा न देणारे उंचच उंच खडकांचे सुळके व ओसाड नापीक जमीन आणि वाळू, ह्या गोष्टी हजरत इब्राहीम ह्यांची, ते जेव्हा अरेबियामध्ये आपली पत्नी व तान्हे मूल ह्यांच्या समवेत स्थायिक होण्यासाठी आले, त्यावेळी वाट पाहत होत्या. त्यांनी जवळ भरून आणलेला पाण्याचा सर्व साठा संपला व तान्हा इस्माईल तहानेने व्याकूळ होऊन जोरजोरात हात पाय झाडू लागला व ओरडू लागला. त्याचवेळी ज़मज़मचा अखंड झरा उंच उचंबळून आला. ईश्वराने त्यांची किती खडतर परीक्षा घेतली होती, त्याची खूण जणू! पण ह्याचाच एक अर्थ असा होता की ही परीक्षा देतानाही तो त्यांच्याचबरोबर होता, त्यांना सोडून गेला नव्हता. ते तर ईश्वराच्या, त्याच्या स्वतःच्या कामातच गुंतले होते आणि त्यामुळे आणीबाणीच्या व अडचणीच्या प्रत्येक प्रसंगी तोच त्यांच्या मदतीला धावून येणार होता. पुढे ज्यावेळी इस्माईल किशोर वयाचा झाला, त्यावेळी इब्राहीमनी त्यांच्या स्वप्नात, ते त्याचा बळी देत आहेत असे बघितले. त्यांनी ही ईश्वराचीच आज्ञा आहे असे समजून ह्या बळीची तयारी केली. मग ज्यावेळी त्यांनी त्यांचा कोयता, इस्माईलच्या नाजूक गळ्याचा वेध घेण्यासाठी उचलला त्यावेळी आकाशवाणी झाली की, 'मुलाचा वध करण्याऐवजी एका मेंढीचा बळी दिला जावा.' इब्राहीमना फार मोठा त्याग करायची तयारी ठेवायला लागणार आहे, ह्याची ती खूण होती. प्रत्यक्ष त्याग जरी करावा लागला नाही तरी इतक्या मोठ्या त्यागाची तयारी ठेवायची होती. एकदा का ही त्यागाच्या तयारीची शक्ती दाखवायची परीक्षा झाली की, प्रत्यक्ष त्याग करण्याची गरज नव्हती. खरे तर ईश्वराला, इब्राहीम व त्यांच्या कुटुंबाकडून फार मोठी योजना गमावायला लागलेली, त्याला चालले नसते. त्याने त्यांचे योग्य संरक्षण केले.

इस्माईलने मोठा झाल्यावर जुर्हम टोळीतील एका मुलीशी विवाह केला. ही टोळी मक्केमध्ये ज़मज़मचा झरा अखंड वाहू लागल्यावर स्थायिक झाली होती. इब्राहीम त्यावेळी सिरियामध्ये होते. नंतर एकदा ते घोड्यावरून आपल्या मुलाला, इस्माईलना भेटायला आले. इस्माईल घरी नव्हते आणि त्यांच्या बायकोने तिच्या सासऱ्यांना ओळखले नाही. 'इस्माईल कुठे गेला आहे? त्यांनी विचारले. 'शिकारीला,' बायको उत्तरली. 'कसे काय, बरे चालले आहे ना?' इब्राहीमनी पृच्छा केली. त्यांना सामना कराव्या लागणाऱ्या गरिबीचा व अडचणींचा पाढा तिने इब्राहीम ह्यांच्यासमोर वाचला. इब्राहीमनी जाता जाता तिच्याजवळ इस्माईलना आपल्या शुभेच्छा

द्यायला सांगितले व पुढे तिला असेही सांगितले की, इस्माईलला म्हणावे, 'आपला उंबरठा बदलून टाक.' इस्माईल परत आल्यावर तिने त्यांना सर्व कथा सांगितली व आलेल्या पाहुण्यांचा निरोप सुद्धा सांगितला. इस्माईलना बरोबर समजले की आलेला पाहुणा दुसरा–तिसरा कुणी नसून, त्यांचे वडील होते आणि त्यांच्या निरोपाचा अर्थ म्हणजे त्यांना नवीन पत्नी शोधायला लागणार होती! ह्याचे साधे कारण म्हणजे ईश्वराला ज्या तऱ्हेच्या वंशाची अपेक्षा होती, तसा वंश निर्माण करण्यास ही पत्नी समर्थ नव्हती. म्हणून त्यांनी ह्या बायकोला घटस्फोट दिला व नवीन बायको करून आणली. काही काळाने वर वर्णन केलेल्या प्रसंगाची पुनरावृत्ती झाली; पण ह्या वेळेला मात्र त्यांच्या नवीन सुनेने नवऱ्याची स्तुती केली व ती दोघे मजेत असल्याचे सांगितले व पुढे ती असेही म्हणाली की, 'ज्याबद्दल ईश्वराचे आभारी राहावे, असे बरेच काही आम्हा दोघांना मिळाले आहे.' प्रेषित हजरत इब्राहीम ह्यांनी आपल्या मुलाला शुभेच्छा दिल्या व पुढे निरोप सांगितला, 'त्याला म्हणावे, हा उंबरठा ठेव.' ईश्वराने टाकलेली जबाबदारी निभावण्यास ही पत्नी सुयोग असल्याने इस्माईलनी तिला विवाह बंधनातच ठेवले. (तफसीर इब्ने कसीर)

अशा रीतीने अरेबियामधल्या वाळवंटात, जगापासून तुटलेल्या एकांतामध्ये एक असा वंश रुजला की जो, पुढे इस्माईलची बीजे (इस्माईलचे वंशज) म्हणून ओळखला जाऊ लागला. पुढे अडीच हजार वर्षानंतर घडणाऱ्या पैगंबरांना, ज्यांनी ह्या जगातले आजवरचे सर्वात महाकाय व प्रचंड काम केले, त्यांना मदत करणाऱ्या त्याच्या लोकांच्या घडणीची, ह्या घटना म्हणजे पूर्वतयारी व पूर्वस्थिती होती.

मक्केच्या आजूबाजूला असलेल्या ओसाड वाळवंटामध्ये जे राष्ट्र घडले, त्याच्या गुणांचे एकाच शब्दात वर्णन करायचे तर ते अरेबिकमधल्या, 'अल–मुरूआह' (मूर्तिमंत पौरुष) ह्या शब्दाने करता येईल. एखाद्या व्यक्तीमधल्या, मानवतेला आवश्यक असणाऱ्या किमान गुणांचे वर्णन करण्याकरिता, अतिशय किंमतवान समजला जाणारा हा शब्द, अरब लोक वापरीत असत. एका प्राचीन अरब शायराने लिहिले आहे.

'तरुणपणातच एखाद्याला जर पौरुष आपल्या अंगी बाणविता आले नाही, तर वाढत्या वयाबरोबर ते मिळविणे, त्याला कायम जड जाईल.'

अरेबियाच्या वाळवंटामध्ये हजारो वर्षे राहून वाढलेल्या लोकांच्या गुणांचे वर्णन सुप्रसिद्ध अरब इतिहासकार व विद्वान, प्रा. फिलीप हित्ती, ह्यांनी पुढीलप्रमाणे केले आहे.

'उत्साह, अडचणींच्या काळातला सोशिकपणा, खऱ्याचे निरीक्षण व शेजाऱ्याशी कृतज्ञभाव, पौरुष (मुरूआह), औदार्य व आतिथ्य, स्त्रियांविषयी आदर व दिलेल्या शब्दाला पक्केपणाने जागणे.' (हिस्ट्री ऑफ द अरब्ज, पृ.२५३).

**सर्वोत्तम राष्ट्र**

आजवरच्या मानवी समाजाने बघितलेल्यापैकी, सर्वोत्तम मानवी गुण ज्यांना आंदण मिळाले होते, असे लोक ह्या अडीच हजार वर्षांमध्ये निर्माण झाले व त्यांचे एक राष्ट्र बनले.

'माणसासाठी निर्मिलेल्या राष्ट्रांपैकी, तुमचे राष्ट्र, हे आजवर घडलेल्या राष्ट्रांपेक्षा, सर्वोत्तम राष्ट्र आहे.' (कुरआन, ३:११०)

ह्या आयातीचे भाष्य करताना अब्दुल्ला इब्ने अब्बास म्हणतात की, ही आयात पैगंबरांबरोबर मक्केहून मदिनेला आश्रयार्थ गेलेल्या लोकांचा संदर्भ देते. खरे पाहता मुहाजिरांचा तो छोटा गट सहाबा (पैगंबरांचे सहकारी) म्हणून ओळखल्या जाणाऱ्या पैगंबरांच्या समकालीन, सर्व अरबांचे प्रतिनिधित्व करतो.

प्रत्येक युगातल्या प्रेषिताला एका फार मोठ्या अडथळ्याला तोंड द्यावे लागले आहे. तो म्हणजे, त्यांच्या लोकांचे, त्यांच्या पूर्वजांच्या धर्माशी, ज्याला भौतिक सर्वोत्तमतेमुळे कुणीच प्रतिस्पर्धी नसे, त्या धर्माशी असलेले नाते व चटकन गळून न पडणारा पूज्यभाव. ते स्वतः मात्र अशावेळी सत्याच्या व तर्काच्या आधाराने उभ्या असलेल्या अमूर्त पायावरती बांधलेल्या जागेवर उभे असत. अरेबियाच्या वाळवंटांमध्ये जे राष्ट्र निर्माण झाले, त्याला अमूर्त सत्याची पारख करण्याचा गुण बहाल झाला होता. असे सत्य ते इतक्या आधी ओळखीत की तोपर्यंत त्या सत्याला काही बाह्य सौंदर्यही लाभलेले नसे. ते भव्य उघड्या आकाशाबरोबर व आकाशाखाली सर्वत्र पसरलेल्या भीतीदायक प्रचंड वाळवंटात, लहानाचे मोठे होत आणि म्हणूनच की काय कदाचित, त्यांच्यामध्ये कुठल्याही प्रकारचा मुलामा नसलेले सत्य ओळखायची पात्रता असे. सत्य हीच एकुलती एक शक्ती असतानादेखील, ते सत्याकरिता सर्वस्व अर्पण करायला सदोदित तयार असत. एक अशी गोष्ट की, जिने बदल्यामध्ये त्यांना काही दिले नाही तरी चालत असे. अब्दुल्ला इब्ने मसूद ह्यांनी सहाबांच्या ह्या गुणांचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे.

‘ती मुस्लिम समाजाच्या शिरोभागी असणारी माणसे होती. अत्यंत अनौपचारिक, मृदू हृदयी व ज्ञानवंत. ईश्वराने त्यांना पैगंबरांचे साथीदार म्हणून, त्यांचे धर्मस्थापनेचे काम पूर्ण करण्याकरिता निवडले होते.’

अनेकेश्वरवादाने सर्वात कुठली वाईट गोष्ट केली असेल, तर ती म्हणजे, अमूर्त स्वरूपातील सत्याचे, आकलन होण्याची पात्रता काढून घेणे. त्यामुळे एखाद्या गोष्टीवरती विश्वास ठेवताना माणसाला ती वस्तू ’पाहण्याची’ व तिचा ’अनुभव घेण्याची’ आवश्यकता वाटायला लागली होती. ह्या जगात आलेल्या प्रेषितांनी माणसांना अशा सत्याची शिकवण दिली, जी अमूर्त शक्ती होती. ही अशी गोष्ट होती की, जी त्या त्या प्रेषितांच्या लोकांना अजिबात आवडणारी व आवाहन करणारी नव्हती. आणि म्हणुनच प्रत्येक युगातल्या प्रेषितांना टीका, हेटाळणी, तिरस्कार व तुच्छतापूर्वक निंदा, ह्या गोष्टींना सामोरे जावे लागले.

अनेकेश्वरवादाने ईश्वराचे अस्तित्व कधीच नाकारले नव्हते. त्यांनी फक्त एवढेच केले होते की, ईश्वराला पंचेंद्रियांनी अनुभवता येईल अशा वस्तूंच्या साच्यात बंद केले होते. ’न दिसणारा ईश्वर’ अशी कल्पनाच करणे त्यांना इतके अवघड झाले होते की, त्यांनी त्याला मूर्त अथवा मानवी स्वरूपांमध्ये गठित केले आणि ह्या दिसणाऱ्या मूर्त प्रतिमांचाच स्वतःच्या लक्ष्याचे व आकर्षणाचे केंद्र बनविले. त्यांना ज्या वस्तू महान भासत, अर्थातच त्याच वस्तूंना त्यांनी पुज्य ठरविले होते. म्हणूनच जेवढे म्हणून प्रेषित झाले, त्यांना लोकमान्यता कधीच मिळाली नाही, कारण ते ह्या बाह्य स्वरूपावर भरवसा ठेवणाऱ्या, ढोंगी व सामान्य माणसांमध्ये होऊन गेले.

त्यांच्या येण्याच्या वेळी त्यांना कुठल्याही प्रकारची ऐतिहासिक महत्ता चिकटविण्यात आली नव्हती. फार फार उशिरानंतर त्यांना 'राष्ट्रीय नायक' म्हणून समजण्यात येत असे.

इब्राहीमनी, मक्केमध्ये काबागृह बांधायला सुरुवात करताना जी प्रार्थना केली तिचा काही अंश असा होता: आणि आठवा ज्यावेळी इब्राहीम म्हणाले होते: 'ईश्वरा ह्या गावाला एक शांतीस्थळ बनव. मी आणि माझ्या वंशजांना मूर्तिपूजकांच्या धोक्यापासून वाचव. ईश्वरा, त्यांनी कित्येकांना मार्गभ्रष्ट केले आहे. माझे अनुयायित्व करणारा प्रत्येकजण नक्कीच माझा आहे; पण जर कुणी माझ्याविरुद्ध गेला, तर तू नक्कीच क्षमाशील व दयावान आहेस. माझ्या काही वंशजांना मी तुझ्या घराजवळच्या (काबागृह) निर्जन दरीत स्थायिक केले आहे. म्हणजे त्यामुळे ते तुझ्या घराजवळच तुझी प्रार्थना करू शकतील...' (कुरआन १४:३५-३७)

इब्राहीम ह्यांच्या काळात अनेकेश्वरवादाने सर्वोच्च परिसीमा गाठली होती. कुठेही नजर वळवली तरी प्रतिमांची उदात्तता वाढवणारी, फार मोठी स्मारके सर्वत्र दिसत असत. अनेकेश्वरवादी विचारांच्या फासातून मुक्तता मिळवणे, ही मानवी बुद्धीला अशक्य वाटणारी गोष्ट वाटायला लागली होती. ह्या अशाच वेळी इब्राहीमना, मक्केमध्ये जाऊन स्थायिक होण्याची व एक वंशवेल तिथे वाढविण्याची आज्ञा मिळाली होती. ईश्वराला, अशा एका भूमीमध्ये त्याच्या लोकांना वाढवायचे होते, की ज्या भूमीला अनेकेश्वरवादी विचाराचा स्पर्शही झालेला नाही. असे केल्याने एका अशा राष्ट्राची उभारणी होणार होती, की जे लोक बाह्यात्कारी गोष्टींविषयी हुश्शार राहिले असते आणि खरोखरच्या सत्य वास्तविकतांचाच त्यांनी विचार केला असता. कुरआन ह्या मानवी वंशाच्या अंतिम आविष्काराचे वर्णन पुढीलप्रमाणे करते.

'ईश्वराने तुम्हाला श्रद्धा अतिशय प्रिय केली आहे आणि तिचे सौंदर्य तुमच्या हृदयात ओतले आहे, ज्यामुळे अश्रद्धा, चुकीचे वागणे आणि आज्ञाभंग तुम्ही करूच शकणार नाही. ही अशीच माणसे योग्य मार्गदर्शन झालेल्यांपैकी असतात.' (४९:७)

आपण ह्या आयातीचा त्याच वेळी अर्थ लावू शकतो, ज्यावेळी आपण दीडहजार वर्षांपूर्वी ज्या परिस्थितीमध्ये सहाबांनी श्रद्धा स्वीकारली, त्या परिस्थितीचा विचार करू शकू. 'दिसणाऱ्या' अनेक देवांच्या आजूबाजूला गलबला असतानाही त्यांनी न दिसणाऱ्या ईश्वराचा स्वीकार केला. त्यांनी पैगंबरांना ओळखले व त्यांच्यावर विश्वास ठेवला जे स्वतः कुठल्याही प्रतिमेची पूजा करण्याच्या विरोधी होते. इस्लाम त्यावेळच्या जगाकरिता एक अतिशय विचित्र धर्म होता. पण ह्याच परका, परभूमीतला वाटणाऱ्या धर्माला सहाबांनी मान्य केले व त्याच्यावर एवढे प्रेम केले की त्याच्यासाठी दुसऱ्या कोणत्याही गोष्टीचा त्याग करायला ते तयार होते. अगदी थोडक्यात म्हणजे त्यांनी सत्याला, ते अमूर्त शक्तीच्या स्वरूपात असतानाच पाहिले, इतिहासाच्या सार्वकालीन मंजुरीची वाट पाहात ते थांबले नाहीत. किंवा तो धर्म राष्ट्रीय अभिमानाची गोष्ट कधी होतो आहे? ह्याचीही वाट त्यांनी पाहिली नाही. एखाद्याला स्वतःचे सर्वस्व, त्यापासून काहीही लाभ उलट होणार नाही, हे माहित असताना, त्या धर्माकरिता द्यायची तयारी दाखवायला लागत होती.

श्रद्धेसंबंधी कृतींमध्ये दाखविल्या जाणाऱ्या निःस्वार्थीपणाचे त्या काळातले ठसठशीत उदाहरण म्हणजे बैत अकबा सानिया (इस्लाम व पैगंबर निष्ठेची दुसरी शपथ), जी पैगंबरांच्या मक्केहून मदिनेला जाण्याच्या आधी घेण्यात आली. ज्यावेळेला मक्केतला छळ आत्यंतिक हद्दीच्या बाहेर जाऊ लागला त्यावेळी मुसलमानांपैकी काही इस्लामचा संदेश मदिनेत प्रचारित करू लागले आणि तिथे मात्र तो घरोघर पोहोचला. त्यावेळी मदिनेतल्या काही लोकांनी, मक्केला जाऊन, पैगंबरांना निष्ठेची शपथ देऊन, मदिनेमध्ये स्थलांतरासाठी राहायला आमंत्रित करायचे ठरविले. जाबीर अन्सारींनी इस्लाम मदिनेत घरोघर पोहोचल्यावर, ते आपापसात कशी सल्ला मसलत करायचे त्याची आठवण सांगितली आहे, 'आपण तरी किती काळ पैगंबरांना मक्के सभोवतीच्या टेकड्यांमध्ये भीतीप्रद वातावरणात व दुर्दशेमध्ये राहू देऊ शकणार आहोत?' ते एकमेकांना म्हणू लागले. जे फक्त बाह्य स्वरूपाचाच निर्णय करणारे होते त्यांना असे वाटत असे की पैगंबरांचे अगदी मूठभर लोकांच्या पाठिंब्यावर एकटे राहणे चुकीचे आहे. ते ईश्वराचे पैगंबर कसे काय असू शकतात; कारण त्यांना अशा हीन अवस्थेमध्ये राहावे लागते, असेही त्यांना वाटत असे. पण मदिनेतेल्या लोकांनी मात्र ह्या गोष्टीचा जास्त महत्त्वाच्या पातळीवरती विचार केला. त्यांना हे समजले होते की, पैगंबर हे ईश्वराचे प्रेषित आहेत व त्यांना मदत केल्याने ईश्वराची विशेष कृपा व आवड आणि प्रेम आपल्याला मिळणार आहे.

मदिनेतल्या सत्तर लोकांनी ही उपरोल्लेखित निष्ठेची शपथ घेतली. ह्या सत्तर जणांपैकी एकाने, काब इब्ने मलिक अन्सारी ह्यांनी सांगितलेल्या वृत्तांतावरून, त्यांनी ही शपथ किती धोक्याच्या प्रसंगी घेतली होती हे आपल्याला कळते. ते सांगतात की, त्यांच्या लोकांच्या एका टोळीमध्ये, अतिशय चोरून ते यात्रेकरिता दाखल झाले व त्यांनी खोटेच सांगितले की, ते सुद्धा यात्रेला जात आहेत. मक्केजवळ ज्यावेळी दुसऱ्या लोकांनी तळ टाकला त्यावेळी मुसलमानांनी सुद्धा ते झोपले आहेत असे नाटक केले. अशीच तिसरी रात्र गेली आणि मग मात्र पैगंबरांना भेटण्याकरिता अगदी गुपचूप ठरलेल्या संकेतस्थळी ते रवाना झाले, 'जणू झुडुपे व गवतामधून पक्षी गुपचूप रांगत आहेत.' (सीरत इब्ने हिश्शाम, खंड २, पृ.४९)

किती असामान्य अशी परिस्थिती होती ती! सर्व जगाने नाकारलेल्या पैगंबरांना, पैगंबर मानून त्यांचे अनुयायित्व पत्करण्यासाठी उत्सुक असलेले, काही लोक उभे राहिले होते. खुद्द पैगंबरांना ह्यावेळी त्यांच्या जन्मगावी जागा नव्हती. ताएफ मधून शिव्या आणि दगडांचा मारा करीत पाठलाग करून त्यांना हाकलून देण्यात आले होते. मक्केतील कुठलीही अरब टोळी त्यांना संरक्षण द्यायला तयार नव्हती. असे सर्व असूनही मदिनेतल्या त्या थोड्या लोकांनी त्यांचे प्रेषितत्व ओळखले होते व त्यांच्या हाकेला ओ देण्यासाठी, पुढे आले होते. अन्सार (पाहा पृ.२११) ज्यावेळी निष्ठेची शपथ घेण्यासाठी पुढे झाले, त्यावेळी त्यांच्यापैकी एकाने विचारले, 'तुम्ही ही शपथ घेताय त्यामुळे पुढे काय वाढून ठेवले आहेत त्याची तुम्हाला जाणीव आहे ना? ही शपथ तुमच्या घरादाराचा व मालमत्तेचा सर्वनाश करू शकते.' 'आम्हाला पूर्ण माहिती आहे. आमची शपथ अशी आहे की जिच्यामुळे आम्ही दररोज प्रवेश करीत असलेली आमची घरे व

मालमत्ता ह्यांचा नाश होऊ शकतो.' ते उत्तरले. त्यांनी पैगंबरांना विचारले की, 'आम्ही शेवटपर्यंत निष्ठावंत राहिलो तर आमचे बक्षीस काय असेल?' 'स्वर्ग' प्रेषित उत्तरले. 'आम्हाला तुमचा हात द्या; म्हणजे आम्हाला तुमच्या निष्ठेची शपथ घेता येईल,' ते प्रेषितांना म्हणाले.

सर्व अन्सार एकसाथ एका अशा सत्याकरिता जीव द्यायला तयार झाले होते की, त्याची सत्यता अजूनही विवादास्पद होती. माणसांच्या जगामध्ये ह्या सत्याला त्याच्याकरिता अजून जागा सापडलेली नव्हती. अन्सारांची कृती अशी होती की, त्यांच्या आधीच्या वा नंतरच्या समाजाची कुठलीच कृती त्या कृतीशी बरोबरी करू शकली नाही, शकणारही नाही.

**अप्रस्तुत वादांना टाळणे**

ज्या वादांना आधुनिक परिभाषेत राष्ट्रीय वाद म्हटले जाते असे वाद लोकांच्या बौद्धिक कल्पनांचा वेध घेतात व अशा वादांमधूनच लोकप्रिय चळवळी प्रस्थापित होतात. अशा प्रकारच्या वादांना इस्लामच्या पैगंबरांना सुद्धा तोंड द्यायला लागली; पण त्यांनी ते काटेकोरपणे टाळले. त्यांच्या कार्याची यशस्विता ही, ज्या योजनेची पूर्वतयारी त्या पूर्वीच अडीच हजार वर्षे चालू होती व जी आता अंतिम टप्प्यात आली होती, अशा ईश्वरी योजनेबरोबर चिकटून काम करण्यावर अवलंबून होती. जर ते दुसऱ्याच, कमी महत्त्वाच्या वादांमध्ये अडकले असते, तर निर्माण केल्या गेलेल्या परिस्थितीचा व संध्यांचा नाश झाला असता.

येमेन हा अरब सरहद्दीलगतचा अरब प्रांत, इ.स. ५२५ मध्ये इथियोपियाच्या आधिपत्याखाली आला होता व अब्राहची नेमणूक सुभेदार म्हणून झाली होती. ह्या उद्धट माणसाने काबागृह नष्ट करण्यासाठी एका हल्ल्याची तयारी केली. असे केल्याने यात्रेची जागा असल्याने, मक्केला जे केंद्रस्थान प्राप्त झाले होते, ते नष्ट झाले असते. हत्तींच्या फौजेला घेऊन त्याने काबागृहावरती केलेली स्वारी व प्रेषितांचा जन्म, ह्या दोन्ही घटना, एकाच वर्षातल्या (इ.स. ५७०). ह्याच वर्षी सासानियन लोकांनी येमेनवरती हल्ला केला व ते पर्शियन साम्राज्याला जोडले. बाझान नावाचा नवीन सुभेदार नेमला गेला. पैगंबरांनी त्यांच्या प्रेषितकार्याला सुरुवात केल्यावर ही गोष्ट पर्शियन सम्राटाच्या कानावर गेली. त्यावेळी त्याने बाझानला आज्ञा दिली, 'त्या नव्या प्रेषिताला त्याच्या प्रेषितत्त्वाच्या दाव्यापासून दूर व्हायला सांग, किंवा त्याला मारून माझ्या पुढ्यात त्याचे शीर हजर कर.' (सीरत इब्ने हिश्शाम)

मोहम्मद पैगंबरांनी (स.) ज्यावेळी त्यांचे प्रेषितकार्य सुरू केले, त्यावेळी अरेबियाच्या सरहद्दीवरती परकीय वर्चस्वाच्या हस्तक्षेपामुळे कशा प्रकारचे प्रश्न निर्माण होत होते, त्याचे हे एक चित्र आहे. पैगंबरांनी अगदी सहज त्यांच्या लोकांना ह्या परकीय घुसखोरांविरुद्ध चिथावले असते व अरेबियाच्या भूभागावरून त्यांना हाकलून द्यायला सांगितले असते; पण असे करणे ईश्वरी योजनेच्या विरोधी ठरले असते. ईश्वराचीच अशी इच्छा होती की त्याच्या पैगंबरांनी इतरांशी लांबलांबचे वाद काढून भांडू नये. कारण नाहीतर ईश्वरीवाणीचा सार्वत्रिक प्रचार करण्याचे जे काम त्यांच्या प्रेषितकार्याच्या गाभ्याचा भाग होते, त्याच्याकडे दुर्लक्ष झाले असते. आपण घटनाक्रम जर बघितला तर इतिहासाची साक्ष अशी आहे की, बाझान व येमेनमध्ये राहाणाऱ्या बहुतांश

ख्रिश्चनांनी इस्लाम स्वीकारला. पैगंबरांच्या जागी दुसऱ्या कुठल्याही नेत्याने राष्ट्रीय प्रश्न उभे करून त्याचे उत्तर बिनदिक्कतपणे राजकीय मार्गाने मिळविण्याचा प्रयत्न केला असता. पैगंबरांनी मात्र, अत्यंत यशस्वीपणे हाच प्रश्न इस्लामच्या कल्पनांचा योग्यरीतीने प्रचार करून सोडविला.

अबू तालिब ह्यांच्या मृत्यूनंतर अबू लहब हा बनु हाशिम टोळीचा नेता बनला. टोळीच्या नव्या सरदाराने पैगंबरांना संरक्षण द्यायचे नाकारले. ज्यामुळे त्यांना दुसऱ्या टोळीचा आसरा शोधणे भाग पडले. ह्याकरिता त्यांना अनेक टोळ्यांना भेट द्यावी लागली. त्यांमध्ये अग्रभागी असणारी टोळी होती बनु शैबान इब्ने सालब! ह्या टोळीचा प्रमुख सरदार होता मुसन्ना इब्ने हारिसा. त्याने प्रेषितांना हे समजाविले की, त्यांच्या टोळीचे लोक पर्शियन सरहद्दीलगतच्या प्रदेशात राहातात, जो भूप्रदेश व्यापताना सासानियन सम्राटाने त्यांना काही अटी घातल्या आहेत. त्यातली एक अट अशी आहे की, ते एखाद्या नव्या धर्मतत्त्वाचा प्रचार करणार नाहीत किंवा असे करणाऱ्या कुणाला आश्रयही देणार नाहीत. तो पुढे म्हणाला, 'राजा तुझ्या शिकवणुकीला मान्यता देईल, असे मला वाटत नाही.' (सीरत इब्ने कसीर)

अरेबियाच्या सरहद्दीलगतच्या परकीय शक्ती अरबांच्या राजकीय व भौगोलिक सरहद्दींच्या सार्वभौमतेला आव्हान देण्याहूनही अधिक काही अपेक्षित होत्या. ह्यामुळे प्रेषितांच्या कार्यात अर्थातच अडथळा झाला. परकीय शक्तिंविरुद्ध द्यायच्या लढ्याची पूर्वकारणे म्हणून पैगंबरांना ह्या गोष्टींचा वापर करता आला असता. त्यांना असेही म्हणता आले असते की, बाह्य अडथळे पूर्णतया दूर केल्याशिवाय त्यांना त्यांचे प्रेषितकार्य पूर्ण करता येणार नाही; पण असे करत असताना त्यांच्या कार्याच्या पहिल्या पायऱ्या ईश्वराच्या योजनेशी जुळल्या नसत्या व ईश्वरी योजनेपासून मार्गभ्रष्ट झाल्या असत्या. ईश्वरी योजनेमध्ये हे काम पर्शियन व रोमन साम्राज्यांमध्ये त्यांच्यात्यांच्यातच सोपवले जायचे होते. पुढील वीस वर्षांमध्ये ही दोन्ही साम्राज्ये एकमेकांशी लढून हतबल झाली. ज्यावेळी त्यांना जिंकण्याची प्रत्यक्ष वेळ आली त्यावेळी त्यांच्याच खांद्यावरती, आक्रमणाची सुरुवात करण्याच्या आरोपाची जबाबदारी आपोआप गेली. शिवाय आधीच ती दोन्ही साम्राज्ये एकमेकांशी लढून दुबळी झाली असल्याने, त्यांना जिंकणे मुसलमानांना तौलनिकदृष्ट्या सोपे झाले. ह्या विजयाने पैगंबराच्या उत्तरकालीन, अभूतपूर्व अशा विजयाचा पाया घातला गेला. मुसलमानांनी अगदी सुरुवातीच्या काळातच जर पर्शियन व रोमन साम्राज्याशी वैर घेतले असते; तर दोन्ही साम्राज्ये प्रचंड सामर्थ्यवान असल्याने व मुसलमान तुलनेमध्ये दुबळे असताना त्याचा परिणाम नंतर घडलेल्या परिणामाच्या बरोबर उलट घडला असता.

### ईश्वरी योजनेशी जुळवून घेणे

ज्यावेळी शेतकरी पीक घेण्यासाठी बी रुजवितो, त्यावेळी तो आपली ईश्वरी संयंत्राशी जोडणी करून घेतो. ईश्वरी तरतूद अशी आहे की, पृथ्वीवरती पीक घेण्याची एकमेवद्वितीय अशी संधी आहे. उरलेल्या सर्व विश्वांमध्ये नसणारा सुपीक जमिनीचा थर ह्या पृथ्वीवरती पसरला आहे.

पण ही जमीन, ती स्वभावतः सुपीक असून देखील पीक देणार नाही, जर तिला ओलावा मिळाला नाही. पृथ्वीच्या कोरड्या जमिनीचा नापीकपणा, हा असा पुरेसे पाणी न मिळाल्याने असतो. ह्या जगामध्ये शेतकऱ्यांना ही गोष्ट जोरजोराने ओरडून सांगायची काहीच गरज नसते. ती त्यांची त्यांनी निसर्ग आपल्या खुणा जागोजागी पसरत असतो, त्या पाहून, समजून घेऊन, त्या प्रमाणे कृती करायची असते. शहाणा शेतकरी हा अशा वेळी बी पेरताना ते पेरायच्या आधी पाऊस पडण्याची वाट बघतो. जर पाऊस पडला नाही तर तो दुसऱ्या प्रकारांनी आपली जमीन जलसिंचित करतो. असाच प्रकार सत्याचा प्रचार करताना करावा लागतो. तो अशा परिस्थितीची वाट पाहातो. अथवा अशी परिस्थिती निर्माण करतो की, ज्या योगे सत्याचे बीज तो माणसाच्या हृदयात पेरू शकेल. मोहम्मद पैगंबरांनी (स.) अगदी हीच पद्धत अवलंबिली. ज्या अरेबियामध्ये ते घडले त्याचे आत्मिक क्षेत्र हे पुरेसे ओले व सुपीक होते. फार मोठी फळे या जमिनीतून वर येणार होती. असे असूनही पैगंबरांना त्यांचे प्रेषितकार्य पुढे नेताना योग्य त्या पद्धती अवलंबिण्याची गरज होती, ज्यामुळे यश मिळाले असते. त्यांना ईश्वरी योजनेशी जुळवून घ्यायचे होते. मिळालेल्या संधीचा योग्य उपयोग करून घेण्यासाठी याहून दुसरा कुठलाही मार्ग उपलब्ध नव्हता.

प्रेषितांच्या धर्म शिकविण्याच्या कार्याचे, सर्वात मोठे मूळ तत्त्व हे, शाश्वत सत्याला सर्वोच्च महत्त्व देण्याचे होते. कुठल्याही परिस्थितीत त्यांची शिकवण ही दैनंदिन वादांमध्ये अडकणारी नव्हती. माणसाचा सर्वात मोठा व खरा प्रश्न हा त्याच्या शाश्वत भवितव्याविषयीचा आहे. बाकी सर्व प्रश्न हे अगदी थोड्या काळापुरते वरवरचे असे आहेत. भौतिक यश अथवा अपयश यांना काहीही अर्थ नाही. कारण ते कधीतरी संपुष्टात येणारे आहे. माणसाने, त्या, पुढच्या जीवनातील सत्यावरती लक्ष केंद्रित केले पाहिजे. ज्यावर कायमस्वरूपी यश व अपयश अवलंबून आहे

ह्याही पुढे जाऊन प्रेषितांना एका ताठ कण्याच्या स्वभावाच्या समाजाची निर्मिती करायची होती. असा समाज त्याचवेळी शक्य होतो, जर त्या समाजातला प्रत्येक माणूस प्रामाणिक ताठ कण्याचा राहिला असता. खराखुरा व कायमचा प्रामाणिक सरळपणा हा या पुढील आयुष्यावरच्या तीव्र श्रद्धेतूनच निर्माण होऊ शकतो. या पुढील आयुष्यावरची श्रद्धा म्हणजे, हे माहीत असणे की, माणूस आपल्याला हवे तसे वागायला मोकळा नाही आणि त्याच्या प्रत्येक कृतीचा हिशेब, त्याला ईश्वराला द्यावा लागणार आहे. ही श्रद्धा माणसाला पदभ्रष्टतेपासून दूर ठेवते आणि शिस्तबद्ध व जबाबदार माणूस घडविते. जर माणसाने कुरआन व सुन्ना, खुल्या दृष्टिकोनातून वाचले तर त्याच्या लक्षात येईल की, मृत्यूनंतरच्या आयुष्यावर जास्त भर देऊन लक्ष केंद्रित करण्यात आले आहे. दुसऱ्याही गोष्टी येतात; पण प्रासंगिक अनुषंगानुसार. प्रेषित कार्याचा सर्वात मोठा हेतू हा, ह्यानंतरच्या आयुष्यावरती लोकांचे लक्ष केंद्रीत करणे हा होता.

प्रेषितांचे दुसरे तत्त्व हे ते स्वतः शिक्षक म्हणून आणि ते ज्या लोकांना शिकवणूक देत होते, त्यांमध्ये कुठल्याही प्रकारचा भौतिक वाद निर्माण होऊ न देणे, अशी गोष्ट काटेकोरपणे टाळणे. कुठलीही किंमत देऊनसुद्धा त्यांनी, त्यांच्यामध्ये व त्यांच्या अनुयायामध्ये भौतिक चुरस

निर्माण होऊ दिली नाही. हुदाय्बिय्याचा तह, हा ह्या गाष्टीचे सर्वात मोठे उदाहरण होय. सततची आक्रमणे करून कुरैशांनी, मुसलमानांना व गैरमुसलमानांना दोन पक्ष बनवून, एकमेकाशी हातघाईवर येऊन लढणारी माणसे बनविले होते. दोन्ही बाजू आपापला वेळ युद्धाची तयारी करण्यात घालवीत होत्या. ह्या तहामधून कुरैशांच्या बाकी सर्व अटी मान्य करून पैगंबरांनी शांतीची दहा वर्षे ह्या तहाद्वारे मिळविली. तहाच्या अटी इतक्यात एकतर्फी होत्या की, कितीतरी मुसलमानांना त्या फारच अपमानकारक वाटल्या. पण खरे पाहता कुरआनने वर्णिल्याप्रमाणे 'स्पष्ट विजयाचा' (४८:१) पाया ह्या तहाने घातला गेला. ह्या तहाने मुसलमान व गैरमुसलमान ह्यांच्यामध्ये निर्माण झालेले हातघाईचे वातावरण संपुष्टात आले. मुसलमान आता गैर मुसलमानांना त्यांची शिकवणूक सांगू शकत होते व गैरमुसलमानांनासुद्धा ही शिकवणूक ऐकून आचरण्याकरिता 'मोकळा वेळ' होता! सत्याच्या प्रचारामध्ये आता कुठल्याही प्रकारची भौतिक चुरस व पूर्वग्रह शिल्लक राहिला नव्हता. ह्या तहानंतर मुस्लिम आणि गैरमुस्लिम ह्यांच्यामध्ये सामोपचाराचे वातावरण निर्माण झाले; ज्यामुळे इस्लामचा संदेश सर्व अरेबियाभर वाऱ्यासारखा पसरला. फक्त दोनच वर्षांमध्ये मुसलमानांची संख्या दहापट वाढली. शस्त्रांच्या सामर्थ्याने मक्का जिंकण्याचा कुठलाच मार्ग दिसत नव्हता; पण पुढल्या दोनच वर्षात इस्लामच्या शिकवणुकीपुढे मात्र तिने माघार घेतली.

प्रेषितांच्या मर्जीवरती त्यांच्या शत्रूचे भवितव्य अवलंबून असतानाही त्यांना शत्रूबद्दल सुद्धा करुणाच वाटत असे. पैगंबरांच्या वागण्याची ही एक पद्धत होती. ह्याचे कारण असे होते की त्यांनी शत्रू म्हणून, कुणाकडे कधी पाहिलेच नव्हते. त्यांनी नेहमीच, प्रत्येकामध्ये इस्लामच्या शिकवणुकीचा ग्राहक बघितला व श्रद्धा (ईमान) स्वीकारण्याकरिता प्रत्येक माणसाला पुरेपूर संधी देण्याविषयी ते आग्रही असत. मनाचा मोठेपणा, जो पैगंबर नेहमीच दाखवित आले, त्याचे एक मोठे उदाहरण म्हणजे मक्केच्या विजयानंतर त्यांनी कुरैशांना दिलेली वागणूक. तेच लोक, जे त्यांचा व त्यांच्या सहकाऱ्यांचा सातत्याने, अत्यंत निर्दयपणे छळ करीत होते, तेच लोक पूर्ण वीस वर्षांनी आज पैगंबरांच्या मर्जीचे ताबेदार बनले होते.

अशा वेळी त्यांच्या पूर्वपापांना शिक्षा द्यायची सोडून, पैगंबरांनी त्यांना क्षमा केली. ज्यावेळी साखळ्यांनी बांधलेले कुरैश त्यांच्यासमोर हजर करण्यात आले, त्यावेळी पैगंबर म्हणाले, 'तुम्हाला रस्ता मोकळा आहे, तुम्ही मुक्त आहात.' पूर्वघोषित वधाची शिक्षा मात्र ज्यांना दिली गेली होती, त्यांना ती फर्माविण्यात आली. त्यापैकी ज्यांनी व्यक्तीशः अथवा प्रतिनिधीमार्फत क्षमेची याचना केली, त्यांना क्षमा करण्यात आली. एकुण सतरा जणांना मृत्यूदंडाची शिक्षा देण्यात आली होती; पण प्रत्यक्षात फक्त पाच जणांना प्रत्यक्ष मृत्यूदंड देण्यात आला, ज्यांनी कुठल्याही प्रकारे क्षमायाचना केली नव्हती. उहदच्या युद्धात प्रेषितांचे काका, हमज़ा, वहेशी इब्ने हर्ब ह्याच्याकडून मारले गेले. त्यानंतर हिंद बिंत उत्बाने त्या मृतदेहाची विटंबना केली. त्यामुळे हे ऐकल्यावर संतापाच्या भरात पैगंबर म्हणाले होते, 'ईश्वराने जर मला त्यांच्यावर विजय मिळवून दिला तर मी त्यापैकी तीन जणांची विटंबना करेन.' (तफसीर इब्ने

कसीर खंड २, पृ. ३५२) वहेशी व हिंद हे दोघेही त्या सतरापैकी होते, ज्यांना मृत्यूदंड फर्माविण्यात आला होता. पण दोघांनीही क्षमायाचना केल्याने, त्यांना क्षमा करण्यात आली. ईश्वराचीच इच्छा आहे की, त्याच्या पैगंबरांनी त्यांच्या शत्रूशीही औदार्याने व क्षमेने वागावे. कारण हेच धोरण इस्लाम कार्याच्या प्रगतीकरता असलेल्या ईश्वराच्या योजनेशी जुळते.

मानवी स्वभावाचे सखोल निरीक्षण व ज्ञान ह्या धोरणामागे दडलेले आहे. मानवी समाज हा जिवंत, भावनाशील व्यक्तींचा समूह आहे. ज्या समूहातील एकाला दुखावल्यावर, दुसऱ्यांच्या मनात सूडाची तीव्र भावना जागू लागते. माणूस म्हणजे काही दगड नव्हे, जो दुसरा दगड फुटल्यावर कुठल्याच प्रकारची प्रतिक्रिया दाखवित नाही. एखाद्या माणसावर अत्याचार करणे म्हणजे त्याच्याशी संबंधितांकडून तीव्र प्रतिकाराला आमंत्रण देणे, ह्याचाच दुसरा अर्थ असा की, जो वेळ एरवी समाजबांधणी करण्याकरिता फायद्याचा ठरतो, तोच वेळ भांडणांमध्ये वाया घालविला जातो. मक्केच्या विजयानंतर सर्वांना सरसकट माफी देऊन पैगंबरांनी एवढीच खात्री करून घेतली की, कुठल्याही प्रकारचे बंड आता मूळ धरू शकणार नाही. खरे पाहाता त्यांनी ज्यांना माफ केले त्यापैकी जवळ जवळ सर्वांनी इस्लाम स्वीकारला व त्यापैकी काही तर पुढे जाऊन इस्लामचे शक्तिस्त्रोत बनले. उदाहरण द्यायचे म्हटले तर आपल्याला इक्रेमाचे घेता येईल. हा इक्रेमा, अबू जहलचा पुत्र, जो पैगंबर व त्यांच्या सहकाऱ्यांचा पाषाणहृदयी शत्रू होता.

एकदा पैगंबरांचा अधिकार प्रस्थापित झाल्यावर त्यांनी पहिले काम हाती घेतले, सामाजिक सुधारणांचे व पुनर्रचनेचे. अशा पुनर्रचना करताना पैगंबर त्या नेहमीच टप्प्याटप्प्याने व सावकाश करीत. लोक ज्यावेळी अशा गोष्टींना तयार नसत, त्यावेळी ते कधीही कृती अथवा निर्णय लादण्याची घाई करीत नसत.

मक्केचे लोक, हजरत इब्राहीम ह्यांच्या धर्माचे वारस होते; पण आता मात्र ते हजरत इब्राहीम ह्यांच्या धर्मापासून फार दूर गेले होते व नवीनच चालीरितींचा पायंडा त्यांनी पाडला होता. उदाहरणार्थ प्रेषित इब्राहीम ह्यांच्या काळी हजची यात्रा ज़ुल–हिज्जा (जिलहज़) ह्या चांद्र महिन्यात भरत असे. चांद्रवर्षे सौरवर्षांपेक्षा प्रत्येक वर्षी अकरा दिवसांनी लहान असल्याने, त्यांचे महिने ऋतूंच्या वार्षिक बदलांशी जुळत नसत. ह्यामुळे हज, कधी एका ऋतूत व कधी दुसऱ्या ऋतूमध्ये येत असे. कुरैशांच्या व्यापाराकरिता ही गोष्ट गैरसोयीची होती. त्यांची अशी इच्छा असायची की, हजची यात्रा दरवर्षी उन्हाळ्यात भरली तर बरे होईल. म्हणून त्यांनी नासी नावाची पद्धत अवलंबिली. ह्या पद्धतीमध्ये चांद्रवर्षामध्ये प्रतिवर्षी अकरा दिवसांची भर टाकली जाई. ह्या घुसवाघुसवीनंतरही चांद्रमासांची नावे मात्र त्यांनी तीच ठेवली; पण ह्याचा परिणाम म्हणजे त्यांचे वर्ष सौर झाले. ह्याचाच अर्थ असा होता की, एकूण तेहेतीस वर्षे त्या त्या चांद्रमासांच्या तारखा बदलत असत व प्रत्येक तेहतीस वर्षांनी, त्यांची दरवर्षीची अकरा दिवसांची भर ध्यानात घेता, ही भर जेव्हा पूर्ण वर्षाची होई, त्यावेळी हजही, ती ज्यावेळी खरोखर व्हायला हवी, अशी चांद्रतिथीला होत असे. कुरैशांनी सुरु केलेल्या सर्व नव्या चालीरीती बंद करून, इब्राहीम ह्यांच्या मूळ पद्धतीप्रमाणे हज सुरू करणे, हेही एक काम पैगंबरांना करायचे होते. हिजरी शकाच्या ८व्या

साली, रमज़ान महिन्यात मक्केवरती विजय प्राप्त झाला. पैगंबर ह्या विजयानंतर संपूर्ण अरेबियाचे शासक बनले. त्यांनी मनात आणले असते, तर कुरैशांच्या चालीरीती त्यांनी ताबडतोब बंद केल्या असत्या; पण ते त्यांची वेळ येईपर्यंत थांबले. नासीची तेहतीस वर्षे पूर्ण होण्यासाठी फक्त दोन वर्षांचा अवधी होता. पैगंबर ही दोन वर्षे थांबले. ते जरी आता मक्केचे शासक होते तरी त्यांनी, ही दोन वर्षे हजची यात्रा केली नाही. मक्केच्या विजयानंतर तिसऱ्या वर्षी (हिजरी शक, १०) त्यांनी हजच्या यात्रेत भाग घेतला. त्याचवर्षी हजरत इब्राहीम ह्यांच्या पद्धतीनुसार, हजच्या यात्रेची तिथी ज़ुल–हिज्जाच्याबरोबर, त्याच तिथीला येणार होती. ही पैगंबरांची शेवटची हजयात्रा ठरली आणि त्या वेळी त्यांनी जाहीर केले की, इथून पुढे हजची यात्रा त्या वर्षी ज्याप्रमाणे करण्यात आली त्याचप्रमाणे केली जाईल. अशा रीतीने चांद्रवर्षामध्ये होणारे फेरफार त्यांनी कायमचे बंद करून टाकले. 'काळाने त्याचा एक फेरा केला आहे,' ते म्हणाले. 'तो आता अशा वळणावर आला आहे की, ज्या वळणावर ईश्वराने पृथ्वी व स्वर्ग निर्मिले आणि ईश्वराच्या दृष्टीने एका वर्षामध्ये बारा चांद्रमहिने असतात.' (इब्ने जरीर, इब्ने मर्दुय्या)

पैगंबरांच्या ह्या बदलाला उशीर करण्यामध्ये फार मोठे कारण दडलेले होते. ज्यावेळी लोक एखादा धार्मिक विधी पिढ्यान्‌पिढ्या करीत असतात त्यावेळी ते विधी त्यांना अशा तऱ्हेने चिकटल्याने पवित्र वाटायला लागतात. असे विधी बदलून टाकायचे, हा विचारच त्यांना फार अवघड वाटायला लागतो. केवळ दोनच वर्षांची हजची तिथी, पैगंबरांना जशी हवी होती तशी येत होती. आणि म्हणून त्यांनी ही दोन वर्षे ह्या संदर्भात कुठल्याही प्रकारच्या कृतीला सुरुवात केली नाही. कारण ही गोष्ट वेळे आधी फार लवकर करून फालतू वाद निर्माण करायचा नव्हता. ज्यावेळी नैसर्गिकरीत्या हजचा दिवस हा हज, ज्या दिवशी खरोखर व्हायला हवी, त्या दिवसाशी जुळला त्याच वेळी त्यांनी जाहीर केले की, हज करण्यासाठी हाच योग्य दिवस होय आणि इथून पुढेही हज ह्याच दिवशी दरवर्षी करण्यात येईल.

देवाने आंदण दिलेल्या प्रतिभेनुसार पैगंबरांची सर्व धोरणे साच्यातल्यासारखी ठरत असत. हे वरील उदाहरणांवरून स्पष्ट व्हावे. आपल्याला असे म्हणता येईल की, त्यांनी स्वतःचे 'दातेरीचाक' ईश्वराच्या दातेरी चाकाशी, बरोब्बर जुळविले. त्यांची प्रत्येक कृती, ही ईश्वराने आरेखन केलेल्या नकाशाबरहुकूम घडलेली होती. ह्याच कारणाने त्यांचे सर्व प्रयत्न हे अतिशय सुफलित ठरले.

# ८ घटनांहून मोठे होणे

**मो**हम्मद पैगंबर (स.) येण्याआधीच्या लगतच्या काळात अरेबियन द्वीपकल्पातील राजकीय परिस्थितीही तीव्रतर वादावादीची व भांडणांची बनली होती. त्या काळातल्या दोन महासत्ता, रोमन व पर्शियन साम्राज्ये, अरेबियाच्या पूर्व व पश्चिमेस पसरली होती आणि अरेबियाची भूमी दोघांनीही आपल्या राजकीय खेळाचे मैदान बनविले होते. अरब भूमीतले सर्व, सगळ्यात सुपीक प्रांत हे, ह्या दोन महासत्तांपैकी कुठल्यातरी एकीच्या प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष नियंत्रणाखाली होते. इराक पर्शियनांनी लाटला होता, तर सिरिया, जॉर्डन, पॅलेस्टीन व लेबनॉन, बिझंटाईन साम्राज्याच्या नियंत्रणाखाली होते. पश्चिमेला लाल समुद्र व पूर्वेला पर्शियन खाडी, अशा भक्कम नैसर्गिक सरहद्दी असूनसुद्धा, ह्या सरहद्दींना लागून असलेले प्रांत, आपली भूमी बलाढ्य शेजाऱ्यांपासून वाचवू शकले नव्हते. पर्शियाची युद्धजहाजे अगदी सहज ओमानची खाडी ओलांडून अरब भूप्रदेशात येऊ शकत असत. इजिप्त आणि इथियोपियातून, जे बिझंटाईन अंमलाखाली होते, लाल समुद्रातून येऊन अरेबियन भूमीत पाऊल टाकणे अजिबात अवघड नव्हते. ह्या दृष्टीने लाल समुद्रसुद्धा अडथळा ठरत नव्हता.

टोळ्यांच्या सरदारांनी ह्याचमुळे आपली राज्ये अरेबियन द्वीपकल्पातल्या आंतर्भागांमध्ये वसविली होती; पण त्यांना सुद्धा खरे स्वातंत्र्य नव्हतेच. रोमन व पर्शियनांचे हे इतके वर्चस्व असण्याचा अर्थ एवढाच होता की, त्यांचे स्वातंत्र्य, ह्या सम्राज्यवादी सत्तांचे मांडलिक राहूनच, त्यांना उपभोगता येणार होते. सिरियाच्या सरहद्दीवरती, पैगंबरांचे प्रेषितकार्य ज्यावेळी सुरू होते त्यावेळी, अरब घसासिनाचे राज्य होते; ज्याच्यावर हारिस इब्ने अबी शिम्र घस्सानीचे राज्य होते; पण तो सुद्धा रोमन साम्राज्याचा मांडलिक होता. बसरा नावाचे एक असेच राज्य होते. ह्या राज्यामध्ये तर रोमनांचे फक्त राजकीय वर्चस्वच नव्हते, तर सांस्कृतिक वर्चस्व सुद्धा होते. कारण त्या राज्यातल्या अनेक लोकांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला होता.

इराक सरहद्दीवरती हीरा अरेबियाचे राज्य होते, ते इराणच्या वर्चस्वाखाली होते. पर्शियन सरहद्दीवरच्या अनेक राज्यांमधून पर्शियाचे तीव्र वर्चस्व निरंतर जाणवत असे. ह्यातले सर्वात मोठे बाहरीन होते. ज्याचा शासक, मुंझीर इब्ने सावा होता. इथल्या कित्येकांनी झरत्रुष्ट्री धर्म स्वीकारला होता. दोन अशीच राज्ये पर्शियन वर्चस्वाखाली होती. ओमान, शासक होते जालंदीचे पुत्र, जैफर व अब्द. यमामाचा शासक होता, हौदा इब्ने अली अल्–हनाफी. पर्शियन व रोमनांच्यात कायम सत्तेसाठी स्पर्धा चालत असे व युद्धे होत असत आणि त्यांचे मांडलीकही त्यांच्या ह्या युद्धांमधून भाग घेत असत. उदाहरणार्थ : घसासिना रोमनांच्या बाजूने लढले; तर हीरा पर्शियनांच्या बाजूने. ह्यामुळे ह्या दोन महासत्तांचा युद्धहेतूसाठी अरबांचे रक्त सांडत असे.

त्याकाळचा येमेन आजच्याशी तुलना करता फार मोठा होता. त्यामध्ये टोळ्यांची छोटी छोटी राज्ये होती. त्यातल्या सर्वात मोठ्या राज्याची राजधानी सना होती. नजरान सुद्धा तिथेच होते. येमेनवरती परकीय सत्तेचा अंमल इ.स. ३४३ मध्ये सुरू झाला. त्याच सुमाराला रोमनांनी

तिथे ख्रिस्ती मिशनऱ्यांना पाठवले. ह्या मिशनऱ्यांना नजरान येथे फार मोठे यश मिळाले. ह्या देशातल्या बहुसंख्य लोकांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला.

ही जरी धार्मिक घटना असली तरी रोमनांच्या पर्शियन प्रतिस्पर्ध्यांनी ह्या गोष्टीला, राजकीय धमकावणी ह्या स्वरूपात घेतले. अरेबियाच्या दक्षिण भागात स्थिरावण्यासाठी हे पाऊल रोमनांनी टाकले असावे, असा त्यांचा समज झाला. रोमनांनी इ.स. ७० मध्ये सिरिया जिंकून, हाकलून दिल्यावर, येमेनमध्ये येऊन स्थायिक झालेल्या ज्यू टोळ्यांनी पर्शियनांशी संगनमत केले. युसुफ–ज़ू–नवास ह्या जन्माने अरब असलेल्या माणसाने ज्यू धर्म स्वीकारला होता. पर्शियनांच्या मदतीने त्याने सनामध्ये अर्धस्वतंत्र सरकार उभे केले. नजरान मधल्या ख्रिस्त्यांचा त्याने विनाश सुरू केला. इ.स. ५३४ मध्ये कितीतरी ख्रिस्त्यांना जिवंत जाळण्यात आले.

रोमनांना आता त्यांचे विभागीय वर्चस्व सांभाळण्यासाठी हालचाल करणे भाग होते. आपण येमेनमधल्या ख्रिस्त्यांचे संरक्षण करीत आहोत, असे दाखविण्यासाठी त्यांच्याशी एकनिष्ठ असलेल्या इथियोपियाचा राजा नजाशी, जो स्वतः ख्रिस्ती होता, त्याला त्यांनी युसुफ–ज़ू–नवास विरुद्ध भडकावले. नजाशीने नंतर येमेनमध्ये आर्यत नावाच्या सेनापतीच्या आधिपत्या खाली इथियोपियन फौजा पाठविल्या. एक छोटेसे युद्ध झाले; पण ह्या युद्धाचा परिणाम म्हणून इथियोपियनांनी येमेनचा कब्जा घेतला व ज़ू–नवासने स्वतःला समुद्रात बुडवून टाकले. ह्यानंतर थोड्याच काळात नजाशीच्या सम्मतीने आर्यतच्या सैन्यातील एक सैनिक, आब्राहाने त्याच्या सेनापतीचा खून केला व स्वतःचे सरकार स्थापले. ह्यानेच इ.स. ५७० मध्ये मक्केतल्या काबागृहावरती हल्ला केला. ह्याच्यानंतर त्याच्या दोन मुलांनी, यकसूम व नंतर मसरूक़ ह्यांनी राज्य केले. पूर्वीच्या येमेनी राजकुळातील एक माणूस सैफ इब्ने झि–याझान ह्याला परक्यांना आपल्या देशातून हाकलून देऊन परत आपल्या पूर्वजांचेच राज्य निर्माण करावे अशी महत्त्वकांक्षा उत्पन्न झाली. ह्याकरिता त्याने एक स्वातंत्र्य चळवळ उभारली; पण ध्येयाकरिता आवश्यक असणारा पाठिंबा पुरेशा रीतीने स्थानिक पातळीवर त्याला न मिळाल्याने तो लष्करी पाठिंब्या करिता पर्शियन सम्राट नौशेरवान ह्याच्याकडे गेला. नौशेरवानने अर्थातच ही सुवर्णसंधी हातची जाऊ नये म्हणून घाई केली. त्याने ताबडतोब दाहराजच्या नेतृत्त्वाखाली येमेनमध्ये जाण्यासाठी पर्शियन फौजा पाठविल्या. हे सर्व होईपर्यंत सैफ इब्ने झि–याझान मृत्यू पावला होता. त्याचा पुत्र मादी कार्ब ह्याने इराणी फौजा त्याच्या देशात आणण्याची कारवाई पूर्ण केली. ओमानची खाडी ओलांडल्यावर त्यांनी हजारमौत येथे तळ ठोकला आणि नंतर सनाकडे प्रयाण केले. मादी कार्ब व दाहराज ह्यांच्या युतीने यशस्वीरित्या इथियोपियनांना येमेनबाहेर हाकलून दिले. मादी कार्ब राजा बनला; पण इराणी फौजा मात्र येमेनमध्येच राहिल्या. ह्यामुळे येमेन हा इराणचा समुद्राने जोडला गेलेला समुद्रापलीकडचा प्रांत बनला. इस्लामच्या उदयाच्या वेळी येमेनमध्ये इराणी सुभेदाराचे राज्य होते. त्याचे नाव बाझान. सुरुवातीच्या विरोधानंतर त्याने इस्लाम स्वीकारला.

रोमन आणि पर्शियन साम्राज्यांच्या विस्तार योजनांच्या शिकारी निरनिराळे अरब प्रांत

कसे बनले होते, त्याची ही काही उदाहरणे. ह्या अशा काळात, पैगंबरांचे प्रेषित कार्य सुरू झाले. अशावेळी पैगंबरांसारख्या सुधारकाला दोन मार्ग उपलब्ध होते. ते, त्यांच्या वर्तमानकालीन घटनांमध्ये बुडून जाऊन एखादी राजकीय चळवळ उभी करू शकले असते, ज्या योगे त्यांच्या भूमीला दास्यत्व देणाऱ्या परक्या शक्तिंविरुद्ध ते लढू शकले असते. हा एक मार्ग होता किंवा लोकांच्या या क्रियाशक्तीला थोडेसे आवाहन करून व श्रम घेऊन त्यांच्या लोकांची आंतरिक शक्ती वाढविण्यावर तिची बांधणी करण्यावर लक्ष केंद्रित करू शकले असते. हीच शक्ती पुढे अशा थराला जाऊन पोहोचली असती की, साम्राज्यांच्या इमारती तिच्यापुढे धडाधड कोसळल्या असत्या. हा दुसरा मार्ग होता.

पहिल्यापेक्षा अर्थातच पैगंबरांनी दुसरा मार्ग निवडला. अब्राहाच्या हल्ल्याचे कुरआनमधल्या दोन सूऱ्यांमध्ये उल्लेख आहेत (१०५ व १०६), ज्यांची नावे अल्–फील व कुरैश अशी आहेत. कुरआन हे अतिशय निःसंदिग्ध, स्पष्टपणाने सांगते की, अशा धोक्यांची व हल्ल्यांची काळजी फक्त प्रार्थनेतूनच घेतली जावी. हा इस्लामी मार्ग झाला. ज्यावेळी राजकीय भयसूचना मिळते, त्यावेळी तिचे उत्तर राजकीय पातळीवर शोधण्यापेक्षा आध्यात्मिक पातळीवर प्रार्थनेच्या पातळीवर शोधले जावे.

# ९ पैगंबरांची पद्धत

### एखाद्याला मनातून सामर्थ्यवान बनविणे

**इ**स्लामची कहाणी इ.स. ६१० मध्ये सुरू होते. ज्यावेळी पैगंबरांना पहिले प्रकटीकरण (पहिली श्रुती) प्राप्त झाले. त्यावेळी ह्या जगामधले ते एकमेव मुस्लिम व ईमानधारक (श्रद्धावंत) होते. इ.स. ६२२ मध्ये पैगंबरांनी मक्केहून मदिनेला आश्रयार्थ स्थलांतर केले. तिथे त्यांनी इस्लामी राज्य निर्माण केले; पण त्याच्या वेशी फारच छोट्या होत्या. मदिना शहरातल्या काही भागापुरत्याच त्या मर्यादित होत्या. मदिनेतल्या फार मोठ्या उर्वरित भागावरती ज्यू टोळ्या व उरलेल्या अरब टोळ्यांचे, ज्या अजून मुस्लिम झाल्या नव्हत्या, नियंत्रण होते. पैगंबर ह्यानंतर अकरा वर्षे जगले. त्यांच्या मृत्यूपर्यंत इस्लामच्या सरहद्दी सर्व अरेबियाभर पसरल्या. इतकेच नव्हे तर त्या दक्षिण पॅलेस्टीनपर्यंत पोहोचल्या. दहा लाख चौरस मैल क्षेत्र व्यापणारे, फार मोठे इस्लामी साम्राज्य तोपर्यंत निर्माण झाले होते. केवळ एकाच शतकाहूनही कमी अवधीत पश्चिमेकडे, उत्तर आफ्रिका ओलांडून, स्पेनपर्यंत इस्लाम पोहोचला. पश्चिमेकडे स्पेन तर पूर्वेकडे चीनपर्यंत इस्लामची क्षितिजे वाढली. इस्लामी वर्चस्वाच्या खुणा अगदी दूरदूरपर्यंत पोहोचलेल्या दिसतात. हंगेरीत बुडापेस्टमध्ये डॅन्यूब नदीच्या काठी 'गुल–बाबा' नावाचे मुस्लिम प्रार्थनास्थळ अजूनही उभे आहे. फ्रान्समध्ये कितीतरी चर्चेस अशी आहेत की, ज्यांच्या घुमटावरती असलेल्या दगडांमध्ये अरेबिकमध्ये लिहिलेले शिलालेख आहेत. हे सर्व अवशेष हिजरी शकाच्या आठव्या शतकातले आहेत, ज्यावेळी दक्षिण फ्रान्स हा दमास्कसच्या खलिफांचा युरोपमधला प्रांत होता. दोनशे वर्षांपूर्वी अरब उंट हाकीत होते आणि आता जगाचे नेतृत्व करू लागले होते. बगदाद, सुसंस्कृत जगाचे केंद्रस्थान बनले होते; ज्याने हे स्थान सेल्यूशिया, पर्सेपोलिस, बॅबिलॉन व रोम ह्यांच्याकडून घेतले होते, जी आंतरराष्ट्रीय अशी ज्ञानार्जनाची विद्यापीठे होती.

हे सर्व मोठमोठे विजय, हे खरे पाहाता एका असामान्य पण अतिशय साध्या योजनेचे परिणाम होते, जिचे वर्णन कुरआनमध्ये पुढीलप्रमाणे केले आहे:

'तुम्ही, जे धर्मोपदेशकाची वस्त्रे घातलेले आहात, उठा आणि धोक्याची सूचना द्या. ईश्वराच्या महत्तेचे गुणगान करा, तुमचे कपडे स्वच्छ ठेवा आणि स्वतःला कुठल्याही प्रकारच्या प्रदूषणापासून मुक्त ठेवा. कुठलाही भलेपणा कराल अथवा दान द्याल, त्यावेळी परतीच्या आशेने करू नका. तुमच्या ईश्वराखातर संयम पाळा.' (कुरआन, ७४:१–७)

**सारांशाने ह्या योजनेचे तीन भाग पाडता येतील:**

१) वैयक्तिक सुधारणा: ह्या केल्याने माणूस एकाच एक ईश्वराची प्रार्थना करतो. स्वतःच्या नैतिक मूल्यांमध्ये बदल करतो व स्वतःला पापापासून व चुकीचे वागण्यापासून दूर ठेवतो.

२) दुसऱ्या लोकांना त्यांच्या अस्तित्त्वाच्या सत्याची व शाश्वत भवितव्याची विशेष तऱ्हेने जाणीव करून देणे. अशी जाणीव म्हणजे, माणसे ईश्वराची सेवक आहेत व मृत्यूनंतर

त्याच्याचकडे परतणार आहेत.

३) स्वतःमध्ये व समाजामध्ये सुधारणा घडवून आणीत असताना, प्रयत्नांमध्ये ज्या अडचणी येतील त्यांना शांतपणे व खंबीरपणे तोंड देणे.

**आंतरिक शक्ती**

इस्लामची लढा हा नेहमी व खात्रीने व्यक्तिगत असतो. ह्या लढ्यापाठीमागे मृत्यूपश्चात आयुष्यातल्या मोक्षाची अतिशय तीव्र इच्छा असते. ईश्वराला सामोरे जायला लागल्यावर ईश्वराने क्षमा करावी, ही ती इच्छा असते. इस्लामने एखाद्या अस्तित्त्वाचा मुळातून वेध घेतला की, एकच जिवितावस्था उरते. ती म्हणजे ईश्वराची कृपादृष्टी आणि क्षमा कशी मिळवता येईल. ईश्वरी इच्छेचा भंग होऊ देऊ नये म्हणून अशी व्यक्ती आपल्या श्रद्धा, कल्पना, चारित्र, कृती आणि जीवनात जे करायचे असते, ते सर्व काही त्याप्रमाणे घडवू लागते. मृत्यूपश्चात आयुष्यावरतीच इथून पुढे सर्व लक्ष केंद्रित होऊ लागते. स्वतः चांगला मुस्लिम असल्याची खात्री झाल्यावरच एखादा दुसऱ्याला इस्लाममध्ये बोलवू (मुस्लिम होण्यासाठी) लागतो.

'सांगा, मला तर हाच आदेश दिला गेला आहे की, सर्वप्रथम मी त्याच्यापुढे (ईश्वरापुढे) आज्ञापालनार्थ मान तुकवावी.' (कुरआन, ६:१५)

ईश्वराला समर्पण करणाऱ्यांमध्ये पहिला होण्यापाठीमागच्या प्रेरणेचा जर विचार केला तर ती मात्र सर्वस्वी व्यक्तिगत बाब होय. अर्थात अशी कृती केल्यावर त्या कृतीचे होणारे परिणाम मात्र समाजावर फार मोठे व महत्त्वाचे, दूरगामी असे असतात. ज्वालामुखीचा उद्रेक हा माणसाला माहित नसणाऱ्या, दिसू न शकणाऱ्या अशा कुठल्यातरी ठिकाणी पर्वतामध्ये होतो. उद्रेक झाल्यावर मात्र आजूबाजूचा सारा आसमंत त्याच्या तेजाने उजळून जातो. ईश्वराला प्रथमच समर्पण करणाऱ्या माणसाची परिस्थिती नेमकी अशीच असते. त्याच्यामध्ये होणाऱ्या बदलांचे त्याच्या आजूबाजूच्या सर्व परिसरावर परिणाम होत असतात. कुरआनच्या प्रकटीकरणामध्येही अशाच प्रकारचा क्रम आढळून येईल. सर्वप्रथम प्रकट झालेल्या आयाती ह्या व्यक्तिगत सुधारणात्मक बदलांविषयीच्या होत्या. नंतरच्या सूऱ्यांमध्ये मोठ्या प्रमाणावर करायचे सामाजिक बदल चर्चिले गेले. ह्या प्रकटीकरणाचा तौलनिक अभ्यास केल्यानंतर, पैगंबरांनी स्वीकारलेल्या मार्गाचा अभ्यास केल्यावर, मोहम्मद मार्माड्यूक पिकथाल (विसाव्या शतकातील एक महत्त्वाचे मुस्लिम विद्वान) ह्यांनी कुरआनच्या भाषांतराच्या आपल्या प्रस्तावनेत लिहिले आहे.

'पैगंबरांची प्रेरणा ही आंतरिक गोष्टींकडून नंतर बाह्य वस्तूंकडे प्रगत होत गेली.'

सर्वसाधारणपणे बाह्य जगताला द्यायचे धक्के व हल्ले ह्या गोष्टी माणसांना आयुष्यातील सर्वात महत्त्वाच्या गोष्टी वाटतात. पैगंबरांपासून घ्यायच्या सर्वात मोठा धडा म्हणजे व्यक्तीने आंतरिक शक्ती वाढविण्यासाठी प्रयत्न करायला हवेत. ज्या माणसाने स्वतःची आंतरिक शक्ती वाढवून घडविलेली असते, अशी माणसे ती ज्यावेळी प्रकट करतात, त्यावेळी त्यांना मोडून वाकविणे शक्यच नसते. अशा शक्तीचा प्रतिरोध अशक्यच. आंतरिक शक्ती वाढवायची म्हणजे नेमके काय करायचे? ह्या संदर्भात कुरआन आपल्याला कुठल्याही प्रकारची 'जादूभरी उत्तरे'

सांगत नाही. तीव्र श्रद्धेनेच ही गोष्ट साधायची आहे. योग्य कृती व अतिशय चिकाटीची ह्याकरिता गरज आहे. पहिल्या प्रथम दैवी सत्यांना आपल्या हृदय व मनावर माणसाने ठसवायला हवे. पुढे येणाऱ्या शाश्वत विश्वातल्या सत्यांवरतीच विचार पक्के करण्याचे प्रयत्न करायला हवेत. आयुष्यात हक्क असे नसतातच; तर असतात फक्त कर्तव्ये, असा दृष्टिकोन तयार व्हायला हवा. दैवी रस्त्यावर चालायचे, तर अडचणी ह्या येणारच असतात. ह्या अडचणींचा ठपका दुसऱ्या कुणावर ठेवण्यापेक्षा त्या शांतपणाने व विनम्रतेने स्वीकारायला शिकायला हवे. ह्या सर्व गुणांनी आंतरिक शक्ती वाढत जाऊन घडत असते. इस्लामच्या पैगंबरांमध्ये ह्या सर्व गुणांचे आदर्श उदाहरण आपल्याला आढळते. हा सर्व गुणसमुच्चय त्यांनी असा वाढविला होता की, त्यांच्या चारित्र्यापुढे कुणाचाच टिकाव लागला नाही. बाह्य जगताला ज्यावेळी पैगंबरांचा (त्यांच्या पैगंबरीचा) साक्षात्कार झाला त्यावेळी तो साक्षात्कार माहीत झालेल्या सर्व जगाने स्वतःला त्यांच्याकडे स्वाधीन केले. लोक त्यांच्या ईश्वरप्रेरित चारित्र्याला वश झाले कारण त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची शक्ती हृदयापासून निघणारी व आंतरिक प्रकारची होती.

सरदार पूरणसिंग (१८८२–१९३२) ह्या प्रख्यात हिंदी लेखकांनी त्यांच्या 'शौर्य' नावाच्या लेखात मोहम्मद (स.) पैगंबर ह्यांना इतिहासातील सर्वात शूर पुरुष संबोधिले आहे. अरेबियन उपखंडात त्यांना फार मोठी क्रांती घडवून आणायची होती. त्यांच्या सहवासात येणारा कुणीही त्यांचा 'गुलाम' बनत असे (त्यांचे श्रेष्ठत्व मान्य करीत असे), ह्या एकाच गोष्टीवरून त्यांची महत्ता सिद्ध होते. अशी सत्ता देणारे हे कुठल्या प्रकारचे शौर्य? सरदार पूरणसिंह ह्यांच्या शब्दात म्हणजे:

'स्वतःला मोठे बनविण्याकरिता प्रत्येक क्षणी कसोशीने झटणे म्हणजे शौर्य. भेकड म्हणतात, 'चला पुढे जाऊयात.' तर शूर लोक म्हणतात, 'थांबूयात, एक पाऊल मागेच घेऊयात.' हा एक मोठाच वदतोव्याघात होय. भेकड तुम्हाला तलवार उचलण्यासाठी प्रवृत्त करतात तर शूर मात्र सरळ तुमच्या मस्तकाचीच मागणी करतात. तुम्ही समर्पण करा, असे शूरांचे म्हणणे असते. प्रथम शक्ती गोळा करून मगच पुढे जायचे हे शूरांचे धोरण असते. अंतर्गत व आंतरिक शक्ती, म्हणजेच राखीवबळ वाढविण्यावरती शूरांचा विश्वास असतो. ते त्यांच्या स्वतःमध्येच भावनांची आगेकूच करीत असतात. लोकांचे हृदय जिंकणे हा त्यांचा आधिपत्य गाजविण्याचा मार्ग असतो. एखादा पत्र्याचा तुकडा गरम व्हायलाही वेळ लागत नाही आणि थंड व्हायलाही वेळ लागत नाही. भावनांच्या भरात भावनांचा उद्रेक होणे आणि मग त्या शांत होणे, हे काही नक्कीच शौर्य नव्हे. करा, करा, करा! असे नुसतेच ओरडणे ह्यासारखा मूर्खपणा नाही. असे म्हणण्याआधी शक्तीची निर्मिती व एखाद्या कामासाठी संचय करायला हवा. एखाद्याने स्वतःची वाढ करीत असताना एखाद्या वृक्षासारखी स्वतःची मुळे स्वतःच खोल रुजवायला हवीत. हे जग काही उकिरड्याच्या ढिगावर उभे नसते, की कुणीही कोंबड्याने त्यावर नाचत, ओरडत प्रसिद्धी मिळवावी. उलट धर्माच्या तत्त्वांवरती शाश्वत मूल्यांच्या उंच पहाडावर जगाची निर्मिती झालेली असते. जो ही सत्ये जाणून घेतो तोच अंतिमतः यशस्वी ठरतो.' (निबंध चणिका: श्री महेंद्र

चतुर्वेदी ह्यांनी संग्रहित केलेल्या निबंधांपैकी एका निबंधातून)

एकांतात केलेली अध्यात्मिक साधना अथवा एखादे जादूभरे सूत्र, अशी ह्या शौर्याची कारणे नक्कीच नव्हेत. एकांतातली गूढ साधनाही द्रव्य जगतात, वस्तू जगतात मूर्ख बनवू शकते; पण माणसाला दैनंदिन आयुष्यात ज्या प्रश्नांशी नेटाने टक्कर देऊन त्यांचा सामना करायचा असतो, त्यांमध्ये तिचा काहीच उपयोग नसतो. खरी शक्ती तीच जी माणसाला त्याच्या दैनंदिन आयुष्यातील प्रश्नांवर मात करू देते.

मनुष्य त्याचवेळी आंतरिक शक्ती प्राप्त करून घेतो, ज्यावेळी त्याची स्वार्थाची सर्व बंधने गळून पडतात. अशा वेळी तो अशा पातळीवर विचार करायला लागतो की, वरवरचे बाह्य विचार पूर्णतया बाजूला राहातात. पैगंबरांच्याच भाषेत सांगायचे तर, 'तो वस्तूंना, त्या आहेत तशाच पाहू लागतो.' पूर्वग्रह, राग, लोभ, द्वेष, सत्ताकांक्षा, फुशारकी, पोकळ बढाई, स्वार्थ ह्यापैकी कुठल्याही गोष्टीचा प्रबळ पाया असणारी इच्छा त्याच्या कृती व विचारांवरती ताबा मिळवू शकत नाही. चारित्र्याची शक्ती ती हीच होय! ही अशी शक्ती आहे की तिला कुठलाच विरोध नसतो आणि ती व्यक्तीला कुठल्याही परिस्थितीला तोंड द्यायला मदत करते. आंतरिक शक्ती प्राप्त असणाऱ्या कुणाच्याही कुठल्याही कृतीची सुरुवात ही त्या कृतीचा यशस्वी निष्कर्ष निघेपर्यंत तपासून पाहता येते. अशी कृती चुकत नाही. सहज निघणाऱ्या व सहज न निघणाऱ्या पण शक्य असलेल्या सर्व शक्यतांचा पूर्ण विचार ह्या व्यक्तीने केलेला असतो व ह्या शक्यतांना तोंड द्यायची पूर्ण तयारी ह्या व्यक्तींची असते. लोकांचा विरोध जेवढा वाढतो तेवढीच ही व्यक्ती स्वतःच्या सत्य व बरोबर असणाऱ्या स्थितीला चिकटून राहाते.

पैगंबरांच्या आंतरिक शक्तीने त्यांच्यासमोर उभ्या राहिलेल्या सर्व प्रश्नांची उत्तरे बरोबर कशी दिली हे पाह्यचे असेल तर मक्केच्या विजयानंतर उद्भवलेली परिस्थिती हे सुयोग्य उदाहरण ठरेल. ज्यानुसार गरज निर्माण झाली त्यानुसार ह्या शक्तीने निरनिराळे स्वरुप धारण केले. काही वेळा ती क्षमाशीलता बनली. कधी सर्वोच्च उत्साह बनली तर कधी ईश्वरावरची श्रद्धा! त्यांचे यश हे काही वेळा दूरदृष्टीमुळे मिळालेले होते. काही वेळा त्यांनी हे दाखविले की, जो स्वार्थ नाकारतो, तो अजिंक्य सत्ता बनतो आणि सर्वस्वाचा त्याग करून सर्वस्व प्राप्त करतो.

मोहम्मद पैगंबरांनी (स.) हिजरी सनाच्या आठव्या वर्षी मक्का जिंकून घेतल्यावर, काही कुरैशांनी हवाज़िन व सकीफ ह्या टोळ्यांकडे आश्रय घेतला. एवढ्यावरच ते थांबले नाहीत तर ह्या टोळीवाल्यांना मुसलमानांशी नवीन युद्ध सुरू करण्यासाठी ते उत्तेजन देऊ लागले. ह्याचा परिणाम म्हणून टोळीवाल्यांनी आपली सर्व माणसे गोळा केली; जी सुमारे २०,००० भरली. मुसलमानांची व त्यांची गाठ हूनैन येथे पडली. हवाज़िनांचे धनुर्धारी एका खिंडीत लपून बसले होते. ज्यावेळी त्यांच्या बाणांचा तुफानी मारा सुरू झाला, त्यावेळी बारा हजारातले अकरा हजार मुस्लिम पळून जाऊ लागले. सुरुवातीलाच अशी माघार घ्यायला लागूनही अंतिमतः दृष्ट लागावी असा विजय मुस्लिमांच्या पदरी पडला. सुरुवातीची माघार भरून निघण्याचे एकमेव कारण म्हणजे, त्यांचा नेता मोहम्मद पैगंबर (स.) ह्यांची आंतरिक शक्ती होय. अशा आणीबाणीच्या

प्रसंगी पैगंबर कुठल्याही तऱ्हेने घाबरले तर नव्हतेच उलट शांतीच्या महामेरूप्रमाणे निश्चिंत होते (कुरआन ९:२६) त्यांचा अशा परिस्थितीतही ईश्वरावरती अढळ विश्वास होता. त्यांच्यातली आंतरिक शक्ती प्रकट झाली व तिने युद्धाचा रंगच बदलून टाकला. पैगंबरांनी युद्धतंत्रच बदलून टाकले. शत्रूच्या पुढ्यात मध्यभागी उभे राहून आपल्या घाबरलेल्या अनुयायांना बोलावण्याकरिता ते हाका मारू लागले,

'मी पैगंबर आहे आणि मी खोटे बोलत नाही. मी अब्दुल मुत्तलिबचा नातू आहे.'

'ईश्वराच्या सेवकांनो माझ्याकडे परत या!' पैगंबरांनी हाका मारायला सुरुवात केली. त्यांचे चुलतभाऊ इब्ने अब्बास ह्यांचा आवाज फार मोठा होता. पळून जाणाऱ्या शिपायांना हे आवाहन करण्यासाठी पैगंबरांनी इब्ने अब्बास ह्यांना सांगितले. 'रिझवान वृक्षाखाली तुम्ही सर्वांनी पैगंबरांना एकनिष्ठतेची शपथ दिलीत! ईमानासाठी (श्रद्धेसाठी) जीव सुद्धा द्यायची प्रतिज्ञा तुम्ही घेतलीत!! आता मात्र तुम्ही कुठे जाताहात?' आपला नेता शत्रूच्या समोर खंबीरपणाने उभा असल्याने पाहून, ईश्वरी कृपा त्याच्याच बरोबर आहे, अशी मुसलमानांची खात्री पटली. त्यांची विझत गेलेली युद्धचेतना जागृत झाली व एका नवीन निश्चयाने ते युद्धभूमीवर परतले. त्यांचा हा नवीन उत्साह इतका ओसंडत होता की, त्यांनी धडपडणाऱ्या उंटांची तोंडे वळवण्याकरताही न थांबता, उंटांवरून उड्या मारून पळत पळत जाऊन युद्धभूमी गाठली. असे घडल्यावर युद्धाचा रागरंग पालटला नाही तरच नवल. आता पळून जायची पाळी शत्रूची होती. मुस्लिमांकरिता हा विजयाचा दिवस होता. २४,००० उंट, ४०,००० बकरे व १२० किलो चांदी अशी प्रचंड मोठी लूट मुसलमानांना प्राप्त झाली. ह्या व्यतिरिक्त ६००० युद्धकैदी पकडले गेले.

हा विजय होऊनही परिस्थिती बिघडतच गेली. सकीफ ही सर्व अरेबियातील दुसऱ्या क्रमांकाची व महत्त्वाची टोळी होती. संपूर्ण द्वीपकल्पातले सर्वात बळकट व तटबंदी असलेले ताएफ हे शहर त्यांच्या मालकीचे होते. त्यांचा तळ आता ताएफमध्ये होता व ह्या नंतरच्या तीन आठवड्याच्या वेढ्यात त्यांनी मुसलमानांचे इतके नुकसान केले की, हुनैनमध्ये त्यांचे फारच थोडे नुकसान झाले म्हणायची वेळ आली. त्यांचा इस्लाम विरोध अतिशय तीव्र व खोल असा रुजलेला होता. 'तरुण सुंदरीपेक्षाही (!) प्रिय असणारा', अशी ज्याची ख्याती होती, त्या उर्वाह् इब्ने मसूद सकफी, ह्या सकफीने ज्यावेळी पैगंबरांडे येऊन इस्लामचा स्वीकार केला, त्यावेळी त्याच्यावर असणारे आपले अतीव प्रेम विसरून अत्यंत क्रूर तऱ्हेने बाणांनी त्याची चाळण करून टाकण्यात आली.

परत एकदा पैगंबरांची आंतरिक शक्ती त्यांच्या मदतीला धावून आली. वेढा बळकट होत गेला आणि हजरत उमर ह्यांनी पैगंबरांना सकीफ़ टोळीचा नाश होवो अशी प्रार्थना ईश्वराकडे करण्यास सांगितले. पैगंबरांनी मात्र ईश्वराने त्यांना मार्गदर्शन करावे अशीच प्रार्थना केली. त्यांच्या अशा वाईट वर्तणुकीनंतरीही पैगंबर रागावले नाहीत अथवा त्यांनी पूर्वग्रह धरले नाही. ताएफला तीन आठवडे वेढा घातल्यावर पैगंबरांनी त्यांच्या सैन्याला परतीची आज्ञा केली. ताएफवरून परतीच्या वाटेवर जेराना येथे येऊन पैगंबर थांबले, जिथे हुनैन युद्धातले कैदी ठेवण्यात आले

होते. सकीफ़ांचे मित्र असणाऱ्या हवाज़िनांवरती सूड उगविण्यास त्यांना उत्तम संधी होती. पण ते मात्र नेमके उलटे वागले! आपले युद्धकैदी सोडून द्यावेत अशी हवाज़िनांनी केलेली विनंती त्यांनी मान्य केली व सर्वच्या सर्व सहा हजार युद्धकैदी त्यांनी सोडून दिले. ते इतक्या औदार्याने वागले की त्यांनी फक्त युद्धकैद्यांना सोडूनच दिले असे नाही तर त्यांना कपडे पुरविले. त्यांच्या परतीच्या प्रवासाची तरतूद केली. ह्या औदार्याचा अर्थातच त्यांच्यावर फार मोठा परिणाम झाला. पैगंबरांच्या अंतःप्रेरणेने परत एकदा करामत झाली. प्रेषितांच्या असीम औदार्याने जिंकल्या गेलेल्या सर्वच्या सर्व हवाज़िन टोळीने इस्लाम स्वीकारला.

या घटनेचा अर्थातच ताएफवर फार मोठा परिणाम झाला. हवाज़िन आणि सकीफ ह्या वस्तुतः एका मोठ्या टोळीच्या शाखा होत्या. ताएफच्या वेढ्यानेही किंचितदेखील परिणाम झालेला नसतानाही, आता मात्र हवाज़िनांच्या इस्लामीकरणाने सकीफांना भीती वाटू लागली. हवाज़िनांच्या मैत्रीमध्ये भंग होणे ही सकीफांकरिता भरून न निघणारी जखम होती. ज्यामुळे त्यांना कळून चुकले की, आता ते मुस्लिमांशी युद्ध करायला असमर्थ बनले आहेत.

'सकीफांनी आपापसात सल्ला मसलत केली. ज्यावेळी त्यांच्या हे लक्षात आले की, त्यांच्या सभोवतालच्या सर्व अरबांनी पैगंबरांना एकनिष्ठतेची शपथ दिली आहे आणि त्यांच्याशी लढणे कठीण आहे, त्यावेळी त्यांनी पैगंबरांच्या श्रद्धेचा (इस्लामचा) स्वीकार केला.' (सीरत इब्ने हिश्शाम, खंड २, पृ.१०७)

हिजरी सन नऊ (इ.स. ६३०) मध्ये ताएफमधून एक शिष्टमंडळ मदिनेला आले. अत्यंत विचित्र अटींवर त्यांनी इस्लाम स्वीकारायचे कबूल केले. त्या अटी अशा होत्या. मुस्लिम फौजेला त्यांच्या प्रदेशातून जाता येणार नाही. जमिनीवरचा कर ते भरणार नाहीत. ते जिहादमध्ये (धर्मयुद्धात) सहभागी होणार नाहीत. ते नमाज़ही पढणार नाहीत व त्यांच्या टोळीव्यतिरिक्त दुसऱ्या कुणाला नेताही मानणार नाहीत. पैगंबरांनी ह्या सर्व अटी मान्य केल्या! पण पुढे हेही स्पष्ट केले की, ईश्वरापुढे झुकणे ह्याहून दुसरी मोठी व चांगली गोष्ट धर्मामध्ये नसते. ही गोष्ट ज्या धर्मात नाही तो धर्मच नव्हे. मान्य केलेल्या अटी पाहून सहाबा आश्चर्यचकित झाले. पैगंबरांनी ह्या असल्या अटींनिशी स्वीकारलेल्या इस्लामला मान्यता दिलेली पाहून थक्कच झाले. पैगंबर स्वतः मात्र दूरवरच्या भविष्यात बघत होते व सहाबांच्या मनातल्या शंका त्यांनी पुढची वाक्ये बोलून दूर केल्या.

'एकदा त्यांनी ईश्वराला समर्पण केले की, थोड्या काळानंतर ते धर्मकर्तव्येही पार पाडतील व ईश्वरी मार्गासाठी लढासुद्धा देतील.' (अबू दाऊद)

हजरत अनस ह्यांचा संदर्भ देऊन इमाम अहमद ह्यांनी असा निष्कर्ष काढला आहे की, इस्लाम स्वीकारायच्या आधी केलेली, माणसांची पूर्ण करणे शक्य असणारी, कुठलीही विनंती पैगंबर मान्य करीत असत. पैगंबरांकडे आलेल्या एका माणसाला एकदा इतका मोठा बकऱ्यांचा कळप दिला गेला की, त्याचा विस्तार हा एका डोंगरापासून दुसऱ्या डोंगरापर्यंत एवढा होता. आपल्या माणसांमध्ये परत गेल्यावर त्याने त्यांना इस्लाम स्वीकारण्याची गळ घातली व पुढे

सांगितले की, 'मोहम्मद (स.) इतके काही देतात की, त्यांच्यापुढे परत याचना करण्यासाठी जाण्याची गरजच उरत नाही.' इब्ने कसिर ह्यांनी एक छान मुद्दा मांडला आहे. जरी एखादा माणूस पैगंबरांकडे जगाची मागणी करीत आला, तरी ते त्याला मिळायच्या आधी, ज्यावेळी एक दिवस तो पैगंबरांबरोबर राहत असे, त्यावेळी त्यांच्या श्रद्धेच्या प्रभावाने, ती श्रद्धाच त्याला, सर्व जग जे काही देऊ शकणार आहे, त्याहून महत्त्वाची वाटायला लागे व तो तिच्यावर प्रेम करू लागे. (अल् बिदायाह वा अल निहायाह्)

सकीफ व हवाज़िन ह्यांचे प्रश्न निकाली निघाल्यावर ह्याहूनही मोठा व गंभीर प्रश्न डोके वर काढू लागला. हवाज़िनांवरच्या विजयात मुसलमानांना प्रचंड मोठी लूट मिळालेली होती. मोठ्या औदार्याने हे युद्धावशेष पैगंबरांनी मक्केतल्या नव्याने मुस्लिम झालेल्यांमध्ये वाटून दिले. ज्या अन्सारांनी पैगंबरांना त्यांच्या कठीण काळात मदिनेला स्थलांतर केल्यावर मदत केली होती, त्यांपैकी काही जणांना हे सहन झाले नाही. त्यांना असे वाटू लागले की, आता पैगंबरांना त्यांच्या मातृगृही, परत मानाचे स्थान प्राप्त झाले आहे, त्यामुळे ते अंधासक्त वृत्तीने 'आपल्या' माणसांना खूश करण्यासाठी त्यांच्यावर संपत्तीचा वर्षाव करीत आहेत. पैगंबरांचे हेतू हे निश्चितच असल्या विचारांहून उंच पातळीवरचे होते; पण अन्सारांना आपल्यावर अन्याय होतो आहे व आपल्याला बाजूला टाकले जात आहे एवढे वाटणेही पुरेसे होते, ज्यामुळे मुस्लिम ऐक्यालाच तडा पडण्याचा प्रश्न निर्माण होत होता. पैगंबरांनी मात्र अतिशय जोरदार प्रयत्नांनी त्यांच्या शंका दूर केल्या व आपला हेतू कळकळीचा व सदिच्छेचाच होता, हे दाखवून दिले.

पैगंबरांनी सर्व अन्सारांना एक दिवस सभास्थानी बोलविले व ते पुढीलप्रमाणे बोलले. 'मी हे तुमच्याबद्दल काय ऐकतो आहे? काय ही गोष्ट खरी नव्हे की रस्ता चुकलेल्या तुम्हाला ईश्वराने माझ्याद्वारे ईश्वरी मार्गावर आणले? तुम्हाला ज्याची ज्याची गरज होती, ती प्रत्येक गोष्ट ईश्वराने परत माझ्याचद्वारे तुम्हाला दिली. तुम्ही एकमेकांना नुसते भांडतच होतात आणि ईश्वराने तुम्हाला माझ्याभोवती गोळा करून तुमचा एक समाज बनविला, हे खरे आहे अथवा नाही?' प्रत्येकाने आपल्या संमतीचा आवाज दिला. मग पुढे पैगंबर पुढचे भाषण करते झाले:

'तुम्हाला असे म्हणायचा पूर्ण हक्क आहे की, आम्ही मुहाजिर तुमच्याकडे आश्रयार्थ आलो. ज्यावेळी आमच्या भूमीतून आम्हाला हाकलून लावण्यात आले होते, अशावेळी तुम्ही आम्हाला आसरा दिलात. आम्हाला गरज होती व तुम्ही आमची काळजी घेतलीत. आम्ही दहशतीखाली वावरत असताना तुम्ही आम्हाला संरक्षण दिलेत. निर्मित्र अवस्थेत तुम्हीच फक्त साथ दिलीत. अन्सारहो, काय तुमच्या रागाचे एक एवढेच कारण आहे की नव्याने मुस्लीम बनलेल्यांना मी काही क्षुल्लक भेटी दिल्या, ज्यायोगे त्यांना संतोष व्हावा आणि त्यांचे ईमानवरती (श्रद्धेवरती) लक्ष  पक्के व्हावे? तुमच्या हे कसे लक्षात येत नाही की, ईश्वराने तुमच्याकरिता दिलेली सर्वात मोठी अशी 'इस्लामची' देणगी मी प्रथम तुम्हालाच विश्वासाने दिली. अन्सारहो, तुम्हाला ह्या गोष्टीचा आनंद होत नाही काय, की लोक त्यांच्या घरी उंट व बकरे घेऊन जात आहेत; पण तुम्ही मात्र घरी जात असताना तुमच्याबरोबर ईश्वराच्या पैगंबराला घेऊन

जाताहात?' (इब्ने इसहाक ह्यांच्या अधिकारयुक्त संदर्भ देऊन अहमद ह्यांनी दिलेला वृत्तांत)

हे भाषण ऐकल्यावर सर्वजण मोडून पडले व रडू लागले. सर्वजण एक मुखाने ओरडले की, 'ईश्वराचे पैगंबर आमच्यात आहेत हाच आमचा सर्वात मोठा आनंद!' ह्या सर्व घटनांवरून पैगंबरांच्या आंतरिक शक्तींची कल्पना यावी. ही शक्ती कुठलाही अडथळा तोडून टाकत असे. उघडायला मुश्किल असणारे प्रत्येक दार उघडत असे व प्रत्येक अडथळ्यावरती स्वार होत असे. आयुष्यातल्या प्रत्येक प्रसंगी त्यांनी जे यश मिळविले त्या यशाची ही आंतरिक शक्ती म्हणजे गुरूकिल्ली होय.

### बाह्य जगतातली साधना: धर्म प्रसाराचे कार्य

ज्यावेळी इस्लामच्या पैगंबरांचा कृतीशील लढा सुरू झाला त्यावेळी ज्या जगाने त्यांना अत्यंत वाईट वागणूक दिली, त्या जगाचा सूड घ्यायचा, अशा प्रकारची कोणतीही इच्छा त्यांच्या मनात नव्हती. सर्वसाधारणपणे लोकप्रिय चळवळी ह्या कुठल्या तरी सूडाच्या तीव्र इच्छेच्या ठिणगीने पेटवल्या जातात. पैगंबरांचा लढा मात्र सर्जनशील व स्वतःच चांगल्या असणाऱ्या कल्पनांवर आधारलेला होता. हा लढा म्हणजे त्यांना मिळालेल्या वागणुकीची अथवा नकारात्मक अशी प्रतिक्रिया नव्हता. लोकप्रिय चळवळींचे मूळ हे सर्वसाधारणपणे राजकीय, सामाजिक, आर्थिक घटनांमधून निर्माण होणाऱ्या कारणांमध्ये असते. पैगंबरांना ज्यावेळी पृथ्वीवर पाठविले गेले, त्यावेळी ही सर्व कारणे तर अस्तित्वात होतीच. पैगंबरांनी ज्यावेळी ईमानचा (श्रद्धेचा) प्रचार केला, त्यावेळी मात्र त्यांनी ह्यापैकी एकाही मुद्याचा वापर केला नाही अथवा त्या प्रचारात ह्या मुद्यांना घुसडले नाही. ह्या प्रकरणाच्या सुरुवातीला आम्ही म्हटल्याप्रमाणे प्रेषितांनी हे धर्मप्रसाराचे काम अतिशय निःस्वार्थी बुद्धीने केले. अर्थात हे करीत असताना त्यांनी एखाद्याही राजकीय, सामाजिक अथवा आर्थिक प्रश्नाला धक्कासुद्धा लावला नाही.

ज्यावेळी पैगंबरांनी आपले कार्य सुरू केले त्यावेळी, त्याकाळच्या साम्राज्यवादी सत्तांना हल्ला करण्यासाठी अरबभूमी, ही आदर्श साध्य बनली होती. देशातले सुपीक व श्रीमंत भाग घुसखोरी करून लाटायची एकही संधी ह्या सत्ता सोडत नव्हत्या. द्वीपकल्पाच्या उत्तरेचा सिरियाचा भूप्रदेश अरब सुभेदाराच्या अधिपत्याखाली होता, ज्याची निष्ठा रोमन साम्राज्याच्या सीझरशी होती! पैगंबरांच्या काळात, दक्षिणेतल्या येमेनच्या प्रांतावर पर्शियनांचे वर्चस्व होते आणि तिथला सुभेदार बाझान हा होता. ज्या प्रांतांनी आपले स्वातंत्र्य अबाधित राखले होते, असे प्रांत म्हणजे हिजाज़, तहामा व नज्दचे प्रांत होते. ह्याव्यतिरिक्त सर्वत्र खडकाळ वाळवंटे होती, ज्यांमध्ये अधूनमधून एखादे ओॲसिस असे. सीझर्स आणि खुसरो ह्यांना अरेबिया ही त्यांची मालमत्ता वाटे आणि म्हणूनच पैगंबरांनी ज्यावेळी पर्शियन सम्राटाला इस्लाम स्वीकारण्याविषयी आमंत्रण करणारे पत्र पाठविले, त्यावेळी त्या गर्विष्ठ सम्राटाने, ते पत्र फाडून टाकले आणि अतिशय क्रुद्ध होऊन तो म्हणाला, 'हा माझा गुलाम! आणि मला भलते पत्र भलत्याच धाडसाने पाठवीत आहे.'

पैगंबरांच्या जन्मवर्षी (इ.स. ५७०) अब्राहाने काबागृहावरती केलेला हल्ला हा, ह्याच

घुसखोरीचा एक भाग होता. इस्लामच्या उदयापूर्वी काबागृह हे अरेबियातील सर्व मुर्तिपूजकांचे केंद्र होते. प्रत्येक टोळीने आपापल्या मूर्तिची प्रतिष्ठापना काबागृहात केली होती व काबागृहाचा सर्व परिसर अतिशय पवित्र समजला जात असे. अरब विस्तृत भूमीतल्या फार दूरवरच्या ठिकाणांहून मक्केकडे लोकांचे तांडे वर्षभर येत असत आणि ते काबागृहाविषयीचा आपला आदर व्यक्त करीत असत व आपापल्या प्रतिष्ठापित मूर्तिला नैवेद्य व बली अर्पण करीत असत. यात्रेकरूंच्या सातत्याने येणाऱ्या ह्या लोंढ्याने मक्केची अर्थव्यवस्था, फायदा होऊन बळकट झालेली होती. अब्राहाला हा पैशाचा प्रवाह आपल्या भूमीत वळवायचा होता. त्याची भूमी असलेले येमेन मक्केच्या दक्षिणेस होते. त्याचे स्वार्थ तो कुठल्याही तऱ्हेने पूर्ण करायला कमी करत नसे. ह्याकरिताच त्याने येमेनच्या आधीच्या सुभेदाराला ठार मारले. संपूर्ण देशाचा ताबा घेतला व ॲबिसिनीयाच्या राजाला आपले, त्याच्या देशावरचे आधिपत्य मान्य करण्यास भाग पाडले. हा धर्माने ख्रिश्चन होता. सना ह्या आपल्या गावी त्याने प्रचंड मोठे चर्च बांधले होते. त्यानंतर त्याने लोकांमध्ये ह्या चर्चला यात्रास्थळ बनवावे म्हणून एक मोठी प्रचार मोहीम आखली. अशा रीतीने त्याने मक्केतल्या यात्रेचा किफायतशीर व्यापार सनाकडे वळविण्याचा प्रयत्न केला. अरब इतिहासाने नोंद घेतली आहे की, त्याचे हे सर्व प्रयत्न ज्यावेळी निष्फळ ठरले त्यावेळी तो काबागृहाचा नाश करण्याच्या मोहिमेवर बाहेर पडला. एकदा काबागृहाचा नाश केला की लोकांना सनातल्या चर्चव्यतिरिक्त दुसरी कुठलीच जागा यात्रेकरिता शिल्लक राहिली नसती, हा ह्या मोहिमेपाठीमागचा हेतू होता. ह्याकरिता हत्तींची फार मोठी सेना घेऊन तो निघाला, ज्यामुळे त्याला 'हत्तींचा सेना–नायक' अशी उपाधी लाभली. त्याने बांधलेल्या चर्चेच्या बांधणीत ज्यांनी मदत केली अशा काही लोकांची नावे इतिहासात उपलब्ध आहेत. त्याने ज्या मार्गाने वाटचाल केली त्या रस्त्याला अरबांनी 'हत्तींचा मार्ग' असे नाव दिले. त्यांनी ज्या झऱ्यावर पाणी प्याले, ज्या दरवाजातून ते मक्केत शिरले आणि त्या हल्ल्याचे वर्ष ह्यांनाही अशाच प्रकारची विशेषनामे बहाल करण्यात आली होती.

कुठल्याही नेत्याने अशा वाईट परिस्थितीत परकीय साम्राज्यशाही सत्तांविरुद्ध एखादी लोकप्रिय राजकीय चळवळ उभारायचा पवित्रा घेतला असता. अशा नेत्याने परकीय सत्तेच्या वर्चस्वापासून आपल्या मातृभूमीला मुक्त करण्याचा प्रयत्न केला असता व आपल्या लोकांमध्ये राष्ट्रीय भावना जागृत करण्याचा प्रयत्न केला असता. पण इस्लामच्या पैगंबरांनी अशी एखादी राष्ट्रीय स्वतंत्रता चळवळ उभारायपासून स्वतःला अगदी काटेकोरपणे रोखले.

पैगंबर ज्यावेळी दुनियेत आले त्या काळी अरेबियाला अत्यंत गंभीर आर्थिक प्रश्न भेडसावत होते. अरेबिया ही एक संपूर्णतया शुष्क भूमी होती. जगात ज्यावेळी 'शेतीचे युग' सुरू झाले होते, त्यावेळी अरबांना मात्र शेती करण्यालायक जमीन नव्हती, ज्यावर तत्कालीन सर्व अर्थव्यवस्था अवलंबून होती. हा प्रश्न अरेबियातील प्रत्येक व्यक्तीचा, अगदी 'व्यक्तिगत समस्या' बनला होता आणि ह्याचा लाभ सहजपणे उठवून एखादी क्रांती चळवळ उभारणे सहज शक्य होते. प्रेषितांनी लोकांच्या ह्या आर्थिक समस्येचे कुठल्याही प्रकारे भांडवल केले नाही. एकदा

मक्केतले सर्व पुरुष काबागृहाजवळ सूर्यास्तानंतर संध्याकाळी जमले व त्यांनी पैगंबरांना पुढे येण्यास फर्माविले. पैगंबरांनी सर्वप्रथम इस्लामची मूलभूत तत्त्वे सांगितली. उत्तरादाखल त्यांना पुढील गोष्टी सांगण्यात आल्या.

'मोहम्मद तुला तर हे माहीत आहे की, आपल्या इतका शुष्क व गरीब देश दुसरा कुठलाच नसेल. आपल्या साऱ्यांना जगणे किती अवघड आहे, हे तुला चांगलेच माहित आहे. म्हणून तू तुझ्या ईश्वराकडे प्रार्थना कर की, त्याने ह्या भूमीतले हे शुष्क डोंगर ज्यांच्यामुळे आपले आयुष्य खडतर झाले आहे, ते काढून टाकावेत. त्याने आपली जमीन सुपीक बनववी व नद्या निर्माण कराव्या. सिरिया आणि इराकच्या दऱ्यांमधून जशा त्या वाहतात!' (तहजीब, सीरत इब्ने हिश्शाम, पृ.६७)

कुरैशी नेतृत्व पैगंबरांशी असे का बोलले हे कळण्यासाठी, अरेबियाची भौगोलिक परिस्थिती आपल्याला समजून घ्यायला हवी. हिजाज़पासून नज्दपर्यंतच्या किणाऱ्या किनाऱ्याने एक लांबचलांब पर्वतरांग पसरली आहे. पावसाचे सामुद्री वारे देशाच्या अंतर्गत भागात वाहण्यास ह्या डोंगररांगा प्रतिबंध करतात. ह्याचा परिणाम म्हणजे सिरीया व इराकच्या तुलनेत अरेबियन भूप्रदेशावर अगदीच कमी पाऊस पडतो. ही भौगोलिक परिस्थितीच अरेबियाच्या आर्थिक समस्यांच्या मुळाशी होती. उदयाला येणाऱ्या कुठल्याही नेत्याने लोकांना अशा प्रश्नांचा (सुयोग्य!) वापर करून आकर्षित करून घेतले असते. पैगंबरांनी मात्र हा मार्ग निवडला नाही. अशा प्रकारच्या प्रश्नांमध्ये प्रत्यक्षतः लक्ष न घालता पैगंबरांनी मात्र ईश्वरी एकत्वाचा उपदेश करीत, त्याचा प्रसार करण्याचा एकमेव मार्ग निवडला. इतिहासाची साक्ष आहे की, पैगंबरांच्या ह्या धर्मप्रसाराच्या कार्याचे व त्याकरिता दिलेल्या लढ्याचे फार दूरगामी परिणाम घडले. ज्यायोगे अरबांना सर्वस्वी नवीन आर्थिक व राजकीय संधींचा लाभ घडला. हे मात्र लक्षात घ्यायला हवे की, पैगंबरांनी दिलेल्या लढ्याचे हे अप्रत्यक्ष परिणाम होते. त्यांनी स्वतः कधीच राजकीय व आर्थिक फायद्याकडे लक्ष ठेवून प्रत्यक्ष प्रयत्न केले नाहीत.

पैगंबरांचे सर्व जीवन हेच सांगते की, त्यांनी इस्लामच्या प्रसारालाच सर्वोच्च महत्त्व दिले. ज्यावेळी त्यांनी कृतिशील चळवळ सुरू केली, त्यावेळी त्यांनी बाकीच्या सर्व गोष्टी बाजूला ठेवल्या व फक्त इस्लामच्या प्रसारालाच वाहून घेतले. सुरुवातीला ईश्वरी मार्ग जगाला सांगण्याकरिता ईश्वराकडून त्यांची निवड झाली आहे, हे स्वतःच्या लोकांना सांगण्यावरती त्यांचा भर होता. हे सांगण्याकरिता एका रात्रीत त्यांनी आपल्या सुमारे चाळीस नातेवाईकांना जेवायला बोलविले, ज्यापैकी किमान तीसजण ह्या भोजनप्रसंगी हजर होते. भोजनानंतर त्यांनी पाहुण्यांसमोर आपले भाषण मांडले, त्याला फारच थोडे यश मिळाले, ते म्हणाले, 'बनी मुत्तालिबहो, मला विशेषतः तुमच्याकडे पाठविण्यात आले आहे, नंतर इतर मानवमात्रांकरिता. माझ्या ऋणाला व वचनांना जागण्यास कोण तयार आहे? मी दूर गेल्यावर माझ्या कुटुंबाकडे कोण लक्ष देईल? मला अशा तऱ्हेची मदत करणारे, माझ्याबरोबर स्वर्गातले मित्र असतील.' पैगंबरांनी ही गोष्ट पुन्हा पुन्हा सांगितली, त्यावेळी किशोरवयीन असणारे अलीच (पैगंबरांचे

चुलतभाऊ) फक्त पुढे झाले व म्हणाले, 'ईश्वराच्या पैगंबरा, मी तुम्हाला मदत करेन.' पैगंबर म्हणाले, अली, (फक्त) तूच, तूच (फक्त) अली!' (मदत करणारा निघालास!) (राझिन).

एक दिवस अबू जहलने पैगंबरांना दगड मारला, ज्यामुळे त्यांच्या चेहऱ्यातून रक्त गळू लागले. पैगंबरांचे चुलते अब्बास ह्यांना ह्या गोष्टीचा पत्ता लागला. जरी त्यांनी त्यावेळी इस्लामचा स्वीकार केलेला नसला तरी खानदानाची इज्जत आणि पुतण्याचे प्रेम म्हणून ते ताबडतोब अबू जहलकडे गेले व त्यांनी त्याला चांगलाच तडाखा दिला. मोठ्या विजयी आनंदात ते पैगंबरांकडे आले व म्हणाले, '(माझ्या लाडाच्या) पुतण्या, मी तुझा बदला घेतला आहे.' 'तुम्ही इस्लामचा स्वीकार केलात तर मला ह्याहून जास्त आनंद होईल,' पैगंबर उत्तरले.

एकदा कुरैशांचे नेते, पैगंबरांचे दुसरे चुलते, अबू तालिब ह्यांच्याकडे आले व सांगू लागले की, 'अबू तालिब, तुमचा पुतण्या आमच्या पटांगणांमधून, सभांमधून येतो आणि अशा काही 'गप्पा' मारतो की, ज्यामुळे आम्हाला बिथरून जायला होते. तुम्ही काही करू शकत असाल (जर तुमचा वचक असेल!) तर त्याला त्याचे हे चाळे थांबवायला सांगा.' पैगंबरांना बोलावून आणण्यासाठी अबू तालिबनी स्वतःचा मुलगा अक़ील ह्याला पाठविले. कुरैश काय म्हणत होते ते पुतण्याला सांगितल्यावर पुतण्याने आकाशाकडे (स्वर्गाकडे) नजर लावली व म्हणाला, 'ईश्वराची शपथ, काय तुमच्यापैकी कोणी सूर्याच्या ज्योतीपासून विस्तव पेटवू शकतो का? ईश्वराने माझ्याकडे विश्वासाने सुपूर्द केलेला त्याचा संदेश आता मी फार काळ रोखून धरू शकत नाही,' पैगंबर फक्त एवढेच म्हणाले आणि त्यांना पिळवटून टाकणारे रडे कोसळले. (अल् बिदायाह् वा अल् निहायाह्)

पैगंबरांची बनो हाशिम ही अरब समाजातली सर्वात मोठी व अग्रेसर टोळी होती. आधीच ही टोळी खूप प्रबळ असल्याने काही लोकांना असे वाटायला लागले की स्वतःचे वर्चस्व निर्माण करून पैगंबरांना अभिषिक्त राजा व्हायचे आहे. पण पैगंबरांच्या कृतींनी मात्र हे सिद्ध केले की, त्यांना एकाच गोष्टीत रस होता आणि ती म्हणजे पुढच्या जगाचे महत्त्व लोकांना पटवून द्यायचे व त्याकरिता कशी तयारी करायची हे समजावून सांगायचे, ही होय. ते इतक्या आग्रहीपणाने ही गोष्ट परत परत सांगत की, कुरैश अतिशय वैतागून त्यांना ताबडतोब तिथून निघून जायला सांगत. अबू जहल एकदा त्यांना म्हणाला, 'मोहम्मद तू आमच्या देवांचा अपमान व विटंबना थांबवशील काय? तू तुझा संदेश आम्हापर्यंत पोहोचविलास ह्याची तुला साक्षच हवी ना, चल आम्ही कबूल करतो की, तू तुझा संदेश आम्हापर्यंत पोहोचविलास. ह्याचे आम्ही साक्षीदार आहोत!' (अल् बिदायाह वा अल् निहायाह)

पैगंबरांवर काहीच परिणाम झाला नाही; ना त्यांनी त्यांचा संदेश द्यायचे काम थांबविले. ह्यामुळे कुरैश फारच क्रुद्ध झाले व त्यांनी संपूर्ण बनो हाशिम खानदानाला बहिष्कृत करायचा निर्णय घेतला. एका आदेशान्वये आपापसातले विवाह व व्यापार थांबविण्यात आले. हा आदेश लागू झाल्याचे कळल्यावर तो अंमलात असेपर्यंत बनो हाशिम शिब नावाच्या जागी स्थलांतरित झाले. ह्या काळात ह्या आदेशाने नुकसान झालेल्यांपुरतेच इस्लामप्रसाराचे कार्य मर्यादित

राहिले; पण पैगंबरांनी त्याचा पूर्ण फायदा उठविला. पवित्र महिन्यांमध्ये मात्र काही काळापुरता आदेश रद्दबातल ठरवत असे. ह्या 'सुटकेच्या' काळात पैगंबरांचे कुटुंब व्यवहार चालवून फायदा करून घेत असे. बळीचे मांस एकत्र करून, ते वाळवून उरलेल्या वर्षभराच्या वापराकरिता साठविले जात असे. पैगंबर मात्र हा काळ वेगळ्या तऱ्हेने व्यतीत करीत. यात्रेकरिता आलेल्या लोकांच्या राहत्या तंबूजवळ जाऊन ते इस्लामच्या संदेशाचा प्रचार करीत राहत.

थोडी जरी कल्पना ताणली तरी, प्रेषितांनी मदिनेकडे मक्केहून केलेले स्थलांतर केवढे धोक्याचे होते ते सहज कळेल. तरी ह्या प्रवासातसुद्धा त्यांना जो कोण भेटत होता त्याला इस्लामचा संदेश सांगायची एकसुद्धा संधी त्यांनी दवडली नाही. उदाहरणार्थ: ते ज्यावेळी गमीम इथे पोहोचले त्यावेळी त्यांनी बरीदा इब्ने हसीब ह्यांना इस्लामचा संदेश दिला आणि त्यांनी आपल्या ऐंशी कुटुंबियांसह इस्लाम स्वीकारला. रकूबाच्या खिंडीत त्यांना दोन माणसे भेटली. त्यांनाही पैगंबरांनी इस्लामची माहिती दिल्यावर त्यांनी इस्लाम स्वीकारला. पैगंबरांनी त्यांची चौकशी केल्यावर त्यांनी सांगितले की ते अस्लम ह्या टोळीपैकी होते व त्यांना टोळीमधून तडीपार करण्यात आले होते. ह्याकरिता त्यांना 'मुहनान' अथवा 'तिरस्करणीय जोडगोळी' म्हटले जात असे. पैगंबर म्हणाले, 'अजिबात नाही, तुम्ही दोघे तर आदरणीय आहात.' (मस्नद इमाम अहमद)

पैगंबरांनी त्यांच्या सहाबांमध्ये (सहकाऱ्यांमध्ये) हीच वृत्ती जोपासली. एखादा प्रदेश जिंकणे अथवा युद्धातली लूट गोळा करणे हे त्यांचे ध्येय नव्हते. उलट तेच एका मूल्यवान संपत्तीचा स्त्रोत बनणार होते. दुसऱ्यांकरिता ईमानाची (श्रद्धेची) ही संपत्ती तेच लुटणार होते! खैबरच्या युद्धभूमीवरती ज्यावेळी मुस्लिमांची ध्वजा, हजरत अली ह्यांच्याकडे देण्यात आली, त्यावेळी पैगंबरांनी आपल्या चुलतभावाला (अलींना) अत्यंत धीमेपणे पुढे सरकायचा सल्ला दिला आणि ते म्हणाले, 'ज्यावेळी तू त्यांच्या भूमीत पुढे जाशील त्यावेळी त्यांना इस्लामचे निमंत्रण दे आणि त्यांच्या ईश्वरविषयक जबाबदाऱ्या काय आहेत हे त्यांना सांग. ईश्वराशपथ, जर त्याने त्यांच्यापैकी एकालाही जरी तुझ्याद्वारे मुस्लिम होण्याचे मार्गदर्शन केले, तरी हे लक्षात ठेव की, युद्धलूट म्हणून मिळविलेल्या तांबड्या उंटांच्या मोठ्या तांड्याहूनही हा विजय फार मोठा असणार आहे.' (बुखारी व मुस्लिम)

धर्मप्रचार हे पैगंबरांच्या आयुष्यातले इतके मोठे व महत्त्वाचे काम होते की, त्यांच्या सर्व लढ्याचे एकाच शब्दात वर्णन करायचे झाले तर धर्मप्रचार एवढाच शब्द पुरेसा व्हावा. नेते सर्वसाधारणपणे राजकीय, आर्थिक व सामाजिक प्रश्नांवरती लक्ष केंद्रित करतात. पैगंबरांनी मात्र आपले उभे आयुष्य व शक्ती ईश्वरी वाणी लोकांपर्यंत पोहोचविण्यासाठी वेचली. सुरुवातीला त्यांचा हा एककल्लीपणा असमर्थनीय वाटणे काही आश्चर्यजनक गोष्टी नव्हती. पैगंबर ज्याप्रमाणे वागले, त्याप्रमाणे एखाद्याने जर पुढच्या जगावरती आपले लक्ष केंद्रित केले, तर त्याच्या आपोआप लक्षात येईल की, ह्या जगातली ध्येये आपोआप साध्य होतात.

## संयम व खंबीरपणा

ह्या प्रकरणाच्या सुरुवातीला उल्लेखिल्याप्रमाणे, दैवी मार्गावर येणाऱ्या अडचणींवर मात करताना खंबीर व शांत संयमाचा आधार घेणे हा प्रेषितकार्याचा तिसरा भाग होता. संयमाकरिताचा अरेबिक शब्द आहे सब्र. हा शब्द ज्या धातूपासून निर्माण झाला आहे, त्याच धातूपासून निर्माण झालेला आणखी एक शब्द आहे, सब्बाराह. ह्या शब्दाचा अर्थ मात्र आहे, कठीण, नापीक जमीन जिच्यात कुठलेच बीज रूजत नाही! ह्या प्रमाणेच सब्र 'ज्याच्यामध्ये' आहे असा संयमी माणूस आपल्यावर कुठल्याच घटनांचा परिणाम घडू देत नाही. भावनांना थारा न देता असा मनुष्य आपले ईप्सित दृढनिश्चयाने साध्य करून घेतो. अशा उत्साही कृतिशील माणसाला 'सबूर' असाही एक शब्द आहे. अशी व्यक्ती कुठल्याही दबावाने दबून जात नाही. ती ठामपणे तडजोड न करता उभी राहते. मग कितीही गंभीर प्रसंग गुदरलेला असो.

इस्लाम एखाद्याने स्वीकारल्यावर, एक प्रतिष्ठित, महत्त्वाचे मूल्य म्हणून संयम हा अशा व्यक्तीच्या अंगी येतोच. इस्लाम एखाद्याच्या आयुष्यातला अविभाज्य घटक बनला की, एका जिवंत आत्मिक बळाने तो मनुष्य इतका भिजून जातो की, 'ईश्वरी मार्गावरील एखाद्या गोष्टीकरिता, कष्ट सोसायला लागले अथवा नुकसान झाले तरी तो कधीच कष्टी होत नाही. तो कधीच दुबळा होऊ शकत नाही ना हलकटपणे तो कोणाची हांजी हांजी करतो' (कुरआन, ३:१४६). ईश्वरावरची श्रद्धा म्हणजे त्याच्यावर पूर्ण विश्वास ठेवणे आणि जो ईश्वराचा विश्वास बाळगतो तो अतिशय मोठ्या बळाचा, शक्तीचा मालक बनतो. त्याच्या निर्णय व निश्चयापासून परावृत्त होण्याइतका दुबळा, त्याला कोणीही बनवू शकत नाही.

संयम अंगी बाणविल्याशिवाय, ईश्वरी धर्माचा प्रसारक त्याचे कार्य फार मोठ्या काळापर्यंत करू शकत नाही. तो त्याच्या कामाला एकदा का धडाडीने लागला की, त्याच्या लक्षात येते की, परक्या व अनोळखी माणसांच्या गलबल्यात तो एकटाच आहे. त्याच्या कृती ईश्वराज्ञेनुसार घडत राहतात, तर इतर लोक मात्र त्यांना जे पाहिजे ते करायला मोकळे असतात. पुढच्या आयुष्यातील यशासाठी व मोक्षासाठी त्याची प्रत्येक गोष्ट घडत असते. ह्या उलट त्याच्यासमोर उभे असणाऱ्यांकरिता मात्र ह्या जगातल्या भौतिक यशाचे सारे रस्ते मोकळे असतात. त्याचे सर्व प्रयत्न आत्मिक साध्याच्या दिशेने चालू असतात, तर लोकांच्या नजरेत मात्र एखाद्याचे राजकीय व आर्थिक बळ त्या माणसाला शक्तिमान समजण्यासाठी पुरेस असते. तो नैतिक मूल्यांची जपणूक करतो तर इतरांच्या कृती मात्र बंधनमुक्त असतात. ईश्वराच्या धर्मप्रसारकावर कधी कधी अशा नकोशा गोष्टीचा सहज परिणाम होऊ शकतो. स्वतःचे कार्य सोडून देऊन वेड्या जनसमूहाप्रमाणे वागावे असा मोहसुद्धा त्याच्यामध्ये उत्पन्न होऊ शकतो. त्याला असेही वाटण्याची शक्यता असते, की तो जे काय करतो ते इतके अपरिणामकारक (व निरुपयोगी) असेल तर ते करायचा त्रास घेण्यापेक्षा सोडूनच दिलेले बरे! ह्या अशा धोक्याच्या ठिकाणी सब्र त्याच्या मदतीला धावून येतो. केवळ दुसऱ्यांवर काहीच परिणाम होत नाही म्हणून आपले काम सोडून देण्यापासून सब्रच त्याला रोखून धरतो.

'म्हणून संयम बाळगा. ईश्वरी वचन खरे आहे. (अशा लोकांची) ज्यांची कुठलीच शाश्वती देता येत नाही, अशांमुळे असंयम (व घाईगर्दी) करू नका.' (कुरआन, ३०:६०)

कधी कधी सब्र दुसरे रूप धारण करतो. हे रूप असते खंबीरपणाचे, सहनशीलतेचे. ज्यायोगे इतरांनी दिलेल्या त्रासाला, छळाला तोंड देता येते. ह्या पद्धतीचा अवलंब ईश्वराच्या प्रत्येक पैगंबरांने केला. विरोधकांना ते पुढीलप्रमाणे म्हणत असत.

'आम्ही तुमचा छळ शांतपणे सहन करू. सर्व श्रद्धाळूंनी (ईमानधारकांनी) ईश्वरावर विश्वास ठेवून असावे.' (कुरआन, १४:१२)

ईश्वराच्या प्रेषितांचा होणारा छळ हा खरे तर त्यांच्या प्रेषितकार्याचा एक भाग असतो. ज्या पक्षाला ते ईश्वरी वाणीचा उपदेश करतात ती कुठल्या ना कुठल्या प्रकारे प्रतिक्रिया व्यक्त करणारच आणि कधी ना कधी कुठल्याही प्रकारची तडजोड न स्वीकारणारी व हिंसक बनणारच. नव्हे, हे गृहीतच धरायला हवे. प्रेषित जर त्याच्या होणाऱ्या छळाबद्दल शोक व्यक्त करू लागला तर कुठेतरी लोकांना खऱ्या श्रद्धेकडे वळविण्याच्या त्याच्या प्रयत्नांच्या गांभीर्याविषयीच शंका उत्पन्न होईल. लोकांची प्रतिक्रिया काय होते, ह्यावर ईश्वरी मार्गाचा उपदेश करणारा स्वतःवर कुठल्याही प्रकारचा परिणाम होऊ देत नसतो. ईश्वराला संतोष होण्यासाठी, त्याला ज्या अडचणींचा सामना करावा लागतो त्यातर त्याच्या प्रामाणिक गांभीर्याविषयाच्या परीक्षा होत. स्वतःच्या कृतींचे गांभीर्य पटवून दिल्याशिवाय एखादा स्वतःच्या भाषणाचा दुसऱ्यांवर परिणाम व्हावा अशी अपेक्षाच बाळगू शकत नाही.

शत्रूच्या हल्ल्यांना सर्वसाधारण मनुष्य उत्तर हे प्रतिहल्ल्याच्या तयारीने देतो. तो ह्या गोष्टीची खात्री करून घेतो की त्याच्यावर केला जाणारा हल्ला त्याच्या विरोधकावरच कसा उलटेल. सब्र जर अंगी असेल तर मात्र शत्रूने उचललेल्या कुठल्याही पावलाला शांतपणे तोंड दिले जाते. उदाहरणार्थ: एखाद्या देशात जर मुस्लिमांचे गैरमुस्लिम देशबांधव जर त्यांच्यावर आर्थिक अन्याय करीत असेल तर ह्याचे सब्रने द्यायचे उत्तर म्हणजे समान हक्कासाठी लढा देणे हे नव्हे! तर स्वतःच जास्तीचे प्रयत्न करून दुसऱ्यांवर अधिकार प्राप्त करून घेणे. पूर्वग्रहाचा पात्रतेवर त्याचवेळी परिणाम होतो, ज्यावेळी समान दर्जाचे लोक समान ध्येयासाठी स्पर्धा करीत असतात. ज्यावेळी एक स्पर्धक दुसऱ्याहून स्पष्टरित्या सामर्थ्यवान असतो त्यावेळी, त्याची जागा पूर्वग्रह सुद्धा हिरावून घेऊ शकत नाही.

ज्यावेळी मक्केतल्या मुस्लिमांना आर्थिकदृष्ट्या अलग करण्यात आले त्यावेळी स्वतःची स्थिती राखण्यासाठी त्यापैकी काही जण ॲबिसिनीयाला आश्रयार्थ गेले. मक्केतल्या लोकांनी पैगंबरांच्या अनुयायी मुसलमानांना व्यापार करणे अशक्य करून सोडले होते. मुस्लिमांनी अशा परिस्थितीत काय केले? तर ते बाजूच्या देशात स्थलांतरित झाले आणि स्वतःची मिळकत त्या देशात कमावू लागले. मुस्लिम त्यांच्या व्यवहारांमध्ये इतके कामसू व प्रामाणिक होते की ते बघून, ॲबिसिनियाच्या राजाने तर आदेशच काढला की, जो मुसलमानाशी वाईट वागेल त्याला त्या मुसलमानाला आठ दिऱ्हाम दंड म्हणून द्यावे लागतील. ईश्वराने

मुसलमानांना परत एकदा त्यांची शक्ती वाढावी म्हणून केलेल्या मदतीचा हा फक्त एक छोटासा भाग होता. दुसऱ्यांनी छळ केल्यावर देखील त्यांनी जो संयम दाखविला त्याचा हा परिपाक होता.

सब्र, हे वरवर पाहता नकारात्मक तऱ्हेचे मूल्य वाटण्याची शक्यता आहे, मात्र त्याचे अंतिम निष्कर्ष पाहता ते सकारात्मकच ठरते. एकदा एखाद्याला सब्रचे महत्त्व ध्यानी आले की, विरोध करणाऱ्याला ताबडतोब विरोधी उत्तर द्यायचे, अशी व्यक्ती कायम टाळते. उलट अशावेळी हा माणूस एखाद्या दूरच्या भविष्यात पाहून आपल्या कृतींची व होणाऱ्या घटनांची अशी काही मांडणी करतो, की अंतिम यश त्याच्याच पदरात पडते. एखादा आपल्याशी वाईट वागला की, भावना आपल्याला चेतावणी देतात. रागाने आपण आभाळात उडायला लागतो. जर आपण रागाने ताबडतोब कृती करायला लागलो, तर काय कृती करायला हवी ह्याचे तार्किक भान आपल्याला शिल्लक राहत नाही. उलट भावनांच्या भरात आपण वाटेल ती कृती करून जाण्याची शक्यता असते. सब्रने जर काम केले तर मात्र उलट आपण शांतपणे व निरपेक्ष विचाराने उपलब्ध असलेल्या सर्व शक्यतांचा विचार करतो आणि मग कुठल्या परिस्थितीला आपल्याला हाताळायची आहे, त्याचे वास्तव भान आपणास येते. असे झाल्यावर तर्कशुद्ध व ठोस अशी भूमिका आपण निभावू शकतो. असंयम, घाईगर्दीने एखादी कृती घडवून आणतो. उलट संयम, आपल्याला थांबायला शिकवितो, ज्या योगे निसर्गाचे कायदेकानून विरोधकाविरुद्ध आपले काम सुरू करतात.

ज्यावेळी शत्रूविरुद्ध एखादी कृती असंयमाने केली जाते, त्यावेळी अशी कृती अतिशय वरवरच्या हेतूंनी सिद्ध व भावनांनी ओथंबलेली असते. अशा माणसाच्या अशा कृतींमध्ये अनेक चुका व त्रुटी राहून जातात. ज्यामुळे तो स्वतःच नंतर दुबळा होण्याची शक्यता जास्त असते. ज्यावेळी एखादा संयम पाळतो त्यावेळी मात्र त्याला दैवी शक्तीचा, बुद्धीचा लाभ होतो. माणसाची बुद्धी ही एका असामान्य शक्तीचा स्त्रोत होय. तत्कालीन अडचणी व अडथळे बाजूला सारून, दूरच्या भविष्यात पाहण्याची शक्ती तिला असते आणि त्यानुसार ती भविष्यकालीन कृतींची मांडणी करते. बुद्धीच नकारात्मक भावनांपासून आपल्याला बाजूला ठेवते व ठाम पायावर विचार करायला लावते. ह्यामुळे परिस्थितीच्या मुळापर्यंत पोहोचता येते. अशावेळीच आपल्याला सर्व गुपितांचा शोध लागतो, ज्यामुळे आपल्याला शत्रू स्पर्धकावर सर्व बाजूंनी, सर्व कोणांतून आपल्याला ताबा मिळवता येतो. शत्रु एखाद्या शिकाऱ्याच्या जाळ्यामध्ये अलगद पडलेल्या सावजासारखा बनतो. त्याची पुढची हालचाल, जाळ्याची पकड अजून अजून घट्ट करते, ज्यामुळे शिकाऱ्याचे काम सुकर होते!

मक्केहून मदिनेला स्थलांतर करणे, हे पैगंबरांच्या संयमाचेच एक उदाहरण होय. ज्यावेळी कुरैशांनी त्यांना ठार मारण्याचा निर्णय घेतला, त्यावेळी पैगंबरांसमोर दोनच पर्याय शिल्लक होते. एकतर स्वसंरक्षणासाठी तलवार हातात घेणे किंवा मक्केतून सुरक्षित स्थलांतर करून निघून जाणे. पैगंबरांनी अर्थातच दुसरा मार्ग निवडला. त्यांनी अतिशय शांतपणे परिस्थितीचा विचार केला व मदिनेला निघून जाण्याचा निर्णय घेतला. जिथे त्यांना त्यांचे काम

करता येणार होते; फक्त जागा वेगळी असणार होती. हजरत आयेशा सांगतात की, पैगंबर ह्या स्थलांतराआधी दररोज त्यांच्या घरी येत असत. तिथे त्यांची, आयेशांचे वडील अबूबकर ह्यांच्याशी सल्लामसलत चाले. ह्या निघून जाण्याची तयारी अत्यंत गुप्तपणाने सुमारे सहा महिने आधी चालली होती. सर्व गोष्टी ठरल्याबरहूकूम घडल्या आणि एका अत्यंत विश्वासू मार्गदर्शकाबरोबर पैगंबर मदिनेला जाण्यासाठी निघाले. एखाद्या आधुनिक जमान्यातल्या अतिउत्साही मुस्लिम राजकीय नेत्यानुसार हे स्थलांतर म्हणजे चक्क पलायन झाले. हा नेता अशा परिस्थितीत मृत्यू पत्करण्याचे समर्थन करेल. पुढे काय घडणार आहे ह्याचा विचार न करता तो हुतात्मा होणे पसंत करेल. इस्लामी इतिहासात मात्र ह्या स्थलांतराने घडवून आणलेले परिणाम पाहता कुणालाही हे सहज समजेल की, हे स्थलांतर तर कठिण काळात घेतलेला एक जलाश्रय (सामर्थ्याश्रय) होता.

संयम हा लगोलगची कृती टाळतो आणि गोष्टींना त्यांचा नैसर्गिक क्रम धारण करायला लावतो. मानवी स्वभाव ही न बदलणारी सत्यता आहे, जी माणसाच्या आयुष्यक्रमावर फार मोठा प्रभाव पाडून परिणाम करते. जो शिव्यागाळीला शांतपणे तोंड देतो, कितीही उत्तेजित केले तरी जो वाईट उत्तरासाठी उत्तेजित होत नाही अशा माणसाबद्दल सर्वांनाच काळजामध्ये एक प्रकारची आपुलकी असते. मानवी सद्‌सद्‌विवेकबुद्धी, छळ करणाऱ्यापेक्षा छळ होणाऱ्याच्या बाजूने असते. माणसांच्या जगामध्ये ज्यांना नाकारण्यात येते त्यांना निसर्गाच्या जगामध्ये फार मोठ्या संधी उपलब्ध होतात. मग ज्यावेळी ते छळाला खंबीरपणे तोंड देतात त्यावेळी उलट त्यांचाच सत्यपक्ष सिद्ध होतो. प्रेषित कार्याच्या सातव्या वर्षी पैगंबर व त्यांच्या कुटुंबियांवर घालण्यात आलेला बहिष्कार हे असेच एक उदाहरण होय. ह्या बहिष्कारानंतर अबू लहबचा अपवाद वगळता सर्व बनो हाशिम टोळीने एका डोंगरी घळीमध्ये जिचे नाव शिब अबी तालीब होते, तिच्यामध्ये तळ टाकला. ज्या रीतीने ह्या सर्व लोकांनी त्यांच्या होणाऱ्या क्रूर छळाला तोंड दिले, त्यामुळे त्याचा परिणाम दुसऱ्यांच्या विवेकबुद्धीवर होणारच होता आणि तसा तो झालाच! फक्त तीनच वर्षांत बख्तरी, हिशाम इब्ने अम्र, ज़ुबैर इब्ने उमय्या, ज़मआ इब्नुल अस्वद आणि मुतआम इब्ने अदी ह्यांसारखे लोक, जे शत्रुपक्षात होते, ते उघड उघडरीत्या ज्या आदेशान्वये व आपापसातल्या करारानुसार बनू हाशिमना बहिष्कृत करण्यात आले होते त्याच्या अधिकाराला आव्हान देऊ लागले. हा करार मोडला व बनो हाशिमना ज्या भयंकर ठिकाणी आसरा घ्यायला लागला होता ती सर्व परिस्थिती संपुष्टात आली.

संयमाबाबतची सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे, तो एखाद्याला दैवी साहाय्याची प्राप्ती होण्यासाठी पात्र करतो. एका बहुमूल्य साध्याकरिता, संयमाने व दृढनिश्चयाने कार्य करीत राहणे म्हणजेच स्वतःच्या कामांची सर्व जबाबदारी विश्वनियंत्याच्या हातात सोपविणे. जो न्याय्य साध्याकरिता ईश्वरावर श्रद्धा ठेवतो, त्याला त्याचे साध्य प्राप्त होत नाही, हे मान्य करणे फार अवघड आहे.

निरनिराळ्या तऱ्हांनी हे ईश्वरी साहाय्य प्रकट होत असते. मानवी मन ना त्याला समजू

शकते ना त्याचा ठाव घेऊ शकते. हा ईश्वरी साहाय्याच्या काही रूपांचा मात्र कुरआनात उल्लेख केला गेला आहे. उदाहरणार्थ: मुस्लिम ज्यावेळी गैरमुस्लिमांशी युद्धात लढतात, त्यावेळी त्यांच्याकडे कमी असलेल्या साधनांची उणीव, हे दैवी साहाय्य भरून काढते. शांती आणि आत्मविश्वास ह्यांनी ईमानधारकांची (मुसलमानांची) मने ओतप्रोत भरून जातात आणि ह्या उलट विरोधक मात्र भीतीने दुबळे बनतात.

'हे ईमानधारकांनो, स्मरण करा ईश्वराच्या औदार्याचे. जे त्याने (नुकतेच) तुम्हाला दाखविले आहे. जेव्हा फौजा तुमच्यावर चालून आल्या त्यावेळी आम्ही (ईश्वराने) एक भयंकर वादळ त्यांच्यावर सोडले आणि अशा फौजा रवाना केल्या ज्या तुम्हाला दिसत नव्हत्या. अल्लाह ते सर्व पाहत होता जे तुम्ही लोक (ईमानधारक) त्यावेळी करीत होता.' (कुरआन, ३३:९)

ही आयात खंदकाच्या युद्धाशी (इ.स. ६२७) संबंधित आहे. ह्यावेळी ईश्वराने दोन गोष्टी पाठविल्या. वादळ आणि देवदूतांची फौजा. ह्यांमुळे मुसलमानांना खूप मदत झाली. वादळ ही काही फार असामान्य बाब नव्हे. वारा वाहत नाही अशी पृथ्वीतलावर एकही जागा सापडणार नाही. पण एका विशेष वेळी व विशिष्ट जागी ह्याच वाऱ्याला, मुसलमानांच्या मदतीसाठी वादळ बनविले गेले. ह्याचा अर्थ एवढाच की, ईश्वराने मदत जर करायची ठरविली तर इतर वेळी सामान्य वाटणाऱ्या भौतिक घटनांची तीव्रता वाढवून यश निश्चित केले जाते.

देवदूतांच्या फौजेविषयी सांगायचे तर ते प्रत्यक्ष आले व मुस्लिमांच्या बाजूने त्यांनी तलवारी चालविल्या असे नव्हे. त्यांनी प्रत्यक्ष लष्करी मदतीपेक्षा मानसिक मदत केली. इतरही अनेकवेळी त्यांनी असेच काम केले होते, जे त्यांनी ह्याही वेळी केले. ते म्हणजे मुसलमानांना धीर व उत्साह देणे व नास्तिक शत्रूच्या मनात भय पैदा करणे (कुरआन, ८:१२). शत्रू हा एक छोटासा फौजेचा पट्टा आहे, तर मुस्लिमांची फौज ही महासेना आहे असे ह्या देवदूतांमुळे शत्रूला भासले.
(कुरआन, ८:४४)

दुसरे खलिफा हजरत उमर, ह्यांच्या कारकीर्दीत एकदा (इ.स. ६३४–६४४) मुस्लिम फौजा खादसिय्या येथे थांबल्या होत्या. ही जागा इराणच्या सरहद्दीवरती होती आणि मुस्लिम फौजेचे नेतृत्व साद इब्ने अबी वक्कास ह्यांच्याकडे होते. त्यांना अपेक्षेपेक्षा जास्तच काळ तिथे राहायला लागले व जवळची रसद तर संपत आली होती. सादनी मग काही लोकांना गुरांच्या व जनावरांच्या शोधात पाठविले, जी जनावरे ते खाऊ शकले असते. त्यांना एक इराणी माणूस भेटला. त्याला त्यांनी विचारले की, जवळ काही बकरे अथवा गुरे मिळतील का? इराणी स्वतः गुराखी होता; पण त्याने जवळ काही जनावरे असतील हे आपल्याला माहीत नसल्याचे सांगितले. त्याने स्वतःचा गुरांचा कळप, मुसलमान फौजा आल्याचे कळल्यावर जवळच्या एका घनदाट जंगलात लपवून ठेवला होता. ह्याचवेळी एक बैल ओरडला, 'गुराखी खोटे बोलतो आहे. आम्ही ह्या जवळच्याच झुडुपांमध्ये आहोत.' हे ऐकून मुस्लिम तिकडे शिरले, त्यांनी काही जनावरे पकडली आणि सादकडे नेली. उरलेल्या मुस्लिम फौजाने ही कहाणी ऐकल्यावर ईश्वर आपल्या बाजूला आहे, असा ह्या गोष्टीचा अर्थ लावण्यात आला.

इब्नुल तक्तकी ह्या इतिहासकाराने लिहिल्याप्रमाणे, बैल, 'आम्ही इथे आहोत,' असे अरेबिकमध्ये (!) बोलला असा ह्याचा अर्थ आपण लावता कामा नये. गायी व बैल नेहमी जसे हंबरतात तसा एक बैल हंबरला, ज्यामुळे गुरे झुडुपांमध्ये कुठल्या बाजूला आहेत ते मुसलमानांना समजले, असाच ह्याचा अर्थ आपण लावायला हवा. (अल् फ़क्री पृ. ७९)

**ईश्वरावरती श्रद्धा ठेवणे**

कुरआन पुढील शब्दात इस्लामी पद्धतीचा सारांश सांगते; 'जर त्यांना (दुसऱ्यांना) शांती हवी असली तर तुम्हीसुद्धा शांतीचा मार्ग पत्करा. ह्याबरोबर ईश्वरावर विश्वास ठेवा. नक्कीच तो ऐकतो व सर्व काही जाणतो. जर त्यांनी तुम्हाला फसवायचे ठरवले तर ईश्वर तुमच्याकरिता पुरेसा आहे.' (कुरआन, ८:६१-६२)

ह्याचा अर्थ एवढाच की, खरी इस्लामी पद्धत ही साध्ये शांतीच्या मार्गाने साध्य करण्याची आहे. अगदी आपला विरोधक आपल्याला फसण्याची शक्यता आहे अशी भीती असतानादेखील! मुस्लिमांनी ईश्वरावरती श्रद्धा ठेवून अशी भीती असताना देखील शांतीकरता तयार असायला हवे.

आपण आपले प्रयत्न अशाच क्षेत्रात केंद्रित करायला हवेत की, दुसऱ्यांशी झगडा होऊ न देता, आपल्याला प्रगती करायची संधी मिळायला हवी. ज्या क्षेत्रात आपोआप संधी उपलब्ध होत नाहीत अशा एखाद्या क्षेत्रात संधीसाठी नैसर्गिक बळाची वाट पाहायला हवी. आपण ज्या क्षेत्रात परिणामकारक काम करू शकतो हे माहीत असते, त्या क्षेत्रात जर आपण काम केंद्रित केले, तर ईश्वर दुसऱ्या क्षेत्रात आपल्याला मदत करतो. जिथे गोष्टींवर नियंत्रण नसल्याने आपण काही करू शकत नाही. आपण आपले क्षेत्र सोडून, आपल्याला संधी नाही अशा एखाद्या क्षेत्रात काम करू लागलो तर त्याचा अर्थ एवढाच की, आपण आपले क्षेत्र सोडून ईश्वराच्या क्षेत्रात अतिक्रमण केले आहे. ईश्वराच्या कामात ढवळाढवळ करायचा प्रयत्न करणे म्हणजे त्याची गैरमर्जी व नाखुशी ओढवून घेणे. असे झाले तर आपल्याला त्याचे अत्यंत आवश्यक असणारे साहाय्य मिळणार नाही.

# १० मक्केमधले पैगंबर

**पै**गंबरांच्या आयुष्यात दोन महत्त्वाचे व स्वतंत्र काळ आहेत. मक्केतला व मदिनेतला. ही नावे अर्थातच मक्का व मदिना ह्या दोन गावांवरून देण्यात आलेली आहेत. स्थलनामांना त्यांच्या शब्दार्थापेक्षाही मोठा ऐतिहासिक अर्थ लाभतो. मक्का व मदिना ही नावेसुद्धा अपवाद नव्हते. सुरुवातीला जरी फक्त ही स्थलनामे असली तरी आता मात्र त्यांना इस्लामी नाण्याच्या दोन बाजूंचा अर्थ लाभला आहे. दोन अशा प्रक्रिया, ज्यांद्वारे इस्लाम परत एकदा ह्या पृथ्वीतलावर आला. लोकांना इस्लामची हाक देणे म्हणजेच 'दावा' (मराठीतले आमंत्रण), हे मक्का म्हणताच अभिप्रेत असते, तर दुसऱ्या बाजूला मदिना हे क्रांतीचे प्रतिक समजले जाते. दुसरा एखादा असेही म्हणू शकेल की, मक्केमध्ये इस्लामची 'दावाशक्ती' कार्यान्वित झाली; तर मदिनेत तिला अत्युच्च स्थान प्राप्त झाले. कुरआनमधील, पुढे दिलेले आयातीचे उद्धृत मक्का आणि मदिनेतल्या इस्लामविषयीची कहाणी यथायोग्य सांगते.

'मोहम्मद हे ईश्वराचे पैगंबर आहेत. त्यांचे अनुयायी नास्तिकांशी (जरी) कठोर आहेत (तरी) त्यांचे एकमेकांशी वागणे कृतज्ञबुद्धीचे आहे. ईश्वराची मर्जी व कृपा होण्यासाठी तुम्ही त्यांना (ईश्वरापुढे) वाकून गुडघे व डोके टेकताना (नमाजची आसनस्थिती) पाहात आहात. (सतत) डोके टेकल्याचे (सज्दा केल्याचे) दृश्य परिणाम त्यांच्या चेहऱ्यावर मौजूद आहेत. (कपाळावर चट्टा पडला आहे) ज्यामुळे त्यांना वेगळे ओळखता येते. असाच त्यांचा उल्लेख तौरात (ज्यूंचा धर्मग्रंथ, जुना करार) मध्ये केला आहे, इंजीलमध्ये तर (ख्रिस्त्यांचा धर्मग्रंथ, बायबलचा नवा करार, गॉस्पेल्स) त्यांचा उल्लेख पुढीलप्रमाणे आहे: जणू एक शेती आहे जिने अंकुर प्रथम उगवले, मग त्यांना बळकटी दिली. नंतर ते गाभुळले मग आपल्या कांडावर उभे राहिले (झाडे तयार झाली), ज्यायोगे शेती करणाऱ्याला आनंद होतो तर नास्तिकांचा ह्या शेतीच्या बहरण्याने जळफळाट होत राहतो. जनसमूहातल्या ज्या लोकांनी आस्तिक्य स्वीकारले आहे आणि ज्यांनी सत्कृत्ये केली आहेत त्यांना अल्लाहने (ईश्वराने) क्षमा व महान मोबदल्याचे वचन दिले (कुरआन ४८:२९).

तौरातचे ह्या आयातीमधले संदर्भ हे सहाबांच्या (पैगंबरांचे सहकारी) प्रत्येकाच्या गुणवर्णनासाठी केले गेले आहेत. इंजीलमधले उल्लेख हे ज्यावेळी ते एकत्र आले त्यावेळच्या गटाच्या गुणसमुच्चयासाठी वापरले आहेत. त्यांचे आपापले गुण हे मक्केमध्ये वाढले तर एक समाज म्हणून असलेले त्यांचे गुण मदिनेत वाढले.

सर्वसाधारणपणे पैगंबरांची (सर्व) चरित्रे ही त्यांचा विषय अशा प्रकारे हाताळतात की, कुणालाही वाटावे की, पैगंबरांना काही असामान्य जादुभऱ्या शक्ती मिळाल्या होत्या, ज्याद्वारे त्यांनी अतिशय गूढरितीने सर्व अरेबिया आपल्या पंखांखाली आणला. ही पुस्तके परीकथांप्रमाणे (बहारीची!) असतात. ज्या घटनांमध्ये कुठल्याही प्रकारची एवढीशीही चमत्कृती दिसणार नाही अशा घटनांची कल्पनारम्य व चमतत्कृतीपूर्ण वर्णन रंगविलेली असतात. उदाहरणादाखल आपण

सुहैब इब्ने सनानच्या मक्केहून मदिनेच्या स्थलांतराची गोष्ट घेऊयात. काही कुरैश तरुणांनी त्यांचा रस्ता अडविल्यावर ते त्यांना समजावू लागले, 'जर माझी सर्व संपत्ती मी तुम्हाला देऊ केली, तर तुम्ही मला जाऊ द्याल?' अर्थातच (!) तरुणांनी संमती दिली. सुहैब ह्यांच्याकडे काही तोळे चांदी होती. ती सर्व त्यांनी त्यांना देऊन टाकली व मदिनेला पोहोचले. पैगंबरांनी त्यांना मदिनेत पाहिल्यावर त्यांना सांगितले की, स्वतःची संपत्ती कुरैशांना देऊन टाकण्याचा व त्याबदल्यात मदिनेला पोहोचण्याचा त्यांचा व्यवहार खूपच नफेशीर झाला. परंपरेनुसार, हे ऐकल्यावर सुहैब आश्चर्याने थक्कच झाले, कारण ते मदिनेला पोहोचेपर्यंत दुसरे कुणीच ही बातमी द्यायला मदिनेला पोहोचले नव्हते. 'नक्कीच तुम्हाला जिब्रीलने (गॅब्रिएल, ईश्वराचा विशेष दूत) सारे काही सांगितले असणार,' सुहैब पैगंबरांना म्हणाले.

हाच प्रसंग मर्दुइया व इब्ने साद ह्यांनी सुद्धा नोंदविला आहे. त्यांच्यानुसार सुहैबनी त्यांची कहाणी पुढील शब्दात सांगितली.

मी कसाबसा मदिनेत येऊन पोहोचलो. पैगंबरांना जेव्हा मी माझी सारी चीजवस्तू कुरैशांना देऊन टाकल्याचे समजले, त्यावेळी ते म्हणाले, 'सुहैबचाच नफा झाला! (नक्की) सुहैबचाच नफा झाला.'

पैगंबरांनी स्वतः अत्यंत साधे आयुष्य व्यतीत केले. ह्याचा अर्थ दुसऱ्यांना त्यांचा कित्ता गिरविणे साधे व सोपे असायला हवे. ते आपणा सर्वांसारखेच माणूस होते; पण त्यांचे जीवन हे आपल्यासाठी सर्वात आदर्श उदाहरण होय. बुखारी सांगतात की, आपल्यापैकी कुणालाही जशी रस्त्यात ठेच लागते, अगदी तसेच पैगंबरसुद्धा ठेचकाळत असत! सर्व बाह्यांगे बघता, पैगंबर हे अगदी आपल्यातुपल्या माणसांसारखेच होते आणि म्हणूनच कदाचित त्यांच्या समाजाने त्यांना ईश्वरी वाणीचा उद्गाता (द्रष्टा) म्हणून त्यांच्यावर विश्वास ठेवायला नकार दिला.

'तुम्ही गावात आमच्यासारखाच बाजारहाट व इतर व्यवहार करत असता. तुम्ही आम्ही सर्वांसारखेच (आमच्या परिचयाचे, साधे) आयुष्य जगता.' (अल् बिदायाह् वा अल् निहायाह्)

पैगंबरांच्या जीवनाची महत्ता हीच की ते एक साधेसुधे मानवी आयुष्य आहे. ओढून ताणून सांगितलेली कहाणी व ज्यांचा अनुवाद करता येणार नाही अशा चमत्कृतीपूर्ण कृती ह्यांनी ते भरलेले नाही. पैगंबर हे ईश्वराचे अतिशय नम्र व पूर्णतया मानवी सेवक होते आणि ईश्वराने आपला संदेश सर्वांपर्यंत पोहोचविण्यासाठी त्यांना निवडलेले असल्याने प्रत्येक अडचणीच्या व आणीबाणीच्या प्रसंगी ईश्वराकडून त्यांना मदत होत असे. ह्या एवढ्याच अर्थाने त्यांचे यश हे चमत्कृतीपूर्ण होते. अर्थातच पैगंबरांना स्वतःला कुठल्याही तऱ्हेने चमत्कार करून दाखविण्याच्या शक्ती देण्यात आलेल्या नव्हत्या. कुरआनचा अभ्यास केला असता त्यांच्या आयुष्याचा हा मानवी पैलूच पुढ्यात उभा राहतो.

### पैगंबरांच्या सार्वजनिक कार्याची सुरुवात

वयाच्या चाळीसाव्या वर्षी पैगंबरांना जेव्हा पहिला साक्षात्कार (कुरआनचे पहिले

दर्शन) झाला त्यावेळी अशा परिस्थितीतल्या कुठल्याही माणसाची जी प्रतिक्रिया होईल, तशीच प्रतिक्रिया त्यांचीसुद्धा झाली. हिराच्या गुहेमध्ये ते त्यावेळी प्रार्थना करीत होते. ते भीतीने गर्भगळित अशा अवस्थेत घरी येऊन पोहोचले. त्यावेळी त्यांच्या पत्नी खदिजा त्यांची वाट पाहत होत्या. त्रयस्थ व्यक्ती म्हणून त्या, त्या परिस्थितीला निरपेक्षपणे पाहून न्याय करू शकत होत्या. पैगंबरांचा अनुभव केवळ एक वाईट स्वप्न म्हणून नाकारणे फार अवघड होते. म्हणुनच त्यांनी असा निष्कर्ष काढला की, हा अनुभव म्हणजे नक्कीच ईश्वराने 'त्यांना निवडल्याची' खूण असावी. त्या म्हणाल्या, 'ईश्वराला तुमचा अपमान करायचा होता किंवा घाबरवून सोडायचे होते, असे असूच शकत नाही. कारण तुम्ही तुमच्या नातेवाईकांशी नेहमीच दयाबुद्धीने वागता, गरजूंना व दुबळ्यांना मदतीचा हात पुढे करता. ज्यांचा कामधंदा व व्यापार बसला आहे अशांना स्वतःच्या पायावर उभे राहण्यासाठी मदत करता. तुम्ही आतिथ्यशील आहात व अतिथी–सन्मान करता. लोकांच्या, अडचणीच्या प्रसंगी तुमचेच तर त्यांना साहाय्य होते.' (बुखारी आणि मुस्लिम)

पारंपरिक श्रद्धा व रूढी ह्यांना चिकटलेल्या समाजामध्ये एका सर्वस्वी नवीन संदेशाचा प्रसार ज्या माणसाला करायचा असतो; तो माणूस जसा वागेल तसेच पैगंबर वागले. अत्यंत काळजीपूर्वक, नैसर्गिक घटनाक्रम पाळून त्यांनी प्रगती केली. सुरुवातीला त्यांना गुप्तपणे काम करायला लागले. पैगंबरांच्या प्रेषितकार्याच्या सुरुवातीला घडलेल्या, एका घटनेचे वर्णन इतिहासकार इब्ने कसिर पुढीलप्रमाणे करतात:

'पैगंबर आणि खदिजा हे नमाज़ पढत असताना एक दिवस, अली, अबू–तालिब ह्यांचा मुलगा व पैगंबरांचा चुलतभाऊ तिथे आले. दोघेजण काय करता आहात असे त्याने विचारले. पैगंबरांनी उत्तर दिले की, हा ईश्वराचा धर्म आहे, जो ईश्वराने स्वतः निवडून ठरविला आहे. ह्याच मार्गावरती लोकांनी चालावे म्हणून त्यांना आवाहन करण्यासाठी ईश्वराने त्याच्या प्रेषितांना पृथ्वीवर पाठविले. 'ईश्वराचा कुणीही भागीदार नाही, फक्त एका ईश्वराचीच पूजा करायला हवी.' लात आणि उझ्झा ह्या मूर्ती (मुर्तिची पूजा, देवता पूजा) सोडून द्यायला हव्यात. 'मी ह्यापूर्वी ह्यातले काहीच ऐकलेले नाही,' अली म्हणाले, 'बाबांशी (अबू–तालिब) बोलल्याशिवाय ह्याबाबत मला काहीच निर्णय घेता येणार नाही.' आपल्या गुपिताला सार्वजनिक स्वरूप द्यायची वेळ येण्याआधीच ते कुणाला माहीत व्हावे, असे पैगंबरांना वाटत नव्हते. ते म्हणाले, 'अली, जर तू मुस्लिम बनायला तयार नसलास तर कृपा करून ह्या सर्व गोष्टी तुझ्याकडेच ठेव. इकडच्या कानाच्या तिकडच्या कानाला कळू देऊ नको.' अलींनी एक रात्र वाट बघितली; परंतु ईश्वरानेच त्यांना मुस्लिम व्हायला प्रोत्साहित केले. ते भल्या सकाळीच परत पैगंबराकडे गेले. 'अहो मोहम्मद, तुम्ही मला काल जे सांगत होतात ते काय आहे?' त्यांनी विचारले. 'एक ईश्वर सोडून दुसऱ्या कुणीही उपासनायोग्य नाही हे कबूल करायचे, तशी साक्ष द्यायची. तो एकमात्र आहे. त्याचा कुणीही भागीदार नाही. लात आणि उझ्झांचा त्याग करायचा आणि ते सर्व, ज्यांना ईश्वराबरोबरीने स्थान दिले जाते, त्यांचाही त्याग करायचा.' अलींनी हे सर्व केले व ते मुस्लिम बनले. नंतर ते अबू तालिब ह्यांच्या भीतीने पैगंबरांकडे येऊन त्यांना गुप्तपणे भेटायचे. अलींनी

त्यांचा इस्लाम, ते मुसलमान बनले आहेत, ही गोष्ट गुप्त ठेवली आणि दुसऱ्या कुणाशीही, ते ह्या संदर्भात अवाक्षरही बोलले नाहीत.' (अल् बिदायाह् वा अल् निहायाह्, खंड ३ पृ.२४)

अगदी नंतर ज्यावेळी, औस आणि खज़रज ह्या टोळीतले, अगदी पहिल्यांदा बनलेले मुस्लिम ज्यावेळी मक्केहून मदिनेला परत आले त्यावेळी त्यांनी हेच धोरण अवलंबिले. 'त्यांच्या टोळीतल्या लोकांना ते गुप्तरितीने बोलावून इस्लाम स्वीकारण्यासाठी निमंत्रण देत,' अशी नोंद इतिहासकार तबरानी ह्यांनी करून ठेवली आहे.

स्वतःचे शक्तिस्त्रोत बळकट झाले आहेत अशी पूर्ण खात्री झाल्याशिवाय कुठल्याही कामाची सुरुवात न करण्याची काळजी पैगंबर त्यांच्या सर्व प्रेषित कार्यकाळाच्या दरम्यान घेत असत. पैगंबरांच्या पत्नी व अबू बकर ह्यांच्या कन्या आयेशा सांगतात की, पैगंबरांभोवती अडतीस मुस्लिम गोळा झाल्यावर, अबूबकर ह्यांनी आता इस्लामचा उघड प्रचार करावा असे आवाहन पैगंबरांना केले. अबूबकर ह्यांचे असे मत होते की, आता मुसलमानांनी उघडपणे समाजात वावरून इस्लामचा प्रसार करावा. पैगंबर मात्र त्यांना म्हणाले, 'नाही, अबू बकर, आपण फारच थोडे आहोत.' अशीच गोष्ट प्रेषितकार्याच्या सहाव्या वर्षी हजरत उमर ह्यांनी इस्लाम स्वीकारल्यावर घडली. त्यांनी पैगंबरांकडे तक्रार युक्त मागणी केली, 'आपण जर बरोबर आहोत तर आपण आपली श्रद्धा का बरे गुप्त ठेवायची? आणि दुसरे मात्र चुकीचे असताना त्यांच्या श्रद्धेचा उघड उघड प्रचार करीत आहेत.' पैगंबरांनी कितीतरी वर्षे आधी अबू बकर ह्यांनाच दिलेले उत्तर दिले, 'आपण फारच थोडे आहोत, उमर.' जोपर्यंत पैगंबर मक्क्यात होते, तोपर्यंत त्यांनी त्यांचा काळजीचा पवित्रा कायम राखला. इस्लामी चळवळीची जुळवाजुळव व केंद्रीकरण मदिनेला स्थलांतर झाल्यावर घडले व पैगंबरांनी किल्लीच बदलली. ज्यावेळी कुरैशांनी मदिनेवरती हल्ला केला, त्यावेळी तर सशस्त्र प्रतिकार करण्याचीसुद्धा परवानगी देण्यात आली. मुस्लिम आणि त्यांच्या विरोधकांमध्ये खेळले गेलेले पहिले युद्ध म्हणजे बदरचे युद्ध होय. युद्धास सुरुवात होण्यापूर्वी पैगंबर म्हणाले की, 'जो कोणी आज यशस्वी होईल, तोच पुढे येणाऱ्या काळातही यशस्वी होईल.' ह्या बोलण्यामध्ये, पुढच्या ज्या काळाचा उल्लेख आहे तो काळ म्हणजे इस्लामच्या भविष्याला नवा आकार देण्याचा, सकारात्मक सुरुवात करण्याचा होय. जर त्यांच्या कृतींचा असा निष्कर्ष निघणार नसेल तर त्यांनी संयम बाळगणेच इष्ट!

पैगंबरांच्या निरनिराळ्या लेखकांनी लिहिलेल्या चरित्रांमध्ये एक गोष्ट सुस्पष्ट आहे. इस्लामच्या सार्वजनिक प्रसाराचे कार्य पैगंबरांच्या अंगावरती पडल्यावर त्या कामाची महत्ता पूर्ण तऱ्हेने जाणवल्यावर, त्यांच्या हे लक्षात आले की, ह्या कामासाठी त्यांच्या संपूर्ण व एकचित्त प्रयत्नांची गरज आहे. त्यांची अशी आशा होती की, त्यांच्या कुटुंबाने त्यांची आर्थिक बाजू सांभाळावी, ज्यामुळे त्यांना त्यांच्या प्रसारकार्यावर लक्ष केंद्रित करता येईल. म्हणून त्यांनी अब्दुल मुत्तालिब ह्यांच्या सर्व कुटुंबाला एकत्र बोलावून घेतले. त्यावेळी जवळजवळ तीस मोठी माणसे कुटुंबात होती. आता त्यांच्या आयुष्याचे खरे ध्येय काय त्यांनी त्यांना समजावून सांगितले. त्यांचे पैगंबरकार्य त्यांना शक्य व्हावे म्हणून त्यांनी कुटुंबाच्या आधाराची मागणी केली.

हजरत आयेशा ह्यांचा संदर्भ देऊन इमाम अहमद ह्यांनी ह्या प्रसंगाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे:

पैगंबर म्हणाले, 'बनु मुत्तालिबहो, मला तुमच्याकडे विशेषतः व उरलेल्या माणसांसाठी साधारण पाठविण्यात आले आहे. माझ्याशी एकनिष्ठतेची शपथ घेऊन माझा भाऊ व सहकारी कोण बनू इच्छितो? माझ्यावतीने माझ्या ऋणांची व वचनांची (वायद्यांची) पूर्तता कोण करेल? माझ्यासाठी माझ्या कौटुंबिक बाबींची काळजी कोण घेईल? असे कोणी जो करेल तो माझा स्वर्गातला साथीदार असेल.' कुणीतरी म्हणाले, 'मोहम्मद तू तर समुद्र आहेस, आमच्यापैकी कोण ही असली जबाबदारी उचलण्यासाठी पुढे येईल?'

खुद्द पैगंबरांचे कुटुंब त्यांची जबाबदारी घेण्यास तयार नव्हते. त्यांचे काका अब्बास इब्ने अब्दुल मुत्तालिब ह्यांची खरेतर पुतण्याचा प्रतिपाळ करण्याइतकी आर्थिक सुस्थिती होती. तरीही आपली संपत्ती ह्या जबाबदारीमुळे खर्चली जाईल ह्या भीतीने ते गप्प बसले. ईश्वराने मात्र पैगंबरांची काळजी प्रथमतः पत्नी खदिजा बिंत खुवैलिद ह्यांच्याद्वारे घेतली व नंतर अबू बकर ह्यांच्याद्वारे, ज्यांची संपत्ती पैगंबरांना अगदी मदिनेतल्या मुक्कामीही उपयोगी पडली.

आपली श्रद्धा दुसऱ्यांना सांगण्याच्या कामी पैगंबरांचा उत्साह एखाद्या अगदी लहान मुलासारखा उतू जात असे. अब्दुल्ला इब्ने अब्बास ह्यांचा संदर्भ देऊन इतिहासकार इब्ने जरीर हे कुरैशांच्या म्होरक्यांनी एक दिवस काबागृहाभोवती गोळा होऊन पैगंबरांना कसे बोलावून घेतले त्या प्रसंगाचे वर्णन करतात. इस्लामविषयी त्यांना आपलेपणा वाटू लागला आहे असे समजून पैगंबर ताबडतोब निघून आले. आपल्या स्वतःच्या लोकांनी इस्लाम स्वीकारावा म्हणून पैगंबर नेहमीच उत्सुक असत. त्यांना नास्तिक्याचे पाप लागत आहे ही गोष्ट पैगंबरांना नेहमीच शरमेची व संकटाची आणि नैराश्याची वाटे. पण पैगंबरांना बोलावण्याची निष्पत्ती एवढीच निघाली की, कुरैशांना भांडण उकरून काढायचे होते. इस्लाम स्वीकारणे ही त्यांच्याकरिता अशक्यप्राय बाब होती. पैगंबरांनी कुरैशांशी लांबलचक संभाषण केले व निराशेने ते निघून गेले. इब्ने हिश्शाम ही घटना पुढीलप्रमाणे सांगतात:

'पैगंबर दुःखीकष्टी व कल्पनाभंग व आशाभंग होऊन घरी परतले. कारण त्यांच्या लोकांनी त्यांना बोलावून घेतल्यावर त्यांना जी आशा निर्माण झाली होती, तिचा चक्काचूर झाला होता. आपला संदेश स्वीकारण्यापासून आपलेच लोक किती दूर आहेत हे चांगलेच त्यांच्या लक्षात आले.' (तहजीब सीरत इब्ने हिश्शाम, पृ. ६८). पैगंबरांचे काका अबू तालिब ज्यावेळी मृत्यूशय्येवरती होते, त्यावेळी त्यांची विचारपूस करण्यासाठी येणाऱ्या सर्व लोकांनी, त्यांनी त्यांच्या मृत्यूपूर्वी त्यांच्यातले व त्यांच्या पुतण्यातले वाद मिटवून टाकावेत असा सल्ला दिला. दोन्ही बाजूंनी एकमेकांदरम्यान करारनामा करून टाकावा; ज्यायोगे दोन्ही बाजू एकमेकांपासून कृतीसाठी स्वतंत्र राहतील व शक्यतोवर कृतीपासून दूर राहतील! अशा आशयाची ही मागणी होती. अबू तालिबनी त्यांच्या पुतण्याला लोकांसमोर बोलावून घेतले व लोकांकडून त्यांची काय मागणी आहे ती विचारली. पैगंबरांनी सांगितले की, त्यांची मागणी एवढीच आहे की लोकांनी

ईश्वराचे एकत्व मान्य करावे, तोच एकमात्र असा आहे, ज्याची सेवा करणे योग्य आहे, हे मान्य करावे व इतर सर्व पूजायोग्य (खरे तर पूजा–अनायोग्य) प्रतिकांचा त्याग करावा. पैगंबरांचा समाज मात्र हे करण्यास नाखूश होता. जेव्हा सर्व लोक निघून गेले त्यावेळी अबू–तालिब आपल्या पुतण्याला म्हणाले, 'पुतण्या (मुला), मला नाही वाटत, तुझी मागणी मान्य करणे ही त्यांच्याकरिता एवढी मोठी व अवघड गोष्ट होती.' काकांचे हे बोलणे ऐकल्यावर पैगंबरांच्या अपेक्षा उंचावल्या की निदान काकातरी इस्लाम स्वीकारतील. मग ते म्हणाले, 'काका, जर असे आहे तर तुम्ही ईश्वराचे एकत्व कबूल का करीत नाही? ज्यायोगे न्यायाच्या दिवशी (कयामतच्या दिवशी) मला तुमच्या बाजूने मध्यस्थी करता येईल.' (अल बिदायाह् वा अल निहायाह) पैगंबरांच्या काकांनी कधीच इस्लाम स्वीकारला नाही, ही गोष्ट पैगंबरांच्या आयुष्यातली त्यांना कायमचा सल देणारी गोष्ट राहिली.

पैगंबर सर्व तऱ्हांनी त्यांच्या पवित्र कार्यामध्ये व्यग्र असत. त्यांची सर्व शारीरिक व मानसिक शक्ती ही त्याच कामामध्ये जोडली गेलेली असे. त्यांच्या जीवनामध्येच नव्हे, तर त्यांच्या मृत्यूनंतरही त्यांची सर्व संपत्ती ही इस्लामच्या प्रचार–प्रसारकार्यार्थ देण्यात आली. पैगंबरकार्याची जबाबदारी अंगावर येऊन पडण्याआधी पैगंबर चांगलेच श्रीमंत बनले होते. ह्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे त्यांनी अतिश्रीमंत अशा खदिजांशी लग्न केले होते. मक्का काळाच्या सुरुवातीला कुरैशांनी उत्बा इब्ने रबिया ह्यांना पैगंबरांशी बोलण्यास पाठविले. इब्ने कसिरनुसार त्यांच्या असे लक्षात आले की, उलट तेच पैगंबरांकडून जिंकले गेले आहेत. (वाईट गोष्ट ही की, रबियांच्या मित्रबांधवांनी मात्र ह्या गोष्टीचा सोयिस्कर अर्थ असा लावला की, पैगंबरांच्या संपत्तीच्या लालसेने रबियांनी इस्लामबद्दल सकारात्मक मत नोंदविले.)

नंतर उत्बा घरीच राहू लागले व त्यांनी कुणालाही भेटणे बंद केले. 'कुरैशांनो, मला वाटते उत्बा त्या मोहम्मदाकडे आकर्षित झाला आहे. त्याला मोहम्मदाची मोहिनी पडली आहे,' अबू जहल म्हणाला, 'त्याने त्या मोहम्मदाकडे जे अन्न खाल्ले, त्याचाच हा जादूटोणायुक्त परिणाम असावा. किंवा कदाचित हे त्याच्या एखाद्या आर्थिक गरजेमुळेसुद्धा घडले असावे. चला, आपण सारे जाऊन त्याची विचारपूस करूयात.' त्याप्रमाणे सर्व निघाले. अबू जहल म्हणाला, 'उत्बा आम्ही सारे आलो आहोत, कारण आम्हाला एका गोष्टीची खात्री वाटायला लागली आहे की, तुला नक्कीच मुहम्मद व त्याच्या धर्माची ह्या ना त्या प्रकारची मोहिनी उत्पन्न झाली आहे. तुला कशाही प्रकारची आर्थिक अडचण जर असेल तर तुला आम्ही खात्री देतो की तुला जेवढी हवी असेल तेवढी संपत्ती आम्ही तुला गोळा करून देऊ. त्यासाठी तुला मुहम्मदकडे जायची गरज नाही.' उत्बांना अतिशय राग, संताप व चीड आली आणि ते म्हणाले की, 'मी शपथ घेतो, मी परत मुहम्मदांना भेटणार नाही!' (अल बिदायाह् वा अल निहायाह्)

अशाच प्रकारे एकदा वलिद इब्ने मुघिरा पैगंबरांना भेटायला आले होते. पैगंबरांनी त्यांच्यासाठी त्यांच्यासमोर कुरआनच्या काही आयातींचे पठण केले. ईश्वरी पुस्तकाच्या शैलीने वलिद अतिशय प्रभावित झाले. ज्यावेळी अबू जहलच्या कानावर ही गोष्ट पडली त्यावेळी तो

वलिद ह्यांच्याकडे गेला व म्हणाला की, सर्व लोक त्याच्याकरिता पैसे गोळा करतील, कारण नक्कीच त्याला पैशांची गरज निर्माण झाली आहे व म्हणूनच तो मुहम्मद ह्यांच्याकडे गेला. पैगंबरांच्या पैगंबरकार्यास ज्यावेळी सुरुवात झाली, त्यावेळी ते आर्थिकदृष्ट्या विलक्षण सधन होते. ह्यानंतर तेरा वर्षांनी ते मदिनेला गेले, त्यावेळची परिस्थिती मात्र सर्वस्वी वेगळी होती. त्यांच्याकडे फुटकी कवडी शिल्लक नव्हती व प्रवासासाठी त्यांना अबूबकर ह्यांच्याकडून काही पैसे उसने घ्यायची वेळ आली.

## पैगंबरांची हाक

तार्किक दृष्टिकोनातून पाहिले असता, इस्लामी हाक ही काही विशिष्ट सातत्याने, परत परत दिल्या जाणाऱ्या मुद्यांनी भरलेली असते. हे मुद्दे तेच असतात, 'ईश्वराचे एकत्व, पृथ्वीवरच्या लौकिक आयुष्यानंतर, मृत्यूनंतर येणाऱ्या जीवनाचे महत्त्व व अपरिहार्यता, ईश्वराचा सेवक म्हणून माणसाचे असलेले स्थान समजून घेणे आणि पैगंबरांनी ठरविलेल्या मार्गावरती आपापले आयुष्य जगणे.' हेच मुद्दे परत परत खूप भर देऊन सांगितलेले असतात. ईश्वरी वाणीचा (शब्दांचा) प्रचार करणाऱ्याच्या मुखातून ज्यावेळेला हे शब्द बाहेर पडतात; त्यावेळी मात्र ते प्रचारकाच्या व्यक्तिमत्त्वाची रंगछटा धारण करून येतात. प्रत्येक प्रचारक मूळच्या समान शिकवणुकीला आपापल्या व्यक्तिमत्त्वानुसार रंग देत असतो. ही जी भर पडते तिचा अर्थ एवढाच असतो की, इस्लामी संदेश हा फक्त नेमलेल्या पाठ्यक्रमाची पुनरावृत्ती न राहता, अशा रीतीने व्यक्त केला जावा की, ज्यायोगे मूळ संदेशातले सळसळते जिवंतपणा व उत्फुल्लता टिकून राहावी. जिचा अर्थ एकच आहे; पण जी निरनिराळे आकार, घाट धारण करू शकते अशी गोष्ट ह्या निरनिराळ्या प्रचारकांकडून वापरली जाते. तिचे विषय जरी तेच असले तरी त्यांचे एकच एक गणिती तऱ्हेचे नियमबद्ध संकलन करणे अशक्य कोटीतली गोष्ट आहे. ईश्वरी वाणीच्या प्रचारकाचे हृदय हे ईश्वराच्या भयाने भरलेले असते. त्याची एकमेव अतितीव्र इच्छा असते की, त्याच्या श्रोत्यांनी सत्य मार्गदर्शनाच्या रस्त्याकडे वळावे. त्याला हे माहीत असते की, ईश्वराच्या सेवकांना तो जर ईश्वराच्या अजून जवळ आणू शकला तर ईश्वराला संतोष होईल. प्रचारातल्या ह्या साऱ्या गोष्टी त्याला त्याच्या कामामध्ये उत्तेजन देत असतात. हे सर्व प्रचारक लोक संदेशाचा एकसूरीपणा व पुनरावृत्ती टाळून, उलट त्यातल्या अंतःस्फूर्तीचा सुगंध आपल्याला पुरवीत असतात. मूळ विषय एकच असूनही हा संदेश आपल्याला निरनिराळ्या स्वरसाचासह मिळतो. ईश्वराचा प्रचारक हा सर्वप्रथम आणि नेहमीच त्याच्या समूहाचा विचार करीत असतो. दुसऱ्या कुठल्याही गोष्टीपेक्षा त्याची सर्वात महत्त्वाची इच्छा ही असते की, लोकांनी योग्य मार्गदर्शनाच्या रस्त्यावर चालावे. ह्याचा अर्थ त्याच्या समोरच्या समूहातील प्रत्येक व्यक्तीच्या गरजेचा, प्रत्येकाचा स्वतंत्र रीतीने विचार करून, त्याला तो संदेश अशा साच्यात बसवायचा असतो की समूहातील प्रत्येकाला तो समजावा.

इस्लामच्या पैगंबरांना ही पद्धत जितकी पूर्ण तऱ्हेने समजली होती तितकी ती दुसऱ्या कुणालाच समजली नाही. रात्रंदिवस ईश्वरी वाणीच्या प्रचारात ते गुंतून गेले होते. तरीसुद्धा

त्यांचाप्रचार हा, लाडीगोडीने भरलेल्या सुखकर भाषणांच्या पुनरावृत्तीचा कधीच नव्हता. संदेश सांगत असताना ते कायम आपल्यासमोर उभ्या असलेल्या समूहाला आपला संदेश काय रीतीने सांगावा, ह्याचा कळकळीने विचार करीत असत.

मक्केतल्या अगदी सुरुवातीच्या काळातल्या एका प्रसंगी पैगंबरांनी अबू सुफ्यान व त्याची बायको ह्यांना इस्लामचा संदेश सांगितला. त्यांना ते पुढीलप्रमाणे म्हणाले:

'अबू सुफ्यान इब्ने हर्ब व हिंद बिंत उत्बा, तुम्ही दोघे ज्यावेळी मृत्यू पावाल त्यावेळी तुम्हाला उठविले जाईल. भल्या लोकांना स्वर्गात दाखल केले जाईल व दुष्टांना नरकामध्ये पाठविले जाईल. मी तुम्हाला खरोखर सत्य तेच सांगत आहे.' (इब्ने असाकीर)

इतिहासकार इब्ने खुज़ैमा ह्यांनी मक्केतील 'श्रेष्ठी' असणाऱ्या हसीन नावाच्या व्यक्तीचा व पैगंबरांचा पुढे दिलेला संवाद नोंदविला आहे. पैगंबर म्हणाले, 'हसीन, मला एक गोष्ट सांग,' पैगंबरांनी विचारले, 'तू किती देवांची पूजा करतोस?' 'सात पृथ्वीवरचे व एक स्वर्गातला,' हसीन उत्तरला. 'तू संकटात असलास की कुणाची करुणा भाकतोस?' पैगंबरांनी विचारले. 'अर्थातच स्वर्गातल्या देवाची,' हसीन म्हणाला. 'आणि तुझ्या संपत्तीचा नाश झाला की तुला कुणाची आठवण येते?' पैगंबरांनी परत एकदा खोदून विचारले. 'स्वर्गातलाच देव प्रार्थना ऐकत असतो.' 'मग असे जर आहे तर तू त्याच्या बरोबरीने दुसऱ्या कुणाला देवाचा दर्जा का देत असतोस?' पैगंबर म्हणाले. (अल् असाबा, खंड १)

अबू उमामा ह्यांचा संदर्भ देऊन इमाम अहमद पुढीलप्रमाणे नमूद करतात: कुठल्यातरी टोळीतला एक माणूस एकदा पैगंबरांकडे आला व त्यांना त्याने विचारले की, देवाकडून त्यांनी कुठली शिकवण आणली आहे. 'नाती समर्थ बनवली गेली पाहिजेत आणि चुकीचे, सदोष वध थांबवायला हवेत. संपर्काचे रस्ते उघडे ठेवायला हवेत. मूर्ती व प्रतिके तोडून टाकायला हवीत. फक्त एकच एक देव भजायला हवा व त्याचा तुल्यबळ दुसरा कुणीही निर्माण व्हायला नको,' असे पैगंबरांचे उत्तर होते.

मदिनेला आल्यावर नज्रानच्या लोकांना इस्लामचा संदेश औपचारिकरित्या पाठवताना मात्र त्यांनी तो वेगळ्या तऱ्हेने पाठविला:

'मी तुम्हाला दुसऱ्या कुणा माणसाची सेवा करण्याऐवजी त्या एकमेव परमेश्वराची सेवा करण्यासाठी बोलावतो आहे. तुम्ही त्या जगदीश परमेश्वराची सार्वभौम सत्ता, दुसऱ्या कुणा मर्त्य माणसाच्या सत्तेऐवजी मान्य करावी अशी माझी इच्छा आहे.'

पैगंबरांच्या धर्मप्रसाराच्या कार्याला कुरआनने सातत्याने अत्यंत महत्त्वाचा असा पाया उपलब्ध करून दिला. ज्या ज्या वेळी पैगंबर कुणाला भेटत, त्या त्या वेळी ते कुराआनचा एखादा अंश त्या माणसासमोर म्हणत असत. पैगंबरांच्या धर्मप्रसारविषयक कार्याच्या ग्रथित पारंपारिक इतिहासामध्ये ह्या घटनांचे तपशील पुढीलप्रमाणे आढळतात. 'त्यांनी इस्लामचा उल्लेख केला आणि त्यांच्याकरिता कुरआनचे थोडेसे पठन केले.' 'त्यांनी त्यांच्यासमोर इस्लामचा संदेश ठेवला व कुरआनमधील एका अंशाचे त्यांच्यासमोर पठन केले.' हे असे उल्लेख ह्या पुस्तकांतून

वारंवार येतात. अरबांना कुरआनचे अत्यंत विलक्षण आकर्षण निर्माण झाले. इस्लामचे कट्टर शत्रू असे असलेले काही लोक, रात्री हळूच चोरून, पैगंबरांच्या घरापाशी येत आणि भिंतीला कान लावून पैगंबरांचे कुरआन पठन लक्षपूर्वक ऐकत. पैगंबरांच्या लोकांवर (अरबांवर) कुरआनच्या दैवी शैलीचा अतिशय तीव्र असा पगडा बसत असे. उदाहरणार्थ, एकदा कुरैशांचे प्रतिनिधीत्व करण्यासाठी वलिद इब्ने मुघिरा पैगंबरांकडे आले होते. त्यावेळी पैगंबरांनी कुरआनचा काही भाग त्यांना म्हणून दाखविला. त्याने वलिद इतके भारावून गेले की, ते कुरैशांकडे परत गेल्यावर कुरैशांना म्हणाले की, कुरआन हे अभूतपूर्व आणि सर्वश्रेष्ठ अशा साहित्यापैकी आहे, ज्याने बाकी सर्वांना अंधारात ढकलले आहे.' इस्लामचा प्रसार करीत असताना कुरआनचे पठन करणे, हीच त्या काळातली एक सर्वमान्य पद्धत होती. जेव्हा मुसाब इब्ने ज़ुबैरना, मदिनेला, इस्लामचा संदेश देण्यासाठी पाठविण्यात आले, त्यावेळी ते लोकांशी बोलत व त्यांना कुरआनचा एक परिच्छेद म्हणून दाखवत. त्यांची ही तऱ्हा इतकी सर्वप्रसिद्ध झाली की, लोक त्यांना, 'अल्–मुक्री' म्हणजे कुरआनचा पाठक म्हणून ओळखू लागले.

मक्केला पैगंबर असताना त्यांचा इस्लाम प्रचार अतिशय बौद्धिक बारकाव्यांनिशी चालत असे. कुरआनने निर्मिलेल्या वैभवशाली साहित्यमूल्यांचा प्रभाव ह्या कार्यक्रमावरती असे. ह्याच्या तुलनेमध्ये पैगंबरांचे विरोधक मात्र फक्त शिव्या व नालस्ती तेवढी देऊ शकत. मग मक्केतल्या समजदार माणसांना, मुहम्मदच्या विरोधकांकडे त्यांची बाजू सिद्ध करायला ठोस असे काहीच नाही, असा निष्कर्ष काढण्यावाचून गत्यंतर नसे. इब्ने जरीर, ह्यांच्यानुसार: एकदा कुरैशांपैकी काही वजनदार मंडळींनी पैगंबरांना भेटीसाठी बोलवायचे ठरविले व त्यांच्याशी बोलायचे ठरविले. ह्या पाठीमागे हेतू एवढाच होता की, पैगंबरांनी त्यांना समजावून द्यावे. म्हणजेच पैगंबरांना हे सांगावे व आश्वासन द्यावे की, पैगंबरांच्या कट्टर शत्रूंनी, त्यांच्या विरोधात चालविलेल्या कृतींशी व मोहिमेशी त्यांचा काहीही संबंध नाही.

### अरबांची योग्यता

आता आपण इस्लामचा संदेश ज्याची निर्मिती करतो अशा, प्रतिक्रियेवर परिणाम करणाऱ्या घटकांकडे वळूयात. प्रसारकाने कितीही अथक असे परिश्रम केले आणि अतिशय योग्य तऱ्हेने इस्लामच्या खऱ्या संदेशाचा प्रसार केला, तरी शेवटी त्याच्या श्रोत्यांनी इस्लाम स्वीकारणे अथवा नाकारणे, हे त्या श्रोत्याच्या स्वभावधर्मावर अवलंबून असते. अरबांचे चारित्र्य, हा घटक, त्यांच्या इस्लाम स्वीकारामध्ये सर्वात महत्त्वाचा असा घटक होता. अरब ही अत्यंत साध्या व नैसर्गिक वातावरणामध्ये वाढलेली अत्यंत साधी माणसे होती. वरवर जरी त्यांच्यामध्ये अज्ञान व हेकेखोरपणा दिसत असला तरी अंतर्यामी त्यांच्यामध्ये, त्यांच्या निसर्गाने त्यांना बहाल केलेले कितीतरी सद्‌गुण होते. तीन कोटी चौ. कि. मी. पसरलेले वाळवंट, अत्यंत ओसाड, उष्ण व नापीक असणाऱ्या जमिनीवर राहणारे हे अरब मात्र, ह्या सर्वांशी अत्यंत विरोधी अशा वैभवशाली मानवी मूल्यांची जपणूक करणारी माणसे होते. सामान्य अरबाकडे उत्पन्नाचे एकच साधन असायचे–ते म्हणजे त्याचे उंट; पण जर त्याच्याकडे कुणी पाहुणा आला, तर अतिथी

सत्कारासाठी त्या उंटाला तो सहज मारत असे. ज्या उंटावरती त्याचा निर्वाह अवलंबून असे. अन्यायाचा बळी झालेला कुणी जर अरबाच्या तंबूमध्ये आसरा घ्यायला आला, तर त्याला ह्या गोष्टीची खात्री असे की, त्याला आता असा एक मित्र मिळाला आहे, जो त्याच्या भल्यासाठी व प्रतिकारासाठी जीवसुद्धा देईल. लुटारूसुद्धा, लुटताना 'स्त्री–दाक्षिण्य' दाखवित. टोळीतल्या स्त्रीवर्गाच्या अंगावरचे कपडे व दागिने जर लुटायचे असतील तर अरब लुटारू ह्या गोष्टी स्वतः कधीच हिसकावून घेत नसत; तर ते त्या बायकांना त्यांच्या किंमतवान वस्तू, देऊन टाकायला सांगत व स्वतः दुसऱ्या दिशेला तोंड फिरवून उभे राहत. कपडे काढत असलेल्या स्त्रिया, अशा रीतीने हे लुटायला आलेले लोक, पाहात सुद्धा नसत.

वाळवंटातले हे अरब, शुद्ध साधी व अडाणी माणसे होती, असा विचार करणे गैरसमजाचे होईल. हे अरब, अतिशय बुद्धिमान व तत्पर आणि झपाट्याने एखाद्या गोष्टीचा ठाव घेणारी माणसे होती.

नुकतेच मुसलमान झालेले, कुठल्यातरी टोळीतले सातजण पैगंबरांना भेटायला एकदा आले. इस्लामपूर्व अज्ञानाच्या काळात आपण पाच गोष्टी शिकल्याचे त्यांनी पैगंबरांना सांगितले. पैगंबरांचा जर विरोध नसेल व त्यांना काही वेगळे सांगायचे नसेल तर ह्या तत्त्वांना पाळावे, अशी त्यांची इच्छा आहे, असे त्यांनी पैगंबरांना सांगितले. पैगंबरांनी त्यांच्या ह्या पाच तत्त्वाविषयी पृच्छा केली. त्यांनी सांगितले, 'सुसंपन्न काळातही कृतज्ञभाव जपणे.' 'संकटाच्या काळात संयम पाळणे.' 'युद्धभूमीवर स्थिर राहणे.' 'दैवाला शरण जाणे.' 'प्रत्यक्ष शत्रूवरही अत्यंत वाईट वेळ व बाका प्रसंग आला असताना त्याने हुरळून न जाणे.' ह्या त्या पाच गोष्टी होत. हे सर्व ऐकल्यावर पैगंबर म्हणाले, 'हे लोक खरोखरचे बुद्धिमान आहेत. सुशिक्षित आहेत. पैगंबरी मुशीतूनच जणू हे निर्माण झाले आहेत. वा! त्यांचे हे शब्द परत परत ऐकण्याजोगे आहेत.' (कंज़ुल आमाल, खंड १, पृ.६९)

जम़द नावाचा, बनो अज़्दशनावा टोळीतला भुते उतरवायची कामे करणारा मांत्रिक एकदा मक्केला आला. तिथल्या काही लोकांनी त्याला पैगंबरांविषयी सांगितले. 'त्याच्यावर कुठल्यातरी दुष्ट शक्तीचा पगडा बसला आहे,' त्यांनी सांगितले. ज़मद पैगंबरांना बघायला गेला. त्यांना कसे बरे करता येईल ह्याचाच विचार तो करत होता; पण त्याने जेव्हा पैगंबरांना बोलताना ऐकले तेव्हा त्याचा सर्व नूरच पालटला. 'मी आजवर कितीतरी ज्योतिषी व जादूगारांना भेटलो आहे. कितीतरी कवींचे काम मी माझ्या डोळ्यांनी पाहिले आहे; पण ह्या तऱ्हेच्या कुठल्याच गोष्टीशी आजवर माझा संपर्क आला नव्हता. मला तुमचा हात हातात घेऊ द्या व तुमच्याशी निष्ठा राखण्याची शपथ घेऊ द्या.' ज़मद पैगंबरांना म्हणाला. अशा प्रसंगी लंबीचौडी भाषणे द्यायची पैगंबरांची प्रथा नव्हती. त्यांनी नेहमीप्रमाणेच छोटेसे भाषण केले, जे पुढीलप्रमाणे होते:

'स्तुती ही ईश्वरापुरतीच असावी. आपण सर्व त्याची स्तुती करतो व तोच आपणास मदत करत असतो. ज्याला ईश्वर मार्गदर्शन करतो, तो कधीच वाकड्या मार्गाला जात नाही व ज्याला ईश्वर वाकड्या मार्गाला धाडतो त्याला कुणीच मार्गदर्शन करू शकत नाही. ईश्वराव्यतिरिक्त

दुसऱ्या कुणाचीही सेवा करता कामा नाही व दुसरा कुणी त्या योग्यही नाही ह्या गोष्टीचा मी साक्षीदार आहे. ईश्वराच्या बरोबरीचा दुसरा कुणीही नाही.' (मुस्लिम)

ह्या फारच थोड्या शब्दांमध्ये ज़मादला फार मोठ्या संपत्तीचा साठा गवसला. 'तुमचे शब्द म्हणजे समुद्राचा तळ गाठू शकतील असे आहेत. कृपया तुम्ही जे काही बोलतात, ते परत एकदा बोला. (ते मला माझ्या हृदयात साठवू देत),' ज़माद पैगंबरांना म्हणाला.

(अल् बिदायाह् वा अल् निहायाह् खंड ३ पृ:३६)

शब्द व कृतीमधला इतकासाही फरक सहन करणे हे कुणाही अरबाला शक्य नसते. तो त्याच्या शब्दाशी पक्का असतो व दुसऱ्या कुणाकडूनही त्याची हीच अपेक्षा असते. एखाद्या गोष्टीतले सत्य त्याला लख्खपणाने दिसले की, अरब ते चटकन स्वीकारतो. पैगंबरांचे एक चरित्रकार इब्ने इसहाक ह्यांनी पुढील प्रसंग सांगितला आहे: बनो साद नावाच्या टोळीने ज़माम इब्ने साअलबा ह्यांना त्यांच्या वतीने पैगंबरांकडे पाठविले. ते मदिनेत आल्यावर त्यांनी त्यांच्या उंटाला मशिदीच्या दाराजवळ बसविले व बांधले. नंतर ते आतमध्ये गेले. तिथे पैगंबर त्यांच्या सहकाऱ्यांबरोबर बसले होते. ते त्या मैफिलीसमोर गेले व त्यांनी विचारले, 'तुमच्यामध्ये अब्दुल मुत्तालिबचा पुत्र कोण आहे?' 'मीच तो मोहम्मद,' पैगंबर म्हणाले. ज़माम म्हणाले, 'मोहम्मद मी तुला काही प्रश्न विचारणार आहे आणि हे प्रश्न विचारताना मी जर कठोर झालो तर मला वाटते तुला राग यायला नको.' 'अजिबात नाही. तुम्हाला पाहिजे ते प्रश्न विचारा,' पैगंबर म्हणाले. 'काय तू ईश्वराची शपथ घेऊन मला सांगशील? त्या ईश्वराची, जो तुझ्या आधी होऊन गेलेल्या लोकांचा ईश्वर होता व तुझ्यानंतर येणाऱ्या लोकांचाही ईश्वर आहे की, तू त्या ईश्वराचा खरोखरचा पैगंबर आहेस?' ज़मामनी विचारले. 'ईश्वराशपथ, खरोखर तसे आहे,' पैगंबर उत्तरले. नव्या प्रश्नाची सुरुवात परत एकदा वरील तऱ्हेनेच करून ज़माम विचारते झाले, 'काय तू 'त्या' ईश्वराची शपथ घेऊन सांगशील की, त्या ईश्वराने तुला खरोखर सांगितले की, तू आम्हाला त्या ईश्वराची एकट्याची उपासना करण्याचा व त्याला भागीदार निर्माण न करण्याचा आग्रहपूर्वक उपदेश करण्यास पाठविले आहे. तसेच त्यानेच मूर्तिपूजा नष्ट करण्याचा व आमचे पूर्वज ज्या चालीरीतीचे पालन करीत त्याही रीतींचा त्याग करण्याचा संदेश तुझ्याद्वारे दिला आहे?' 'ईश्वराशपथ खरोखर तसे आहे.' ह्यापुढे नमाज़, ज़कात, उपवास (रोज़े) व हज व अशाच, इस्लामने आवश्यक धर्मकृत्य म्हणून सांगितलेल्या गोष्टींविषयी अगदी वर दिलेल्या शैलीतच प्रश्नोत्तरे झाली. ज्यावेळेला त्यांचे प्रश्न संपले व प्रत्येक प्रश्नाला पैगंबरांनी तेच एक साधे उत्तर दिले; ज़माम पुढे म्हणाले:

'खरोखर एकच एक ईश्वराव्यतिरिक्त दुसरा कुणीही सेवा करण्याकरिता (पूजा करण्याकरिता) पात्र नाही व मोहम्मद हा त्या ईश्वराचा पैगंबर (रसूल) आहे. तुम्ही ज्या गोष्टींचा निषेध केला आहे, त्या गोष्टींचा आता मी त्याग करतो व इस्लामच्या आवश्यक धर्मकर्तव्यांचे पालन निष्ठापूर्वक करण्याची शपथ घेतो. ह्याहून जास्तही काही मी करणार नाही व अर्थातच कमीसुद्धा नाही.' (अल् बिदायाह् वा अल् निहायाह्, खंड ५)

ते त्यांच्या उंटावर स्वार झाले व लगेचच त्यांच्या तांड्याकडे रवाना झाले. आपल्या बांधवांकडे पोहोचल्यावर मदिनेत काय घडले त्याचा वृत्तांत त्यांनी लोकांना सांगितला. त्यांच्या घरी येण्याची वाटच बघणाऱ्या सर्व आबालवृद्धांनी एक दिवसाचा अवधीसुद्धा जाऊ न देता इस्लामचा स्वीकार केला.

भोंदूपणाचा लवलेशही ह्या अरब लोकांमध्ये नव्हता. त्यांना स्वीकार अथवा नकार एवढ्या दोनच गोष्टी माहीत होत्या. ह्यामधली एखादी स्थिती त्यांना ठाऊकच नव्हती. त्यांनी एकदा वचन दिल्यावर, कुठलीही परिस्थिती उद्भवली तरी ते त्या वचनाचे पालन करीत. दिलेल्या शब्दांत एवढासाही फेरबदल अगदी सर्व संपत्ती अथवा जीव हिसकावून घेण्याची धमकीही करू शकत नसे. अरबांचा नैसर्गिक स्वभाव हा असा होता. इतिहासकारांनी निष्ठेच्या दुसऱ्या शपथेच्या प्रसंगी, औस व खज्रज ह्या दोन टोळ्यांनी केलेल्या भाषणाचा वृत्तांत दिला आहे. ह्या भाषणांची झळाळीच ह्या वंशाचे वेगळेपण प्रकर्षाने दाखविते. अंतिमतः अब्बास इब्ने अबादांना पुढीलप्रमाणे म्हणावेसे वाटले: 'खज्रजच्या लोकांनो, ह्या माणसाला निष्ठेची शपथ वाहून तुम्ही स्वतःला कशाशी जोडून घेता आहात ह्याची तुम्हाला जाणीव आहे ना? ह्यामुळे तुम्ही सर्व वंशांच्या लोकांशी होणाऱ्या युद्धाशी स्वतःला जोडून घेता आहात. परत एकदा ह्याचा विचार करा. संपत्तीचा नाश व हत्या घडल्यावर जर तुम्ही त्याला त्याच्या लोकांकडे, मक्केला परत पाठविणार असलात तर खरेतर तसे आताच करा. तुम्ही जर तसे नंतर करणार असलात तर ही गोष्ट ह्या आयुष्यात तसेच पुढच्या आयुष्यात सुद्धा तुमच्यासाठी शरमेची व निंदनीय ठरेल आणि जर तुम्हाला असे वाटत असेल की, संपत्तीचा कितीही नाश झाला अथवा तुमचे कितीही योद्धे मारले गेले तरीसुद्धा तुम्ही तुमच्या शपथेचे पालन कराल, तरच त्याला तुमच्याबरोबर मदिनेला घेऊन जा. ह्या जगात व ह्या पुढील आयुष्यात तुमच्यासाठी ही गोष्ट योग्य ठरेल.'

प्रत्येकाने एकमुखाने वाटेल तो तोटा झाला तरी शपथेचे पालन करण्याचे व पैगंबरांना त्यांच्याबरोबर मदिनेला नेण्याचे सांगितले. 'जर आम्ही शब्द पाळला तर आम्हाला काय मिळेल?' त्यांनी पैगंबरांना विचारले. 'अर्थातच स्वर्ग,' पैगंबर उत्तरले. 'तुमचा हात शपथेसाठी पुढे करा,' सर्व एकमुखाने गरजले. पैगंबरांनी हात पुढे केला व निष्ठेच्या शपथेचा स्वीकार केला.

(अल् बिदायाह अल् निहायाह, खंड ३,पृ.१६२)

अन्सारांकडून दिले गेलेले हे फक्त शब्दच नव्हते, तर हे शब्द त्यांच्या कृतींमधून जन्मले होते. राजकीयदृष्ट्या मुस्लिम वरचढ झाल्यानंतरसुद्धा त्यांनी त्यांच्या त्यागाचा बदला म्हणून कुठल्याही तऱ्हेच्या राजकीय मागणीचा अवलंब केला नाही. खिलाफत मक्कावासियांकडे राहावी ह्या गोष्टीला त्यांची सर्व तऱ्हेने मानसिक सम्मती होती. त्यांना ह्या आयुष्यात त्यांच्या कृतींचे बक्षीस मिळावे अशी अपेक्षा नव्हती. ह्या दुनियेतल्या आयुष्यातील मानापानाच्या गोष्टी त्यांनी दुसऱ्याकरिता सोडून दिल्या होत्या. ते मात्र उलट फार दूरदृष्टीने ह्या पुढील आयुष्यात ईश्वराकडून त्यांना मिळणाऱ्या बक्षीसांची अपेक्षा बाळगून होते.

## पैगंबरांच्या संदेशाची सर्वसमावेशकता

पैगंबरांचे एक चरित्रकार इब्ने इसहाक़ ह्यांनी पुढील वृत्तांत दिला आहे. एकदा कुरैशांचे निवडक ज्येष्ठ सरदार लोक पैगंबरांचे काका अबू तालिब ह्यांचे घरी जमले होते. उत्बा इब्ने रबिया, शैबा इब्ने रबिया, अबू जहल इब्ने हिश्शाम, उमैया इब्ने ख़लफ़, अबू सुफ़्यान इब्ने हर्ब अशांसारखे कुरैशांचे ज्येष्ठ व श्रेष्ठ नेते लोक ह्यावेळी जमले होते. अबू तालिबकरवी त्यांनी पैगंबरांना विचारले की, अखेर पैगंबरांना त्यांच्यापासून हवे तरी काय आहे? पैगंबर म्हणाले, 'फक्त एकच गोष्ट, ती म्हणजे इस्लामचा स्वीकार! आणि ती जर तुम्ही मान्य केलीत तर तुम्ही अरबांचे राजे व्हाल. एवढेच नव्हे आशियातले सर्व लोक तुम्हाला शरण येतील.' (अल् बिदायाह् वा अल् निहायाह् खंड २, पृ: १२३)

एकेश्वरत्व हे नुसत्या एखाद्या सिद्धांताहून वा जीवनशैलीहून कितीतरी जास्त आहे! मानवी यशाच्या प्रत्येक प्रकारामागचे ते रहस्य आहे. एका ईश्वरावरची फक्त श्रद्धा असणे हे मानवी स्वभावाचा खरा आशय व्यक्त करणे आहे. आणि म्हणूनच मानवी मनाच्या तळाशी अशी श्रद्धा तळ ठोकून बसते. एखाद्याच्या शत्रूच्या मनातसुद्धा अशी श्रद्धा शिरायला वाव असतो. खालिद इब्ने वलिद ह्यांनी मक्केवरच्या विजयाच्या फार थोडाकाळ आधी इस्लाम स्वीकारला. पण ईश्वराच्या खऱ्या संदेशाची, इस्लामची पुर्नस्थापना व्हायच्या कितीतरी काळ आधी ते त्याविषयी जागरूक बनले होते. नंतर त्यांनी त्यांच्या खूप आधी केलेल्या निवाड्याविषयी सांगितले की, पैगंबरच योग्य असून कुरैश चुकीचे आहेत आणि त्यांना सर्वशक्तीनिशी इस्लामच्या पैगंबरांना मिळायला हवे, असे त्यांना वाटले होते. ते पुढे असे म्हणाले, 'मी मोहम्मदांबरोबरच्या प्रत्येक युद्धात त्यांच्याविरुद्ध भाग घेतला; पण असे एकही युद्ध झाले नाही की ज्यावेळी आपण योग्य बाजूला लढतो आहोत असे मला वाटले. उलट प्रत्येक वेळी आपण चुकीच्या बाजूने लढत आहोत हीच भावना माझ्यात वाढीस लागली.' (अल् बिदायाह् वा अल् निहायाह् खंड ४)

कितीतरी लोकांच्याबद्दल असा वृत्तांत उपलब्ध आहे की, त्यांनी प्रत्यक्ष इस्लाम स्वीकारायच्या कितीतरी आधीपासून त्यांचा इस्लामकडे कल होता. काहींना तर इस्लाम विषयक स्वप्न पडत असत. खालिद इब्ने सईद अल आस हे अशा काही लोकांपैकी एक होत. एकदा त्यांनी स्वतःला आगीच्या महाप्रचंड विहिरीच्या तोंडाशी उभे असलेले स्वप्नात पाहिले. कुणीतरी त्यांना आतमध्ये ढकलण्याच्या प्रयत्नात होते. अशावेळी पैगंबर मुहम्मद कुठूनसे आले व त्यांनी त्यांना आगीच्या विहिरीत पडण्यापासून वाचविले.

जरी धर्मप्रचाराच्या कार्यात पैशाचा प्रत्यक्ष संबंध अर्थाअर्थी नसला तरी अप्रत्यक्षतः ह्या गोष्टीचा फार मोठा संबंध ह्या कार्याशी असतो. एकदा का माणूस मुसलमान बनला की, त्याची सर्व साधनसंपत्ती ही 'इस्लाम कार्याची' बनते. सर्वप्रथम इस्लामी चळवळीला आर्थिक मदत ही पैगंबरांची प्रथमपत्नी हजरत खदिजा ह्यांच्याकडून झाली. नंतर हजरत अबू बकर ह्यांनी व्यापारात मिळविलेले ४०,००० दिऱ्हाम हे त्यांच्याकडचे सर्व भांडवल इस्लामच्या सेवार्थ दिले. ज्यावेळेला ते व पैगंबर, मक्का सोडून मदिनेला आले, त्यावेळी त्यांनी सोबत ६,००० दिऱ्हाम

घेतले होते. ज्यातून सर्व प्रवासाचा खर्च यथायोग्य तऱ्हेने निभावला. हजरत उस्मान ह्यांनी हिजरी सन ९ मध्ये तबुकच्या मोहिमेप्रीत्यार्थ १०,००० दिऱ्हामची देणगी दिली. 'इस्लाम-कार्यार्थ' अब्दुल रहमान इब्ने औफ ह्यांनी ५०० घोडे दिले. हे सर्व घोडे एकाचवेळी देण्यात आले. इस्लाम स्वीकारलेल्या दुसऱ्या प्रत्येकाची कथा ही अशीच आहे. एकदा त्यांनी इस्लामी कंपूत प्रवेश केल्यावर त्यांची सर्व संपत्तीही जणू इस्लामच्या खजिन्याचा एक भाग झाली.

कुठल्याही तऱ्हेच्या सामाजिक व वांशिक मतभेदांना व पूर्वग्रहांना इतकेसेही स्थान न देणारा एकमेव मार्ग म्हणजे एकेश्वरवादाचा होय. एका ईश्वरावरील श्रद्धा होय. म्हणूनच सामान्य साध्यासुध्या माणसांचे मोठे समुदाय, एखाद्या चळवळीमध्ये सामील होतात त्यावेळी अशी चळवळ ही एकेश्वरवादाच्या पायावरती उभी असते. एका ईश्वराच्या सत्तेखाली सर्व माणसे ही खरोखरची समान बनू शकतात, हे ह्या समुदायाला चटकन कळते. मानवी प्रतिष्ठेवरचा त्यांचा हक्क, ते ज्यावेळी त्या एकाच सर्वशक्तिमान ईश्वराचे नम्र उपासक होतात, त्याचवेळी ते खऱ्या अर्थाने समान दर्जाची खरी माणसे बनल्याने बजावू लगतात. माणूस ज्या कुठल्या सर्वोच्च स्थानाची अपेक्षा धरू शकतो, ते स्थान त्यांना ह्या जगातले त्यांचे खरे स्थान कळाल्याने, ते मिळवू शकतात. इराणी योद्धा रुस्तुम ह्याच्या दरबारात ज्यावेळी मुगिराह इब्ने शौबा प्रवेश करते झाले, त्यावेळी त्यांनी जमलेल्या दरबाऱ्यांसमोर भाषण केले. इब्ने जरीर सांगतात की, त्यांच्या भाषणाचा श्रोत्यांवर अतिशय प्रक्षोभक असा परिणाम झाला:

'कनिष्ठ वर्गीय म्हणाले, देवाशपथ! ह्या अरबाने सत्य तेवढेच सांगितले आहे.' वरिष्ठ वर्गीय मात्र म्हणाले, 'देवाशपथ, त्याने आल्यावर अशा शब्दांनी हल्ला केला आहे की, तो आपल्यावर जरी हल्ला असला तरी आपल्या नोकर गुलामांना ह्या शब्दांचे अतीव आकर्षण वाटले. देव आमच्या पूर्वजांना अधोगती देवो. ह्या समाजाविषयी (अरबांविषयी) ज्यांनी कधी गंभीरपणे(!) विचार केला नाही ते आमचे पूर्वज खरोखरचे किती मूर्ख.' (तारिख अल् तबरी, खंड: ३ पृ.३६)

पैगंबरकार्याच्या तेराव्या वर्षी ज्यावेळी पैगंबर व अबू बकर मदिनेला येऊन पोहोचले त्यावेळी त्यांना जवळ जवळ ५०० माणसे येऊन भेटली. त्यांनी नवागतांचे पुढील शब्दांनी स्वागत केले. 'स्वागत असो! आता तुम्ही आमच्यात सुरक्षित आहात. आम्ही तुमचे नेतृत्व मान्य करीत आहात.' (अल बिदायाह् वा अल निहामाह् खंड:३)

पैगंबरांच्या उपदेशकार्यानेच केवळ त्यांना मदिनेच्या लोकांचा नेता बनविले होते. सोवैद इब्ने सामित अल् खज्रजी, हे बहुधा मदिनेचे पहिले रहिवासी होत, ज्यांना पैगंबरांनी प्रथम इस्लामचा उपदेश केला होता. इस्लामची रूपरेषा पैगंबरांनी त्यांना सांगितल्यावर ते पैगंबरांना म्हणाले की, 'तुमचा व माझा संदेश हा अगदी एका तऱ्हेचा आहे.' 'तुमचा संदेश कोणता?' पैगंबरांनी विचारले. 'लुक़मानची प्रतिभा व बुद्धी चातुर्य,' सोवैद म्हणाले. ह्या शब्दांचे स्पष्टीकरण ज्यावेळी पैगंबरांनी विचारले त्यावेळी सोवैदनी लुक़मानच्या काही कवितांचे पठण केले. पैगंबर म्हणाले, 'माझ्याकडे तर कुरआन आहे, जे ह्याहून सर्वदृष्टीने कितीतरी श्रेष्ठ आहे.' मग त्यांनी

कुरआनच्या काही आयाती सोवैदना म्हणून दाखविल्या. त्या ऐकल्यावर सोवैदनी ताबडतोब इस्लामचा स्वीकार केला. ते मदिनेला गेले व त्यांनी इस्लामचा उपदेश त्यांच्या स्वतःच्या टोळीतील लोकांना केला; पण त्यांच्याच लोकांनी त्यांचा वध केला. (तारिख अल् तबरी, पृ. २३४)

ह्यानंतर मदिनेचे प्रमुख अबुल हैसार अनास इब्ने राफे हे मक्केला आले. त्यांच्या बरोबर बनो अब्द अल् अश्हल ह्या टोळीतली काही तरुण मंडळी होती. खज़्रज व औस ह्या दोन अतिमहत्त्वाच्या टोळ्यांमध्ये मदिनेत त्यावेळी संघर्ष निर्माण झाला होता. हे लोक कुरैशांचा पाठिंबा मिळवून तह करण्यासाठी खज़्रज टोळीच्यावतीने आले होते. पैगंबरांना ज्यावेळी कळाले, की हे लोक मक्केमध्ये आले आहेत, त्यावेळी ते त्यांना भेटायला गेले व म्हणाले, 'तुम्ही ज्या गोष्टी करिता आला आहात त्याहून जास्त महत्त्वाची गोष्ट मी तुम्हाला सांगू का?' नंतर त्यांनी त्या लोकांना एका ईश्वरावरची श्रद्धा म्हणजे काय ते समजावून सांगितले. त्यांच्यामध्ये अयास इब्ने मआज़ नावाचा एक तरुण होता. तो त्यांच्या लोकांना म्हणाला की, खरोखरच ते ज्या गोष्टीकरिता आले होते त्याहून कितीतरी चांगली गोष्ट पैगंबरांनी त्यांना सांगितली आहे. शिष्टमंडळातल्या उर्वरितांना अर्थातच हे म्हणणे पसंत पडले नाही. ते म्हणाले, 'आमचा नाद सोडून द्या. आम्ही इथे दुसऱ्याच महत्त्वाच्या कामासाठी आलो आहोत.' ते मदिनेला परत गेले. ह्यानंतर थोड्याच दिवसांनी अत्यंत वाईट व विनाश करणारे असे प्रक्षोभक युद्ध औस व खज़्रज ह्यांच्या दरम्यान सुरू झाले. ज्याचा इतिहासात उल्लेख बुआसचे युद्ध असा केला जातो.

ख़ुबैब इब्ने अब्दुल रहेमान ह्यांनी पुढील एक प्रसंग नमूद करून ठेवला आहे. साद इब्ने ज़रारा व ज़कवान इब्ने कैस हे मदिनेचे दोन नागरिक एकदा उत्बा रबिया ह्यांच्याकडे मक्केला राहाण्यासाठी आले होते. त्यांनी पैगंबरांविषयी ऐकल्यावर ते पैगंबरांना भेटायला आले. पैगंबरांनी दोघांनाही इस्लाम स्वीकाराचे आमंत्रण दिले व त्यांच्यासाठी कुरआनचे थोडेसे पठन केले. त्यांनी पैगंबरांचे निमंत्रण स्वीकारले व ते मुसलमान बनले. त्यांचे यजमान उत्बा ह्यांच्याकडे परत जाण्याऐवजी, पैगंबरांची भेट होऊन ते मुसलमान बनल्यावर, ते सरळ मदिनेला निघून गेले. मदिनेला पैगंबरांचा इस्लामचा संदेश नेऊन पोहोचविणाऱ्यांपैकी हे दोघे पहिले होत. ही गोष्ट प्रेषितकार्याच्या दहाव्या वर्षी म्हणजेच पैगंबरांनी मदिनेला प्रयाण करण्याच्या तीन वर्षे आधी घडली.

पुढच्याच वर्षी खज़्रज टोळीतील सहाजण हजची यात्रा करण्यासाठी मक्केला आले. त्यांनी पैगंबरांजवळ निष्ठेची शपथ घेतली. ते मुसलमान बनले व इस्लामचा प्रसार करण्यासाठी परत मदिनेला निघून आले. पैगंबर कार्याच्या बाराव्या वर्षी बारा लोक पैगंबरांकडे निष्ठेची शपथ घेण्यासाठी आले. मक्केनजीक अक़बा येथे त्यांनी जी शपथ घेतली, ती इस्लामच्या इतिहासात अकबाची पहिली शपथ म्हणून सुप्रसिद्ध आहे. त्यांनी अशाच तऱ्हेचा करार पुढल्या वर्षी त्याच स्थळी केला, ज्यावेळी त्यामध्ये ७५ जण सामील होते.

मक्केला जे काही घडत होते त्याच्याशी अगदी विरोधाभास ठरणारी गोष्ट म्हणजे

मदिनेतले अतिशय प्रतिष्ठित असे लोक अगदी सहज पहिल्या फटक्यात इस्लाम स्वीकारीत होते. टोळीतल्या प्रथा–परंपरांप्रमाणे लोक त्याकाळी आपल्या टोळीच्या नेत्याने मान्य केलेला धर्म पाळीत असत. ह्यानंतर मात्र मदिनेत इस्लामचा फार झपाट्याने प्रसार झाला. अगदी लवकरच असे एकही घर शिल्लक राहिले नाही ज्यात इस्लामचा शिरकाव झाला नव्हता. मुस्लिमांचे शहरात मताधिक्य झाल्यावर त्यांनी शहराच्या सामाजिक व सांस्कृतिक जीवनावर वर्चस्व गाजवायला सुरू करणे नैसर्गिक होते. तबरींनी अगदी असाच ह्या गोष्टीचा उल्लेख केला आहे: 'मुस्लिम हे शहरातले सर्वात प्रभावशाली लोक ह्या काळात बनले होते.'

**उपदेश कार्याला साहाय्यक ठरणारे घटक**

आपण राहात असलेल्या जगाची भ्रष्टता रोखण्यासाठी काही माणसे सातत्याने प्रयत्न करीत असतात. हे सर्व करताना ती स्वतःच्या खऱ्या व अस्सल मूळ स्वभावाला चिकटून राहातात. ही गोष्ट प्रत्येक काळी व प्रत्येक देशात घडत असली तरी, पैगंबरांनी आपले पैगंबरकार्य सुरू करायच्या काळात ती जास्तच प्रकर्षाने अरबांमध्ये (अरबस्तानात) घडत होती. अरबांना साध्यासुध्या जीवनाची सवय तर होतीच पण ह्या व्यतिरिक्त त्यांना हजरत इब्राहीम ह्यांच्या धर्माची परंपरासुद्धा होती. ह्यामुळे कितीतरी जण आपोआप सत्य स्वीकारायला तयार झाले व त्यांनी मूर्तीपूजा सोडून दिली. अशी माणसे सामान्यतः हनीफ म्हणून (सत्याचे पुरस्कर्ते) ओळखली जात. कुसा इब्ने साआदा व वराक्का इब्ने नौफल हे अशा 'हुनाफांपैकी' होते. जंदुब अम्र–अल–दौसी हे सुद्धा असेच होते. इस्लामपूर्व अज्ञानपर्वात असताना सुद्धा त्यांनी पुढील भाषण केल्याचे वृत्त आहे: 'ह्या सर्व दुनियेच्या निर्मितीचा कुणीतरी निर्माता आहे हे मला माहित आहे; पण तो कोण? हे मात्र मला माहीत नाही.' ज्यावेळी त्यांनी पैगंबरांविषयी ऐकले; त्यावेळी ते पैगंबरांना आपल्या टोळीतील ७५ माणसांबरोबर येऊन भेटले व त्या सर्वांनी इस्लाम स्वीकारला. अबू ज़र्र ग़िफ़्फ़ारी हे अशा काही लोकांपैकी होत. ज्या क्षणी त्यांनी पैगंबरांविषयी ऐकले; त्यात क्षणी त्यांनी त्यांच्याविषयी जास्त माहिती काढण्याच्या उद्देशाने आपल्या भावाला मक्केला पाठविले. अबू ज़र्र ह्यांच्या भावाने पुढील काळात ह्या घटनेचा वृतांत सांगितला आहे, त्यातले एक वाक्य पुढीलप्रमाणे आहे: 'मी एका माणसाला पाहिले ज्याला सर्व लोक अधार्मिक म्हणतात. त्यांच्यासारखा असणारा असा दुसरा कुणीही माणूस आजवर कधीच मी पाहिला नव्हता.'

(मुस्लिम)

अशा माणसांना पैगंबरांचा संदेश समजण्यात कुठल्याच तऱ्हेची अडचण नव्हती.

ईश्वरी–वाणीचा प्रसारक हा बी रुजायला टाकायला घराबाहेर निघालेल्या माळ्यासारखा (शेतकऱ्यासारखा) असतो. कधीतरी जरी त्याने टाकलेल्या बिया नापीक जमिनीवर पडल्याने निरूपयोगी ठरत असल्या, तरीही कधी कधी त्या अशा जागीसुद्धा पडतात जिथून उत्तम पीक निघायला लागते आणि ज्याची त्या माळ्याला किंचित कल्पनासुद्धा नसते.

काही लोकांनी इस्लाम स्वीकारायला नजरेत भरण्याजोगा मोठा काळ घेतला. ह्याचा अर्थ असा नव्हे की, शेवटी कुठल्यातरी चमत्काराने त्यांच्या मनात इस्लाम उगवला. पैगंबरांनी

स्वतः अत्यंत श्रेष्ठ व उच्च अशा नैतिक मूल्यांनिशी जीवन कंठले. ह्यावर कळस म्हणजे, त्यांनी त्यांचा सर्व वेळ ईश्वरी वाणीच्या उपदेशकार्यातच घालविला. पैगंबरांना होणारा विरोध हा सुद्धा त्यांना होणाऱ्या फायद्याचाच एक घटक होता! म्हणजे त्यांचे व्यक्तिमत्व व त्यांचा संदेश सातत्याने सर्वांच्या चर्चेचा विषय असे. ह्या सर्वच गोष्टींचा एकत्रित परिणाम म्हणजे अनेक अरबांच्या मनात इस्लामचे बीज रुजविले गेले. टोळीच्या परंपरेला चिकटून राहाणे व पूर्वजांची पूजा करणे ह्या गोष्टी अस्तित्त्वात होत्याच आणि ह्यामुळे कधी कधी असे वाटे की, इस्लामला कठोर विरोध होतो आहे; परंतु लोकांच्या मनात हळूहळू व अदृष्य रूपाने इस्लामचे बीज वाढतच होते. असा सर्वसाधारण समज आहे की, हजरत उमर ह्यांनी इस्लाम स्वीकारण्याची घटना, ही एका विशिष्ट घटनेचा प्रभाव त्यांच्यावर पडल्याने अचानकच त्यांच्या मनात इस्लाम स्वीकारण्याची इच्छा निर्माण झाल्यामुळे घडली. असे म्हणण्याऐवजी, आपल्याला असे म्हणायला हवे की, त्यांच्या मनात इस्लामची श्रद्धा, जी हळूहळू वाढत होती; तिनेच त्या प्रसंगाचे निमित्त करून त्यांना इस्लाम स्वीकारण्यास भाग पाडले व मूळच्या, निर्माण झालेल्या श्रद्धेवर शिक्कामोर्तब केले.

उमरनी इस्लाम स्वीकारायच्या खूप आधी ज्यावेळी ते पैगंबरांच्या विरोधकांच्या आघाडीवर अग्रभागी दिसत असत त्यावेळी काही मुसलमानांना आश्रयार्थ ॲबिसिनियाला निघून जावे लागले. उम्म अब्दुल्ला बिन्त अबू हास्समा ह्या त्या लोकांपैकी एक होत्या. त्यांनी स्वतःची कहाणी पुढील शब्दात सांगितली आहे: 'आम्ही ॲबिसिनियाला जाण्यासाठी निघण्याच्या तयारीत होतो. माझे पती 'आमेर' हे त्यांच्या काही वस्तू गोळा करण्यासाठी गेले होते. एवढ्यात ज्याने आमचा शब्दात वर्णनही करता येणार नाही असा छळ केला व अनेक गोष्टी भोगायला लावल्या, असा उमर इब्ने खत्ताब माझ्याजवळ येऊन उभा राहिला. त्याने तोवर इस्लाम स्वीकारला नव्हता. तो मला म्हणाला, 'उम्म अब्दुल्ला (अब्दुल्लाच्या आई) तुम्ही कुठे बाहेरगावी जाता आहात का?' 'हो. तुम्ही लोक आम्हाला जे छळत असता व जे नस्ते भोग भोगायला लावता त्यामुळे आम्हाला दुसरीकडे, देवाच्या भूमीवर कुठेतरी जागा शोधायलाच हवी. आमच्या ह्या संकटाच्या पडत्या काळातून, देव जोपर्यंत आम्हाला बाहेर काढत नाही तोवर आम्ही असेच जात राहू.' 'ईश्वर तुमच्याबरोबर राहो,' उमर म्हणाला आणि तो बोलत असताना त्याच्या गालांवरून अश्रू ओघळत होते. मी त्याला असे वागताना कधीच बघितले नव्हते. नंतर तो त्याच्या रस्त्याने निघून गेला; पण आम्ही मक्का सोडून जाणार ह्याचे दुःख मात्र निश्चितच त्याला झाल्याचे दिसले.' (अल् बिदायाह् वा अल् निहायाह् खंड: ३ पृ.७९)

प्रत्येक काळी काही कल्पना, ह्या जनसामान्यांमध्ये वाढीला लागून मूळ धरतात व प्रसिद्धी पावतात. ह्या कल्पना मुळापासून जोपर्यंत नष्ट होत नाहीत, तोवर कुठलाही संदेश मग तो कितीही बुद्धीला पटणारा व तर्कशुद्ध असला तरी स्वीकारला जात नाही. फक्त ताठपणा किंवा कसली तरी युक्ती, ही कारणे, अरब इस्लामला प्रथम करीत असलेल्या विरोधामागे अजिबात नव्हती. उलट पवित्र काबाच्या मक्तेदारांहून वेगळा असा कुठलातरी धर्म खरा धर्म असू शकतो, ही गोष्ट त्यांना समजणेच मुळी मुदलात अवघड होते. ह्या उलट ज्यू लोकांच्या आसपास

राहाणाऱ्या अरबी टोळ्या, ह्या अशा पूर्वग्रहापासून मुक्त असत. त्यांनी त्या ज्यू लोकांकडून ऐकलेले असे की, ज्यूंच्या धर्मग्रंथात असे दिले आहे की, अरबांमधून एक पैगंबर होणार आहे. इतिहासकार तबरानी ह्यांनी मदिनावासियांच्या सहज इस्लाम स्वीकारामागचे एक कारण म्हणून ही गोष्ट नोंदली आहे. त्याचा तपशील असा:

ज्यावेळी अन्सारांनी (अन्सार म्हणजे पैगंबरांच्या मदिना प्रयाणानंतर त्यांना व त्यांच्या सहकाऱ्यांना मदत करणारे मदिनेतले लोक) पैगंबरांची शिकवण ऐकली. त्यावेळी ते शांत राहिले. त्यांचा उपदेश व पैगंबरकार्य सत्य आहे, ह्या भावनेने त्यांचे हृदय समाधानाने भरून गेले. ज्यू व ख्रिश्चन ह्या ग्रंथधारी लोकांकडून त्यांनी 'शेवटचे पैगंबर, कसे असतील ह्याविषयी ऐकले होते. त्यांनी त्यांच्या संदेशामागचे सत्य ओळखले. त्यांनी पैगंबरांची शिकवण मान्य केली व ते त्याबरहुकूम वागू लागले.'

ज्यावेळी पैगंबर उकाझच्या जत्रेला गेले होते, त्यावेळेला बनो कंदांच्या तंबूमध्ये शिरून त्यांनी त्यांची शिकवण समजावून सांगितली होती. त्याचे उत्तर म्हणून त्यांच्यातल्या एका जवान मुलाने पुढील भाषण केले:

'बंधूंनो, आपण घाई करून ह्या माणसाचे अनुयायी बनायला हवे. कारण, देवाशपथ सांगतो, ग्रंथधारी लोक आपल्याला सांगत असत, की ह्या पवित्र भूमीतून एक मनुष्य पैगंबर होणार आहे व त्याचा काळ फारच जवळ आला आहे.' (अबु नईम, अल् दलायल अल् नबूवाह)

त्याकाळी औस व खज्रज ह्या टोळीतील लोकांची अरब पैगंबराच्या येण्याची वाट बघण्यासाठी मानसिक तयारी झाली होती. ज्यावेळी पैगंबर आले; त्यावेळी तुलनात्मकदृष्ट्या त्यांचा पैगंबर म्हणून स्वीकार करणे ह्या लोकांना सोपे झाले. मक्केतल्या व मक्केच्या आजूबाजूच्या लोकांच्या दृष्टीने मात्र ह्या गोष्टीहूनही जास्त महत्त्वाची व खरी गोष्ट, म्हणजे काबावर ताबा कुणाचा आहे? ही होती. अतिप्राचीन अरब रूढीप्रमाणे काबा म्हणजे जणू राजाचा मुकुट समजला जाई. खरे तर काब्याचा अधिकार हा राजमुकुटाहूनही अधिक होता कारण राजमुकुटाबरोबर फार तर राजकीय सत्ता येते. पण इथे मात्र काब्यावरील ताबा ज्याच्याकडे येई, त्याला अध्यात्मिक परंपरांचा वारसासुद्धा लाभत असे. झुल जौशन अल् ज़ब्बाई व पैगंबर ह्यांमधला एक संवाद पुढे दिला आहे. त्यावरून एक गोष्ट चटकन लक्षात येते. अरब हे इतके साधे होते की, ईश्वराच्या घरावर म्हणजेच मक्केतल्या काब्यावर ताबा असणे ह्या एकाच गोष्टीत त्यांना धार्मिक सत्य दिसत होते.

'तुम्ही इस्लाम का स्वीकारत नाही? ह्या योगे असे करणाऱ्या पहिल्या काही लोकांपैकी असे तुम्ही व्हाल.' पैगंबरांनी झुल जौशनना विचारले. झुल जौशनने असे काही करणार नसल्याचे सांगितले. पैगंबरांनी कारण विचारले, 'तुमचेच लोक तुम्हाला मारायला उठल्याचे मी ऐकले आहे,' झुल जौशन म्हणाले. 'तुम्ही त्यांचा बदरच्या युद्धात झालेला प्रभाव ऐकला नाही का?' पैगंबरांनी विचारले तेव्हा तसे ऐकल्याचे झुल जौशनने सांगितले. 'आम्ही तुम्हाला योग्य असाच रस्ता दाखवित आहोत,' पैगंबर म्हणाले. झुल जौशननी सांगितले की,

'जोपर्यंत पैगंबर मक्का जिंकत नाहीत व जोपर्यंत काब्याचा ताबा त्यांच्याकडे येत नाही तोपर्यंत ते इस्लाम स्वीकारणार नाहीत.' 'तुम्ही जगला वाचलात तर नक्कीच हे घडल्याचा दिवस बघाल,' पैगंबर म्हणाले. झुल जौशन सांगतात की, नंतर कधीतरी आपल्या कुटुंबाबरोबर गौरमध्ये राहात असताना त्यांना एक घोडेस्वार येताना दिसला. झुल जौशननी त्याला काय बातमी आणली आहे म्हणून विचारले, 'मोहम्मदनी मक्का जिंकली आहे व पवित्र भूमीचा ताबा घेतला आहे,' स्वाराने उत्तर दिले. 'अरेरे, माझ्यावर अनर्थ गुदरला!' झुल जौशन म्हणाले. 'जर मी त्याच दिवशी इस्लाम स्वीकारला असता व जर मोहम्मदकडे पाचू मागितला असता तरी त्यांनी तो मला नक्कीच दिला असता.' (तबरानी)

### इस्लामच्या संदेशावरती प्रतिक्रिया

ज्यावेळी पैगंबरांनी आपले पैगंबर कार्य सुरू केले त्यावेळी त्यांना अशीच प्रतिक्रिया मिळाली, जशी ती नवीनच संदेश ऐकणाऱ्या दुसऱ्या कुठल्याही समाजाने दिली असती. लोकांना त्यांचा संदेश समजणे हीच मुळी अवघड बाब होती. एकदा कुरैश श्रेष्ठींनी उत्बा इब्ने रबिया ह्यांना त्यांचे प्रतिनिधी म्हणून पैगंबरांकडे पाठविले. त्यांनी पैगंबरांवर व त्यांच्या संदेशावर खूप दोषारोप ठेवले. त्यांचे बोलणे झाल्यावर तुमचे भाषण संपले आहे का? असे पैगंबरांनी त्यांना विचारले. उत्बांनी होय म्हणून सांगितले. ह्यानंतर पैगंबरांनी कुरआनच्या हामीम अस्सज्दाह ह्या सूऱ्यातील पहिल्या तेरा आयातींचे पठण केले. ज्याची सुरुवात, 'ईश्वराच्या नावाने, जो सर्वांचे भले करतो व परम दयाळू आहे ...' ह्या शब्दांनी झाली. 'तुझ्याकडे सांगण्यासारखे दुसरे काहीच नाहीये का?' उत्बाने क्रुद्ध होऊन विचारले. पैगंबरांनी सांगण्यासारखे दुसरे काहीच नसल्याचे सांगितले. उत्बा कुरैशांकडे परत गेल्यावर त्यांनी घटिताचा वृत्तांत विचारला. 'मी तुम्हाला जे काय सांगायचे होते त्यातली एकसुद्धा गोष्ट सोडली नाही,' उत्बा म्हणाले. मोहम्मदनी काय उत्तर दिले अशी पृच्छा त्यांनी केली. उत्बा म्हणाले की, त्यांनी उत्तर तर दिले, पण उत्तरादाखल दिलेले पुरावे मात्र अनाकलनीय होते. 'मला एवढेच समजले की, तो आपल्याला (कुरैशांना) वज्रसमान विजेच्या धोक्याची सूचना देत आहे, जी ह्यापूर्वी समूद व आदच्या लोकांवर पडली होती. एवढेच काय ते मला समजले. 'मूर्खा तुझे असे कसे झाले? कुणीतरी माणूस तुझ्याशी अरबीमध्ये बोलतो आहे व ती गोष्ट तुला समजत नाही, ह्या म्हणण्याला काही अर्थ आहे का?' कुरैश म्हणाले. 'खरोखरच मला तो काय बोलत होता ते समजले नाही. मला एवढेच समजले की तो वज्रसमान वीजेचा उल्लेख करीत होता,' उत्बा उत्तरले. (बहेखी)

काही लोक परंपरेनुसार चालत आलेल्या धर्माशीच फक्त परिचित होते. त्यांना इस्लामचा संदेश म्हणजे त्यांच्या पूर्वजांविरुद्धचे आरोप-पत्र वाटले. ज़मदा एकदा उमऱ्याची यात्रा करण्यासाठी मक्केला आले. त्यावेळी अबू जहल, उत्बा इब्ने रबिया व उमय्या इब्ने ख़लफ़ ह्यांच्याबरोबर एका मैफिलीत ते बसले होते. अबू जहल जोरात म्हणाला, 'त्याने (मोहम्मदनी) आमच्या समाजात मोठी फूट पडली आहे. तो आम्हाला मूर्ख समजतो व आमचे पूर्वज निंदनीय व अनर्थकारकरीत्या गैरमार्गावर असल्याचे समजतो. तो आमच्या मूर्तीचे अपमान करतो.'

'खरोखर त्याला वेड लागले आहे,' उमय्यांनी भर घातली. (अल् असाबा; खंड २, पृ. २१०)

एकदा अम्र इब्ने मुर्रा अल– जहनी हे आपल्या स्वतःच्या जुहैना टोळीतील लोकांना इस्लामचा संदेश सांगत होते. त्यावेळी त्यांच्यातला एक जण म्हणाला, 'खरोखर, ईश्वर तुला आयुष्यातली सर्व तऱ्हेची कटुता व कडवट फळे चाखायला लावो. अम्र, काय आम्ही आमच्या पवित्र मूर्तींचा त्याग करावा असे तुझे म्हणणे आहे? आपल्या बांधवांमध्ये फुट पडावी व आपल्या योग्य व महान पूर्वजांच्या धर्माच्याविरुद्ध आपण कृती करावी? हा तहामामध्ये राहणारा कुरैश, जो धर्म सांगत फिरत असतो, त्याला आपल्या पूर्वधर्माबद्दल इतकेही प्रेम वाटत नाही व त्याचा धार्मिक दृष्टिकोनही अजिबात दयेचा नाही.' नंतर त्यांनी तीन कविता म्हटल्या. त्यातल्या शेवटच्या कवितेचा मथितार्थ असा होता:

'आमचे पूर्वज मूर्ख होते हे सिद्ध करण्याचा तो नेहमी प्रयत्न करतो. जो असे वागतो त्याला कधीच संपन्न भवितव्य लाभणार नाही.' (अल् बिदायाह् वा अल् निहायाह्, खंड २)

काही लोक हे निव्वळ द्वेषामुळे इस्लाम स्वीकारापासून दूर राहिले. पैगंबरांची नेमणूक ईश्वराने केली आहे, हे उघड सत्य पैगंबरांनी लपवून ठेवले नाही. त्यांनी ही गोष्ट समाजातल्या सर्व लहानथोरांना गरजून सांगितली; पण दुसऱ्या कुणालातरी ईश्वराने सत्य ज्ञान सांगण्यासाठी निवडले आहे, व ते स्वतः मात्र (ईश्वराकडून) नाकारले गेले आहेत, ही सत्य गोष्ट पचविणे लोकांना नक्कीच अवघड वाटले. मुग़िरा इब्ने शौबा ह्यांनी एक प्रसंग ऐतिहासिकदृष्ट्या नमूद करून ठेवला आहे. अबू जहलनी एकदा पैगंबरांना एका बाजूला नेऊन सांगितले, 'ईश्वराशपथ,तू जे काही सांगत असतोस ते खरे आहे, ह्या गोष्टीची जाणीव मला आहे; पण एकच गोष्ट मला माझा उघड विश्वास दाखविण्यापासून रोखते. बनी कुसय सांगतात की, काब्याचे दरवान ते आहेत, जे मला मान्य आहे. ते सांगतात की, यात्रेकरूंना पाणी द्यायचा हक्क फक्त त्यांना आहे, हे मला मान्य आहे. दारूल नद्वामधील जागेचा हक्क ते सांगतात, तेही मला मान्य आहे. युद्धामध्ये अग्रभागी ध्वज सांभाळण्याचा हक्क त्यांचा आहे. हेही मला मान्य आहे. आणि आता मात्र ते सांगतात की, त्यांच्या मध्ये एक पैगंबरसुद्धा आहे. हे मात्र मी मान्य करू शकत नाही. (अल् बिदायाह् वा अल् निहायाह्, खंड ३)

आर्थिक नुकसानीची भीती, हा घटक काही लोकांना इस्लाम स्वीकारापासून रोखत होता. पैगंबरांच्या येण्याआधी, मक्केतले ईश्वराचे घर हे मूर्तिपूजकांच्या मूर्तीचे घर बनले होते. प्रत्येक धर्माच्या लोकांनी आपापल्या मूर्तींची स्थापना काबागृहात केली होती. जीझस व मेरी ह्यांचे पुतळेसुद्धा काबागृहात होते आणि अर्थातच काबा हे सर्व थरातल्या व सर्व लोकांच्या तीर्थयात्रेचे ठिकाण बनले होते. आणि म्हणूनच वर्षातले चार महिने पवित्र महिने मानून त्यांमध्ये शांतता राखली जात असे. ज्यायोगे, रस्त्यामध्ये हल्ला होणे किंवा लूट होऊन इजा होणे अशा गोष्टींच्या भीतीपासून मुक्त राहून लोक काबागृहाला भेट देऊ शकत. ह्या चार महिन्यांत ज्यावेळी लोकांचे तांड्याचे तांडे मक्केला भेट देत, त्यावेळी मक्केतले व्यापारी अपवादात्मक व आश्चर्यकारक चांगल्या तऱ्हेने धंदा करीत असत. जर काबागृहातल्या मूर्ती काढून टाकण्यात

आल्या असत्या तर लोकांनी मक्केला भेट देणे थांबविले असते व मक्कानिवासी लोकांचा भरून न निघणारा तोटा झाला असता. ह्यामुळे अनेकेश्वरत्व अस्तित्वात राहावे, ह्या इच्छेपाठीमागे लोकांचे हे असे स्वार्थ दडलेले होते. त्यांना असे वाटायचे, की जर एकेश्वरत्वाचा प्रसार झाला तर मक्केचे इतके नुकसान होईल, की मक्का म्हणजे फक्त एक नापीक दरी बनून जाईल, जशी ती मूळची होती.

काबागृहाचे संरक्षक, अशी भूमिका निभावत असल्याचे कुरैश हे जवळच्या व अतिदूरच्याही अरबी टोळ्यांवर राजेपणाची हुकुमत गाजवीत होते, हाही मुद्दा जास्तीचा व विचारात घेण्यासारखा आहे. पूर्व व पश्चिम दिशांना द्वीपकल्पाच्या सीमा ओलांडून जाईल अशा दूरवरच्या ठिकाणीसुद्धा त्यांचे तांडे व्यापारार्थ फिरत असत. अगदी जुन्या काळापासून चालत आलेल्या करारांनुसार ते पर्शिया, ॲबिसिनिया व बिझंटाईन साम्राज्य, इतक्या दूरवरच्या प्रदेशातसुद्धा व्यापार करीत असत. मोहम्मद पैगंबर ह्यांना जर पैगंबर म्हणून आपण मान्यता दिली तर ह्या सर्व, शेजारी टोळ्यांशी केलेले व्यापारविषयक करार संपुष्टात येतील, अशी भीती कुरैशांना वाटत असे. कारण ह्या सर्व टोळ्या अनेकेश्वरत्व मानणाऱ्या होत्या. दुसरे म्हणजे ह्याचबरोबर त्यांच्याकडे असलेले अरबांचे धुरीणत्व संपुष्टात येणार होते. कुरआनच्या अल्–वाक़िआ (तो प्रसंग) ह्या सूऱ्यामधील पुढे दिलेल्या आयातीचा हाच अर्थ आहे: 'काय, तुम्ही तुमच्या चरितार्थाच्या साधनालाच नकार देता आहात' (५६:८२). इथला संदर्भ हा कुरैशांच्या त्या समाजाबद्दल आहे, ज्यायोगे मोहम्मद पैगंबर व त्यांचा एकेश्वरत्वाचा धर्म, ह्यांना नाकारून ते स्वतःला आर्थिक नुकसानापासून वाचवीत होते.

एकदा पैगंबरांनी त्यांचे पैगंबरकार्य सुरू केल्यावर, त्यांचे जीवन व चारित्र्य हे सार्वजनिक उत्सुकतेचे विषय बनले. इतिहासकार अबू याअला ह्यांनी नोंदविले आहे की, लोक त्यांना पाहिल्यावर एक दुसऱ्याला विचारत असत, 'हेच का 'ते'?' पैगंबर जरी प्रवाशांच्या भल्या मोठ्या, तांड्यामध्ये कुठेतरी असेल तरी लोक मात्र त्यांचा स्वतंत्र उल्लेख एकमेकांशी करायला विसरत नसत. कुणीही मक्केला आल्यावर, परत जाताना दुसऱ्या कुठल्याही गोष्टींबरोबर 'पैगंबरांची बातमी' न्यायला विसरत नसे. 'अब्दुलापुत्र मोहम्मद ह्याने पैगंबरीचा दावा केला आहे आणि अबू कहाफांचा पुत्र (अबू बकर) त्याचा अनुयायी बनला आहे,' अशा अर्थांच्या बातम्या ते बोलत असत. कुरैश पैगंबरांना मोहम्मद म्हणण्याऐवजी मोझम्मम म्हणत असत. मोझम्मम म्हणजे आरोपपात्र तर मोहम्मद म्हणजे स्तुतिपात्र! पूर्वजांचा अपमान केल्याचा आरोप ते त्यांच्यावर ठेवत असत. पैगंबरांचे चरित्रकार इब्ने हिश्शाम ह्यांनी एक प्रसंग नोंदविला आहे. एकदा पैगंबर रस्त्याने चाललेले असताना, त्यांच्या रस्त्यात कुरैशांनी घाण टाकली होती. ती बघून पैगंबर व्यथितपणे, ' बनो अब्दे मनाफ, हे शेजारी म्हणून किती वाईट आहेत.' (तहजीब सीरत इब्ने हिश्शाम, पृ. ८६)

पैगंबरांचे काका, अबू तालिब जिवंत असेपर्यंत, पैगंबरांचे शत्रू, त्यांच्याविरुद्ध कुठलीही कृती करायला धजावले नाहीत. कारण त्या काळच्या टोळीतील रीती रिवाजाप्रमाणे पैगंबरांशी वैर करणे म्हणजे त्यांच्या सगळ्या टोळीशी (कुटुंबाशी), बनो हाशीम ह्यांच्याशी वैर

करण्यासारखे होते. इस्लाम स्वीकारण्यापूर्वी एकदा उमर इब्ने खत्ताब हे पैगंबरांना मारण्याच्या इराद्याने तयारी करून बाहेर पडले होते. 'तू जर मोहम्मदला मारलेस, तर नंतर बनो हाशीम तुझी काय अवस्था करून टाकतील ह्याचा विचार केला आहेस का?' एवढे कुणाचेतरी म्हणणे, त्यांना त्यांच्या इराद्यापासून परावृत्त करायला पुरेसे होते. पैगंबरांना धोका द्यायचा विचार करणाऱ्या कुणालाही नेमका हाच प्रश्न पडत असे. मुसलमानांचा मक्केत होणारा छळ, हा मुख्यत्वे मुसलमान झालेल्या गुलामांचाच होत अस, कारण त्यांना कुठल्याच 'टोळीचा पाठिंबा' नसे. अब्दुल्ला इब्ने मसूद ह्या पैगंबरांच्या अतिनिकटच्या सहकाऱ्यानुसार, अगदी सुरुवातीच्या काळात मक्केमध्ये ज्यांनी आपण मुसलमान असल्याचे जाहीर केले होते, असे फक्त सात जण होते. ते म्हणजे : पैगंबर स्वतः, अबू बकर, अम्मार, सईद, सुहैब, बिलाल आणि मिक्दाद. 'पैगंबरांना ईश्वराने त्यांच्या काकांच्या माध्यमातून वाचविले. अबू बकर ह्यांची काळजी, त्यांची टोळी घेत होती. उरलेले मात्र मूर्तिपूजकांच्या तावडीत सापडत. हे मूर्तिपूजक त्यांना लोखंडी चिलखते चढवत व उकळत्या सूर्यांच्या उन्हात मैदानामध्ये निजायला लावत.' (अहमद)

बनो हिशामचे प्रमुख, पैगंबरांचे काका, अबू तालिब ह्यांच्या मृत्यूनंतर मात्र चित्र पालटले. एकदा कुरैशांपैकी एका हेंगाड्या व वात्रट माणसाने पैगंबरांच्या अंगावर घाण फेकली जी त्यांच्या अंगाला व कपड्यांना चिकटून बसली. नंतर पैगंबर घरी आल्यावर त्यांची एक मुलगी, ती घाण साफ करू लागली. 'कुरैश आजवर माझ्याशी अशा गलिच्छपणाने कधीच वागले नव्हते,' पैगंबर तिला म्हणाले, 'अबू–तालिब ह्यांच्या मृत्यूनंतर मात्र त्यांनी अशा हलक्या दर्जाच्या हल्ल्यांनासुद्धा सुरुवात केली.' पैगंबरांचे सहचर अबू हुरैरा ह्यांनी ही गोष्ट अशी सांगितली आहे:

'कुरैश अत्यंत कठोर रीतीने, अबू–तालिब ह्यांच्या मृत्यूनंतर पैगंबरांशी वागत असत. 'काका, केवढ्या थोड्या काळात तुमच्या जाण्याने होणारी माझी हानी मला जाणवते आहे.' पैगंबर एकदा दुःखावेगाने म्हणाले होते.' कुरैश पैगंबरांना नाहीसे करण्याच्या योजनासुद्धा आखू लागले. ह्याच काळात कधीतरी अबू जहलने प्राण्यांची आतडी पैगंबरांच्या गळ्यात घातली होती आणि उक्बा इब्ने मुआयत ह्याने त्यांच्या गळ्याभोवती कपडा बांधून आवळला होता. हा चक्क गळफास लावण्याचा प्रयत्न होता. नशिबानेच तो अयशस्वी झाला. अबू तालिब ह्यांच्या मृत्यूनंतर जणू पैगंबरांच्या आयुष्यावर घाला घालायला कुणाचा अटकावच शिल्लक राहिला नाही. लोकांना परावृत्त करणारी एकच गोष्ट म्हणजे अशा तऱ्हेचे ह्यापूर्वी अरबस्तानात कधी घडले नव्हते. बनो हिशामच्या एका घटकावर, त्याच्याच कुरैश साथीदारांनी हल्ला करून त्याला ठार मारणे, ही अरबस्तानाच्या इतिहासातली एक अभूतपूर्व घटना ठरली असती. शिवाय ह्या मूर्तिपूजकांमध्ये असेही थोडे लोक शिल्लक होते, ज्यांना त्यांची सद्सद्विवेकबुद्धी टोचणी देऊ असे. ते अगदी मनातल्या मनात पैगंबरांना पाठिंबा देत असत. अबू जहलने सर्वप्रथम पैगंबरांवर हल्ला केल्याचे वृत्त, अबुल बख्तरी ह्यांनी ऐकले तेव्हा त्यांनी हातात आसूड घेतला व ते काबागृहाच्या दिशेने गेले. जिथे अबू जहल, त्याच्या साथीदारांबरोबर विजयी उन्मादात बसला होता. अबुल बख्तरींनी प्रथम अबू जहलने पैगंबरांवर हल्ला केला होता ह्या गोष्टीची शहानिशा करून घेतली. ते खरे असल्याचे ज्यावेळी कळाले तेव्हा हातातल्या आसूडाचा असा काही सपकारा त्यांनी अबू

जहलच्या डोक्यावर मारला की, तो वेदनांनी किंचाळू लागला.

निरनिराळ्या धर्मांच्या इतिहासातून कुणालाही एक गोष्ट दिसेल. ती म्हणजे, एक धार्मिकपंथ म्हणून अनेकेश्वरत्ववाद, हा त्याविरुद्धच्या टीकेबाबत अतिसंवेदनशील असतो; परंतु प्राचीनकाळी अनेकेश्वरत्ववाद हा एका पंथाहूनही जास्त होता. सामाजिक उतरंडीचा पायाच मुळी हा अनेकेश्वरवाद घालून देत असे. अनेकेश्वरत्ववादाला वेड्याप्रमाणे चिकटून राहण्यामध्ये राजकीय कारणे सुद्धा दडून राहिलेली होती. मक्केतली परिस्थिती ही अशी होती आणि म्हणूनच पैगंबरांच्या काळात, त्यांचे काम, म्हणजे संयमाची पराकाष्ठेची कठोर परीक्षा होती. हाताच्या बोटांवर मोजता येतील, इतक्याच माणसांनी पैगंबरकार्याच्या पहिल्या तीन वर्षांत त्यांच्यावर पैगंबर म्हणून विश्वास दाखविला होता. मक्केमध्ये सावली देणाऱ्या वृक्षांची जशी कमतरता होती; तशीच कमतरता पैगंबरांना पाठिंबा देणाऱ्यांचीही होती! फक्त चारच माणसे त्यांच्या निकटची होती. अली, ज़ैद, अबू बकर व खदिजा. अबू बकर ह्यांच्या, जन्माने मुसलमान असलेल्या मुलीचाही समावेश करायचा झाला तर, पाच!

अशीच परिस्थिती पूर्ण तीन वर्षांपर्यंत होती. पैगंबर घराबाहेर पडले की, त्यांचे स्वागत उपहास व टवाळीने होई, जणू ते वेडा बनलेले गृहस्थ होते. एक दिवस, अबू जहलने चिथावणी दिल्याने, काही माणसे पैगंबरांना शिव्या घालत होती. कुरैशांच्या उच्च खानदानातील एखाद्या व्यक्तीला अशी वागणूक मिळते आहे, हे पहाणे रस्त्यातून जाणाऱ्या एका वाटसरूला अशक्य झाले. तो सरळ पैगंबरांचे काका हमज़ा ह्यांच्याकडे गेला. ‘तुम्ही तुमचा सर्व सन्मान घालवून बसला आहात का? तुम्ही इथे निवांत बसला आहात व तिकडे लोक तुमच्या पुतण्याचा तुच्छातापूर्वक अपमान करीत आहेत,’ तो हमज़ांना म्हणाला. अरब स्वाभिमानाला चेतावण्यास एवढे शब्द पुरेसे होते. त्यांच्याकडे एक लोखंडी धनुष्य होते. ते घेऊन ते अबू जहलला शोधायला निघाले. त्यांने अबू जहलला तडाखा देऊन ते म्हणाले,‘मोहम्मदचा धर्म, मी माझा धर्म म्हणून स्वीकारला आहे. जर तुझ्यामध्ये दम असेल तर आता त्यासंबंधाने काहीतरी करून दाखव.’

(तबरानी)

हमज़ा हे योद्धा म्हणून सर्व अरबस्तानात सुप्रसिद्ध होते. त्यांनी ही कृती केल्याने, मुसलमानांचा उत्साह वाढला व त्यांची संख्या तीसपर्यंत वाढली. त्या काळी मक्केमध्ये दोन व्यक्ती अतिशय प्रभावशाली होत्या. उमर इब्ने खत्ताब व अबू जहल इब्ने हिश्शाम. पैगंबरांनी देवाजवळ प्रार्थना केली होती. ‘ईश्वरा, उमर इब्ने खत्ताब किंवा अबू जहल इब्ने हिश्शाम ह्यांच्या द्वारे इस्लामला बळकटी आण.’ ही प्रार्थना उमर इब्ने खत्ताब ह्यांच्या संदर्भात स्वीकारली गेली. पैगंबरकार्याच्या सहाव्या वर्षी उमर इब्ने खत्ताब ह्यांनी इस्लाम स्वीकारला. त्यांच्याबरोबर दुसऱ्याही काही लोकांनी इस्लाम स्वीकारला व इस्लाम स्वीकारणाऱ्यांची एकुण संख्या चाळीस झाली. ह्या काळात मुसलमानांनी भेटण्याची गुप्त जागा, ही दार–अर्कममध्ये होती. इतिहासकार इब्ने कसिर ह्यांच्यानुसार एकोणचाळीस माणसे त्या जागी जमत असत.

अर्थातच, इतक्या छोट्या संख्येने, प्रस्थापित व्यवस्थेला विरोध करणे अवघडच होते.

कारण संख्याबळाने व साधनबळाने, प्रस्थापित नक्कीच कितीतरी जास्त मोठे होते. लवकरच परत एकदा मुसलमानांना विरोध व त्यांचा छळ सुरू झाला. पैगंबरांवर सर्व तऱ्हेचे छलप्रयोग करण्यात आले; परंतु त्यांचा वध करण्याचे सर्व प्रयत्न व्यर्थ गेले. टोळ्यांमधली अंतर्गत व्यवस्था पैगंबरांना अजूनही संरक्षण देत होती. त्यांचा जीव घ्यायला अजून कुणी धजत नव्हते, कारण असे करणे, पैगंबरांच्या संबंध टोळीशी युद्ध जाहीर करण्यासारखे होते. अशा रीतीने ज्यांचे संरक्षण झाले, असे ते पहिले पैगंबर नव्हते. पैगंबर शुऐब ह्यांना त्यांच्या लोकांनी अगदी ह्याच कारणासाठी मारले नाही. जरी त्यांची तसे करण्याची तीव्र इच्छा होती.

ते म्हणाले, 'अरे शुऐब, तू जे काय सांगतोस त्यातले आम्हाला काहीच कळत नाही आणि आमच्यात तू आम्हाला सर्वात दुबळा दिसतोस. जर तुझ्या टोळीचे भय नसते तर आम्ही तुला दगडांनी चेचून मारले असते. आम्हाला तुझ्याविषयी यत्किंचितही प्रेम वाटत नाही.'

(कुरआन, ११:९१)

कुरैशांना एकदा बनो हाशिम टोळीचे प्रमुख सरदार, पैगंबरांचे काका, अबू तालिब ह्यांच्याकडे मागणी केली की, त्यांनी पैगंबरांना टोळीतून बहिष्कृत करावे. असे झाल्यावर पैगंबरांचा वध ते सहज करू शकले असते. अबू–तालिब ह्यांच्या स्वाभिमानाने त्यांना असले कुठले पाऊल उचलू दिले नाही. कुरैशांनी हट्टाग्रह केल्याने अबू–तालिबनी एकदा पैगंबरांना (त्यांच्या पुतण्याला) कुरैशांच्या 'देवावर' टीका करण्याचे थांबविण्यास सांगितले. आपले काका आता आपल्याला कुरैशांच्या हाती देतील ह्या भीतीने पैगंबर चिंताग्रस्त व अस्वस्थ झाले; पण अबू–तालिबनी मात्र पुतण्याला लगोलग दिलासा दिला. 'ईश्वराशपथ! मी तुला कुणाच्या ताब्यात देईन, असे तू मनातसुद्धा आणू नकोस,' ते पैगंबरांना म्हणाले. (तहज़ीब, सीरत इब्ने हिश्शाम पृ: ६०)

ज्यावेळेला बाकी सर्व उपाय थकले, त्यावेळी पैगंबरकार्याच्या सातव्या वर्षी कुरैशांनी संपूर्ण बनो हाशिम टोळीवरच बहिष्कार घालण्याचे ठरविले. अबू तालिबनी, त्यांच्या पुतण्या बरोबर सर्वच कुटुंबाचे स्थलांतर मक्केबाहेर, शिअब अबी तालिब ह्या घळीमध्ये केले. ह्या पर्वतीय प्रदेशात काही जंगली झाडाझुडुपांव्यतिरिक्त दुसरे काहीच नव्हते. संपूर्ण तीन वर्षे अबू–तालिबचे कुटुंब ह्या झाडांच्या पानांवरती व मुळांवरती जगले. त्यांची ह्या सर्व कष्टांमधून सुटका फक्त चार पवित्र महिन्यांमध्ये होत असे. ज्यावेळी बनो हाशिम मक्केला येत असत. बली दिलेली जनावरे ते आपल्या बरोबर परत नेत व त्यांचे मांस सुकवून पुढे काही महिने त्यावर दिवस काढीत.

पैगंबरकार्याच्या दहाव्या वर्षी कुरैशांनी आपापसांत केलेला, बनो हाशिमना बहिष्कृत करण्याचा करार संपुष्टात आला. आता बनो हाशिम परत मक्केला येऊ शकत होते. पण वनवासात घडलेल्या परिश्रमांनी थकून गेलेले अबू–तालिब त्याच वर्षी (इ.स.६२० मध्ये) मृत्यू पावले. अब्दुल उझ्झा उर्फ अबू लहब आता बनो हाशिमचे नवीन प्रमुख बनले. ते पैगंबरांचे कट्टर विरोधक होते आणि त्यांनी अबू–तालिबनी इतके दिवस रोखून धरलेला निर्णय घेतला. तो म्हणजे पैगंबरांना बनो हाशिम ह्या टोळीतून बहिष्कृत करण्याचा.

## बहिष्कार

एखाद्या अरबाला टोळीतून बहिष्कृत करणे, म्हणजे त्या काळामध्ये, त्याला भुकेल्या लांडग्यांच्या झुंडीपुढे टाकण्यासारखे होते. आपल्या नागरिकांची काळजी वाहणारे कुठल्याही तऱ्हेचे सरकार, त्यावेळी नव्हते. फक्त टोळीव्यवस्था अस्तित्वात होती व एखादा मनुष्य टोळीमध्ये राहूनच आपले संरक्षण करीत जगू शकत असे. मिनामध्ये यात्रेकरूंच्या तंबूमध्ये एकदा पैगंबर त्यांचा संदेश एका टोळीतल्या लोकांना सांगत होते; पण त्यांनी इस्लाम स्वीकारायला नकार दिला. तरीही मैसरा इब्ने मस्त्रुक अल् अब्बासी ह्या त्यांच्यापैकी एकाने जो वृत्तांत कथन केला आहे, त्यावरून पैगंबरांच्या शब्दांचा केवढा मोठा परिणाम त्यांच्यावर झाला होता, ते आपणास पडताळता येते. 'किती सुरेख भाषण तुम्ही केले आहे आणि तुमच्या भाषणाने खूप मोठे प्रबोधन केले आहे; पण माझ्या टोळीतले लोक माझ्याशी सहमत नाहीत व तुम्हाला तर माहीत आहे की, एखादा माणूस त्याच्या टोळीच्या विरोधात जाऊ शकत नाही.' टोळी ही इतकी महत्त्वाची गोष्ट कुठल्याही माणसासाठी असे. एखाद्याचे टोळीतून बहिष्कृत होणे, ही त्याकाळी केवढी भयंकर गोष्ट होती! पैगंबरांना स्वतःच्या भूमीतच आता जाण्यासारखे ठिकाण शिल्लक राहिले नाही. दुसऱ्या एखाद्या टोळीचे संरक्षण मिळवण्याव्यतिरिक्त दुसरा कुठलाही पर्यायच शिल्लक राहिला नव्हता. त्यांचा ह्या दिशेने पहिला प्रयत्न ताएफ ह्या गावच्या प्रवासाने घडला. 'मी इब्ने अब्द यालैल ह्यांच्याकडे मदतीसाठी गेलो होतो,' पुढे कधीतरी पैगंबरांनी आपली पत्नी आयेशा ह्यांना सर्व प्रसंग कथन केला. उर्वा इब्ने ज़ुबैर ह्यांनी पुढील वर्णन केले आहे. 'ज्यावेळी अबू-तालिब वारले त्यावेळी पैगंबरांवरचा दबाव व छळ दोन्ही इतके वाढले की, ते सकीफ टोळीकडे गेले व त्यांनी आसऱ्याची व मदतीची मागणी केली;' पण पैगंबरांना मात्र त्यांच्याकडून अतिशय रानगट व नीचपणाची प्रतिक्रिया मिळाली. ती कशी होती, हे कुणालाही पैगंबरांनी परतीच्या वाटेवर, ईश्वराकडे जी प्रार्थना केली, त्यावरून कळून येईल:

'ईश्वरा, मी माझ्या अशक्तपणाची व असाहय्यतेची तक्रार तुझ्याकडे करतो. माणसांमध्ये मी किती चटकन भेद्य आहे, ज्याला सर्वात जास्त कृपेची गरज आहे!' मक्केतल्या लोकांना, ताएफमध्ये काय घडले हे माहीत झाले नाही ते बरेच झाले. अशी प्रतिक्रिया पैगंबरांनी मक्केला परत आल्यावर व्यक्त केली. जर त्यांनी घडलेले ऐकले असते, तर ते अधिकच उद्धटपणा करू लागले असते. पैगंबरांना मक्का शहरात जगणे अशक्य होऊन बसले. ते शहराबाहेर राहून निरनिराळ्या लोकांना, त्यांच्या वैयक्तिक सुरक्षिततेखाली घेण्यासाठी निरोप पाठवीत राहिले, ज्यायोगे त्यांना शहरात परत येता आले असते. असे करता करता शेवटी मुतीम इब्ने आदी ह्यांनी पैगंबरांना स्वसंरक्षणाखाली घेण्याचे मान्य केले आणि मग मुतीम, ह्यांच्या मुलांच्या तलवारींच्या संरक्षणाखाली, ते परत एकदा शहराच्या वेशींच्या आतमध्ये प्रवेश करते झाले.

सर्व टोळ्या ज्यामध्ये हजर राहत अशा कितीतरी जत्रा त्याकाळी अरबस्थानात निरनिराळ्या गावी भरत असत. अशा प्रत्येक प्रसंगी पैगंबर जात व निरनिराळ्या टोळ्यांशी बोलणी करीत. त्यांना आशा असे की, त्यातलीच एखादी त्यांना संरक्षण देऊ करेल. त्यांनी त्यांची ही दीनदशा त्यांचे काका अब्बास ह्यांना सांगितली. 'मी इथे, तुम्ही व तुमच्या

नातेवाईकांमध्ये अजिबात सुरक्षित नाही. तुम्ही मला उद्याच्या जत्रेमध्ये घेऊन चलता का, ज्यायोगे आपण लोकांच्या तंबूमध्ये जाऊन लोकांशी ह्या संबंधाने बोलू शकू?' पैगंबर त्यांना म्हणाले. (अल् बिदाहाय् व अल् निहायाह् खंड ३)

अशा तऱ्हेने पैगंबर टोळीवाल्यांच्या तंबूमध्ये त्यांच्यासमोर जाऊन उभे राहत व ते कुठल्या तऱ्हेचे संरक्षण पैगंबरांना देऊ शकतील ह्याची पृच्छा करीत. माझ्या स्वतःच्या लोकांनी मला नाकारून बहिष्कृत केले आहे, हाकलून लावले आहे, ही गोष्ट ते लोकांना सांगत. 'माझे संरक्षण करा व मला आसरा मिळवून द्या. ह्या योगाने ईश्वराने साक्षात्कार करून माझ्याकडे दिलेल्या धर्माचा उपदेश मी परत सुरू करू शकेन.' इतिहासकरांनी पैगंबरांनी अशा भेट दिलेल्या निरनिराळ्या पंधरा टोळ्यांची नावे दिली आहेत. प्रत्येक वेळी त्यांना, नकारामागून नकारच मिळत राहिले. एखाद्याने दुसऱ्या कुठल्यातरी टोळीचा आसरा मागणे ही गोष्ट मुळात शरमेची समजली जात असे व त्याहूनही जास्त शरमेची गोष्ट म्हणजे त्याला तो नाकारला जाणे, ही होती. खरे तर अरब इतिहासामध्ये हे पहिलेच उदाहरण घडत होते. ज्यावेळी एखाद्या माणसाला एखाद्या टोळीचा आश्रय मिळविण्यासाठी वाट बघत इतकी वर्षे फिरावे लागले. पैगंबरांच्या बाबतीत ही जबाबदारी खांद्यावर घ्यायला कुणीच तयार नव्हते. ज्यावेळी एखाद्या टोळीतल्या काही माणसांना त्यांची दया येई; त्याचवेळी त्यांच्यातला जुना जाणता असा कुणीतरी ताशेरा झाडत असे, 'त्याला स्वतःला त्याच्या टोळीतून हाकलून देण्यात आले आहे आणि तुम्ही त्याला संरक्षण देऊ इच्छिता? अखेर तुम्हाला ह्यातून साधायचे तरी काय आहे? संपूर्ण अरब राष्ट्रावरच युद्ध लादायचे नाही ना?' त्या जुन्या जाणत्याला हे माहीत असे की, एखाद्या टोळीतल्या हाकलून दिलेल्या एखाद्याला संरक्षण देणे, म्हणजे त्या संपूर्ण टोळीशी युद्धच जाहीर करण्यासारखे होय.

कुरैशांनी पैगंबरांना टोळीतून बहिष्कृत केले होते व कुरैश तर संपूर्ण अरब द्वीपकल्पाचे स्वामी होते. त्यांनी बहिष्कृत केलेल्या एखाद्याला सहारा देणे म्हणजे प्रत्येक अरब टोळीशी युद्ध जाहीर करण्यासारखे होते. अगदी प्रत्येकाशी, जो कुरैशांना त्यांचा नेता समजत होता व पवित्र काबागृहाचे पालक समजत होता. म्हणूनच अन्सार जेव्हा पैगंबरांना निष्ठेची शपथ देत होते, त्यावेळी अबुल हैसम इब्ने अल् तैहान ह्यांनी त्यांना पुढील धोक्याची सूचना दिली, 'जर तुम्ही त्यांना तुमच्याबरोबर नेले तर सर्व अरब राष्ट्र तुमच्यावर एकदिलाने तुटून पडणार आहे.'

(तबरानी)

ह्याहून कठोर सत्य म्हणजे सीमेवरच्या अरबी टोळ्यांनी शेजारच्या परकी सत्तांशी करार केले होते. पैगंबरांसारख्या वादग्रस्त माणसाला जर निवारा दिला, तर ह्या परकीय सत्तांमुळे निर्माण होणाऱ्या धोक्याची व परिणामांची भीती, ह्या टोळीवाल्यांना वाटत होती. अल् बिदायाह् वा अल् निहायाह् ह्या ग्रंथात इब्ने कसिर म्हणतो: पैगंबर एकदा मक्केमध्ये बनो शैबान इब्ने साअलबा ह्यांच्या तंबूमध्ये जाऊन त्यांच्या वडीलधाऱ्यांशी बोलत होते. ते सर्व पैगंबरांच्या बोलण्याने प्रभावित झाले; पण शेवटी सर्वांचेच एकमत झाले की, पर्शियाच्या सीमेवरती ते राहत असल्याने, त्यांची तिथली स्थिती, ही पैगंबरांची जबाबदारी घेण्यासाठी मात्र अतिशय धोक्याची

होती. हानी इब्ने कुबैसा ह्यांनी त्या टोळीचे प्रवक्ता म्हणून सांगितले की, त्यांनी इराणच्या सम्राटा बरोबर काही करार केले होते आणि अशीही एक शक्यता होती की इराणच्या सत्ताधाऱ्यांना मोहम्मदांचा संदेश पसंत येणार नाही! (अल् बिदाहाय् व अल् निहायाह् खंड ३)

पैगंबर तर एखाद्या टोळीचा सहारा मिळविण्यासाठी अत्युत्सुक झाले होते, जी त्यांना संरक्षण देऊ शकेल. कारण त्याशिवाय त्यांना त्यांचे पैगंबरकार्य सुरू ठेवता येणे शक्य नव्हते. एकदा ते बनू अब्दुल्ला नावाच्या टोळीला भेटायला गेले. नेहमीप्रमाणे त्यांनी त्यांचा संदेश सांगितला व इस्लाम स्वीकारायचे निमंत्रण दिले. ते लोक त्यांना आसरा देतील अशी त्यांना आशा होती. भाषणाच्या शेवटी ते म्हणाले, 'बनो अब्दुल्ला खरोखर तुमच्या पूर्वजांचे नाव किती सुंदर (अब्दुल्ला म्हणजे अब्द + अल्लाह, ईश्वराचे सेवक) होते!' पण टोळीतल्या लोकांना त्यांच्या चांगुलपणाचा स्पर्शसुद्धा झाला नाही व त्यांनी पैगंबरांची मागणी फेटाळली.

पैगंबरांची मक्केतील तीन वर्षे निरनिराळ्या टोळ्यांमध्ये, कुठल्यातरी टोळीमध्ये आसरा मिळतो आहे का? हे पाहण्यात गेली. त्यांनी अथक परिश्रम घेऊनही, एकही टोळी त्यांना आसरा द्यायला तयार झाली नाही. ज्या काही लोकांना ते भेटत असत, ते छद्मप्रहार करीत त्यांना म्हणत, 'आमच्यामुळे निराश होऊन जायची वेळ अजूनही झाली नाही का?' असे करता करता, ईश्वराने मदिनेतील राहणाऱ्या औस व खज्रज ह्या टोळ्यांना, पैगंबरांना मदत करण्याची बुद्धी दिली. ह्या त्यांच्या निर्णयामागे एक विशिष्ट तऱ्हेचे मानसिक कारण होते. त्यांच्या जवळपासच ज्यू लोकांच्या टोळ्या राहत असत. खैबरच्या ज्यू लोकांकडे अरबस्थानातील त्या भागातल्या सर्वात सुपीक भूमीचा ताबा होता. तसेच त्या प्रदेशातील बहुतांश व्यापारही त्यांच्याचकडे होता. औस व खज्रजचे कितीतरी लोक, ह्या ज्यूंकडे काम करून आपला चरितार्थ चालवीत असत. पैगंबर मदिनेला स्थलांतरित झाल्यावर, पैगंबरांनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी स्वतःच्या हाताने एक मशीद बांधली, जी 'पैगंबरांची मशीद' म्हणून ओळखली जाते. इब्ने कसीरनुसार ती बांधून झाल्यावर पैगंबर म्हणाले:

'हे म्हणजे खैबरच्या* कामगारांकडून करून घेतलेले काम नव्हे. हे त्याहून कितीतरी मोठे व प्रामाणिक असे काम आहे.'

ज्यूंकडे असलेले व्यापारी वर्चस्व व ते हाताखालच्या लोकांचा करीत असलेला भ्रष्ट वापर, ह्यातून अर्थातच ज्यू व औस आणि खज्रजचे लोक, ह्यांमध्ये सतत संघर्ष घडत असत. हे ज्यू लोक मदिनेतल्या टोळीवाल्यांना सांगत की, लवकरच अरबांमधून एक पैगंबर होणार आहे.

खैबरच्या ज्यूंकडे, योग्य मोबदला न मिळता, गुलामांसारख्या राबणुकीतून निर्माण झालेल्या कठोर श्रमांचा संदर्भ इथे आहे. तो पैगंबर आल्यावर, ज्यू त्याच्याशी शस्त्रसंधी करून औस व खज्रजचा नाश करून टाकतील, अशी धमकीही ते पुढे देत असत. ज्यूंच्या ह्या धमकीचा

---

***खैबरचा हा उल्लेख औस व खज़्रजच्या लोकांनी तुटपूंज्या जव ह्या धान्याच्या मोबदल्यात खैबरच्या ज्यूंकडे जे अतोनात कष्ट केले होते. त्यासंबंधीने आहे. हे एका तऱ्हेने गुलामांकडून काम करून घेण्यासारखे होते.**

उल्लेख कुरआनच्या एका आयातीत पुढीलप्रमाणे केला आहे:

'ह्या उलट त्यापूर्वी मात्र ते ईश्वरावरती श्रद्धा न ठेवणाऱ्यांच्या विरोधात प्रार्थना करीत असत.' (कुरआन, २:८९)

ज्यावेळी औस व खज्रजच्या लोकांनी पैगंबरांचा उपदेश ऐकला, त्यावेळी ज्यू सांगत असतात, तो पैगंबर हाच, हे त्यांनी चटकन ओळखले आणि अर्थातच ज्यूंनी त्याला पैगंबर मानण्यापूर्वी स्वतः त्याचे पैगंबरत्व मान्य करण्यासाठी घाई केली. ह्या शिवाय इतर अनेक ऐतिहासिक व सामाजिक कारणे, औस व खज्रजच्या तुलनात्मकदृष्ट्या सहजी घडलेल्या इस्लाम स्वीकाराविषयी देता येतील. पैगंबरांना पैगंबर मानणे व त्यांचा धर्म स्वीकारणे ही गोष्ट दुसऱ्या टोळ्यांना मात्र अवघड वाटली. त्यांनी पैगंबरांना निष्ठा वाहण्याची शपथ घ्यायला मुद्दामहून वेळ अजिबात लावला नाही वा मागचा पुढचा विचार केला नाही.

पैगंबर ज्या काळाची आतुरतेने वाट पाहत होते तो काळ अखेर अशा रीतीने आला. त्यांना आता टोळीचे संरक्षण मिळाले होते. ह्या टोळीच्या संरक्षणाखाली आता त्यांचा संघर्ष, ते अधिक तीव्र करू शकणार होते. मक्केतल्या व मक्केच्या आजूबाजूच्या मुसलमानांना एकत्र गोळा होण्यासाठी एक जागा लाभणार होती. मदिनेतल्या बहुसंख्य लोकांनी इस्लाम स्वीकारल्याने, मुस्लिमांचे इतस्ततः विखुरलेले साधनस्त्रोत हे आता एके ठिकाणी येऊ शकणार होते व त्यांचे केंद्रीकरण झाल्याने इस्लाम–कार्याला पुढे नेण्यासाठी, जास्त चांगल्या तऱ्हेने वापरले जाऊ शकणार होते. ज्यावेळी औस व खज्रजच्या लोकांनी निष्ठेची शपथ वाहिली, त्यावेळी पैगंबर अतिशय त्वरेने त्यांच्या सहकाऱ्यांकडे परतले. 'ईश्वराची प्रार्थना व स्तुती करा. कारण आज राबियाच्या मुलांनी पर्शियनांना जवळ जवळ जिंकून घेतले आहे, असे समजा, 'पैगंबर म्हणाले. अन्सारांनी इस्लाम स्वीकारल्याने भविष्यात मुसलमान किती प्रबळ होणार आहे तेच जणू पैगंबरांनी बघितले. त्यांना समजून चुकले की, मुसलमानांनी पर्शियाच्या प्रबळ सत्तेला जिंकून घ्यायला, आता काळाचाच फक्त काय तो अडसर आहे.

पैगंबरांनी मदिनेला स्थलांतर करण्याची तयारी सुरू केली. औस, खज्रज़च्या इस्लाम स्वीकारानंतर सहा महिन्यांनी हे स्थलांतर होणार होते. ह्या काळादरम्यान पैगंबरांनी त्यांच्या ह्या योजनेविषयी गुप्तता राखण्याचा प्रयत्न केला. पण शेवटी कुठून तरी कुरैशांना पैगंबरांच्या निघून जाण्याच्या योजनेचा सुगावा लागलाच. अन्सारांनी मदिनेमध्ये, पैगंबरांना संरक्षण व आसरा द्यायचे कबूल केले आहे, हे कुरैशांच्या कानावर आले. अन्सारांनी इस्लाम स्वीकारला आहे, ही घटना त्यांच्या नजरेला पडली व सर्व मुसलमान मदिनेला एकत्र येत आहेत, ही बाबही त्यांच्या ध्यानात आली. पैगंबर निघून जायच्या क्षणीच त्यांना ताब्यात घ्यायचे व मग एकतर मारून टाकायचे किंवा कैद करून ठेवायचे, अशी योजना त्यांनी आखली. पण ह्या सर्व योजना फसल्या. जेव्हा पैगंबरांची सर्व तयारी झाली त्यावेळी आपल्या नव्या गावी अतिशय शांत तऱ्हेने निघून जाण्यात पैगंबर यशस्वी ठरले!

# ११ इस्लाम मदिनेला येतो

इस्लामपूर्व काळात मदिना हे शहर यस्त्रब ह्या नावाने प्रसिद्ध होते. औस व खज्रज ह्या मुख्य टोळ्यांव्यतिरिक्त काही ज्यू टोळ्यासुद्धा ह्या प्रदेशात राहत असत. 'फोडा आणि झोडा' ची नीती अवलंबून ज्यूंनी ह्या प्रदेशावर वर्चस्व स्थापिले होते. त्यांचे नेहमीचे प्राथमिक ध्येय हे आजूबाजूच्या अरबांना एकत्र न येऊ देता, दुबळे राखणे हे होते. पैगंबरांच्या मदिनेला स्थलांतर व्हायच्या फक्त पाच वर्षे आधी खज्रजच्या लोकांनी ज्यूंच्या चिथावणीमुळे औसच्या लोकांशी युद्ध छेडले होते. अबुल हैसर अनास इब्ने राफे, हा औस लोकांचा टोळीनायक, आपल्या काही सहकाऱ्यांबरोबर, मक्केला कुरैशांची मदत मिळविण्यासाठी आला होता. पैगंबरांनी ते आल्याचे ऐकल्यावर, ते त्यांच्याकडे गेले व त्यांना त्यांनी इस्लाम स्वीकाराचे निमंत्रण दिले.

त्यांच्यामधला एक तरुण नौजवान, अयास इब्ने मुआज़ हा पैगंबरांच्या उपदेशाने प्रभावित झाला. ते ज्या कारणासाठी आले होते त्याहून हा संदेश कितीतरी जास्त चांगला आहे, असे त्याचे म्हणणे पडले. अर्थातच उरलेल्यांना ते मान्य झाले नाही. अबुल हैसरनी अयासच्या तोंडावर अपमान करण्यासाठी थोडीशी माती फेकली आणि त्याला पैगंबर काय म्हणतात ते विसरून जाण्यास सांगितले. कारण त्यांना त्यांचे त्याहून जास्त 'महत्त्वाचे काम' दिसत होते.

औसांचे प्रतिनिधी मंडळ इस्लाम न स्वीकारताच परत गेले. नंतर थोड्याच काळात, औस व खज़्रज़ ह्यांमध्ये बुआस ह्या नावाने प्रसिद्धीस आलेले युद्ध घडले. त्यांच्यामधले शत्रूत्व ह्या थराला पोहोचले की, प्रत्येकाच्या मनात, दुसऱ्या टोळीचा पूर्ण निःपात व्हावा अशी इच्छा होती. युद्धात खज्रजची प्रथम सरशी होती; पण नंतर मात्र औसने अबू उसैद ह्यांच्या नेतृत्वाखाली खज्रजचा पराभव केला. त्यांनी एकमेकांचे अपरिमित नुकसान केले. घरे व शेतेसुद्धा जाळण्यात आली. अशा रीतीने आपापसांत अंतर्गत युद्ध करून अरबांनी स्वतःच स्वतःला दुबळे करून टाकले.

ह्या युद्धाने उलट ज्यूंचाच फायदा झाला व त्यांचे मदिनेवरील वर्चस्व जास्तच बळकट झाले. भावनावेग थंड झाल्यावर, दोन्हीकडच्या जबाबदार माणसांना आपण केवढी मोठी चूक करून बसलो, ते समजले. जणू ते त्यांच्या शत्रूकडूनच लढले! त्यांनी स्वतःला दुबळे करून घेतले व ज्यूंना अधिक प्रबळ केले. दोन्ही टोळ्यातील पुष्कळ जणांना परिस्थितीमध्ये सुधारणा घडावी, असे वाटू लागले. जर दोन्ही टोळ्यांनी 'क्षमा करा व विसरा' हे तत्व अवलंबिले तरच हे शक्य होते. हे करण्याचा सर्वोत्तम मार्ग म्हणजे एखाद्याला राजा नेमून शांततेची प्रक्रिया सुरू करणे, हा होता. अब्दुल्ला इब्ने उबय ह्या खज्रज टोळीतल्या मानकऱ्यामध्ये सर्व तऱ्हेचे नेतृत्वगुण होते व त्यामुळे त्याची ह्या कामी नेता म्हणून निवड झाली. अगदी ह्याच सुमाराला खज्रजचे काही लोक यात्रेकरिता म्हणून मक्केला आले. तिथे ते पैगंबरांना भेटले. पैगंबरांनी त्यांना आपली ईश्वराकडून खऱ्या धर्मासह पाठवणी झाली आहे व त्यांनी त्यांचा धर्म, इस्लाम स्वीकारावा म्हणून सांगितले. पैगंबरांच्या शब्दांनी त्यांच्या हृदयातले दरवाजे उघडले. आता लवकरच सकल

साम्राज्याचा अधिपती होणारा पैगंबर येणार आहे, असे जे ज्यू सांगत असत त्याची त्यांना आठवण झाली. अरबांना कायमचे नष्ट करण्यासाठी आपण त्या पैगंबरांशी शस्त्रसंधी करू, असे मनात बाळगून त्याची येण्याची वाट पाहत, ते मनात आनंदाने मोहोरून जात. ज्यूंनी वर्णन केलेला हाच तो पैगंबर हे मदिनेतल्या लोकांना चटकन समजले. ज्यूंनी निष्ठा वाहाण्याआधी आपणच त्याला निष्ठा वाहण्याची ही एक सुवर्णसंधी होती.

आणि म्हणून त्यांनी पैगंबरांना निष्ठा वाहिली व ते म्हणाले, 'आम्ही आमच्या लोकांना मागे ठेवले आहे. दुसरे कुठलेही राष्ट्र भ्रष्टतेने व शत्रुत्वाने, आजवर त्यांच्यासारखे मोडून पडलेले नाही. कदाचित तुमच्या माध्यमातून त्या राष्ट्राची जोडणी करावी, अशी परमेश्वराची इच्छा दिसते. आम्ही परत आमच्या गावी जातो व आम्ही स्वीकारलेल्या धर्माची माहिती त्यांना देतो. जर ह्या धर्मश्रद्धेवर आमचे लोक एकत्र आले तर संपूर्ण अरबस्तानात आमच्यासारखे दुसरे प्रबळ राष्ट्र दुसरे कुठलेही शिल्लक राहणार नाही.' (तहज़ीब, सीरत इब्ने हिश्शाम, खंड २, पृ.३८)

ह्या घटनेनंतर मदिनेतल्या लोकांनी फार मोठ्या संख्येने इस्लाम स्वीकारला. ते अन्सार, किंवा इस्लामचे मदतगार म्हणून ओळखले जाऊ लागले. त्यांनी पैगंबरांच्या धर्माला, ज्या निःस्वार्थपणे मदत केली, त्यामुळेच पैगंबरांच्या धर्माला अरबस्थानात सर्वोच्च स्थान व सत्ता लाभू शकली.

पैगंबरांनी मदिनेला स्थलांतर करण्याच्या पाचच वर्षे आधी त्या लोकांनी पैगंबर संदेशाचा विचारसुद्धा केला नव्हता. उलट प्रथमदर्शनी एक हाती ह्या धर्माला धुडकावून लावला होता; पण असे असूनही ह्याच लोकांनी पाच वर्षांनंतर मात्र इस्लाम स्वीकारला. ह्याचे कारण एवढेच होते की, ते पैगंबरांना प्रथम भेटले, त्यावेळी त्यांची मने ही युद्धाच्या लष्करी विचारांनी भरलेली होती. आपल्या शत्रूला कसे हरवायचे ह्या एकाच विचाराने त्यांना ग्रासून टाकले होते. ह्याचा अर्थ ह्याचमुळे त्यांच्याकडे अध्यात्मिक व दैवी विचारांना वेळ द्यायला वेळच शिल्लक नव्हता. ईश्वर व मृत्यूनंतरचे जीवन ह्या गोष्टी त्यांना असंबंधित विषय वाटत होता. ह्या गोष्टी आपल्या 'खऱ्या ध्येयापासून', आपले लक्ष विचलित करीत आहेत असेसुद्धा त्यांना वाटत होते.

औस आणि खज्रजच्या लोकांनी त्यांचे सर्व साधनस्त्रोत बुआसच्या युद्धात वापरून टाकले होते. त्यातून त्यांना मिळालं काय, तर स्वतःच स्वतःचा केलेला नाश. दोन्ही टोळ्यांच्या भवितव्याविषयी शंका निर्माण झाली होती. ते एकमेकांचा सर्वनाश करेपर्यंत त्यांना आपापसात लढवत ठेवण्याचा डाव, ज्यू खेळत राहणार असे दिसत होते. ह्या इस्लामच्या विचारांनी एका नव्याच दृष्टिकोनाची ओळख करून दिली. ते आता युद्धाऐवजी शांतीचा व सामाजिक यादवी ऐवजी ऐक्याचा विचार करू लागले. एका, पूर्वीहून विस्तृत संदर्भासह ते आपल्या शेजाऱ्यांशी असलेले आपले संबंध राखू लागले. दोन अरबांच्या टोळ्यांमधले असलेले संबंध, हे त्यांच्यामधले संबंध व ज्यूंशी असलेले संबंध ह्यांहून वेगळे आहेत व वेगळे राखायला हवेत, ही महत्त्वाची गोष्ट त्यांच्या ध्यानी आली. जर औस व खज्रज एका स्थानी, एक दिलाने एकत्र आले, तर ते ज्यूंचा सामना करण्यासाठी नवीन आघाडी उभारू शकत होते. दोन्ही टोळ्यातले वाद मिटवून, युद्धात

झालेल्या जखमा भरून निघण्यासाठी त्यांना एकच एका श्रद्धेची गरज होती आणि त्यांना दोन्ही बाजूंना मान्य होणारा नेता मिळायला हवा होता, ज्याने शांततेची प्रक्रिया सुरू करून तिची स्थापना करायला हवी होती. मोहम्मद पैगंबरांच्या चारित्र्यमध्ये त्यांना अशा प्रकारचा नेता व त्यांना हवी असलेली श्रद्धासुद्धा लाभली.

बुआसच्या युद्धाने, अशा तऱ्हेने इस्लामचा अप्रत्यक्षतः फायदा झाला. कारण त्याचमुळे औस व खज्रजच्या लोकांना युद्धाच्या निरर्थकतेची जाणीव झाली व शांती हवीशी वाटू लागली. त्यांना ही शांती, इस्लाममध्ये मिळाली आणि ते एकमेकांमध्ये पवित्र पैगंबरांचे मदतनीस म्हणून मिसळून गेले. हजरत आयेशा एकदा म्हणाल्या होत्या, 'बुआसचे युद्ध हे त्याच्या पैगंबराला मदत व्हावी म्हणून ईश्वराने निर्मिलेले होते.'

# १२ स्थलांतर - मक्केकडून मदिनेकडे

**पै**गंबरांचे मक्केहून मदिनेला प्रयाण ही इस्लामी इतिहासातली सर्वात महत्त्वाची घटना होय. म्हणूनच सहाबांनी (पैगंबरांच्या सहकाऱ्यांनी), इस्लामी शकाची सुरुवात ह्या घटनेपासून मानली. इतिहासामधल्या काचेसारख्या नितळ असलेल्या ह्या घटनेसभोवती गेल्या शेकडो वर्षांत, दंतकथांची व परिकथांची जी धूळ जमली आहे, ती जर झटकली तरच ह्या घटनेचा सत्य ऐतिहासिक अन्वयार्थ व महत्त्व समजेल.

पैगंबर मक्केहून मदिनेला येत असताना त्यांनी सूरच्या गुहेत जो मुक्काम केला, त्यावरच अशी एक दंतकथा निर्माण झाली आहे. कुरैश अत्यंत कडक तऱ्हेने पैगंबरांचा माग काढू लागले आणि त्यामुळे त्यांच्यापासून लपण्यासाठी पैगंबरांना ह्या गुहेचा आश्रय घ्यावा लागला. कथा अशी आहे की, पैगंबर गुहेत शिरल्यावर गुहेच्या तोंडाशी एका कोळ्याने जाळे विणले. नंतर एका कबूतराने त्या जाळ्यावरच येऊन अंडे घातले. अशा रीतीने ईश्वरीय साहाय्य झाले की, कुणालाही वाटावे की गुहेमध्ये कुणी नसणारच. पण अशा तऱ्हेच्या सर्वसाधारण घटनेचे जे काही घडते, तेच ह्याही घटनांचे घडले आहे. पैगंबरांच्या मक्केहून मदिनेला जाण्याशी संबंधित घटना ह्या, मूळच्या ओळखताच येणार नाहीत, अशा तऱ्हेने अतिशयोक्त बनवून त्यांची मोडतोड झाली आहे. खरोखरच्या ऐतिहासिक घटनांचे जर बारीक निरीक्षण केले तर हे कुणाच्याही ध्यानात यावे

अब्दुल्ला इब्ने अब्बास ह्यांच्या अधिकारयुक्त संदर्भांनी युक्त असा, इमाम अहमद ह्यांनी दिलेला ह्या घटनांचा वृत्तांत, हा इतिहासकार इब्ने कसिर म्हणतो त्याप्रमाणे सर्वात जास्त विश्वसनीय आहे. हा वृत्तांत असा:

'ते (कुरैश) पैगंबरांच्या वाटेचा माग काढत त्यांचेमागे येऊ लागले; पण ज्यावेळी ते डोंगरापाशी आले त्यावेळी मात्र त्यांचा माग चुकला. ते नंतर तो डोंगर चढून गेले व तो डोंगर चढत असताना ते 'त्या' गुहेजवळूनसुद्धा गेले. गुहेच्या तोंडावर चढलेले कोळ्याचे जाळे पाहून ते आपापसांत म्हणाले की, 'तो जर ह्या गुहेत शिरला असता तर नक्कीच कोळ्याचे हे जाळे, आता आहे तसे अखंड शिल्लक राहिले नसते.'

कुरैशांनी पाहिलेली गुहा ही सूरची गुहाच होय, हेही निश्चितपणे सांगितलेले नाही. आणि जरी आपण असे धरून चाललो की ती गुहा सूरचीच होय. तरीसुद्धा ह्या वृत्तांतावरून एवढेच स्पष्ट होते की, त्यांनी गुहेच्या तोंडावर एक कोळ्याचे जाळे विणलेले पाहिले. ईश्वराने, पैगंबर आत शिरल्यावर, कोळ्याला जाळे विणण्याची आज्ञा दिल्याचे कुठेही वर्णन नाही. किंवा ईश्वराच्या सांगण्यावरून एका कबुतराने त्या जाळ्यावरतीच अंडे घातल्याचेही वर्णन कुठेही नाही. आपल्याला हवे तशा तऱ्हेने विचार करण्यामधून ह्या अशा तऱ्हेच्या चमत्कारिक व विलक्षण गोष्टींची भर ह्या गोष्टीमध्ये पडली आहे.

अशा तऱ्हेच्या प्रक्षेपांमुळे सर्वात जास्त तोटा होतो, तो हा की, खरोखरच्या घटनांच्या विश्लेषणातून माणूस जो खरा धडा शिकू शकेल त्याऐवजी त्याचे लक्ष भलत्याच जागी, ह्या अशा

चमत्कृतीपूर्ण व ओढून ताणून निर्मिलेल्या कथा वेधतात.

**आश्रयार्थ आलेल्यांना घर लाभते**

पैगंबरांना मदिनेतल्या टोळ्यांनी ज्या तऱ्हेने साहाय्य केले, तो एकुणच प्रकार इतिहासातली अभूतपूर्व घटना होय. त्यांच्या ह्या मदतीमुळेच ते इतिहासात अन्सार म्हणून, म्हणजेच मदतगार म्हणून ओळखले जाऊ लागले. सर्वसाधारणपणे ज्यावेळी लोक दातृत्व दाखवितात त्यावेळी ते कसल्यातरी अपेक्षेने तरी दाखविलेले असते किंवा कुणाची तरी कृपा संपादण्यासाठी तरी दाखविलेले असते. काही लोक साधुपुरुषांना दान करतात कारण असे केल्याने त्यांच्या कुटुंबाला व मालमत्तेला संपन्नतेचा आशीर्वाद लाभेल अशी अपेक्षा असते. निराधार व निराश्रित निर्वासितांना मदत करताना प्राप्ती तर काहीच होणार नव्हती, उलट त्यातून भरपूर नुकसानच होण्याची शक्यता जास्त होती. पण असे असूनही पैगंबरांबरोबर आलेल्या निर्वासितांना अन्सारांनी मदत केली. अशा तऱ्हेचे, इतिहासाच्या कीर्द व खतावण्यांमधील, बहुधा हे एकमेव उदाहरण असावे. इस्लाम कार्याकरिता समर्पण करण्याचे जे वचन अन्सारांनी दिले होते, त्या वचनाशीच ह्या कृतींचा संबंध होता. त्यांनी आपल्या घरातून निर्वासितांना फक्त आसराच दिला नाही, तर त्यांना भाऊ व बहीण मानून आपल्या मालमत्तेतसुद्धा भागीदारी दिली. आर्थिक त्यागाहूनही जास्त नुकसान ह्या कृतींनी होऊ शकते हे पूर्णतया जाणूनही त्यांनी हे सगळे केले. ते जे काही करत होते त्याने अरेबिया व पर्शियातील सर्वात प्रबळ सत्ता संघर्षासाठी उद्दीपित होणार होत्या. हजरत अलींनी ह्याचे जे वर्णन केले आहे, त्याहून जास्त योग्य शब्द कदाचित सापडणार नाहीत: 'ते त्यांच्या शब्दाला जागले. विपत्तीतही हे (हिमालयासारखे : अनुवादक) निश्चल व खंबीर राहिले.' (अल् बिदाहाय् वा अल् निहायाह्, खंड ३)

ज्यावेळी मुहाजिरांनी मदिनेला जाण्यासाठी आपला देश (मक्का) सोडला, त्यावेळी अन्सारांपैकी प्रत्येक जण त्यांना आतिथ्य दाखविण्यासाठी उत्सुक होता. अशा तऱ्हेच्या श्रेष्ठ पाहुण्यांना पाहुणचार देण्याचा मान मिळविण्यासाठी कधी कधी तर ते चिठ्यासुद्धा टाकत असत! कुणाला हा मान आधी मिळतो हे पाहण्यासाठी. आपल्या सामान सुमानापैकी व मालमत्तेपैकी चांगला भाग त्यांनी मुहाजिरांकरिता सोडला. निष्ठेच्या शपथेमध्ये तर स्पष्टपणे त्यांना दुसऱ्या कुणाहीपेक्षा चांगल्या गोष्टींच्या भागीदारीमध्ये अग्रमानांकन दिले जाईल, असे म्हटलेले असूनही अन्सार हे सर्व करीत होते. जरी त्यांनी इस्लामकरिता अतिशय टोकाचा त्याग केला, तरी त्यांच्यापैकी कुणीही निष्ठेच्या शपथेमधील वरील भागाचा भंग होतो आहे, असे कणभरसुद्धा दाखविले नाही. (तहज़िब, सीरत इब्ने हिश्शाम खंड १, पृ.१११)

जरी शक्य असलेल्या सर्व तऱ्हेच्या सुविधा पैगंबरांना उपलब्ध करून देण्यात आल्या होत्या, तरी पैगंबरांचे मदिनेतले आयुष्य काही सोपे नव्हते. संपूर्ण अरबस्तान मुसलमानांच्या विरोधात एकत्र येईल अशा तऱ्हेच्या अपेक्षा व समज फारच लवकर, फारच खरे ठरले. उबय इब्ने काब ह्या पैगंबरांच्या एका सहकाऱ्याने, परिस्थितीचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे:

'ज्यावेळी पैगंबर व त्यांच्याबरोबरचे त्यांचे इतर सहकारी मदिनेमध्ये येऊन पोहोचले

आणि अन्सारांनी ज्यावेळी त्यांना आसरा दिला त्यावेळी सगळे अरब त्यांच्या विरोधात एकत्र आले. मुसलमानांना त्यामुळे रात्रंदिवस शस्त्रसज्ज राहावे लागे.' (कंज़ुल आमाल, खंड १, पृ. २५९)

मदिनेच्या लोकांच्या विरोधात आर्थिक दंड कुरैशांनी जाहीर केला. सर्व अरब टोळ्यांनी, कुरैशांचे नेतृत्व पत्करल्यावर मदिनेशी असलेले संबंध तोडून टाकले. आताच्या वाढलेल्या लोकसंख्येला पुरी पडण्यास, शहरातली व आसपासची साधन सामुग्री अगदीच असमर्थ होती व शहर लढविण्याचा, आर्थिक बोजा असह्य झाला होता. उमर सांगतात की, मदिनेमध्ये पैगंबर संपूर्ण दिवस भुकेले राहून अस्वस्थ असे राहात. त्यांना पुरतील इतके, टाकून दिलेले खजूरसुद्धा उपलब्ध होत नसत. काही वर्षांनंतर तुमच्याकडे कंदील होता ना? अशी पृच्छा कुणीतरी हजरत आयेशा यांचेकडे केली. 'कंदिलात जाळायला जर आमच्याकडे तेल असते, तर त्याचा वापर आम्ही आधी स्वयंपाकामध्ये खाण्यासाठी केला असता!' आयेशांनी सांगितले. मुसलमान योग्य त्या तयारीऐवजीच मोहिमांवर जात असत. अबू मुसा ह्यांनी पैगंबरांबरोबर त्यांनी केलेल्या एका मोहिमेविषयी सांगितले आहे. 'आमच्या सहाजणांकडे मिळून एक उंट होता. आम्ही स्वार होण्यासाठी पाळ्या ठरविल्या होत्या. चालून चालून आमच्या पायाची कातडी सोलून निघून गळून जायला लागली. आम्ही पायांना चिंध्या बांधत असू. म्हणूनच ही मोहीम जात अल् रिक़ा म्हणून ओळखली जाऊ लागली. रिक़ा म्हणजे चिंधी किंवा ठिगळ.' अन्नाचा पुरवठा व वाटप इतके कमी होते की, लोक खजूर खाण्याऐवजी चोखत असत असेच म्हटलेले बरे. बाभळीची पाने व लोकस्टची पाने व फळे हा त्यावेळी 'खजुरांहून वेगळा' आहार असे. ह्यात भर म्हणजे मुहाजिरांना त्यांच्या आहारात झालेला बदलही सहन करावा लागे. मक्केमध्ये त्यांना मांस व दुधाच्या आहाराची सवय असे; तर मदिनेतल्या आहारात मुख्यत्वे खजूर असत. तबरानींनी एक प्रसंग ह्या संदर्भात वर्णिला आहे. पैगंबर एकदा शुक्रवारची सर्व मुसलमान समूहाची (जुम्म्याची) नमाज़ घेण्यासाठी आले. मक्केतला एक मुसलमान त्यांना तक्रार करू लागला, 'ईश्वराच्या पैगंबरा, ह्या खजूरांनी आमची आतडी जाळून टाकली आहेत.'

(तबरानी)

मदिनेला स्थलांतर हा इस्लामी इतिहासात एक पर्जन्यपात होता. अगदी प्रत्यक्षतेच्या दृष्टिकोनातून पाहिले तर साधुपुरुषाने (पैगंबरांनी) चालविलेली प्रचार चळवळ, अशा स्वरूपातून बाहेर पडून आता इस्लाम कृतिशील संघर्षाच्या काळात शिरला होता. ज्यावेळी पैगंबर फक्त इस्लाम प्रसाराच्या कार्याशी निगडित होते, त्यावेळी पैगंबरांनी एक तत्त्व अतिशय कडकपणाने अंमलात आणले. ते सर्व वादग्रस्त विषय बाजूला ठेवीत आणि स्वर्गातल्या आनंददायी गोष्टींच्या बातम्या देणे व नरकामधील शिक्षांच्या धोक्याची सूचना देणे, ह्या गोष्टीवरच आपले लक्ष केंद्रित करीत. ते एखाद्या राजकीय, आर्थिक अथवा टोळीविषयक वादासंबंधाने संभाषण करायचे टाळीत. ज्यावेळी त्यांनी बनी आमेर इब्ने सासा ह्या टोळीला उकाझच्या जत्रेच्या वेळी इस्लामचा संदेश सांगितला, त्याचवेळी त्यांनी त्यांना ह्या गोष्टीची खात्री दिली, की अत्यंत शांततामय

तऱ्हेनेच ते त्यांचे इस्लाम प्रचाराचे कार्य करतील. ह्याहून दुसऱ्या कुठल्याही बाह्य विषयाला थारा ते देणार नाहीत. ते त्यांना म्हणाले, 'मी ईश्वराचा पैगंबर आहे. मी जर तुमच्यात आलो तर तुम्ही मला संरक्षण द्याल का? ज्या योगे मी माझे धर्मप्रसाराचे काम चालू ठेवू शकेन. मी तुमच्यावर कुठल्याही गोष्टीची बळजोरी करणार नाही.' (अबू नईम, दलायल अल् नबूवाह, पृ.१००)

मदिनेतसुद्धा पैगंबरांचे मुख्य ध्येय हे पैगंबरकार्याशी संबंधित असेच होते; पण आता क्षेत्र मात्र विस्तृत झाले होते. व इस्लामला आता सामाजिक प्रश्नांची दखल घेणेसुद्धा भाग होते. ह्या अशा स्थळी, पैगंबरांनी अवलंबिलेले धोरण हे, लोकांची हृदये इस्लामकडे सहज व नरमाईने वळविण्याचे होते. असे केल्याने संघर्षाविना त्यांचे पैगंबरकार्य त्यांना करता येणार होते. 'मी जी दराऱ्याची भावना उत्पन्न करू शकतो, त्याचा मला खूप फायदा झाला आहे. एक महिना प्रवास करुन जे लाभेल तोच लाभ मला ह्यामुळे होतो,' ते एकदा म्हणाले होते. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या व चारित्र्याच्या प्रभावानेच त्यांची बरीचशी कामे यशस्वी होत असत.

ह्या पद्धतीच्या, एकमेकींशी मिळत्याजुळत्या, अशा दोन तऱ्हा होत्या. पहिली तऱ्हा म्हणजे इस्लाम विरोधकांच्या मनात दरारा उत्पन्न करणे व दुसरी तऱ्हा म्हणजे त्याचवेळी त्यांच्या मनात प्रेमाचे बीज रुजविणे. पहिली तऱ्हा म्हणजे इस्लाम विरोधकांना पुरून उरेल अशी जरब बसविण्यासाठी आवश्यक असलेले बळ मिळविणे, ज्या योगे विरोधक इस्लामला मारून टाकू शकणार नाहीत व असे झाल्याने इस्लामच्या बळामुळे इस्लाम स्वीकारतील.

'तुम्हाला पाहिजे त्या रीतीने, त्यांच्याविरुद्ध सर्व माणसे व घोडेस्वारांची योजना करा, ज्या योगे तुम्ही ईश्वराच्या व तुमच्या शत्रूमध्ये भय निर्माण करू शकाल. ह्यात तुमच्या त्या शत्रूंचासुद्धा समावेश आहे. ज्यांना तुम्ही जाणत नाही; पण ईश्वर मात्र जाणतो. ईश्वरकार्यार्थ तुम्ही जे कराल त्याचा योग्य मोबदला तुम्हाला दिला जाईल. तुमचे काहीही वाईट (वाकडे) केले जाणार नाही.'(कुरआन, ८:६०)

'धर्मश्रद्धेकडे आकर्षित झालेल्या' (कुरआन ९:६०) लोकांना धर्मादाय म्हणून दान देऊन धर्मश्रद्धेला बांधून ठेवणे ही लोकांना जवळ आणण्याची दुसरी तऱ्हा होती. लोकांना आपल्या कार्यात वळवून आणण्यासाठी पैगंबरांनी दाखविलेल्या औदार्याला दुसऱ्या कशाचीच तोड नाही. त्यांच्या आधी व नंतर झालेल्यांपैकी कुणीही पैगंबरांच्या असीम 'दानशौर्याशी' बरोबरी करू शकणार नाही. सफ्वान इब्ने उमय्या हे मक्केतले एक प्रतिष्ठित गृहस्थ डोंगरातल्या एका घळीत गेले व दडून बसले. मुसलमानांच्या मक्का विजयानंतर पैगंबरांनी त्यांना पूर्ण माफी जाहीर केली व त्यांचा शोध घ्यायला सांगितले. हवाज़िन ज्यावेळी जिंकले गेले, त्यावेळी पैगंबर घडलेल्या विनाशांची जिराना येथे पाहणी करीत होते. युद्धात मिळालेल्या गोष्टींचे वाटप होण्यासाठी मोजणी चालू होती. सफ्वान इब्ने उमय्या त्यावेळी त्यांच्याबरोबर होते. त्यांनी त्यावेळीसुद्धा इस्लाम स्वीकारला नव्हता. एका ओहोळाशी उभे राहून त्यांच्याजवळ जमा होत असलेल्या बकरे व उंटांच्या गर्दी करणाऱ्या झुंडीकडे ते आश्चर्ययुक्त नजरेने पाहत होते. त्यांना पाहिल्यावर पैगंबरांनी विचारले, अबू वहब तुम्हाला ही जनावरे आवडतील नं? सफ्वाननी हो

म्हणून सांगितल्यावर पैगंबर म्हणाले, 'ही सर्व जनावरे तुमची!' 'ईश्वराच्या पैगंबराहून दुसरा कुणीही इतका उदार असू शकत नाही,' सफ्वान म्हणाले. त्यांनी तिथल्या तिथे इस्लाम स्वीकारला व कलमा पढली. (ताबेदारी करण्यायोग्य ईश्वराव्यतिरिक्त दुसरा कुणीही नाही व मोहम्मद त्या ईश्वराचा पैगंबर व सेवक आहे). (कंजुल आमाल खंड ५, पृ. २९४)

पैगंबरांचे अनेक विवाह हे सुद्धा ह्याच धोरणाचा भाग होय. टोळ्यांच्या संबंधांमध्ये, विवाहाने जोडलेल्या संबंधांना प्राथमिक व अतिमहत्त्वाचे संबंध समजले जाई. पैगंबर, मदिनेला आल्यावर त्यांनी जे अनेक विवाह केले; त्याचे कारण आपल्याला टोळ्यांच्या ह्या रिवाजामध्ये सापडते. ह्या विवाहातून अगणित लोकांशी नाते जोडले गेले आणि नैसर्गिकतः त्यांची मने पैगंबरकार्याच्या दिशेने मृदुतेने वळली. पैगंबरांचा पहिला विवाह हा त्यांच्याहून वयाने जवळ जवळ दुप्पट असलेल्या विधवा, खदिजा ह्यांच्याशी झाला होता. हा एक विवाह वगळता, पैगंबरांचे बाकी सर्व विवाह हे त्यांपासून इस्लामला होणाऱ्या राजकीय व धर्मकार्याच्या फायद्यांकरिता घडले.

हुदाय्बिय्याच्या तहानंतरच्या वर्षी (इ.स.६२८) पैगंबर, २००० मुसलमानांबरोबर पवित्र काब्याच्या यात्रेला गेले होते. त्यांच्या मक्केतल्या तीन दिवसांच्या निवासामध्ये त्यांनी मैमुना बिंत अल् हारिस नावाच्या विधवेशी विवाह केला. त्यांना आठ बहिणी होत्या, ज्या मक्केतल्या नावाजलेल्या कुटुंबांमध्ये पडल्या होत्या. त्यांच्याशी विवाह करून, पैगंबर त्यांच्या आठ बहिणींच्या कुटुंबाशी संबंधीत झाले. खालिद इब्ने वलिद हे मैमुना ह्यांचे भाचे होते व मैमुना ह्यांनी त्यांना मुलासारखे वाढविले होते. म्हणजे ह्या विवाहाने कुरैशांचा सर्वात मोठा योद्धा आता पैगंबरांचा सावत्र मुलगा बनला! ह्यानंतर खालिदनी मुसलमानांशी झालेल्या कुठल्याही संघर्षात भाग घेतला नाही व ते लवकरच इस्लामच्या बंधनात बांधले गेले. मैमुना ह्यांच्याशी झालेल्या विवाहानंतर पैगंबरांनी मक्केकरांकरिता एक मेजवानी आयोजित केली होती; पण कुरैशांनी त्यांना आठवण करून दिली की, तहानुसार त्यांना तीनच दिवस मक्केत राहता येणार होते. त्यांच्या निवासाचा काळ संपला होता व त्यांनी आता मक्का सोडून जायची वेळ आली होती. धर्म श्रद्धकडे आकर्षित करण्यासाठी योजिलेले विवाह–भोजन ह्या कारणामुळे होऊ शकले नाही. खालिद इब्ने वलिद व अम्र इब्ने अल आस ह्या दोघांनीही एकदमच इस्लाम स्वीकारला. त्यांना मदिनेमध्ये येताना पाहून कुणीतरी उद्गारले, 'ह्या दोघांना मुसलमानांनी आपल्या झोळीत टाकल्याने, मक्का आता मिळमिळीत व पचपचीत झाली आहे!'

अबू सुफ्यान ह्या कुरैश श्रेष्ठीच्या मुलीने, उम्मे हबीबा व त्यांचे पती उबैदुल्लाह इब्ने जहश ह्यांनी इस्लाम स्वीकारून ते आश्रयार्थ ॲबिसिनियाला निघून गेले. ॲबिसिनियात मात्र पतीने ख्रिश्चन धर्म स्वीकारला. ह्यानंतर फार थोड्या काळात पतीचा मृत्यू झाला. हे ऐकल्यावर पैगंबरांनी उम्मे हबीबा ह्यांच्याशी गैरहजेरीत विवाह करण्याची व्यवस्था करवली. अबू जहलच्या बदर येथील निधनानंतर अबू सुफ्यान हा कुरैशांचा सर्वात प्रभावशाली नेता बनला होता. ह्या विवाहानंतर आता पैगंबर त्याचे जावई बनणार होते. विवाह तर गैरहजेरीतच लावण्यात आला, कारण अशी भीती होती की, उम्म हबीबा जर मक्केला परत आल्या तर त्यांचे वडील विवाहाला

विरोध करतील व परवानगी देणार नाहीत. विवाह विधी, ॲबिसिनियाचा राजा नजाशी ह्याच्या उपस्थितीत (जणू तो वधूपिता असल्यासारखा) पार पडला व वधूने ताबडतोब मदिनेला प्रयाण केले. ह्या नातेसंबंधाने अबू सुफ्यानचे पैगंबरांविषयीचे शत्रूत्व पातळ झाले व मक्काविजयाच्या एक दिवस आधी त्याने इस्लाम स्वीकारला.

ह्याच धोरणाचा दुसरा पैलू म्हणजे इस्लाम विरोधकांच्या मनात भय उत्पन्न करणे हा होय. ह्यामध्ये बळ निर्माण करून त्याचा असा देखावा व प्रदर्शन मांडण्यात येई की, प्रत्यक्षात त्याचा वापर करण्याची वेळ येऊ नये. अबू सुफ्यानने पहिल्या विजयानंतर मक्केला परत जाण्याऐवजी जर मुसलमानांवर दुसरा हल्ला केला असता तर, पराभवानंतर (हिजरी शक, ३) उहदमध्ये मुसलमानांची दाणादाण उडाली असती. तो रौहा येथे पोहोचल्यावर त्याची चूक त्याच्या लक्षात आली व त्याने परत एकदा आपल्या फौजा मुसलमानी वर्चस्व असलेल्या प्रदेशाच्या दिशेने वळविल्या. पण अशा गोंधळाच्या व अव्यवस्थेच्या काळातही पैगंबरांची हेरयंत्रणा कार्यक्षम होती. त्यांना अबू सुफ्यानचा हेतू कळाला व त्यांनी ताबडतोब अबू सुफ्यान वर चालून जाण्याचा निर्णय घेतला. त्यांनी त्यांच्या कंपित फौजेला एकत्र आणले व ते मक्केवर चाल करून जाण्यासाठी निघाले. लष्करी योजना व डावपेच ह्यांना कडेकोट गुप्ततेच्या पडद्याआड ठेवण्याची त्यांची नेहमीची प्रथा बाजूला ठेवून, ह्या योजनेला मात्र अतिप्रचंड प्रसिद्धी देण्यात आली. ज्यावेळी मुसलमान मदिना सोडून हम्रा अल असद ह्या मदिनेपासून आठ मैल असलेल्या मुक्कामी पोहोचले त्यावेळी अबू सुफ्यान त्यांच्या ह्या मोहिमेच्या हेतूविषयी ऐकले. नवीन ताजी कुमक, मुसलमानांना मिळाली असेल हा विचार करून मदिनेवरती हल्ला करायचा विचार त्याने सोडून दिला व तो परत मक्केकडे वळला. अबू सुफ्यानच्या फौजा निघून गेल्याची नक्की खात्री ज्यावेळी पटली त्यावेळी पैगंबरांनी आपल्या फौजा परत मदिनेच्या दिशेने वळविल्या.

जमादि उल अव्वलच्या महिन्यात हिजरी सन ८ मध्ये घडलेल्या मोअताच्या युद्धानंतर बिझंटाईन सम्राटाने सिरियाच्या सरहद्दीजवळ सैन्याची जमवाजमव करायला सुरुवात केली. घस्सानी व त्या प्रदेशातील इतर रोमन व अरबी टोळ्यांनी सम्राटाचे नेतृत्व स्वीकारले. ह्यावरची प्रतिक्रिया म्हणून तबुकजवळ ३०,००० ची फौज पैगंबर घेऊन गेले. तबूकची मोहीम म्हणजे हल्ला न करता केलेल्या यशस्वी चढाईच्या लष्करी डावपेचाचा उत्कृष्ट नमूना होय. ह्या चढाईचे एकमेव ध्येय म्हणजे शत्रूच्यामध्ये भीती निर्माण करणे व त्यामुळे त्यांचे अवसान गळून गेल्यावर ते आपोआपच त्यांचे युद्धखोर हेतू सोडून देतील, असे करणे हे होते. पैगंबर तबुकला आल्यावर त्यांना कळाले की, सीझरने मुसलमानी फौजांना भेटण्यासाठी पुढे येण्याऐवजी युद्धआघाडीवरच्या फौजा काढून घ्यायला सुरुवात केली होती. युद्धाचा प्रश्नच निर्माण झाला नाही. सीझरच्या माघारीने पैगंबरांचा नैतिक विजय झाला होता व त्याचा वापर आपल्या राजकीय फायद्याकरीता करून घेण्याचे त्यांनी ठरविले. रोमन प्रभावाखाली असलेल्या आजूबाजूच्या अरबी टोळ्यांशी संबंध प्रस्थापित करण्यात तबुकमधल्या २० दिवसांच्या मुक्कामाचा त्यांनी वापर केला. दुमतुल जंदलचा ख्रिस्ती सरदार, उकैदिर इब्न अब्दुल मलिक किंदी, आयला टोळीतला

यौहन्ना इब्न रुया ह्यांनी व मक़्ना, जर्बा व अज़्रूह येथील ख्रिस्ती लोकांनी जिझिया भरण्याचे मान्य केले. जिझिया म्हणजे गैर मुसलमानांवर लादण्यात आलेला कर, जे मुसलमान सरकारच्या संरक्षणाखाली राहतात. ह्यायोगे त्यांना जीविताची सुरक्षा व आपल्या धर्माचे मुक्तपणाने पालन करण्याची परवानगी, ह्या दोन गोष्टींची खात्री दिली जाते.

पैगंबरांच्या मृत्यूनंतर हजरत उसामा ह्यांच्या नेतृत्वाखाली काढण्यात आलेल्या मोहीमेमागे अशाच प्रकारचे कारण होते. मदिनेतल्या टोळ्यांव्यतिरिक्त अरबस्तानातल्या सर्व टोळ्या पैगंबरांच्या मृत्यूनंतर उलटल्या होत्या. अरब देशबांधव अचानकच मुसलमानांच्या विरोधात गेले. मदिनेच्या रक्षणार्थ सर्व फौजा मदिनेत ठेवणे लष्करी डावपेचाच्या दृष्टीने योग्य ठरले असते; पण असे करण्याऐवजी अबू बकर ह्यांनी मात्र पैगंबरांनी मृत्यूआधी घेतलेल्या निर्णयानुसारच वागायचे ठरविले. उसामांच्या नेतृत्वाखाली ७०० जणांची फौज रोमन आघाडीवर पाठविण्यात आली. बंडखोर अरबी टोळ्यांवर झालेल्या, ह्या मोहिमेच्या परिणामाबाबत अबू हुरैरा म्हणतात:

'स्वधर्मत्यागाच्या तयारीत असणाऱ्या अरबी टोळ्यांजवळून ज्यावेळी उसामांची फौज जाई, त्यावेळी ते म्हणत, 'मुसलमानांकडे नक्कीच भरपूर मोठी राखीव फौज असली पाहिजे. त्याशिवाय त्यांनी अशी (छोटी) फौज पाठविली नसती. रोमनांशी लढाई करण्यासाठी त्यांना सोडून देऊयात.' मुसलमानांनी रोमनांबरोबरची लढाई जिंकली व रोमनांचा पराभव करून अतिशय सुरक्षित तऱ्हेने ते युद्ध करून परतले. हे पाहिल्यावर इस्लाम सोडून द्यायचा विचार ज्यांनी केला होता; त्यांचा तो विचार नष्ट होऊन ते इस्लामशी जास्तच निष्ठावान बनले.'

(अल् बिदायाह् वा अल् निहायाह्, खंड ६, पृ.३०५)

पैगंबर मदिनेला पोहोचल्यावर मूर्तिपूजकांच्या एका छोट्या गटाव्यतिरिक्त दोन महत्त्वाचे समाज मदिनेत राहत होते. ज्यू व मुसलमान हे दोन समाज अनेक छोट्या-छोट्या गटांमधून विखुरलेले होते. कुणीही एकच एक आघाडी निर्माण करू शकले नव्हते. लोक त्यांची व्यवस्था लावून त्यांना एकत्र आणू शकणाऱ्या कुणाची तरी वाट पाहत होते. लोकांना काय हवे आहे, ते कळल्यावर पैगंबरांनी एक आदेश (जाहीरनामा) जारी केला, ज्यान्वये मुसलमानांना व ज्यूंना स्वयंसिद्ध समाज घोषित करण्यात आले. ज्यू हे मुसलमानांबरोबर राहणारे लोक आहेत... त्यांना त्यांचा धर्म असेल तर मुसलमानांना मुसलमानांचा.' पारंपरिक अधिकार व कर्तव्यावर कुणाच्याच, ज्यूंच्या अथवा मुसलमानांच्या, बंधने घालण्यात आली नाहीत आणि दोन्ही समाजांच्या भावना दुखावल्या जाणार नाहीत अशा स्वीकारार्ह सवलती मान्य करण्यात आल्या. अर्थात ह्यात अजून एक वाक्य असे टाकण्यात आले, जे पुढीलप्रमाणे होते:

'ज्यावेळी एखाद्या गोष्टीविषयी वाद निर्माण होईल त्यावेळी वादाच्या निर्णयार्थ सर्व शक्तिमान ईश्वर व मोहम्मद, ह्यांना तो वाद संदर्भित करण्यात येईल.' (तहज़ीब सीरत इब्ने हिश्शाम, पृ. १२९)

अत्यंत युक्तीने व चातुर्याने ह्या जाहीरनाम्यामुळे राजकीय पुढाकार घेतला गेला व

अशा रीतीने मदिनेला इस्लामी घटनात्मक सरकारचा लाभ झाला.

पैगंबरांच्या मदिनेला जाण्याने कुरैशांना समाधान मिळण्याऐवजी उलट त्यांचा राग अजूनच तीव्र बनला. त्यांनी हे पाहिले की, मुसलमान सर्व एकत्र येत आहेत व ह्या एकत्र येण्याच्या प्रक्रियेने जास्तच बलशाली होत आहेत. फक्त दोनच वर्षांत, पैगंबरांना कुरैशांशी मदिनेबाहेर जाऊन लढायचे की, कुरैशांना मदिनेमध्ये येऊ देऊन इस्लामचे नव्याने बांधलेले घरटे तोडू द्यायचे ह्याविषयीचा निर्णय करावा लागला. कुरैशांच्या फौजेत ९५० माणसे होती तर मुसलमान होते फक्त ३१३; पण पैगंबरांची अंतःप्रेरणा त्यांना सांगत होती की, कुरैशांची मने ही फक्त नकारात्मक भावावेगाने भरली आहेत. मुसलमानांविषयी घृणा व पैगंबरांविषयी द्वेष ह्याच गोष्टी त्यांच्या युद्ध–चढाईमध्ये दडलेल्या आहेत. ह्याउलट मुसलमानांची मने मात्र अतिशय श्रेष्ठ दर्जाच्या व सकारात्मक भावावेगाने भरली आहेत. ईश्वरावरची श्रद्धा त्यांना उत्तेजना देत होती व त्यांची बाजू खरी असल्याची खात्री त्यांना झाली होती. अर्थातच मुसलमान त्यांच्या शत्रूंहून कितीतरी जास्त उत्तेजित झाले होते, ज्याची गणती करता येणार नाही. दुसरे म्हणजे अरबी युद्ध म्हणजे व्यक्तिगत मामला असायचा. स्वतःचे शौर्य दाखवून नाव गाजविण्याचा प्रयत्न प्रत्येक अरबी योद्धा करीत असे. ईश्वराच्या श्रद्धेमुळे मुसलमानांच्या मनातून असला 'दुबळेपणा' नाहीसा झाला होता. अरबी इतिहासात ठरविलेल्या कृती करण्यासाठी फौजांना जमवून, त्यांची रांगांमध्ये योजनाबद्ध आखणी करून, त्यांना आज्ञा करणारे, पैगंबर हे पहिली व्यक्ती होत. त्यांनी व्यक्ती म्हणून लढण्यापेक्षा, एक गट म्हणून लढायला हवे, ह्या गोष्टीवर भर दिला. कुरैशांची व्यक्तिगत शक्ती, एकीच्या शक्तीने हाणून पाडण्याची तीव्र इच्छा मुसलमानांच्या मनात निर्माण झाली.

'चांगल्या मजबूत बांधणीच्या इमारतीप्रमाणे, रांगांमध्ये ईश्वरकार्यार्थ लढणारी फौज ईश्वराला (अतिशय) प्रिय होते.' (कुरआन, ६१:५)

ईश्वरावरची नितांत श्रद्धा आणि एकीने लढण्याची पात्रता, ह्या दोन गोष्टींमुळे, ह्या बदरच्या युद्धात, मुसलमानांना इस्लामच्या इतिहासातला पहिला विजय प्राप्त झाला.

**इस्लामचा विजय**

बदरच्या युद्धामुळे कुरैश चिडून अधिकच उत्तेजित झाले व त्यातून अनेक युद्धे निर्माण झाली. ह्यातली नोंद घ्यावी अशी म्हणजे उहदचे युद्ध (हिजरी सन ३) व खंदकाचे युद्ध (हिजरी सन ५), जी काही वर्षांच्या अवधीमध्ये घडली. मुसलमानांना ह्या युद्धांमध्ये अनेक अडचणींना तोंड द्यावे लागले. खंदकाच्या लढाईत ज्या ८०० जणांनी भाग घेतला, त्या सर्वांना थंडी, उपासमार व दमणूक ह्या गोष्टींना तोंड द्यायला लागले. ह्याचा परिणाम इतका भयंकर होता की, पैगंबरांनी त्यातल्या कुणीतरी एकाने हेरगिरीसाठीचा हल्ला करावा असे सुचविले, त्यावेळी कुणीही पुढे झाले नाही. प्रसंगोपात्तरीत्या पैगंबरांनी स्वतःच हे काम हुज़ैफा ह्यांच्यावर सोपविले.

मदिनेच्या ज्यूंबरोबर सातत्याने काहीना काही प्रश्न चालूच राही, जे कुरैशांना मिळून मुसलमानांच्या विरोधात सातत्याने काही ना काही कपट कारस्थान करत राहत. खंदकाचे युद्धाच्या वेळी मदिनेला वीस दिवस वेढा पडला होता. शेवटी, वाळूच्या एका मोठ्या वादळाने

कुरैशांना मक्केला परत जायला लावले. ह्या वेळेपर्यंत ज्यूंचे कुरैशांशी असलेले सहकार्य स्पष्ट झाले होते. हे साटेलोटे उघडे पडल्यावर मात्र पैगंबरांनी मुसलमानांना ज्यूंच्या दटावण्या, धमकावण्यापासून मुक्त करायचे ठरविले. बनो नज़ीर, बनो क़ैनुक़ा आणि बनो कुरायझा ह्या तीन ज्यू टोळ्या मदिनेमध्ये व मदिनेच्या आसपास विखुरलेल्या होत्या. खंदकाच्या युद्धानंतर लवकरच त्यांना वेढण्यात आले व त्यांच्या स्वतःच्या ज्यू कायद्यानुसारच त्यांना देशद्रोही ठरवून मदिनेतून हद्दपार करण्यात आले. त्यांनी मुसलमानांना मदिनेमध्येच धोका निर्माण केला होता, तो अशा रीतीने कायमचा निकाली काढण्यात आला.

ह्यानंतर खैबरचा प्रश्न निर्माण झाला. मदिनेपासून दक्षिणेस ४०० कि.मी. अंतरावरील मक्केतले कुरैश व उत्तरेस २०० कि.मी. अंतरावरील खैबरचे ज्यू ह्यांच्यादरम्यान मुसलमानांचे एक बेटच जणू मदिनेत निर्माण झाले. ज्यू आणि कुरैश हे मुसलमानांशी सारखेच शत्रूत्व जरी करीत होते तरी त्यांच्यापैकी कुणा एकाची, मुसलमानांना एकटेच अंगावर घ्यायची टाप होत नव्हती आणि म्हणूनच मुसलमानांच्या विरुद्ध एकत्र कृती करण्याच्या योजनेसंबंधी वाटाघाटी त्यांच्यात सुरू झाल्या होत्या. मुसलमानसुद्धा दोन्ही शत्रूंना एकदम तोंड द्यायला समर्थ नव्हते.

ह्या पार्श्वभूमीवर हिजरी सनाच्या सहाव्या वर्षी पैगंबर दैवी अंतःप्रेरणेने, १४०० लोकांबरोबर मक्केच्या दिशेने निघाले. त्यांनी हे अगदी स्पष्ट केले होते की, मुसलमानांना कुणाशीही लढायचे नाही व ते फक्त उमऱ्याची यात्रा करण्यासाठी निघाले आहेत. मुसलमानांबरोबर बळी द्यायला नेण्यात येणारे उंट, हा त्यांच्या शांतीच्या हेतूंचा सर्वात मोठा पुरावा होता. बलीचे चिन्ह, ज्याला कलादा म्हटले जाते, तेसुद्धा उंटांना चढविण्यात आले होते, ज्यामुळे मक्केतल्या लोकांना, ते बळीचेच उंट आहेत ह्याची खात्री पटली असती. मुसलमानांना पवित्र काबागृहाचे धार्मिक व व्यापारी महत्त्व नष्ट करायचे आहे, ही कुरैशांच्या मनात निर्माण झालेली भीती नष्ट करणे, हा सुद्धा हेतू ह्या प्रवासामागे होता.

कुरैश मुसलमानांना मक्केत येण्यापासून रोखण्यासाठी पुढे चाल करून आले, जे पूर्णतया अपेक्षित होते. दोन्ही बाजूकडले लोक मक्केपासून ११ कि.मी. अंतर असलेल्या हुदायबिय्या येथे एकत्र आले. विनाकारणचा संघर्ष होऊ न देण्याविषयी अतिउत्सुक असलेल्या पैगंबरांनी त्याच क्षणी तिथेच मुक्काम करण्याचा, तळ ठोकण्याचा निर्णय घेतला. नंतर त्यांनी कुरैशांकडे निरोप पाठविला व दोन्ही बाजूंच्या दरम्यान शांती व्हावी असा तहाचा प्रस्ताव मांडला. त्यांनी त्यांच्या दूतांना बजावून सांगितले की, ते कुणाशीही युद्ध करायला आलेले नाहीत हे स्पष्ट करण्यात यावे. 'आम्ही यात्रेकरू म्हणून आलो आहोत. युद्धाने कुरैशांचे भरपूर नुकसान होऊन, त्यांना दुबळे बनविले आहे. जर त्यांची इच्छा असेल तर मला त्यांच्याशी तह करायचा आहे. ते माझ्या व मक्केच्या आसपासच्या लोकांमध्ये ढवळाढवळ करायला येणार नाहीत, ह्याची त्यांनी काळजी घ्यावी. जर मी श्रेष्ठ ठरलो तर त्यांनी इतरांनी स्वीकारलेला धर्म स्वीकारायची त्यांची इच्छा असल्यास, त्यांना तसे करता येईल आणि जर मी श्रेष्ठ शाबीत झालो नाही तर कुरैशांनी पाहिजे तसे वागण्याची मुभा त्यांना असेल. जर कुरैशांनी ह्या तहाला नकार दिला तर माझ्या धर्म

रक्षणासाठी मला त्यांच्याशी लढावे लागेल. ह्यात मला माझा जीव गमवावा लागला तरी मला त्याची पर्वा नाही आणि (शेवटी) परमेश्वराची इच्छा जी असेल त्याचप्रमाणे घडेल.' (बुखारी)

कुरैशांच्या हृदयातील मृदुतेलाच पैगंबर आवाहन करीत होते. हे ह्या निरोपाच्या पद्धतीवरून कुणाच्याही ध्यानी यावे. ज्यावेळी पैगंबरांनी मक्केत प्रथमच त्यांच्या सार्वजनिक कार्याला सुरुवात केली, त्यावेळेस उत्बा इब्ने रबिया हे कुरैशांचे प्रतिनिधी म्हणून त्यांच्याकडे आले होते. ज्यावेळी ते कुरैशांकडे परतले, त्यावेळी ते कुरैशांना म्हणाले:

'ह्या माणसाला त्याचे अंगीकृत कार्य करण्यासाठी सोडून देऊयात. ईश्वरसाक्ष, तो हे काम कधीच सोडून देणार नाही. अरबांमध्ये प्रचार करण्यापासून त्याला रोखू नका. जर त्यात तो यशस्वी झाला तर त्याचा बहुमान हा तो तुमच्यातलाच एक असल्याने तुमचा असेल. जर त्यांनी त्याला पराभूत केले तर त्यांना धन्यवाद द्या. तुम्ही त्याच्यापासून आपोआपच मुक्त व्हाल.'

(अल् बिदायाह् वा अल् निहायाह्)

कुरैश ज्या तऱ्हेने विचार करीत असत. त्याच्याशी मिळते जुळते असे हे आवाहन होते. शेवटी शत्रूच्या बाजूने त्यांच्या शांती पुढाकाराला पाठिंबा देणारे लोक निर्माण करण्यात पैगंबरांना यश आले.

पैगंबरांनी कुरैशांना हा निरोप पाठविला व त्याचबरोबर कुरैशांवर प्रभाव टाकण्यासाठी काही गोष्टी सुरू केल्या. बनो किनानाह पैकी एकजण ज्यावेळी मुस्लिमांच्या हेतूंची खात्री करून घेण्यासाठी मक्केहून पुढे आला त्यावेळी तो येणार हे कळाल्यावर, बनो किनानाह बलीच्या उंटांविषयी जो आदर दाखवित तो जाणून, आपल्या लोकांना ते त्या माणसाला ज्यावेळी भेटायला जातील त्यावेळी बरोबर बलीचे उंट ठेवण्यास सांगितले. त्यांनी तसे करून यात्रेच्या वेळची प्रार्थना म्हणायला सुरुवात केली, 'ईश्वरा, इथे आम्ही तुझ्या सेवेसाठी जमलो आहोत...' ही प्रार्थना म्हणत म्हणतच ते त्या माणसाला सामोरे गेले. कुरैशांचा दूत हे पाहून फारच भारावून गेला. त्याने मक्केला परत गेल्यावर कुरैशांना सांगितले की, मुसलमान नक्की फक्त यात्रेसाठी आले आहेत. त्यांच्या येण्यापाठीमागे दुसरे कोणतेही कारण नाही व म्हणून त्यांना यात्रेची परवानगी देण्यात यावी.

ईश्वरावरती श्रद्धा दाखविणाऱ्या १४०० मुसलमानांचे एकत्रित दृश्य, कुरैशांच्या मनात अत्यंत खोल प्रभाव पाडणारे असे होते. ज्यावेळी त्यांचा एक प्रतिनिधी भेटण्यासाठी मुसलमानांच्या तळावर आला, त्यावेळी मुसलमान रांगा करून पैगंबरांच्या पाठीमागे नमाज़ पढण्यासाठी उभे होते. ईश्वरपूजकांच्या योजनाबद्ध, शिस्तीने, नमाज़ पढण्यामुळे तो फारच प्रभावित झाला. तो कुरैशांकडे परत गेल्यावर त्याने त्यांना सांगितले की, मुसलमान एक घटक म्हणून हालचाली करत होते. मोहम्मदने एखादी हालचाल केली की, त्याचे अनुयायी त्याबरहुकूम वागत होते. पैगंबर वज़ू करीत असताना, त्यांच्या अंगावरचे पाणी जमिनीवर पडण्याआधी ते झेलण्यासाठी मुसलमान धावत होते, हे दृश्य दुसऱ्या एका दूताने पाहिले. पैगंबर ज्यावेळी बोलू लागत त्यावेळी त्यांच्यामध्ये पसरणाऱ्या शांतीची दखल त्या दूताने घेतली. पैगंबरांविषयीच्या

आदराने कुणीही मुसलमान त्यांच्या डोळ्याला डोळा भिडवून बोलत नाही हेही त्याने पाहिले. मुसलमानांच्या, त्यांच्या नेत्याविषयी असलेल्या निष्ठा व प्रेमाच्या ह्या वर्णनामुळे, दूताने हे सर्व सांगितल्यावर, कुरैशांवर त्याचा फारच प्रभाव पडला. उर्वा इब्ने मसूद त्यांना म्हणाले, 'काय तुम्ही माझ्या बापासारखे व पुत्रासारखे नाहीत काय? लोकांनी त्यांना ते म्हणतात तसेच अगदी असल्याचे सांगितले. 'तुम्ही माझ्याविषयी कुठल्याही तऱ्हेची शंका बाळगता काय?' लोकांनी नाही म्हणून सांगितले. 'मग मी सांगतो तसे करा. ह्या माणसाने (मोहम्मदनी) तुमच्यासमोर अतिशय चांगला प्रस्ताव मांडला आहे. तो मान्य करा व त्याची सिद्धता करण्यासाठी मला त्याच्याकडे जाऊ द्या.' (अल् बिदायाह् वा अल् निहायाह्)

ईश्वराच्या कायद्याच्या विरुद्ध जाणाऱ्या मागणी व्यतिरिक्त दुसरी कुठलीही मागणी मान्य केली जाऊ शकते हे पैगंबरांनी प्रथमतः स्पष्ट  केले. कुरैशांनी तहाची कलमे ठरत असताना ते दाखवू शकतील तेवढा, प्रत्येक बाबतीत दुराग्रह त्यांनी दाखविला. 'मोहम्मद, ईश्वराचा पैगंबर, हे तहनाम्यातील शब्द काढून त्याजागी त्यांनी 'मोहम्मद अब्दुल्ला–पुत्र' हे शब्द घालायला लावले. 'ईश्वराच्या नावाने, जो सर्वांचे भले करणारा व परमदयाळू आहे' ह्या शब्दरचनेऐवजी त्या शब्द रचनेवर हल्ला चढवून, 'हे ईश्वरा, तुझ्या नावाने' ह्या शब्दांचाच आग्रह त्यांनी धरला. कुठल्याही कुरैशाने, जर तो मुसलमानांना येऊन मिळाला, तर त्याला कुरैशांकडे परत करण्यात येईल अशी एक अट त्यांनी घातली. एखादा मुसलमान जर कुरैशांना मिळाला तर त्याला मात्र मुसलमानांकडे परत करण्यात येणार नव्हते. मुसलमानांना त्यावर्षी यात्रेची परवानगी नाकारण्यात आली. ह्या अटी मुसलमान सहकाऱ्यांना सहन होणे शक्य नव्हते. उर्वा इब्ने मसूद ह्यांनी शेरा मारला की, पैगंबरांनी त्यांच्याभोवती गोळा केलेल्यांपैकी जवळजवळ सर्वजण त्यांना सोडून जाऊ लागले. पण पैगंबर स्वतः मात्र कुठल्याही प्रकारे उत्तेजित झाले नाहीत. त्यांनी कुरैशांच्या सर्व अटी मान्य केल्या व कुरैशांशी दहा वर्षांसाठी शांतीचा तह केला. हा तह मोडीत निघेपर्यंत, मुसलमानांविरुद्ध प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष आगळीक करण्यापासून कुरैशांना ह्या तऱ्हेने रोखण्यात आले.

मुसलमानांच्या हृदयावर ह्या तहाने इतका बोजा पडला की, तह पूर्ण झाल्यावर, बरोबर आणलेल्या उंटांचा बली देण्यासाठी पैगंबरांनी वारंवार बोलावूनही कुणी मुसलमान पुढे येईना. अत्यंत जड अंतःकरणाने शेवटी ते उंटांचा बली देण्यासाठी सिद्ध झाले. त्यांनी मुंडन केल्यावर, ते एकमेकांचे गळेच कापण्यासाठी तयार झाले होते की काय, असे वाटावे अशा जखमा त्यांच्या चेहऱ्यांवर झाल्या होत्या. इतके त्यांचे दुःख तीव्रतर होते. तह घडत असताना ज्या अटी अपमानकारक व गैरफायद्याच्या वाटत होत्या, त्या असल्या तहानेच भविष्यात पुढे त्यांना अपरिमित फायदा मिळवून दिला. जणू हा तह त्याकरिताच घडविण्यात आला होता.

तह होण्याच्या काळात, मक्केचे कुरैश व खैबरचे ज्यू हे दोन प्रमुख शत्रू मुसलमानांशी संघर्ष करीत होते. एकाच वेळी दोन्ही शत्रूंचा समाचार घेण्याइतकी शक्ती मुसलमानांजवळही नव्हती. एकावर हल्ला करणे, म्हणजे दुसऱ्याला मदिनेवर पाठीमागून हल्ला करण्याची सुवर्णसंधी देण्यासारखे होते. ज्यामुळे मुसलमानी वर्चस्वाचा प्रदेश नाहीसा होणार होता. आता पैगंबरांनी

कुरैशांच्या सर्व अटी मान्य करून, अख्ख्या दहा वर्षांचा शांतीचा करार त्यांच्याशी घडवून आणला होता. आता त्यांना मुसलमानांविरुद्ध चाल खेळता येणार नव्हती. अशा तऱ्हेने कुरैशांना मार्गातून बाजूला काढल्यावर पैगंबर त्यांचे लक्ष खैबरच्या ज्यूंवर केंद्रित करू शकणार होते. हुदाय्बिय्याच्या तहानंतर ज़ु अल् क़दा (ज़िकद) (हिजरी सन ६) ताबडतोब खैबरच्या ज्यूंवरचा हल्ला (मुहर्रम, हिजरी सन ७) हाती घेण्यात आला. वीस हजारांचे लष्कर खैबरमधल्या एकंदर प्रबळ व प्रचंड अशा आठ गढ्यांभोवती जमा झाले. ह्या गढ्यांमध्ये अत्यंत प्रगत अशी संरक्षण सिद्धता उपलब्ध होती. किल्ल्यांनी मजबूत अशा ह्या शहराला जिंकून घ्यायची कहाणी चांगली लांबलचक आहे. अपूर्व अशा लष्करी कौशल्याच्या पद्धती हे शहर जिंकण्यासाठी वापरण्यात आल्या. जवळ जवळ पन्नास लोकांनी उचलून धरलेल्या, एका महावृक्षाच्या खोडाने, ह्या शहराचा दरवाजा तोडण्यात आला. ह्या खोडाचे काही धक्के दरवाजा तोडायला पुरेसे होते, ज्यामुळे बाणांच्या व दगडांच्या प्रचंड वर्षावामध्ये मुसलमानांना शहरामध्ये प्रवेश करता आला. चार गढ्या अशा तऱ्हेने जिंकण्यात आल्या. उरलेल्या चारांनी शरणागती पत्करली. त्यांनी आपणहून दरवाजे उघडले व गढ्या मुस्लिमांच्या ताब्यात देण्यात आल्या.

ह्या काळात कुरैश शांत राहिले. पैगंबरांची अंतःप्रेरणा सांगत होती की, कुरैशांबरोबर युद्धासाठी रणात उतरण्याआधी, त्यांनी तहाचा भंग करण्याची वाट पाहणे इष्ट होते. कुरैशांनी मुसलमानांशी केलेल्या लढाईमुळे निर्माण झालेल्या नकारात्मक व दुःखाच्या भावनांची जाणीव पैगंबरांना होती. कुरैश हे मुसलमानांविरुद्ध द्वेष, मत्सर, घृणा, हावरेपणा व माजखोरपणा ह्या गुणांसह एकत्र आलेले असल्याने ते मुसलमानांविरुद्ध अनैतिक व निष्कारण चाल फार मोठ्या काळापर्यंत रोखून धरू शकणार नाहीत, हे पैगंबरांना बरोबर समजले होते. त्यांचा अंदाज बरोबर ठरला. हिजरी सन ८ च्या शाबान महिन्यात खुज़ाआ व बनो बक्र ह्या टोळ्यांमध्ये संघर्ष छेडला गेला. हुदाय्बिय्याचा तह धडधडीतपणाने मोडून टाकून कुरैशांनी त्यांच्या मित्रांना, खुज़ाआच्या विरुद्ध चांगला भरभक्कम पाठिंबा दिला. ह्यामुळेच खुज़ाआ विरुद्ध ते हल्ला करू धजावले. हुदाय्बिय्याच्या तहानंतर फक्त दोनच वर्षांनी हा प्रसंग घडला. दरम्यानच्या काळात पैगंबरांबरोबरच्या लोकांचा आकडा १५०० वरून वाढून १०,००० झाला होता. त्यांच्याबरोबर गुप्तपणाने पैगंबर मक्केवर चालून गेले. त्यांची योजना इतकी मुत्सद्देगिरीची व बुद्धीचातुर्याची होती की, मक्का कुठल्याही तऱ्हेचा रक्तपात न होता जिंकली गेली.

'ईश्वराने तुम्हाला मिळणार असलेल्या कितीतरी फायद्यांविषयी तुम्हाला वचन दिले होते जे त्याने अशा रीतीने फार लवकरच पूर्ण केले आणि त्याने तुमच्यामधल्या लोकांचे हात आपल्या ताब्यात ठेवले आहेत.' (कुरआन, ४८:२०)

ज्यावेळी हुदाय्बिय्याचा तह झाला त्यावेळी पैगंबरकार्याची वीस वर्षे पूर्ण झाली होती. इस्लामचा संदेश सर्व अरबी द्वीपकल्पात पसरला होता. प्रत्येक टोळीत अशी काही माणसे होती की, ज्यांच्या हृदयात इस्लामचे बीज रोवले गेले होते. पण तरीही कुरैशांकडेच नेते म्हणून पाहण्यात येत होते. इस्लामचे सत्यत्व कळलेले कितीतरी जण कुरैशांच्या भीतीने त्यांची धर्मश्रद्धा

जाहीर करण्यास कचरत होते. ते हे जाणून होते की, आपण मुसलमान असल्याचे जाहीर करणे, म्हणजे अरबस्तानातल्या सर्वात प्रबळ टोळीशी, युद्ध जाहीर करणे. आता त्यांना कळाले होते की, मुसलमानांनी व कुरैशांनी येणारी दहा वर्षे कुठल्याही तऱ्हेचा संघर्ष न करण्याचा करार केला आहे. मुसलमान बनणाऱ्यांचा कुठल्याही तऱ्हेचा सूड अथवा त्यांच्याविरुद्ध कुठलीही कृती आता कुरैश करू शकणार नाहीत हे त्यांना माहीत झाले होते. आता लोकांना इस्लाम स्वीकारण्यापासून रोखणारे दुसरे काहीच शिल्लक राहिले नव्हते. जणू इस्लामच्या दरवाजापाशी खूप मोठा जमाव जमला होता व हुदाय्बिय्याच्या तहाने हा दरवाजा उघडला गेला आणि सर्व जमाव एकसाथ ह्या दरवाजातून आतमध्ये आला. इब्ने शाहाब अल ज़हरी व इतर काही जणांनीही नोंद केली आहे की, दुसऱ्या कुठल्याही मोहिमेपेक्षा हुदाय्बिय्याच्या तहाने मुसलमानांना जास्त लाभ घडले. दोन वर्षांनंतर पैगंबर १०,००० च्या फौजेनिशी मक्केवर चालून गेले, तर त्यापूर्वी फौजेचा आकडा फारतर ३००० पर्यंत पोहोचला होता. इस्लामच्या स्वीकारापासून रोखणारा सर्वात मोठा अडथळा दूर केल्याने हे घडले होते. हा अडथळा म्हणजे इस्लामचे नाव काढताच कुरैशांमध्ये उत्पन्न होणारा क्रोध व चीड. हुदाय्बिय्या येथे उपस्थित असलेल्या मुसलमानांपैकी बराह् हे एक होत. नंतरच्या काळात ते लोकांना जे सांगत त्याची बुखारींनी नोंद करून ठेवली आहे. लोकांना मक्केवरचा विजय म्हणजे मोठा विजय वाटे; पण बराह् त्यांना सांगत की, सहाबा मात्र हुदाय्बिय्याच्या शांती करारालाच अजोड विजय मानीत असत.

मदिनेच्या आर्थिक बंधनाच्या नाड्या हातात ढिल्या झाल्या. व्यापारी तांड्यांना मदिनेहून मक्केला व मक्केहून पुढे दुसरीकडे जाण्याची परवानगी मिळाली. पण ह्या करारामुळे अबू जंदल, अबू बसीर आणि दुसऱ्या काही जणांना मात्र, ज्यांनी इस्लाम स्वीकारला होता, त्यांना तहाच्या अटीनुसार कुरैशांच्या स्वाधीन करावे लागले. पण लवकरच ते पळून गेले व त्यांनी ज़ुल मर्वाकडे आश्रय घेतला. ह्या ठिकाणी इतके मुसलमान एकत्र आले की, ते मुसलमानांसाठी एक नवीनच वाढीला लागलेले केंद्र म्हणून ख्यातीस आले. तिथे राहून ते, कुरैशांच्या व्यापारी तांड्यावर प्रचंड नुकसान करणारे गनिमी हल्ले चढवीत असत. ह्यामुळे कुरैशांना त्यांचा, मुसलमानांना जाऊन मिळणाऱ्या कुरैशांना, कुरैशांकडे परत करण्याचा हट्टाग्रह सोडून द्यावा लागला.

हुदाय्बिय्यापासून शिकायचा सर्वात मोठा धडा म्हणजे एखाद्याने संयम सोडून देता कामा नये व बाह्यात्कारी रूपाला बळी पडू नये (दिसते तसे नसते), हा आहे. बाह्यात्कारी गैरफायद्याच्या वाटणाऱ्या ह्या तहाने प्रत्यक्षात मात्र मुसलमानांना खूप संधी उपलब्ध करून दिल्या. ज्यांना अंतर्दृष्टी होती अशीच माणसे ह्या संधींना पाहू शकत होती. इब्ने असाकीर ह्यांनी हजरत अबू बकर ह्यांच्या, हुदाय्बिय्याविषयीच्या काही प्रतिक्रिया नोंदवून ठेवल्या आहेत. ते म्हणाले, ‘मुसलमानांचा व इस्लामचा तो सर्वात मोठा विजय होता. जरी त्या दिवशी, मोहम्मद व त्याच्या ईश्वरामधले गुप्त खलबत जाणून घेण्याची पात्रता व दृष्टी लोकांमध्ये नव्हती. लोकांना धीर

नसतो पण ईश्वराचे तसे नाही. त्याच्या इच्छेनुरूप जोपर्यंत घडत नाही, तोवर तो घटनांना त्यांच्या प्रवाहानुसार जाऊ देतो.' खरोखर वास्तवतावादच फक्त ह्या दुनियेमध्ये यश देऊ शकतो; पण लोकांना ताबडतोब व आयते मिळणारे यश हवे असते आणि त्यांना यशापर्यंत पोहोचायच्या लांबचलांब रस्त्यावरून, सावकाश चालत जायची इच्छा नसते.

खैबरची मोहीम संपवून, पैगंबर नव्या मोहिमेची तयारी करण्यात गुंतले. त्यांनी त्यांचे उद्दिष्ट इतके गुप्त ठेवले की, प्रत्यक्ष अबूबकरना सुद्धा फौजा कुठल्या रोखाने चालल्या आहेत, हे पैगंबरांनी सांगितले नव्हते. हिजरी सन ८ रमज़ान महिन्यात, ज्यावेळी मुसलमानांना प्रत्यक्षात मक्केच्या दिशेने वळण्याची आज्ञा देण्यात आली त्याचवेळी त्यांना कळाले की, इतकी तयारी कशाची चालली होती? त्यांची ही चढाई इतक्या पराकाष्ठेच्या गुप्ततेने व लपतछपत चालली होती की, मुसलमान मर्रुझ झहरान जवळ येऊन पोहोचल्यावर सुद्धा कुरैशांना, मुसलमान त्यांच्यावर चालून येत असल्याची पहिली बातमी समजली नव्हती. मोहिमेवर निघताना पैगंबरांनी ईश्वराला साकडे घातले होते की, 'कुरैशांचे हेर व माहिती काढणाऱ्या लोकांना मुसलमानांनी मक्का शहरात प्रवेश करेपर्यंत रोखण्यात यावे.'

मक्केवरच्या चढाईची तयारी करताना, ती मक्केच्या चढाईकरिता करण्यात येत आहे, हे गुप्त राखण्यात पैगंबरांनी आश्चर्यकारक व बेजोड असे यश मिळविले. त्यांनी हुकूम दिले होते की, मदिनेचा उर्वरित अरबस्तानशी संपर्क तोडण्यात यावा. कुणालाही शहरात येण्याची वा शहर सोडून जाण्याची परवानगी ह्या हुकूमान्वये नाकारण्यात आली. अलींच्या नेतृत्वाखालील एक विशेष सुरक्षा पथक मदिनेचे रस्ते रोखून धरण्यासाठी पाठविण्यात आले. त्यांनीच हातिब इब्ने अबी बल्ताच्या निरोप्याला गिरफ्तार केले, जो मक्केतल्या लोकांना, त्यांच्या शहराला होऊ शकणाऱ्या धोक्याची सूचना, देणारे पत्र घेऊन जात होता. इब्न अब्बास ह्यांचा खात्रीलायक संदर्भ देऊन तबरानी म्हणतात, 'प्रत्येक टोळीने मनुष्यबळ व उपलब्ध होऊ शकणारे, सर्व तऱ्हेचे शस्त्रबळ ह्या मोहिमेसाठी पुरविले.' कुणीही मागे शिल्लक उरले नव्हते. १०,००० च्या फौजेला अनेक शेकड्यांमध्ये विभागण्यात आले होते. सैन्याची प्रत्येक तुकडी ही रांगांमधून तिच्यासमोर असलेल्या ध्वजधाऱ्याच्या पाठीमागे शिस्तीने चालत होती. अबु सुफ्यान जो मुसलमानांचा अतिशय जुना, कट्टर विरोधक होता. त्याला आपले काका अब्बास ह्यांच्याकरवी पैगंबरांनी मुसलमानांची फौज पाहण्यासाठी बोलाविले. अबू सुफ्यानने डोंगराच्या एका निरुंद खिंडीपाशी उभे राहून, रांगांमधून रांगांनी येणारी मुसलमानी फौज पाहिली. त्याचा त्याच्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. तो उत्स्फूर्तपणाने म्हणाला, 'ह्या फौजेशी लढायची ताकद कुणामध्ये आहे? मी असली फौज ह्यापूर्वी कधीच पाहिली नव्हती.' अशा रीतीने अबू सुफ्यानवर फार मोठा प्रभाव टाकण्यात पैगंबर यशस्वी झाले. त्याचवेळी त्यांनी जाहीर केले की, अबू सुफ्यानच्या घरामध्ये आसरा घेणारा प्रत्येक जण, सुरक्षित राहील. ह्याचा परिणाम असा घडला की, मोहम्मदशी लढू शकेल असे मक्केमध्ये कुणी नसल्याने, खुद्द अबू सुफ्याननीच मक्केतल्या लोकांना पैगंबरांपुढे शरणागती पत्करण्याचे आवाहन केले. मक्का जिंकल्यानंतर ज्या घटना घडल्या, त्यावरून इतका

निष्कर्ष सहज काढता येतो की, युद्धाची जय्यत तयारी ही रक्तपातासाठी करण्यात आलेली नव्हती. तर ही तयारी अशासाठी करण्यात आली होती की, मक्केकर भिवून जाऊन शरण यावेत व ह्यामुळे संघर्षाची गरज न भासता, इस्लामसाठी, रक्तपाताविना मक्का सहज जिंकली जावी. मुसलमानी फौज मक्केजवळ येऊन पोहोचल्यावर तिचा एक नेता साद इब्ने उबादा हा ओरडून म्हणाला, 'आजचा दिवस हा खरोखरचा युद्धाचा दिवस होय!' पैगंबरांनी त्याला हा दिवस युद्धाचा नसून क्षमेचा असल्याचे सांगितले. सादला त्यानंतर पायउतार होण्यास सांगितले जाऊन, ध्वज त्याच्याऐवजी त्यांच्या मुलाच्या हातात देण्यास सांगण्यात आले.

मक्काविजयानंतर जरूर असलेल्या काही मोहीमा चालविण्यात आल्या. पैगंबरांनी नेतृत्व केलेल्या एकूण मोहिमांची संख्या जवळजवळ ऐंशी भरते; पण आता अरबस्तानच्या राजधानीचा ताबा मुसलमानांकडे आल्याने, ह्या पुढच्या मोहिमा म्हणजे छोट्याशा झटापटी म्हणायला हव्यात. अशा तऱ्हेने संपूर्ण अरबस्तान शरण येऊन अरबस्तानने पैगंबरांचा, एकमेव नेता म्हणून स्वीकार केला.

# १३ विजय आणि त्यानंतर...

**जे**त्यांमध्ये सर्वसाधारणतः दोन प्रकार आढळून येतात. अभिमान बाळगणारे किंवा सूड घेणारे. इस्लामच्या पैगंबरांनी मात्र हिजरी सन ८ मध्ये, मक्का जिंकून घेतल्यावर ह्यापैकी कुठलीच गोष्ट दाखविली नाही. त्यांचा विजय हा ईश्वराच्या पैगंबरांचा विजय होता. इब्ने इसहाक सांगतात की, मक्केमध्ये शिरत असताना पैगंबरांची मान विनयाने इतकी झुकली होती की, त्यांची दाढी, उंटाच्या खोगीराला स्पर्श करीत होती. त्यांचा विजय झाल्याच्या क्षणीही त्यांची विनम्रता, ही अशी होती. काबागृहाच्या दरवाजाशी उभे राहून त्यांनी भाषण केले. त्या भाषणामध्ये ते म्हणाले:

'ईश्वरावाचून दुसरा कुणीही खरोखर, सेवेला लायक नाही. त्याने त्याचे वचन पूर्ण केले आहे व त्याच्या गुलामाला (सेवकाला) अन्नपाण्याची व इतर सर्व तऱ्हेची मदत व निवारा, अशी दैवी मदत देऊ केली आहे. त्याने स्वतःच एकट्याने शत्रूच्या यजमान लोकांना (आज) नीच पातळीवर नेऊन ठेवले आहे.' (अल् बिदायाह वा अल् निहायाह)

त्यांनी दुसऱ्या कुठल्याही शब्दांनी विजय व्यक्त केला नाही वा विजयावर दावा सांगितला नाही. त्यांनी विजयाचे सर्व श्रेय ईश्वराकडे दिले. भाषणाच्या उर्वरित भागात ते कुरैशांना म्हणाले:

'मी तुमच्याशी आता कसा वागेल असे तुम्हाला वाटते?' आम्हाला वाटते की, तुम्ही आम्हाला चांगली वर्तणूक द्याल. कारण तुम्ही आमचे श्रेष्ठ भाऊ आहात व आमच्या श्रेष्ठ भावाचे पुत्र आहात,' कुरैश उत्तरले. पैगंबर म्हणाले, 'पैगंबर युसूफ त्यांच्या भावांना जे म्हणाले तेच मी तुम्हाला म्हणतो, आजच्या दिवशी कुठल्याही तऱ्हेचा सूड नको, जा तुम्ही स्वतंत्र आहात.' (इब्ने क़य्यम, ज़ाद अल माद)

अशा रीतीने पैगंबरांनी सूड बाजूला ठेवला व अशा तऱ्हेने, त्यांच्या नवीन नागरिकांची होणारी वाईट प्रतिक्रिया त्यातल्या प्रत्येक शक्यतेसह नाहीशी केली. रणांगणात पराभव झालेले राष्ट्र सर्वसाधारणपणाने भरभक्कम प्रतिकाराचा अवलंब करण्याकडे वळते. सार्वजनिक माफी जाहीर करून, पैगंबरांनी अशा तऱ्हेच्या प्रतिकाराची कळीच खुडून टाकली. इस्लामचा किल्ला तोडण्याकरिता जे बळ वापरले जाऊ शकले असते, ते बळ अशा तऱ्हेने उलट त्या किल्ल्याच्या बांधणीकडे व मजबूतीकडे वळविले गेले.

मक्का शहर जिंकल्यावर ज्यावेळी पैगंबर मक्केत प्रवेशले, त्याचवेळी त्यांनी त्यांच्या सेनापतींना आज्ञा दिली की जोपर्यंत त्यांच्यावर कुणी हल्ला करीत नाही, तोपर्यंत त्यांची सेना कुणाशीही युद्ध करणार नाही. त्यांच्याविरुद्ध हल्ला करणाऱ्या सर्वांनाच त्यांनी सरसकट माफी देऊन टाकली. फारच थोड्यांचा, 'त्यांनी जरी काबागृहाच्या पडद्याआड आश्रय घेतला तरीही,' वध करायचे ठरले होते, त्यांनाच देहांताची शिक्षा फर्माविण्यात आली. इब्ने हिश्शाम ह्यांनी व पैगंबरांच्या इतर चरित्रकारांनी प्रत्येकाचा स्वतंत्र उल्लेख केला आहे. इथे आता, त्यातल्या प्रत्येक

नावाबरोबर त्या प्रत्येकाने केलेल्या गुन्ह्याचे स्वरूप व त्यांना प्रत्यक्षात मिळालेल्या वर्तणुकीचे स्वरुप थोडक्यात पाहूयात.

१) अब्दुल्ला इब्ने सादः हा मुसलमान बनला होता व पैगंबरांनी कुरआनचे लिखाण करण्याकरिता ह्याची नेमणूक केली होती. त्याने नंतर स्वधर्माचा त्याग केला व तो नास्तिकपक्षाला जाऊन मिळाला. मक्केच्या विजयानंतर ज्यावेळी त्याला पैगंबरांनी आपल्याला देहदंड दिला आहे हे समजले त्यावेळी त्याने आपले दूधभाऊ उस्मान ह्यांच्याकडे आसरा घेतला. उस्माननी त्याला निवारा दिला व नंतर त्याला घेऊन ते पैगंबरांकडे गेले व त्याला परत मुसलमान करून घेण्याविषयी विनंती करू लागले. पैगंबर शांत राहिले. उस्माननी दुसऱ्यांदा विनंती केल्यावर पैगंबरांनी त्याची निष्ठेची शपथ स्वीकारली व त्याला परत मुसलमान करून घेतले. उमर व उस्मान ह्यांच्या खिलाफतीच्या काळात, पुढे हा इजिप्तचा राज्यपाल बनला. आफ्रिकेच्या विजयामध्ये ह्याचा सिंहाचा वाटा राहिला.

२) अब्दुल्ला इब्ने ख़तलः ह्याने सुरुवातीला इस्लाम स्वीकारला होता व पैगंबरांनी सदक़्याचा (धर्मदायाचा) कर गोळा करण्यासाठी त्याला पाठविले होते.

अन्सारांपैकी एकजण व एक गुलाम त्याचेबरोबर धाडण्यात आले होते. प्रवासामध्ये एका मुक्कामी, बरोबरच्या गुलामाला त्याने भोजनासाठी कोंबडी बनविण्यास सांगितले. पण गुलाम झोपी गेला व त्यामुळे जेवण वेळेवर बनू शकले नाही. अब्दुल्ला इब्ने ख़तल ह्यांने संतापाच्या भरात, गुलामाचा जीव घेतला. तो जर मदिनेला परतला तर पैगंबर जीवहत्येच्या नुकसान भरपाईची (म्हणजे त्याच्या जीवाची) मागणी करतील ह्या भीतीने त्याने स्वधर्माचा त्याग केला व नास्तिकपक्ष धरला. हा कवीसुद्धा होता व पैगंबरांची निंदानालस्ती करणारी कवने रचीत असे. मक्का जिंकून घेतल्याच्या दिवशी ह्याने स्वतःला काबागृहाच्या पडद्यात बांधून घेतले. पैगंबरांना हे कळल्यावर त्यांनी त्याचा अगदी त्याचजागी वध करण्याची आज्ञा दिली. अबु बुर्झा अस्लमी व सईद इब्ने हरीस, ह्यांनी, काळी शीला (हजेरे अस्वद) व इब्राहीम स्थळ ह्या दरम्यानच्या जागेत त्याचा वध केला.

३) फर्तनाः ही अब्दुल्ला इब्ने ख़तलकडची गुलाम दासी होती. ही सुद्धा पैगंबरांची निंदानालस्ती करणारी कवने गात असे. कुरैशांच्या दारू पिण्याच्या समारंभातला तिचा नाच ही गोष्टठरून गेल्या सारखी होती. तिचाही तिच्या मालकाबरोबरच वध करण्यात आला.

४) कुर्तबाः ही सुद्धा अब्दुल्ला इब्ने ख़तलची गुलाम दासी होती व हिचासुद्धा फर्तनासारखाच व्यवसाय होता. तिच्या वधाची आज्ञा देण्यात आली होती. पण तिने पैगंबरांकडे येऊन क्षमा मागितली व आश्रय मागितला. तिची विनंती मान्य झाली. पुढे ती मुसलमान बनली.

५) हुवैरिस इब्ने नक़िझ इब्ने वहबः हा अजून एक कवी होता. पैगंबरांची निर्भर्त्सना करणाऱ्या कवनांचा ढीग रचून त्याने नाव कमविले होते. त्याला इस्लाम हा प्रखर टीकेचा विषय वाटत असे. अब्बास इब्ने अब्दुल मुत्तालिब आणि पैगंबराच्या मुली, मक्केहून मदिनेला परत येत असताना, ह्याने त्यांचा पाठलाग केला आणि त्यांच्या उंटाला भाल्याने भोसकले. उंट बिथरून

मागे सरकला व पैगंबरांच्या मुली उंटावरून फेकल्या जाऊन जमिनीवर पडल्या. ह्याच्या वधाची आज्ञा देण्यात आली, जी अलींनी अंमलात आणली.

६) मिक्यस इब्ने सुबाबाः हा हिश्शाम इब्ने सुबाबा, ह्यांचा भाऊ. ज़िकराद मोहिमेच्या वेळी एका अन्साराकडून चुकीने हिश्शाम मारला गेला. ह्यानंतर मिक्यस मदिनेला आला व त्याने इस्लाम स्वीकारला. त्याने पैगंबरांकडे भावाच्या मृत्यूच्या नुकसानभरपाईची मागणी केली, जी मान्य करण्यात आली. तो काही दिवस मदिनेत राहिला. आपल्या भावाच्या मृत्यूला जबाबदार असणाऱ्याचा त्याने वध केला व मक्केला पळून जाऊन स्वधर्माचा त्याग केला. पैगंबरांनी त्याचा वध करण्याची आज्ञा दिली. नुमैला इब्ने अब्दुल्ला लैसी ह्यांनी त्याचा शिरच्छेद केला.

७) साराः इक्रिमाह इब्ने अबू जहलची गुलाम दासी. पैगंबरांची निंदानालस्ती करीत धांगडधिंगा घालण्यामध्ये तिला मौज वाटत असे. तिच्या वधाची परवानगी देण्यात आली होती. पण तिने पैगंबरांकडे येऊन आश्रय मागितला जो तिला देण्यात आला. पुढे ही मुसलमान बनली. ही उमर ह्यांच्या खिलाफतीपर्यंत जिवंत राहिली.

८) व ९) हारस इब्ने हिश्शाम व झुएर अबी उमैय्या ह्यांचासुद्धा वध होणार होता. पण त्यांनी आपल्या नातेवाईकाच्या घरात आश्रय घेतला. उम्म हानी बिंत अबी तालिब ही ती नातेवाईक होय. अली त्यांच्या पाठलागावर निघाले व त्यांनी त्यांना जिवंत न सोडण्याची शपथ वाहिली. उम्म हानीने, अलींचा रस्ता अडवून धरला. दोन्ही पळपुट्यांना तिच्या घरात कुलूपबंद केले व ती पैगंबरांना भेटण्यासाठी गेली. आपण आश्रय दिलेल्या दोघा जणांना अलींनी मारायचे ठरविले आहे, असे तिने पैगंबरांना सांगितले. 'तू ज्यांना आपल्यापाशी घर दिलेस त्या निर्वासितांना आम्हीसुद्धा घर दिले व तू ज्यांना आश्रय दिलास त्यांना आम्हीसुद्धा आश्रय दिला,' पैगंबर तिला म्हणाले. अलींना, त्या दोघांना सोडून द्यायची आज्ञा देण्यात आली, जी अलींनी मान्य केली.

१०) इक्रिमाह इब्ने अबू जहलः बापाच्या पावलावर पाऊल टाकून इतकीही तडजोड न करता मुसलमानांना विरोध करणाऱ्यांपैकी एक. मक्केमध्ये आपला शेवट जवळ आला आहे हे जाणून तो येमेनला पळून गेला. त्याची बायको, उम्म हकीम बिंत हारीस हिने इस्लाम स्वीकारला होता. तिने तिच्या नवऱ्याच्या वतीने पैगंबरांकडे आश्रय मागितला, जो तिला देण्यात आला. ती येमेनला आपला नवरा इक्रिमाह ह्याला आणण्यासाठी गेली. तो तिच्याबरोबर परत आला व पैगंबरांच्या स्वहस्ते मुसलमान बनला. त्याच्या मुसलमान बनण्यानंतर त्याने इस्लामकरिता कितीतरी वैयक्तिक व आर्थिक त्याग सोसले. शेवटी अबू बकर ह्यांच्या खिलाफतीच्या काळात अज्नदीन येथे भोंदू नास्तिकांशी लढत असताना त्याला वीरगती प्राप्त झाली.

११) हब्बार इब्ने अल अस्वदः हा मुसलमानांच्या फार मोठ्या छळाला जबाबदार होता. पैगंबरांची मुलगी ज़ैनब, जी अबू अल आस ह्यांची पत्नी होती. त्या एकदा मक्केहून मदिनेला येत असताना ह्याने त्यांच्या उंटाच्या पोटाला एका बाजूकडून भोसकले. ह्यामुळे उंट उधळला व ज़ैनब जमिनीवर फेकल्या गेल्या. त्या त्यावेळी गर्भवती होत्या. त्यांचा फक्त गर्भपातच झाला असे

नव्हे, तर ह्या वाईट घटनेचे त्यांच्या तब्येतीवर झालेले परिणाम, त्यांना पुढे जन्मभर भोगायला लागले. ह्याचाही वध करण्याच्या आज्ञा दिल्या गेल्या होत्या. पण हा पैगंबरांकडे आला व क्षमायाचना करू लागला, 'ईश्वराच्या पैगंबरा, मी अज्ञानातून केलेले गुन्हे माफ करा. मला मुसलमान होऊ देत.' त्याला क्षमा करण्यात आली.

१२) वहशी इब्ने हर्बः हा पैगंबरांचे काका हमज़ा ह्यांच्या मृत्यूला कारणीभूत ठरला होता. आपण जर मुसलमानांच्या हातात सापडलो तर नक्कीच ते आपला वध करतील हे जाणून तो मक्केहून ताएफला पळून गेला. नंतर तो मदिनेमध्ये पैगंबरांच्या समोर आला. स्वतःच्या गुन्ह्यांबद्दल त्याने क्षमायाचना केली आणि इस्लाम स्वीकारायची आपली इच्छा व्यक्त केली. पैगंबरांनी त्याची क्षमायाचना मंजूर करून त्याला मुसलमान करवून घेतले. तोतया पैगंबर मुसैलेमाह ह्याच्या विरूद्धच्या लढाईत, हजरत अबु बकर ह्यांच्या खिलाफतीच्या काळात त्याने भाग घेतला. शेवटी त्यानेच मुसैलेमाहचा शिरच्छेद केला. शस्त्रसुद्धा तेच होते, ज्याने हजरत हमज़ा ह्यांना हौतात्म्य बहाल केले होते.

१३) काब इब्न ज़ुहैर : एक प्रसिद्ध कवी. हा पैगंबरांची निंदानालस्ती करणारी कवने लिहीत असे. मक्का विजयाच्या वेळी जीवाच्या भीतीने हा पळून गेला. त्याला देहदंड सुनावण्यात आला. पण नंतर तो मदिनेला आला व त्याने क्षमायाचना केली. पैगंबरांनी आपली निष्ठेची शपथ (कलमा) मान्य करावी अशी विनंती तो करू लागला. त्यांनी काबाला आपले कांबळे भेट दिले व तिथल्या तिथे त्याची निष्ठेची शपथ मान्य केली

१४) हरिस इब्ने तलातीलः हा एक कवी होता. आपल्या कवितांच्या माध्यमांतून पैगंबरांवर चिखलफेक करण्याचे काम तो इमानेइतबारे करीत असे. मुसलमानांना त्याला ठार मारण्याची परवानगी देण्यात आली. हे काम अली ह्यांनी केले.

१५) अब्दुल्ला इब्ने ज़िवारी : अजून एक कवी. पैगंबरांविषयीचा राग तो त्याच्या कवितांमधून व्यक्त करीत असे. पैगंबरांनी त्याला ठार मारण्याची शिक्षा दिल्यावर तो नज्रानला पळून गेला. नंतर तो परत पैगंबरांकडे आला. त्याने पश्चाताप व्यक्त केला व इस्लाम स्वीकारला. पैगंबरांनी त्याला क्षमा केली.

१६) हुबैरा इब्ने अबी वहब मक्ज़ूमीः हा सुद्धा एक कवी होता. जो पैगंबरकार्याची सातत्याने अवहेलना करीत असे. ह्याचे नाव मृत्युदंड द्यायच्या लोकांच्या यादीमध्ये होते. तो नज्रानला पळून गेला व तिथेच त्याचा नास्तिकपणातच अंत झाला.

१७) हिंद बिंत उत्बाः अबू सुफयानची पत्नी. तिचा मुस्लिमद्वेष इतका तीव्र होता की, उहदच्या युद्धात तिने हजरत हमज़ांच्या मृतदेहातून यकृत वेगळे काढले व चावून टाकले. तिलाही ठार मारायचे होते; पण ती पैगंबरांपुढे आली व तिने क्षमायाचना केली व इस्लाम स्वीकारला. पैगंबरांनी क्षमायाचना मान्य करून तिला ज्यावेळी मुसलमानांच्यात दाखल करून घेतले त्यानंतर घरी गेल्यावर तिने घरातल्या सर्व मूर्ती तोडून टाकल्या व ती म्हणाली. 'खरोखर तुम्हीच आम्हाला चुकीच्या मार्गाने नेत होतात.'

एवढी माहिती घेतल्यावर हे पुरेसे स्पष्ट होते की, ज्या सतरा जणांना मृत्युदंडाची सजा फर्माविण्यात आली होती, ते विशिष्ट गुन्ह्यांमध्ये गुन्हेगार होते; पण ज्यांनी स्वतःहून क्षमायाचना केली अथवा ज्यांच्यावतीने दुसऱ्या कुणीतरी क्षमायाचना केली, त्या सर्वांना क्षमा करण्यात आले. ज्यांनी कसल्याच तऱ्हेने क्षमेची मागणी केली नाही अशांनाच फक्त मारण्यात आले. ज्या सतरा जणांना मृत्युदंड देण्यात आला होता, त्यातल्या अकरा जणांना प्रत्यक्षातः अथवा कुणीतरी त्यांच्यावतीने माफी मागितल्याने माफ करण्यात आले. पाच जणांना, ज्यांनी कुठल्याही तऱ्हेने माफी मागितली नाही, अशांना ठार करण्यात आले. एक जण मक्केतून पळून गेला व अतिदूरच्या प्रदेशात त्याला नैसर्गिक मृत्यू आला.

मक्केवरचा विजय ध्यानी घेता ईश्वराच्या नजरेत दोषी ठरले होते, अशांना पैगंबरांनी का बरे माफ केले? फातिमा नावाच्या बनो मकज़ूम टोळीतली एका बाईने ज्यावेळी चोरी केली, त्यावेळी तिच्या आप्तस्वकीयांना आता तिचा हात तोडून टाकण्याची शिक्षा तिला मिळेल, अशी भीती वाटायला लागली. ते लोक उसामा इब्ने ज़ैद ह्यांच्याकडे पोहोचले. त्यांना असे वाटले की, उसामा हे पैगंबरांचे निकटवर्ती असल्याने त्यांनी सांगितले तर नक्कीच शिक्षेत सूट मिळू शकेल. उसामा पैगंबरांकडे गेले व त्यांनी फातिमा मकज़ूमीच्या वतीने पैगंबरांकडे क्षमायाचना केली. पैगंबर शब्दशः निराश व हताश झाले, ज्यावेळी (प्रत्यक्ष) उसामांनी क्षमायाचना केली. 'ईश्वराने घालून दिलेल्या सीमारेषेचे उल्लंघन करण्यासाठी तर तुम्ही माझी मानसिक तयारी करीत नाहीयात ना?' पैगंबरांनी उसामांना विचारले. ह्यानंतर पैगंबरांनी लोकांना एकत्र गोळा करून एक भाषण दिले: 'माझ्या आत्म्यावरती ज्याची सत्ता चालते त्याची (ईश्वराची) शपथ माझ्या मुलीने, फातिमाने जरी चोरी केली असती, तरी तिलासुद्धा मी हात तोडण्याची सजाच फर्माविली असती.' फातिमा मकज़ूमीला, तिला जी शिक्षा मिळणार होती, तीच मिळाली. ह्यानंतर तिला पश्चात्ताप झाला व ती एक नीतीशुद्ध व उदात्त व्यक्तिमत्त्वाची स्त्री बनली. (बुखारी आणि मुस्लिम)

ह्याचा अर्थ असा की, ईश्वराने ठरविलेल्या श्रद्धेत दुसरा कुणीही (लुडबुड करून) बदल करू शकत नाही. मग असे असूनही मक्केच्या विजयानंतर मात्र पैगंबरांनी लोकविलक्षण औदार्याने काही लोकांना क्षमा केली हे कसे? ह्याचे कारण एवढेच की, युद्धजन्य परिस्थितीतले गुन्हे व सर्वसाधारण परिस्थितीमध्ये घडणारे गुन्हे ह्यांच्यामध्ये फरक असतो. सर्वसाधारण परिस्थितीत केल्या जाणाऱ्या गुन्ह्यांच्या शिक्षेमध्ये लोकांना सवलत दिली जाऊ शकत नाही. युद्धकाळात घडलेले गुन्हे मात्र ह्या उलट माफ केले जाऊ शकतात. जर गुन्ह्याचे नीच कृत्ये करणाराने, त्याच्यातली शत्रूबुद्धी सोडून देऊन क्षमायाचना केली, तर असे गुन्हे माफ केले जाऊ शकतात. सर्वसाधारण परिस्थितीत घडणाऱ्या गुन्ह्यांची भरपाई ही गुन्हेगाराला त्याबाबत ईश्वराने ठरवून दिलेली शिक्षा मिळाल्यावरच होऊ शकते. युद्धातील गुन्ह्यांची भरपाई मात्र शरणागती व क्षमायाचना ह्यांमधूनसुद्धा होऊ शकते. अरबस्तानातल्या मुस्लिम–शत्रूंनी मुसलमानांविरुद्ध अतिशय ओंगळ व अघोरी स्वरूपाचे गुन्हे केले होते. पण असे असूनसुद्धा कुरआनने जाहीर केले की, त्यांनी जर पश्चाताप व्यक्त केला तर भूतकाळातले सर्व काही माफ केले जाईल. (८:३८)

ह्याहून पुढे जाऊन, शत्रूने जर शांती प्रस्ताव मांडला तर तो मान्य केला पाहिजे. जर अगदी अशा प्रस्तावाच्या अटी मोडल्या जाण्याची शक्यता असली तरीही.

'जर त्यांनी शांती घडवून आणण्याची इच्छा दाखविली तर त्यांच्याशी शांती प्रस्थापित करा व ईश्वरावर भरोसा ठेवा. खरोखर तो सर्व काही ऐकणारा व जाणणारा आहे. जर त्यांनी तुम्हाला फसवायचे ठरविले तर ईश्वर तुमची काळजी वाहायला समर्थ आहे. त्याने तुम्हाला मदत देऊन प्रबळ बनविले आहे व तुमच्या भोवती श्रद्धावंतांना गोळा केले आहे.'

(कुरआन, ८:६१–६२)

ज्यांना मृत्यूची शिक्षा सुनावण्यात येऊन नंतर माफ केले गेले; अशांमध्ये इक्रिमाह इब्ने अबी जहल हा एक होता. त्याच्या वडलांच्या बरोबरीने तो मुसलमानांचा एक कृतिशील विरोधक राहिला व पैगंबरांना व सहाबांना छळण्याची एकसुद्धा तऱ्हा त्याने सोडली नाही; पण ज्यावेळी बातमी आली की, इक्रिमाह मुसलमान बनण्यासाठी येत आहेत त्यावेळी पैगंबरांनी त्यांच्या सहकाऱ्यांना इक्रिमाहच्या वडिलांविषयी अपमानकारक बोलू नका असे सांगितले. 'कारण मृतांना घातलेल्या शिव्या ह्या जिवंत लोकांना त्रासदायक ठरतात,' पैगंबर म्हणाले.

ह्या औदार्यामुळेच मक्केच्या विजयापूर्वी इस्लामचे जे कट्टर व न नमणारे विरोधक होते, तेच लोक पुढे जाऊन इस्लामच्या धर्मश्रद्धेचे खंदे समर्थक व संरक्षक बनले.

# १४ पैगंबर पदाचा शेवट

**पै**गंबरांच्या पैगंबरकार्याच्या सुरुवातीच्या एका वर्षी एक मनुष्य मक्केला यात्रेनिमित्त आला होता. तो त्याच्या गावी परत गेल्यावर, मक्केमध्ये त्याने नवीन असे काय काय पाहिले अशी विचारणा झाली.

मोहम्मदने पैगंबर असल्याचा दावा केला आहे. पण नाव घेता येण्याजोगा एकच माणूस, म्हणजे अबी कहाफा ह्यांचा पुत्र, हा त्याचा अनुयायी बनला आहे, त्या माणसाने सांगितले. ह्या उत्तरावरून सुरुवातीला लोक पैगंबरांविषयी, इ.स. ६१० मध्ये कसा विचार करीत होते, हे कुणीही सांगू शकेल. ह्यावेळी पैगंबरकार्याची नुकतीच सुरुवात झाली होती. त्या दिवसांमध्ये त्यांचे विरोधक त्यांचा उल्लेख एक खेडवळ वेडपट मनुष्य असल्यासारखा करीत. ते त्यांना इब्ने अबी कबशा म्हणून हाक मारीत. इब्ने अबी कबशा म्हणजे त्यांना (तान्हेपणी) सांभाळणाऱ्या त्यांच्या खेड्यातल्या आई–वडिलांचा मुलगा. अर्थात हे सर्व त्यांची विटंबना करण्यासाठीच असे. ज्यांना अजून थोडे सभ्य असावे, असे वाटे, ते पैगंबरांचा उल्लेख 'कुरैशांपैकी एक तरुण मनुष्य', असा करीत.

पैगंबरांच्या हयातीमध्ये त्यांचा उल्लेख अशाच रीतीने होत राहिला. आता, काही शतके उलटून गेल्यावर मात्र परिस्थितीत फारच बदल घडला आहे. मोहम्मद पैगंबरांचे पैगंबरत्व ही वादाची गोष्ट न राहाता आता ती एक प्रस्थापित झालेली सत्य गोष्ट आहे. आता ज्यावेळी कुणी पैगंबर मोहम्मदांचा विचार करतो त्या वेळी मनामध्ये इतिहासातली एक फार मोठी व श्रेष्ठ अशी व्यक्ती उभी राहते. ती व्यक्ती गेली १५०० वर्षे पिढ्यानपिढ्या अशी कायमच्या चर्चेचा विषय बनली आहे. जर इस्लामच्या पैगंबरांपासून हा सर्व इतिहास दूर केला तर लोकांच्या मनात परत ते फक्त 'इब्ने अबी कबशा' म्हणूनच शिल्लक राहातील. जर असे घडायचे असते तर ह्या दुनियेतल्या मुसलमानांची आजची अब्जावधीची संख्या न दिसता ती हाताच्या बोटावर मोजण्याइतकी थोडी शिल्लक राहिली असती. ह्या विधानाबाबतच्या शंकेस तिळमात्र जागा नाही. 'इब्ने अबी कबशा' हे रूप धारण करून येणाऱ्या पैगंबराला पैगंबर म्हणून ओळखणे ही एक अतिशय अवघड गोष्ट आहे. ऐतिहासिक महापुरुष म्हणून ज्याची प्रतिष्ठापना झाली आहे, अशा माणसाला मान्यता देणे, ही गोष्ट ह्या उलट अतिशय सोपी आहे. इस्लामच्या पैगंबरांनी कुरआनने वर्णिलेली 'स्तुती व वैभवाची जागा' (१७:७९) मिळविली आहे. मग जर अब्जावधी माणसे त्यांची स्तुती गात असतील तर कुणाला फार आश्चर्य वाटायला नको.

अगदी ह्याच घटकामुळे ह्या पूर्वीच्या काळातल्या पैगंबरांनाही त्यांच्या लोकांनी पैगंबर म्हणून नाकारले. 'हा एक अगदी साधा माणूस! आतापर्यंत आम्ही त्याला त्याच्या नेहमीच्या नावाने ओळखत असू. आता मात्र अचानक हा ईश्वराचा प्रेषित कुठून झाला?' लोक असे विचारीत असत. ज्या ज्या वेळी पैगंबर आले त्या त्या वेळी त्यांच्या लोकांनी हाच आक्षेप घेतला.

ह्या गोष्टीचा पैगंबरांच्या समकालीन लोकांना, त्यांना पैगंबर मानण्यामध्ये व त्यांची शिकवण मान्य करण्यामध्ये, सर्वात मोठा अडथळा असे.

प्रत्येक पैगंबराकडे त्याचे पैगंबरत्व सुरू झाल्यावर अशाच तऱ्हेच्या संशयाने व संभ्रमाने पाहिले जाते. आपल्या सारख्याच दिसणाऱ्या कुणातरी माणसामध्ये पैगंबर म्हणून विश्वास ठेवणे ही गोष्ट अनेक लोकांना फार दुस्तर वाटते. कारण असे करण्यामध्ये त्यांना एक मानसिक अडथळा जाणवत असतो. आपल्यासारखाच तर होता, अशा तऱ्हेचा तो अडथळा असतो. ज्यावेळी प्रेषितांना ओळखण्यात त्यांची चूक केली त्यावेळेस ईश्वरी कायद्याप्रमाणे त्यांना शिक्षा देण्यात आली.

आता ईश्वराने असा प्रेषित पाठवायचे ठरविले की, जो हा अडथळा पार करेल. त्याच्या प्रेषितत्वाविषयी शंकेला इतकासुद्धा वाव शिल्लक राहाणार नाही, की त्याचा प्रेषितत्वाचा दावा खरा की, अतिउत्साही महत्त्वकांक्षेतून तो निर्माण झाला होता अशी शंका कुणाला वाटावी. त्याने इतिहासात ईश्वराचा पैगंबर हे त्याचे स्थान पटकावावे. काळाच्या अतिविशाल समुद्रांमध्ये दीपस्तंभासारखे उभे राहून त्याने लोकांना ईश्वरश्रद्धेकडे खुणावीत बोलवावे. लोकांना ईश्वराचा पैगंबर म्हणून त्याची ओळख पटण्यात अडचण न यावी. तसेच त्याच्यावर श्रद्धा ठेवण्यात व ईश्वराचे शाश्वत आशीर्वाद, त्याच्याबरोबर भागीदारी करून मिळविण्यात, लोकांना अडचण न यावी.

प्रेषित वचने गोळा करणाऱ्या कितीतरी परंपरांनी सांगितले आहे की, पैगंबर एकदा म्हणाले होते, की त्यांच्या अनुयायांची संख्या ही दुसऱ्या कुठल्याही प्रेषितांच्या अनुयायांच्या संख्येपेक्षा जास्त असेल. वर दिलेला मुद्दा मांडण्याचा हा दुसरा मार्ग आहे. मोहम्मद पैगंबरांनंतर (त्यांना शांती लाभो) दुसरा कुणीही माणूस पैगंबर होणार नाही. त्यांच्या अनुयायांना परत कधीही श्रद्धा व अश्रद्धा ह्यांमधून निवड करावी लागणार नाही. शेवटच्या दिवसापर्यंत (कयामतपर्यंत) ते संख्येने (कायम) वाढतच राहतील.

हा मुद्दा इस्रायलच्या इतिहासाकडे जर आपण नजर टाकली तर चटकन स्पष्ट होऊन लक्षात येईल. येशू ख्रिस्त ह्यांच्या काळातले ज्यू, ईश्वराचा कायदा हा मूसा (मोझेस) ह्यांना तो मिळाला होता, त्याप्रमाणे पाळत. तरीही एक नवा पैगंबर मरीयमचा (मेरीचा) पुत्र त्यांच्यामध्ये निर्माण झाला. त्यावेळी त्याच्यावर विश्वास ठेवण्यात त्यांना अपयश आले. त्यांच्या ऐतिहासिक पैगंबरांवर त्यांचा विश्वास होता; पण येशू ह्यांच्या बारा शिष्यांव्यतिरिक्त बाकी सर्व जणांनी त्यांच्या समकालीन पैगंबरांना मात्र नाकारले. ह्यानंतर सातशे वर्षांनी अरबस्तानच्या पैगंबराला पाठविले गेले. ह्या वेळेपर्यंत जगातल्या ख्रिश्चनांची संख्या चांगली वाढली होती. इतिहासाची मात्र पुनरावृत्ती होणार होती. ख्रिश्चन इस्माईली पैगंबरावर विश्वास ठेवण्यास तयार नव्हते; कारण त्यांचा असा समज होता की, सारे पैगंबर इस्रायलीच असायला हवेत. परत एकदा त्यांनी त्यांचा विश्वास ऐतिहासिक प्रेषितामध्येच, जीझसमध्येच कायम केला व समकालीन प्रेषितावर, मोहम्मद ह्यांच्यावर विश्वास ठेवला नाही. फारच थोड्या ख्रिश्चनांनी, ज्यांनी इस्लाम स्वीकारला त्यांना

वगळता, जीझस ह्यांच्या अनुयायांनी त्यांच्यानंतरच्या वारसावर मात्र, विश्वास दाखविला नाही.

पैगंबरपद संपुष्टात आणण्यात आले आहे. ह्यासाठी (आपण ईश्वराचे) आभार मानायला हवेत. कारण मोहम्मदच्या अनुयायांना ह्यानंतर प्राचीन प्रेषित व आधुनिक प्रेषित ह्यांच्यामधून निवड करायची वेळ परत कधीही येणार नाही. परत कधीही नाही– ह्या सध्याच्या जगात तरी त्यांना जुन्या व नव्यामधून निवड करावी लागणार नाही. जे ऐतिहासिक प्रेषितांच्या लोकसमूहाला समकालीन पैगंबराने भेट दिल्यावर नेहमी घडत राहिले होते. पैगंबर मोहम्मद ह्यांची इतिहासाचा शिरपेच म्हणून प्रतिष्ठापना करण्यात आली आहे. कुरआनने ह्या ऐतिहासिक अग्रस्थानाचे वर्णन 'स्तुती व वैभवाची जागा' (१७:७९) म्हणून केले आहे. 'सर्व राष्ट्रांवरची कृपा' (२१:१०७) असे त्यांचे वर्णन कुरआन ज्यावेळी करते, त्यावेळी त्यांचे असे असण्यामधला, सर्वात महत्त्वाचा घटक हा, पैगंबरांचे अग्रस्थान हाच आहे. ऐतिहासिकदृष्ट्या मोहम्मद ह्यांचे ईश्वराचे पैगंबर, हे स्थान वादविषय नाही. हेच ते स्तुती व वैभवाचे स्थळ होय. पुनर्जागृतीच्या (कयामतच्या) दिवशी त्यांना विशेष दैवी महत्व देऊन ते सिद्ध केले जाईल.

पैगंबरांचे स्तुती व जयजयकाराच्या जागी झालेले उत्थापन ही एक साधी निवड प्रक्रिया होती, असे समजणे, मूर्खपणाचे होईल. त्यांच्या पैगंबरीनंतर मनुष्यमात्राच्या इतिहासात एका नव्या अध्यायाची सुरुवात झाली. सर्वोच्च नैतिक पात्रतेचा मनुष्यच फक्त ह्या पदासाठी निवडला जाऊ शकत होता. ज्याची तुलना नाही अशा तऱ्हेने जो आत्मसमर्पण व आत्म संयमनयुक्त धीरोदात्तपणा दाखवू शकणार होता, अशा माणसाची पैगंबर होण्यासाठी गरज होती. ह्या कामासाठी मोहम्मद ह्यांची नियुक्ती करणे ईश्वराला युक्त वाटले.

'तुम्ही जे कपडे अंगाभोवती गुंडाळले आहेत, त्यातून बाहेर येऊन उभे राहा व (लोकांना) धोक्याची सूचना द्या. तुमच्या ईश्वराची भव्यता वर्णा, तुम्ही घातलेले कपडे स्वच्छ करा व सर्व तऱ्हेच्या प्रदूषणापासून दूर राहा. कुठल्यातरी मिळकतीची अपेक्षा बाळगून (कुणावर) उपकार करू नका. ईश्वराखातर संयम पाळा.' (कुरआन, ७४:१–७)

कपड्यांमध्ये गुंडाळला गेलेल्या महान आत्म्याने, हाकेला उत्तर दिले व दैवी योजनेमध्ये मनापासून समर्पण करून भाग घेतला. अर्थात पैगंबरपद देण्याआधी ईश्वराने त्यांची अनेक वेळा कठोर परीक्षा घेतली. ज्यात ते उत्तीर्ण झाले व अशा रीतीने त्यांचे पैगंबरपद, ही सर्व जगासाठीची कृपा असणारे स्थान झाले. एकामागोमाग एक, सातत्याने येत राहिलेले प्रेषित ही माणसाची एक कठोर परीक्षा होती. आता हे युग संपले आहे व शिल्लक राहिलेल्या काळामध्ये एकच मान्यताप्राप्त पैगंबर असणार आहे, ज्यामुळे ईश्वराच्या कृपेच्या न संपणाऱ्या मिरवणुकीमध्ये सामील व्हायला लोकांना शक्य होणार आहे.

अशारीतीने पैगंबरपद, हे मोहम्मद ह्यांच्याबरोबर, इतिहासातले एक कायमचे सत्य बनून राहिले. ह्याचा अर्थ, पैगंबरी संदेशामध्ये नवीन चेतना ओतण्यासाठी, अजून नवीन पैगंबरांची गरज उरली नाही. अर्थात दैवी जाहीरनामा सांगून फक्त पैगंबरपद संपुष्टात आणता येणार नव्हते. मानवी व्यवहारांच्या प्रत्येक पैलूविषयी दैवी आदेश देणारे पुस्तक (श्रुती) निर्माण

होणे आवश्यक होते. 'संपूर्णतया स्पष्ट केलेले कुरआन त्याने (ईश्वराने) तुमच्यासाठी निर्मिले आहे.' (कुरआन, ६:११४) कुरआनमधील या उल्लेखानुसार ही पहिली गोष्ट कुरआनच्या रूपाने सिद्ध केली गेली. नंतर जीवन व्यतीत करण्याचे एक सर्व दृष्टींनी परिपूर्ण उदाहरण माणसासमोर निर्माण करणे आवश्यक होते. मोहम्मद पैगंबर, हे अशा तऱ्हेचे 'चांगले उदाहरण' (कुरआन,३३:२१) माणसासमोर निर्माण करण्यात आले. तिसरे म्हणजे कुरआनच्या सर्वकालीन रक्षणाची जबाबदारी घेणे. सर्वशक्तिमान ईश्वराने हे काम स्वतःकडे ठेवले. 'ते आम्हीच होतो ज्यांनी कुरआन (मोहम्मदला साक्षात्काराच्या रूपाने) दिले व आम्ही नक्कीच त्याचे (कुरआनचे) संरक्षण करू.' (कुरआन,१५:९)

ईश्वर ह्यापूर्वी आलेल्या पैगंबरांना काही खुणा व चमत्कार ह्यांच्यानिशी पाठवित असे. ईश्वरी वाणी आपल्या लोकांना सांगत असताना, एकसुद्धा दगड फिरवून पाहाण्याचे सोडायचे नाही, अशा तऱ्हेचे सर्वव्यापी काम, आपल्या जबाबदाऱ्या निभावत असताना, प्रत्येक पैगंबराने केले. ह्या प्रक्रियेमध्ये त्यांच्याकडून काही चमत्कार घडत, ज्यायोगे लोकांना कळावे की, त्यांना ईश्वराने धाडले आहे. असे सर्व घडूनही जर लोकांनी त्यांच्यावर विश्वास ठेवायला नकार दिला तर त्याला ते पैगंबर तरी काय करणार? ह्यानंतर ईश्वराच्या देवदूतांची पाळी येई की, त्यांनी प्रत्यक्ष कृती करावी व नास्तिकांना शिक्षा करावी.

शेवटच्या पैगंबरांविषयी मात्र असा निर्णय घेतला गेला, की ते ज्या लोकांना हितोपदेश करीत होते, त्यांना, अशा तऱ्हेची दैवी शिक्षा दिली जाऊ नये. उलट स्वतः पैगंबर व त्यांच्या सहकाऱ्यांना सांगितले गेले होते की, 'जे अजूनही विश्वास ठेवण्यापासून परावृत्त होतात, त्यांना मुसलमानांच्या हातून शिक्षा मिळेल.' (कुरआन, ९:१४) ह्याचा दुसरा अर्थ म्हणजे, इतके दिवस जे काम देवदूतांकडून करून घेतले जाई, ते ह्यापुढे माणसांच्या हातून करून घेतले जाणार आहे.

पैगंबर मोहम्मद ह्यांना व त्यांच्या अनुयायांना, त्यांच्या समाजाने नाकारल्याने, त्यांना मदिनेला आश्रयार्थ स्थलांतर करावे लागले. नकाराला कुठलेही तार्किक कारण शिल्लक न राहीपर्यंत, त्यांनी ईश्वरीवाणी लोकांना सांगत राहाण्याचे काम चालू ठेवले. असे असूनही, पूर्वीच्या पैगंबरांच्या समाजाप्रमाणे त्यांच्यावर ईश्वराचा सर्वभक्षक प्रकोप घडला नाही. उलट पैगंबर व त्यांच्या सहकाऱ्यांनी त्यांचा रणांगणावर धुव्वा उडविला. ईश्वराचे साहाय्य त्याच्या सेवकांना होते व त्यामुळे ते त्यांच्या शत्रूविरूद्ध विजयी झाले आणि अशा रीतीने इस्लाम हा अरबी द्वीपकल्पाचा राज्य चालविणारा धर्म बनला.

तत्कालीन संदर्भ व प्रसंगानुसार दैवी आज्ञा देणे, ही ईश्वराची पद्धत असते. पैगंबरांचा धर्म हा त्यानंतरच्या जगाकरिता एक परिपूर्ण धर्म असणे आवश्यक होते व म्हणून त्यांच्या पैगंबरकार्याने, मानवी जीवनाच्या प्रत्येक अंगाला स्पर्श केला. असे घडल्यानेच वैयक्तिक व सार्वजनिक महत्त्वाच्या गोष्टींविषयीच्या धार्मिक पद्धती, पुढील पिढ्यांकरिता उपलब्ध होणार होत्या. गैरमुसलमानांच्या विश्वास न ठेवण्याच्या कृतीबद्दल, मुसलमानांनी शिक्षा करीत राहाण्याचे चालू ठेवल्याने, ईश्वराच्या धर्माची धर्मश्रद्धा पूर्ण होण्याच्या बेताला आली. सर्व तऱ्हेच्या

परिस्थितींना तोंड देण्याविषयी सांगणाऱ्या ईश्वरी आज्ञा हळूहळू येत होत्या. सर्व एकदम नव्हे, तर जसजशी परिस्थिती उद्भवत होती, तसतशा त्या हळूहळू, एकेक दिल्या जात होत्या. नास्तिकांना मुसलमानांच्या हातून शिक्षा द्यायच्या निर्णयाने धार्मिक पूर्णतेविषयी एक महत्त्वाची गोष्ट घडली. कारण मानवी जीवनात उद्भवणाऱ्या प्रत्येक परिस्थितीला पैगंबरांना तोंड द्यायला लागल्याने, इस्लामी तऱ्हेने जीवन व्यतीत करण्याच्या प्रत्येक पद्धतीविषयी त्यांना, त्यांच्या अनुयायांसमोर उदाहरणे घालून देता आली. घटना ज्या तऱ्हेने घडत गेल्या त्या तऱ्हेने पैगंबरांना हे दाखवून देता आले. ह्यामुळे फक्त घरातच, लोकांनी कसे वागावे हे न सांगितले जाता, त्यांनी रणांगणावर व सत्ता मिळाल्याच्या काळीही कसे वागावे, हे सांगितले गेले. त्यांच्यामध्ये जे उदाहरण निर्माण केले गेले, ज्यामध्ये जीवनाच्या सर्वांगाचा विचार आहे, ते, येणाऱ्या शेवटच्या दिवसांपर्यंत संरक्षिले जाईल.

ईश्वराने पैगंबरपदाचा शेवट केल्याने कुरआनच्या संरक्षणासाठी विशेष अशा आवश्यक घटनांची निर्मिती करण्यात आली. कुरआन, हे ईश्वरनिर्मित साक्षात्कार आहे. ह्यापूर्वीचे ईश्वरी साक्षात्कार जर शब्दशः जपले गेले नसले, तर त्याचे एक कारण म्हणजे, ह्या साक्षात्कारांचे जतन करणारी राजकीय सत्ता अस्तित्वात नव्हती. पण पैगंबर व त्यांच्या अनुयायांनी त्यांच्या शत्रूशी युद्ध करून, जगाच्या नजरेत भरेल अशा भागावर सत्ता निर्माण केली. ह्यामुळे ईश्वरी पुस्तकाला राजकीय संरक्षण लाभले. त्यामध्ये बदल करण्याची अथवा त्याला नष्ट करण्याची प्रत्येक शक्यता अशा रीतीने रद्दबातल ठरली. जवळ जवळ १,००० वर्षे, कुरआन हे एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे, इस्लामी सरकारच्या संरक्षणाखाली हस्तांतरीत होत राहिले. नंतर माणसाने छापखान्यांचा शोध लावला आणि मग तर कुरआन नष्ट व्हायचा धोका सर्वार्थाने संपला.

अर्थात हे सर्व सरळ साधेपणाने घडले, असे समजणे चुकीचे होईल. इस्लामला राज्यकर्ता धर्म म्हणून स्थापन करीत असताना व अशा रीतीने ईश्वरी पुस्तकाचे संरक्षण करण्याची तरतूद करीत असताना, पैगंबर व त्यांच्या सहकाऱ्यांना अपरिमित कष्ट व दुःखासह असा छळ व संकटे ह्यांचा सामना करावा लागला. मूर्तीपूजकांना तर चमत्कार पाहायला हवा होता. पैगंबरांना स्वतःलासुद्धा, त्यांच्या पैगंबरपदाची खात्री पटवून देणारे चमत्कार त्यांच्याकडून घडविले गेले असते, तर आवडले असते; पण असे व्हायचे नव्हते. ह्याच्याऐवजी, पैगंबरांचे चारित्र्य व वर्तणूक ह्यांनी चमत्काराची जागा घेतली. पैगंबरांच्या विरोधकांना कुठल्याही तऱ्हेची शिक्षा ईश्वराने स्वतः केली नाही. जशी त्याने ती, पूर्वीच्या पैगंबर नाकारलेल्या लोकांना केली होती. पूर्वीच्या नास्तिकांना शिक्षा करण्यासाठी, जे काम भूकंप व ज्वालामुखींनी केले होते, तेच काम आता पैगंबर व त्यांच्या सहकाऱ्यांना करायचे होते. ईश्वराचे पुस्तक सर्व काही एका वेळेस साक्षात्कारित करण्यात आले नाही. साक्षात्काराचा काळ एकुण तेवीस वर्षे राहिला. ह्या तेवीस वर्षांच्या काळात मुसलमानांना आयुष्यातली 'प्रत्येक नदी' व 'प्रत्येक पर्वत' पार करावा लागला. असे अशाकरिता केले गेले की, ईश्वराला त्याच्या सेवकांनी कशा तऱ्हेचे आयुष्य घालवायला हवे आहे, त्याचा परिपूर्ण नकाशा तयार व्हावा.

पैगंबर व त्यांच्या सहकाऱ्यांना ह्या काळात ज्या संकटांना तोंड द्यावे लागले त्यांनी तीव्र परिसीमा गाठली, ज्याचे वर्णन कुरआनने 'एक भयंकर थरकांप असे केले आहे,' (कुरआन,३३:११). विरोधकांबरोबर सुतळीच्या तोड्याची ही तडजोड करू नये अशी तीव्र व सक्त आज्ञा पैगंबरांना देण्यात आली होती (कुरआन, १७:७५). प्रसंग कितीही अवघड असला, तरीही पैगंबरांना व त्यांच्या सहकाऱ्यांना, ईश्वराची हाक आल्यावर 'पाठीमागे राहाण्याची' (कुरआन ९:११९) थोडीसुद्धा सवलत नव्हती. पैगंबरांच्या पत्नींनी जर फक्त दोन वेळेच्या जेवणाची मागणी केली, तरी त्यांना 'हे आयुष्य व त्यातल्या सुखसोयी एका बाजूला व ईश्वर आणि त्याचा प्रेषित दुसऱ्या बाजूला (कुरआन ३३:२८)'. ह्यातून तुम्ही निवड करायची आहे, असे त्यांना सांगण्यात येई.

'स्तुतीची व वैभवाची' जागा असणारे पैगंबरपद निर्मिणे ही संपूर्ण मानवी इतिहासातली एक अतिशय अवघड अशी गोष्ट होती. खुद्द पैगंबरांनी हे मान्य केले की, त्यांचा जसा छळ झाला, तसा तो ह्या आधी कुठल्याही पैगंबरांचा झालेला नाही. त्यांच्या पत्नी आयेशा ह्यांच्या शब्दात सांगायचे तर, 'पैगंबरांना मिळालेल्या वागणुकीने, त्यांचा अगदी चक्काचूर झाला.' ते व त्यांच्या सहकाऱ्यांनी आयुष्यातली सुखासीनता तर नाकारली होतीच; पण मोहम्मद पैगंबर यांचे पैगंबरपद, 'सर्व राष्ट्रांना झालेली कृपा,' बनावे म्हणून कितीतरी वेळा त्यांना आयुष्यातल्या प्राथमिक गरजांवरसुद्धा पाणी सोडावे लागले.

पैगंबर मोहम्मदांनी मानवी वंशावर केलेला हा सर्वात मोठा उपकार होय. ह्यामुळेच अगदी ह्या जगाच्या अंतापर्यंत त्यांच्या अनुयायांना, 'त्यांना शांती लाभो', अशी प्रार्थना करायला व शुभेच्छा द्यायला, सांगण्यात आले आहे. त्यांचे कुटुंब व सहकारी ह्यांचासुद्धा समावेश ह्या शुभेच्छांमध्ये आहे. कारण ते सर्वजण पैगंबरांना भल्याबुऱ्या, असणाऱ्या प्रत्येकवेळी त्यांचेबरोबर राहिले होते. ह्यात अनेक कर्मकठिण व दुस्तर घटनांचा समावेश आहे. जे इस्लामच्या पैगंबरांनी केलेले उपकार जाणतात, त्यांनी त्याविषयी कृतज्ञता व्यक्त करणे, हे नैसर्गिकच आहे. मुसलमान त्यांच्या पैगंबरांना ज्या (आशीर्वचनपूर्वक) शुभेच्छा (रेहमत व सलाम) देतात, त्या त्यांच्या कृतज्ञतेचे प्रार्थनेच्या रूपात व्यक्त झालेले रूप आहे. पैगंबर स्वतःच एकदा म्हणाले होते: 'माझे नाव ऐकून, 'मला शांती मिळो' अशा तऱ्हेच्या शुभेच्छा व आशीर्वचन देणार नाही, त्याला खरोखरचा कंजूष म्हणायला हवे.' (तिर्मिझी, नसाई)

# १५ कुरआन : पैगंबरांचा चमत्कार

प्रत्येक पैगंबराला, तो पैगंबर आहे हे ओळखले जावे, म्हणून ईश्वराने एकेक चमत्कार खूण म्हणून दिला होता. इस्लामच्या पैगंबरांचा चमत्कार म्हणजे कुरआन होय. पैगंबर मुहम्मद (त्यांना शांती लाभो) ह्यांची पैगंबरी शेवटच्या दिवसापर्यंत अधिकृत व अधिमान्यता मिळालेली अशी आहे. अर्थातच त्यांना दिलेला चमत्कार सर्वकालिक असायला हवा, हे साहजिकच आहे. म्हणूनच कुरआन हे, कायम टिकणारा चमत्कार म्हणून पैगंबरांना दिले गेले.

पैगंबरांच्या विरोधकांनी, पैगंबरांच्या पूर्वसूरी पैगंबरांनी जसे चमत्कार दाखविले, तशा चमत्कारांची मागणी केली. पण कुरआनमध्ये हे स्पष्टरीतीने सांगण्यात आले की, तशा प्रकारचे चमत्कार आता परत पाठविण्यात येणार नाहीत (कुरआन १७:५९). कुरआनने पुढे पैगंबरांना हे सुद्धा सांगितले:

'त्यांचा (तुमच्याविषयीचा) तिटकारा सहन करणे जर तुम्हाला शक्य नसेल, तर जर तुमच्यात काही सामर्थ्य असेल तर जमिनीतील एखादा भुयारी मार्ग शोधा किंवा आकाशाला शिडी लावा आणि त्यांच्यासाठी एखादा चमत्कार (तुमची खूण म्हणून) आणण्याचा प्रयत्न करा. जर अल्लाहची इच्छा असती तर त्याने नक्कीच ह्या सर्वांना मार्गदर्शन करून सन्मार्गाला आणले असते. (मग जर असे आहे तर) तुम्ही (तरी) अज्ञान पांघरू नका.' (कुरआन, ६:३५)

असा चमत्कार निर्माण करण्याऐवजी ईश्वरी वाणीला (कुरआनलाच) पैगंबरांचा चमत्कार बनविण्यात आले.

'ते विचारतात, 'त्याला त्याच्या ईश्वराने एखादा चमत्कार (खूण) का बरे दिला नाही?' तुम्ही सांगा: 'चमत्कार देणे न देणे हे ईश्वराच्या हातात आहे. माझे काम हे फक्त सूचना देण्याचे आहे. आम्ही तुम्हाला साक्षात्कारित केलेले पुस्तक जे (तुमच्याकडून व इतरांकडून) त्यांना पठन करून दाखविले जाते, ते (चमत्कार म्हणून) त्यांना पुरेसे नाही काय? खरोखर, ह्यामध्ये (पुस्तकामध्ये) खरोखरच्या श्रद्धावंतांसाठी आशीर्वचन व (वाईटापासून दूर राहण्याची) ताकीद सामावलेली आहे.' (कुरआन, २९:५०-५१)

कुरआनच्या दैवीपणाचे (ते चमत्कार असण्याविषयीचे) कितीतरी पैलू आपल्याला दाखविता येतील. इथे त्यातल्या फक्त तीन पैलूंवरच आपण लक्ष केंद्रित करणार आहोत.

१) कुरआनची भाषा -अरबी- ही इतर आंतरराष्ट्रीय भाषांचा विचार केल्यास शेकडो वर्षे जशीच्या तशी प्रचलित राहिली आहे.

२) ईश्वराच्या सर्व श्रुतींमध्ये (जुना करार, नवा करार इत्यादी) कुरआनचे एक वैशिष्ट्ये असे आहे की, ते संपूर्णपणाने, शब्दाचाही बदल न होता, जसेच्या तसे मूळ स्वरूपात टिकून आहे.

३) कुरआनने त्याच्याविषयी शंका घेणाऱ्यांना तशाच प्रकारचा ग्रंथ निर्माण करण्याचे आव्हान दिले आहे. जे आजवर कोणीही पेलू शकलेले नाही. ईश्वराच्या ग्रंथ निर्मितीशी

तुल्यबळ अशी ग्रंथनिर्मिती आजवर झालेली नाही.

पुरातन श्रुती ज्या भाषांमध्ये निर्माण झाल्या, त्या भाषा आज इतिहासाच्या संग्रहालयात कुलुपबंद झाल्या आहेत. ह्या भाषांमधून, अपवाद एकच, तो म्हणजे अरबी. जी अजूनही जगातली वर्तमानकालीन भाषा आहे. पंधराशे वर्षांपूर्वी ज्या भाषेमध्ये कुरआनची निर्मीती झाली, तीच भाषा आज कोट्यवधी लोकांच्या लोकव्यवहारात आहे. कुरआनच्या दैवीपणाविषयी हा आश्चर्यकारक व धडधडीत पुरावा आहे. दुसऱ्या कुठल्याही श्रुतीने, ती ज्या भाषेमध्ये निर्माण झाली, त्या भाषेवरती, अशा तऱ्हेचा परिणाम केलेले नाही. संपूर्ण भाषेलाच, आपल्या शैलीच्या साच्यामध्ये तयार करायची व नंतर त्याच स्वरूपात ती शेकडो वर्षे प्रचलित स्वरूपात ठेवायची, असे महत्त्वपूर्ण काम दुसऱ्या कुठल्याच श्रुतीला साधलेले नाही.

नवा करार म्हणून ओळखली जाणारी, इंजील ही श्रुती, उदाहरणादाखल घेऊयात. कुरआनचा अपवाद सोडून दिल्यास इंजील ही काळाच्या पटावरची सर्वात आधुनिक श्रुती म्हणायला हवी. असे असूनही जीझस (त्यांना शांती लाभो) कुठल्या भाषेत बोलायचे, ह्याविषयी सुद्धा अजूनही किंचितही शंकेला जागा न ठेवता, आपल्याला काही खात्रीपूर्वक सांगता येत नाही. सर्वसाधरणपणे, ती अरेमिक होती, असे समजले जाते. आज नव्या कराराची सर्वात जुनी, उपलब्ध असलेली प्रत, ही ग्रीकमध्ये आहे. अरेमिकमध्ये नाही. पैगंबर जीझसच्या उक्ती व कृती विषयीची माहीती आपल्याला अशा तऱ्हेने भाषांतरीत स्वरूपात मिळते. ही माहितीसुद्धा आर्ष ग्रीक भाषेतली आहे. जिचे स्वरूप, आजच्या प्रचलित ग्रीकहून सर्वस्वी वेगळे आहे. एकोणीसाव्या शतकापर्यंत ग्रीक भाषा इतकी बदलून गेली आहे की, नव्या करारातल्या किमान ५५० शब्दांचा अर्थ माहीतच नव्हता. संपूर्ण पुस्तकाचा विचार करता हे ५५० शब्द पुस्तकातील संपूर्ण शब्दांच्या १२ टक्के आहेत. ह्याच वेळी जर्मन तज्ज्ञ अडोल्फ डाईसमान ह्यांना इजिप्तमध्ये काही पुरातन भूर्जपत्रे सापडली. त्यावरून हे सिद्ध झाले की, बायबलकरिता वापरलेली ग्रीक ही खरेतर ज्येष्ठ (क्लासिकल) ग्रीक भाषेची एक बोलीभाषा होती. ही भाषा पॅलेस्टीनमध्ये इ.स. च्या पहिल्या शतकात बोलली जात असे. डाईसमान, ह्या माहीत नसलेल्या ५५० पैकी जवळ जवळ ५०० शब्दांचा अर्थ (ह्या भूर्जपत्रांद्वारे) नक्की करू शकले. पण तरीही ५० शब्द शिल्लकच राहिले, ज्यांचा अर्थ अजूनही आपल्याला ठाऊक नाही. (द गॉस्पेल ॲण्ड द जीझस ऑफ हिस्टरी, झेवियर लिऑन– डयुफॉर एस. जे.)

एर्न्स्ट रेनान (१८२३–१८९४) ह्यांनी सिमेटिक भाषांवर प्रचंड संशोधन केले. त्यांनी त्या भाषांच्या शब्द संपत्तीवर एक पुस्तक लिहिले. त्या पुस्तकामध्ये न राहवून त्यांनी अरेबिक विषयी लिहिले:

'मानवी इतिहासातली एक अतिशय चमत्कारिक व आश्चर्याने थक्क करणारी घटना, म्हणजे अरबी भाषा. ग्रीक व लॅटिनच्या वैभवाच्या काळात माहितसुद्धा नसलेली, ही भाषा अचानक (एक दिवस) संपूर्ण भाषेच्या स्वरूपात उभी ठाकली. ह्यानंतर तिच्यामध्ये लक्षात घेण्याजोगे कुठलेही बदल घडले नाहीत. ह्यामुळे तिच्याविषयी, ही पुरातन किंवा ही आधुनिक,

अशा तऱ्हेच्या व्याख्या (आपल्याला) करता येत नाहीत. ती सध्या अगदी तशीच आहे, जशी ती, भाषा म्हणून माहिती झाली, त्याकाळी सुद्धा होती.'

'मानवी इतिहासातील आश्चर्यजनक घटना', म्हणून रेनान (फ्रेंच प्राच्य विद्या संशोधक) हे ज्यावेळी अरबीला मान्यता देत असतात; त्यावेळी ही मान्यता, खरे तर कुरआनला एक चमत्कार म्हणून दिलेली मान्यता असते. बदल घडवून आणणाची शक्ती असलेल्या, कुरआनच्या भाषा शैलीनेच, अरबी भाषेला, तिच्यात होणाऱ्या बदलांपासून वाचविले. असे बदल इतर सर्व भाषांमध्ये मात्र घडले आहेत. ख्रिस्ती विद्वान जूर्जी झैदान (१८६१-१९१४) हे, अशा काही विद्वानांपैकी होत, ज्यांनी हे सत्य ओळखले आहे. अरबी साहित्याविषयीच्या त्यांच्या पुस्तकात ते लिहितातः

'कुरआनने अरबीवरती जसा प्रभाव टाकला, तसा प्रभाव कुठल्याही धार्मिक पुस्तकाने, ते लिहिले गेलेल्या भाषेवरती आजवर टाकलेला नाही.'

जगातल्या भाषा ह्या काळाबरोबर बदलत गेलेल्या आहेत. ह्या भाषांच्या आधुनिक स्वरूपावरचा तज्ज्ञ, शब्दकोशाची मदत न घेता, त्याच भाषांच्या पुरातन स्वरूपातल्या पुस्तकाला समजू शकणार नाही. भाषेत होणाऱ्या बदलाची मुख्यत्वे दोन कारणे असतात. सामाजिक व्यवस्थेत होणारी उन्नती व उत्क्रांती आणि त्या भाषेच्या साहित्याची निर्मिती. हे दोन्ही घटक, अरबी भाषेच्या संदर्भात, गेली शेकडो वर्षे, आपले हे काम करीतच आहेत. फरक एवढाच की, अरबी भाषेच्या भाषाव्यवस्थेमध्ये मात्र, ते काहीही बदल घडवून आणू शकलेले नाहीत. कुरआनच्या अवतरणाच्या काळात मक्केमध्ये बोलली जाणारी भाषा व आज अरबस्तानात बोलली जाणारी अरबी भाषा, ह्या एकच आहेत. होमरचे इलियड (इ.स. पूर्व ८५०), तुलसी दासाचे रामायण (इ.स.१६२३) व शेक्सपियरची नाटके (१५६४-१६१६), ह्या त्या त्या भाषेतल्या श्रेष्ठ वाङ्‌मयीन कलाकृती समजल्या जातात. त्यांचे वाचन व रंगमंचीय आविष्कार त्यांच्या निर्मिती काळापासून आजतागायत सातत्याने चालू आहेत. पण ज्या भाषेत त्या लिहील्या गेल्या, त्या भाषांना, बदलापासून मात्र ह्या श्रेष्ठ कलाकृती वाचवू शकलेल्या नाहीत. होमरची ग्रीक, तुलसीदासाची तत्कालीन बोलीभाषा व शेक्सपियरची इंग्रजी ह्या आता प्रचलित भाषा असण्याऐवजी प्राच्य-भाषा बनल्या आहेत.

कुरआन हे एकच असे ग्रंथ आहे, ज्याने एखाद्या भाषेला आपल्या सांच्यात घडविले आणि शेकडोशे वर्षे त्याच स्वरूपात टिकविले. अरब देशांमध्ये बौद्धिक व राजकीय अशी केवढीतरी क्रांती घडून गेली आहे; पण तरीही अरबी भाषा मात्र तीच, कुरआनच्या काळी जशी बोलली जात होती तशी राहिली आहे. अरबांच्या समाज व्यवस्थेमध्ये घडणारे बदल, अरबी भाषेला मात्र कुठल्याही तऱ्हेने बदलू शकलेले नाहीत. ही गोष्टच कुरआनची अतिनैसर्गिक निर्मिती सिद्ध करणारा पुरावा आहे. पैगंबर मुहम्मदांना साक्षात्कारित केल्या गेलेल्या कुरआनला दैवी चमत्कार सिद्ध करणारा, हा असा गेल्या १५०० वर्षांचा इतिहास आहे. ह्याहून अजून स्वतंत्र्य गोष्टीची गरजच नाही.

## सामाजिक उत्क्रांती व उन्नती

सामाजिक बदल भाषेच्या स्वरूपावर कसे बदल करतात, ह्याचे उदाहरण म्हणजे लॅटीन. इटली हे जरी नंतरच्या काळात लॅटीनचे केंद्र बनले, तरी ती काही त्या देशाची मूळ भाषा नव्हे. लोहयुगामध्ये, इ.स. पूर्व १२ व्या शतकाच्या सुमाराला, मध्य युरोपातल्या टोळ्या आजूबाजूच्या प्रदेशात पसरल्या. त्यांच्यातल्या काही, विशेषतः अल्पाइन टोळ्या इटलीमध्ये शिरल्या आणि रोम व आजूबाजूच्या प्रदेशात स्थिरावल्या. त्यांची भाषा रोमच्या स्थानीय भाषेत मिसळली व अशा रीतीने लॅटीनची निर्मिती झाली. ल्युबस अँड्रोनिकसने इ.स. पूर्व तिसऱ्या शतकात, ग्रीकमधून काही कहाण्या (गोष्टी) व नाटके लॅटिनमध्ये अनुवादित केली आणि अशा रीतीने लॅटीन साहित्यनिर्मितीची भाषा बनली. इ.स. पूर्व पहिल्या शतकात रोमन साम्राज्याची स्थापना झाली व लॅटीन अधिकृत भाषा बनली. ख्रिस्ती धर्मप्रसाराबरोबर लॅटीनचे बळ वाढून अजून भक्कम बनले. धार्मिक व राजकीय संस्थांचा पाठिंबा मिळाल्याने व सामाजिक आणि आर्थिक बळामुळे, लॅटीनचा प्रसार सातत्याने होतच राहिला. एक वेळ अशी आली की, ती संपूर्ण प्राचीन युरोपची भाषा बनली. सेंट ऑगस्टीन ह्यांच्या काळात लॅटीन ही परमोच्च बिंदूला पोहचली होती व अगदी मध्ययुगीन काळापर्यंत ती आंतरराष्ट्रीय भाषा समजली जात असे.

इ.स. चे ८ वे शतक हा काळ मुस्लिम विजयाचा होता. रोमन्सना कॉन्स्टँटिनोपलचा आश्रय घ्यावा लागला, जी साम्राज्याची पूर्वेकडील अर्ध्या भागाची राजधानी बनली. तुर्कांनी १४५३ मध्ये कॉन्स्टँटिनोपल जिंकून घेतले व रोमन्सना त्यांच्या ह्या शेवटच्या, वर्चस्व असलेल्या प्रदेशातून, घालवून दिले. रोमन साम्राज्य उतरणीला लागल्यावर, प्रादेशिक भाषा फुलू लागल्या. ह्यांमध्ये फ्रेंच, इटालियन, स्पॅनिश व पोर्तुगीज ह्या भाषा येतात. लॅटीनचा ह्या सर्वांवरच मोठा प्रभाव राहिला; पण ती मात्र रोमन कॅथॉलिक चर्चची अधिकृत भाषा म्हणूनच फक्त शिल्लक राहिली. जिवंत भाषा म्हणून तिचे प्रयोजन संपले. त्यानंतर फक्त तांत्रिक, कायद्याची व शास्त्रीय परिभाषा स्पष्ट करण्यासाठी व ऐतिहासिक महत्त्वाची म्हणून ती शिल्लक राहिली. उदाहरणच द्यायचे तर, लॅटीनचे चांगले ज्ञान असल्याशिवाय, एखाद्याला न्यूटनचा प्रिन्सिपिया मुळामध्ये वाचता येणार नाही.

प्रत्येक प्राचीन ज्येष्ठ भाषेच्या संदर्भात असेच काही ना काही घडत गेले. सामाजिक बदलांबरोबर ह्या भाषा बदलत गेल्या व नंतर काही काळाने मूळ भाषेने दुसरीची वाट मोकळी करून दिली. ही दुसरी भाषा मूळ भाषेहून अगदीच वेगळी असे. लोकसमूहांचा प्रवाह इकडून तिकडे वाहून एकीकडे गोळा होणे, राजकीय क्रांत्या व सांस्कृतिक संघर्ष ह्यांनी संदर्भित भाषेवर नेहमी न पुसला जाणारा ठसा उमटविला. हे सर्व घटक अरबी भाषेच्या संदर्भात गेली १५०० वर्षे कार्यरत होतेच. पण तरीही ती तिच्या मूळ स्वरूपात अखंड राहिली. अरबीची अपवादात्मक लवचिकता, ही पूर्णपणे, कुरआनने तिच्यामध्ये ओतलेल्या आश्चर्यकारक आकर्षण शक्तीमध्ये आहे.

इ.स. ७० च्या सुमाराला काही ज्यू टोळ्या सिरीया सोडून मदिनेला स्थायिक झाल्या,

जिथे आधीपासून अमालिका नावाची अरबी बोलणारी टोळी रहात होती. अमालिका टोळीबरोबर राहाताना ज्यूंनी अरबीचा भाषा म्हणून स्वीकार केला. पण ते जी अरबी भाषा बोलत, ती सामान्य अरबीहून वेगळी होती आणि तिच्यावर हिब्रूचा तीव्र प्रभाव होता. इस्लामच्या स्थापनेनंतर अरब, आफ्रिका व आशियाच्या केवढ्यातरी देशांमध्ये जाऊन स्थायिक झाले, जिथे अरबी व्यतिरिक्त दुसऱ्या भाषा बोलल्या जात होत्या. त्यांचे दुसऱ्या वंशामधून मिसळून जाण्यानेसुद्धा अरबी भाषेवर काहीही परिणाम घडला नाही व ती तिच्या मूळ स्वरूपात टिकून आहे.

कुरआनच्या अवतरित झाल्यानंतरच्या पहिल्या शतकात, अरबीला अशा काही तीव्र घटनांना तोंड द्यायला लागले की, ज्यांमुळे भाषेत फार मोठे बदल होणे (एरवी) साहजिकच असते. हा काळ प्रमुख मुस्लिम शहरांमध्ये निरनिराळ्या टोळ्यांमधले लोक, इस्लामच्या प्रसारा नंतर जमू लागल्याचा आहे. निरनिराळ्या अरबी टोळ्यांमध्ये बोलल्या जाणाऱ्या अरबी बोलींच्या उच्चारणामध्ये व आघातांमध्ये लक्षात घेण्याजोगा फरक होता. हा फरक इतका होता की, अबू अम्र इब्न अल्–अला ह्यांनी जाणीवपूर्वक नोंद केली आहे: 'हिम्यार टोळी आपली भाषा बोलत नाही. त्यांची शब्दसंपत्ती आपल्याहून फारच वेगळी आहे.' उमर इब्ने खत्ताब हे एकदा एका अरबाला पैगंबरांकडे घेऊन गेले. तो कुरआन पठन करीत असता उमरनी ते ऐकले होते. तो मनुष्य कुरआनचे शब्द अशा विचित्र तऱ्हेने उच्चारीत होता की, उमरना कुरआनचा नक्की कुठला भाग तो म्हणतो आहे, हे अजिबात समजत नव्हते. भेटीला आलेल्या एका जनसमूहाशी एकदा पैगंबर त्यांच्या बोलभाषेत बोलले. हजरत अलींना वाटले की, जणू पैगंबर दुसऱ्याच कुठल्यातरी परकी भाषेमध्ये बोलत आहेत.

ह्या फरकामागचे महत्वाचे कारण म्हणजे आघातामधला (शैलीतला) फरक हे होते. उदा. बनो तमीम ह्या नज्दच्या पूर्व भागात राहाणाऱ्या लोकांना 'ज' (ج) हे अक्षर उच्चारता येत नसे. त्याएवजी ह्या अक्षराच्या उच्चार 'य' (ي) असा ते करीत असत. मस्जिद हा शब्द ते मस्यिद असा उच्चारीत व शजरात (वृक्ष, झाडे) च्या ऐवजी शरात म्हणत असत. 'क' (ق) चा उच्चार ते 'ज' (ج) सारखा करीत व तरीक (रस्ता) ला तरीज, सदिक (मित्र) ला सदिज, कद्र (किंमत, मूल्य) ला जद्र आणि कासिम (वाटणी करणारा) ला जासिम अशा तऱ्हेचे उच्चार करीत. सर्व सामान्य भाषाशास्त्रीय घटनेचा विचार करिता, निरनिराळ्या बोली बोलणाऱ्या अनेक टोळ्यांच्या एकत्र येण्याने एका नवीन व ताज्या अशा अरबी भाषेतील बदल होण्याच्या प्रक्रियेला सुरुवात व्हायला हवी होती. पण असे व्हायचे नव्हते. कुरआनच्या सर्वोच्च वक्तृत्व शक्तीने, अरबीला अशा बदलांपासून वाचविले, ह्याऐवजी काय घडले ते डॉ.अहमद हुसैन जय्यत ह्यांच्या शब्दांमध्ये पाहूयात. 'इस्लाम स्थापनेनंतर अरबी ही एका राष्ट्राची मालमत्ता व अग्रहक्क राहिली नाही. ज्यांनी इस्लाम धर्मश्रद्धा स्वीकारली; त्या प्रत्येकाची भाषा अरबी बनली.'

ह्यानंतर अरबांनी त्यांची मातृभूमी सोडली व पूर्वेकडे काशघरपासून पश्चिमेकडे जिब्राल्टरपर्यंतचा प्रदेश त्यांनी जिंकून घेतला. ज्या लोकांशी त्यांचा संबंध आला ते लोक पर्शियन, किब्ती, बर्बर, हिब्रू, ग्रीक, लॅटीन, अरेमिक व सुर्यानी ह्या भाषा बोलत असत. ह्यांपैकी

काही राष्ट्रे राजकीय व सांस्कृतिकदृष्ट्या अरबांहून वरचढ होती. प्राचीन संस्कृतीचा बुरूज (मेरूमणी) व अनेक मोठ्या टोळ्यांचे सांस्कृतिक केंद्र असलेला इराक, हा देश त्यांनी प्रवेश केलेल्या देशांपैकी एक होता. अरब इराण्यांमध्ये सहज मिसळून गेले. इराण हे तत्कालीन दोन जागतिक महासत्तांपैकी एक होत. अतिशय प्रगत रोमन साम्राज्य व पसरत चाललेला ख्रिस्ती धर्म ह्या दोन प्रबळ शक्तिंशीसुद्धा मुसलमानांनी झुंज दिली. फोनिशियन, घस्सानिद, ग्रीक, इजिप्शीयन आणि कॅनानियन टोळ्यांनी साहित्य व नीतीशास्त्र विषयक डोळ्यात भरणाऱ्या परंपरा जिथे निर्माण केल्या होत्या, अशा सिरीयामध्ये मुसलमान गेले. त्यानंतर इजिप्त. इजिप्तमध्ये तर पौर्वात्य व पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा संगम झाला होता. अशा तऱ्हेच्या घटकांचा परिणाम झालेल्या दुसऱ्या भाषांचा विचार करता हे सर्व घटक खरे तर अरबीमध्ये बदल घडवून आणण्यासाठी पुरेसे होते. पण ह्या सर्व घटकांना एकट्या कुरआनने नामोहरम केले. कुरआन हा अशा एका अद्वितीय साहित्यिक श्रेष्ठतेचा व महत्तेचा नमुना होता, की ते ज्या भाषेमध्ये निर्माण झाले, त्या भाषेचे एवढेसुद्धा वाकडे, हे सर्व घटक करू शकले नाहीत.

इस्लामच्या विजयानंतर अरबी ही काही एका समाजाची भाषा उरली नाही. ती अनेक राष्ट्रांची व वंशांची भाषा बनली. आशिया व आफ्रिकेतील अजमी (अरबी नसलेले) लोकांनी इस्लाम धर्म स्वीकारल्यावर, सावकाशीने व टप्प्याटप्प्याने अरबीचासुद्धा स्वीकार केला. जुन्या अरबांप्रमाणे अर्थातच हे लोक समर्थपणाने अरबी बोलू शकत नसत. ह्यामुळे आपल्या सहधर्मींचा प्रभाव पडल्याने, त्याचा परिणाम अरबी बोलणाऱ्या अरबांच्या भाषेवरसुद्धा होऊ लागला. अरबीची ही स्थानच्युति मुख्यत्वे मोठ्या बहुसमाजीय शहरामध्ये पाह्यला मिळत असे, जिथे अनेक वंशाचे लोक एकमेकात मिसळून राहत. भाषाशास्त्रीय बारकाव्यांकडे एका विशिष्ट शिस्तीने न पाहाणाऱ्या सर्वसामान्य लोकांवर हा परिणाम प्रथम झाला. पण तरीही सांस्कृतिक वर्तुळातले श्रेष्ठ लोकसुद्धा ह्या बदलाला रोखू शकले नाहीत अथवा त्यापासून दूर राहू शकले नाहीत. ज़ियाद इब्ने उमय्या, ह्यांच्या दरबारात एकदा एक माणूस आला व शोक प्रकट करू लागला, 'आमचे बाप मेले आहेत आणि त्यांनी छोटी (छोटी) मुले पाठीमागे ठेवली आहेत. 'बाप' आणि 'मुले' हे दोन्ही शब्द प्रयोग तो चुकीच्या विभक्तीमध्ये व्यक्त करीत होता. अशा तऱ्हेच्या चुका अगदी सामान्य बनून घडत राहिल्या, पण तरीही अरबी भाषा मात्र तीच राहिली. लिखित अरबीचे, कुरआनच्या अमोघ वक्तृत्वशैलीने, ढालीसारखे संरक्षण केले व त्यामुळे अरबी बोल भाषेप्रमाणे ती स्थानभ्रष्ट झाली नाही. कुरआनने निर्माण केलेल्या सांच्यातच ती राहिली.

कुरआनची दैवी शक्ती समजण्यासाठी, आपल्याला अरबी गेल्या १५०० वर्षात ज्या थरकाप उडविणाऱ्या व घायाळ करणाऱ्या अनुभवांना सामोरे जायला लागले, त्यांच्याकडे पुरावा म्हणून पाहाता येईल. जर कुरआनचे संरक्षण करणारे पंख अरबीला लाभले नसते, तर मूळची अरबी भाषा, नक्कीच फार फार बदलून गेली असती. कुरआनची, कधीही मोडू न शकणारी, अशी जी प्रतिमा निर्माण झाली, तिनेच प्रमाण अरबी भाषेला 'काळ्या दगडावरची रेघ' बनवून टाकले. त्याचप्रमाणे 'सोन्याचा कस तपासणारी कसोटी', कुरआनच्या अरबीमुळे प्रमाण अरबी भाषेला लाभली.

उमवी (उमय्यद) राज्यसत्तेच्या खलिफांची राज्यसत्ता, जिने हि.स. ४१ ते १३२ (इ.स. ६६१ ते ७५०) पर्यंत राज्य केले, जी कुरैश टोळीतील मुआवियाह ह्यांनी निर्माण केली होती, अंत झाल्यावर, हिजरी सनाच्या दुसऱ्या शतकात अरबी भाषेला फार मोठा धोका निर्माण झाला. उमय्यद ही संपूर्णतया अरबी राज्यसत्ता होती. अरबी राष्ट्रवादाचे खंदे पुरस्कर्ते असलेल्या ह्या राज्यसत्तेने, कधी कधी तर उघड उघड पक्षपात करून अरबी भाषा व साहित्य ह्यांच्या प्रगतीसाठी प्रयत्न केले. त्यांची राजधानी अरबस्तानच्या हृदयस्थानी असलेल्या दमास्कसमध्ये होती. त्यांच्याकाळी लष्करी व प्रशासकीय सत्ता ह्या दोन्ही, अरबांच्या हातात होत्या. त्यानंतर अब्बासी लोकांच्या हाती सत्ता आली. इराणी पाठिंब्याच्या जोरावर अब्बासिदांनी खिलाफत काबीज केली. अर्थातच तिथून पुढे प्रशासनावर इराण्यांचा प्रभाव राहणार हे साहजिकच होते. ह्यामुळेच पर्शियन सीमेवरती, बगदाद येथे, दमास्कसहून राजधानी हलविण्यात आली. अब्बासिदांनी इराण्यांना सरकारी कामकाजात मुक्तद्वार ठेवले. अरबी लोक व त्यांची संस्कृती, ह्यांना ते कमी दर्जाचे लेखू लागले व त्यांची शक्ती कमी करण्याचे प्रयत्न करू लागले. राजकरणातल्या मोठ्या पदाकरिता उमय्यद राजसत्तेने कायम अरबांना प्राधान्य दिले होते. अरबांना प्राधान्य द्यायचा हा काळ संपल्यानंतर इराणी, तुर्क, सिरियन, बिझंटाईन आणि बर्बर हे सर्वच लोक समाज व राज्याच्या भानगडींमध्ये लक्ष घालून त्यांच्यावर आपापला प्रभाव टाकू लागले. अरब आणि अरब नसलेल्यांमध्ये विवाह होऊ लागले. आर्य व सिमेटिक संस्कृतींचा अशा तऱ्हेने मिलाप झाल्याने, अरबी भाषा व संस्कृतीला नव्या संकटक्रमाला तोंड द्यावे लागले. पर्शियन सम्राट व सरदारांच्या नातवापणत्वांना त्यांच्या थोर पूर्वजांच्या संस्कृतीचे पुनरुत्थापन करावे, असे वाटू लागले.

ह्या सर्व घटनांचा अरबीवरती न पुसणारा ठसा बसला. कवी मुतनब्बीच्या (इ.स. ९१५ ते ९६५) काळी अरबीची काय दशा झाली होती, ती त्याच्या पुढील काव्यपंक्तीमध्ये पाहूयात:

'इराणच्या इमारती बाकी सर्वांना सौंदर्यात पाठीमागे लकटतात.
जसा ऋतुंमध्ये वसंत, दुसऱ्या ऋतुंना लकटतो.
एक अरब युवक त्यांमधून फिरतो, त्याचा चेहरा,
त्याचे हात, त्याची भाषा, सर्व काही त्यांमध्ये परके असते, असे म्हणतात. सुलेमान (सॉलोमन) जिन्नांशी बोलत असे. पण तो जर इराण्यांना भेटला असता तर नक्कीच त्याला दुभाषाची गरज पडली असती.'

(दिवान–अल्–मुतनब्बी)

कुरआनची अजोड साहित्यिक महत्ता जर नसती, तर ह्या सर्व सामाजिक बदलांनी, अरबी कधीच एखाद्या खपलीसारखी गळून पडली असती. पण प्रत्येक वेळी, ही भाषा कुरआनच्या 'तळावरती' उतरली. जशी एखादी नौका, दूरवर समुद्रात तात्पुरत्या वादळांना तोंड देऊन, परत स्वसंरक्षणार्थ 'आपल्या' बंदराकडे परत येते.

मुतवक्कील खलिफांच्या (हि.स. २०७–२४७) राज्यकाळात, अरब नसलेले कितीतरी

इराणी व तुर्क अरबस्तानात शिरले. सन ६५६ (हि.स.) मध्ये मंगोलियन हलाकू खान याने बगदाद जिंकून घेतले. हि.स. ८९८ मध्ये अँदालूशिया ख्रिस्तांनी जिंकून घेतल्यावर, इस्लामी साम्राज्याला एक मोठाच तडाखा बसला. इजिप्त व सिरीयावर राज्य करणारी फातिमिद राजसत्ताही फार काळ टिकली नाही. सन ९२३ मध्ये तिची जागा ऑटोमन उस्मानी तुर्कांनी घेतली व त्याबरोबर अरबस्तानाचा एक मोठाच लचका तोडला गेला. आता इस्लामी सरकार, कैरोहून कॉन्स्टँटिनोपल येथे हलले. सरकारची अधिकृत भाषा अरबीऐवजी तुर्की बनली. आणि तिच्यामध्ये कितीतरी परकी शब्द व वाक्प्रचारांचा भरणा होऊ लागला.

अरबस्तानात, अरब नसलेल्या राजांची सत्ता सुमारे ५५० वर्षे टिकली. पर्शियन, तुर्क व मुघलांनी तर अरबी भाषेचे नखसुद्धा दिसू नये, अशा तऱ्हेने तिचा नाश करण्याचा प्रयत्न केला. अरबी ग्रंथालये जाळण्यात आली. अरबी शाळा पाडून टाकण्यात आल्या. अरबी विद्वानांच्या वाट्याला अपमानितांचे जिणे आली. ऑटोमन सम्राटांनी तर अरबी–विरुद्ध मोहीमच उघडली, जिला 'तत्रीक–उल–अरब' (अरबांचे तुर्कीकरण), असे सार्थ नाव सुप्रसिद्ध समाज सुधारक जमालुद्दीन अफगाणी (१८३८–९७) ह्यांनी दिले आहे. ह्यापैकी कुठल्याच प्रयत्नांनी अरबीच्या चेहऱ्यावरती इतकासुद्धा डाग निर्माण होऊ दिला नाही. बुखारातले तार्तार, पॅलेस्टीन व सिरीयातले युद्धखोर, आणि अँदाल्यूशियातले इतर युरोपियन्स ह्यांनी अरबी भाषा व साहित्यावर खूप मोठे हल्ले रचले. दुसऱ्या भाषांच्या इतिहासाचा जर विचार केला तर अरबी संस्कृतीवरचे हे घाव, अरबी भाषेला पूर्णपणे नाहीशी करण्यासाठी पुरेसे होते. अरबीची अवस्था, दुसऱ्या भाषांप्रमाणे होऊन, खरे तर तिने दुसऱ्या कुठल्या तरी सिमेटिक भाषेत मिसळून जायला हवे होते, अशी अपेक्षा करायला काहीच हरकत नव्हती. तुर्की अज्ञान (रानटीपणा) व पर्शियन पूर्वग्रह ह्यांचा सामना जर अरबीला करावा न लागता, तर खरे सांगायचे झाले तर, अरबी ही आज सर्व मुस्लिम जगताची भाषा बनली असती. पण असे असूनही अरब जगतात तिचे अस्तित्व शिल्लक राहणे, हीच गोष्ट मुळी कुरआनच्या दैवी गुणांनी घडलेली आहे. कुरआनच्या महत्तेने, लोकांना अरबीला चिकटून रहायला लावले. तिने कित्येक अरबी विद्वानांना अंतःस्फूर्ती दिली. अगदी चटकन मनात येणारी दोन नावे म्हटली, तर इब्ने मंज़ुर (हि.स.६३०–७११) व इब्ने ख़ल्दुन (हि.स.७३२–८०८) ही होत. त्या काळच्या सरकारला आव्हान देऊन त्यांनी आपल्या उत्कृष्ट साहित्यकृती व उच्चविद्यासंबंधित प्रबंधकृती अरबीमध्ये निर्माण केल्या.

नेपोलियनच्या कैरोप्रवेशाने (इ.स. १७९८) मध्यपूर्वेला छापखान्यांच्या युगात आणून सोडले. शिक्षण ही काळाची गरज बनली. अरबी भाषा नव्या युगात अशा रीतीने गुंतवली गेली. पण तरीही शतकानुशतकांच्या मारझोडीच्या काही खुणा अरबीवरती दिसू लागल्या. अरबी व तुर्कीचे एक मिश्रण, शुद्ध अरबीऐवजी, सिरिया व इजिप्तमध्ये सरकारची अधिकृत भाषा म्हणून मान्य केले गेले.

ब्रिटिशांनी १८८२ मध्ये इजिप्तचा कब्जा केल्यावर परत एकदा परिस्थिती पालटली. त्यांनी अरबीला कडवा विरोध केला. शाळांमधून इंग्रजी ही सक्तीची भाषा करण्यात आली व

अभ्यासक्रमामधून इतर सर्व भाषांना हद्दपार करण्यात आले. फ्रेंचांच्या ताब्यात जो प्रदेश गेला, त्या प्रदेशासंदर्भात असेच घडले. वसाहतवादी सत्ता त्यांची त्यांची भाषा शिकण्यासाठी, त्यांच्या वसाहतींवर सक्ती करू लागल्या. इंग्रजी व फ्रेंचच्या छायेत अशा तऱ्हेने सुमारे १०० वर्षे अरबी राहिली. तरीही ती तिच्या मूळ स्वरूपात टिकून राहिली. तिच्यामध्ये काही नवीन शब्दांची भर जरूर पडली. उदाहरणच द्यायचे तर, 'दब्बाबा' म्हणजे रणगाडा, ज्याचा मूळ साधा अर्थ फक्त मारण्यासाठीचा मेंढा असा होतो. नव्या लेखन-पद्धती अस्तित्वात आल्या. आजकालच्या काळात लोक मुसलमान का बनतात? ह्याविषयी एखाद्याला पुस्तक लिहायचे असेल तर त्याचे शीर्षक 'लि माज़ा अस्लम्ना' (आम्ही इस्लाम का स्वीकारावा?) असे देण्यात येईल. हेच शीर्षक पूर्वीच्या काळी वृत्तबद्ध, लयबद्ध व अलंकारिक काव्यमय शैलीत दिले गेले असते. कितीतरी इंग्रजी शब्दांची भर अरबीमध्ये पडली. उदा. 'डॉक्टर'. पण हे बदल फक्त वरवरचे व बाह्यात्कारी होते. खरी अरबी प्रमाणभाषा तीच राहिली, जशी ती पंधरा शतकांपूर्वी कुरआन-अवतरणाच्या काळी होती.

### साहित्यिक प्रगती

उच्च दर्जाचे साहित्यकार एखाद्या भाषेच्या साहित्यपटावरती क्वचित कधीतरी निर्माण होतात. ज्यावेळी हे घडते, त्यावेळी त्यांच्या साहित्य-निर्मितीच्या भाषेमध्ये काही बदल घडतात. त्यांच्या साहित्याच्या अप्रतिम नमुन्यांचा जनसामान्यांच्या अभिव्यक्तीवर प्रभाव पडतो. अशा रीतीने भाषा, उत्क्रांतीच्या प्रगत अवस्थांतरांमधून जात राहतात आणि मग असे होता होता त्यांच्या मूळ स्वरूपापासून त्या फारच बदलून जातात. अरबीच्या संदर्भात मात्र असे घडले नाही. अरबीच्या इतिहासात कुरआनने असे काही साहित्यिक प्रमाण निर्माण केले की ते ओलांडण्याची प्राज्ञा कुणाचीही झाली नाही. कुरआनने निर्धारित केलेली शैलीच अरबीमध्ये चालू राहिली. कुरआनशी तुलना होऊ शकेल अशी दुसरी एकही अरबी साहित्यकृती त्यानंतर निर्माण झाली नाही. आणि त्यामुळे दैवी साहित्यकृतीच्या ('काव्य' कृतीच्या) साच्यामध्येच अरबी घडली व तशीच राहिली.

इंग्रजी उदाहरणादाखल घेऊयात. इ.स. च्या ७ व्या शतकात ती एक सामान्य प्रादेशिक बोलीभाषा होती. कुठल्याही तऱ्हेची आशयघन बौद्धिक अभिव्यक्ती तिच्यात झालेली नव्हती. नंतर ५०० वर्षे ही परिस्थिती टिकली. नॉर्मन लोकांनी इ.स.१०६६ मध्ये इंग्लंड जिंकून घेतले. आणि नंतर इंग्रजीचा संस्थापक पिता, जिऑफ्री चॉसर हा इ.स.१३४० च्या सुमाराला जन्मला. ब्रिटिशांच्या दरबारची अधिकृत भाषा अजूनही फ्रेंच हीच होती. चॉसरला इंग्रजी, ह्या त्याच्या मातृभाषेव्यतिरिक्त लॅटीन, फ्रेंच व इटालियन ह्या भाषा, उत्तम येत होत्या. ह्या भाषांचे ज्ञान व दैवाने दिलेली विद्वत्ताशक्ती, ह्यांच्या जोरावर इंग्रजी ह्या भाषेला तो ज्ञानसंपादनाची भाषा बनवू शकला. अर्न्स हाऊसरच्या शब्दांत सांगायचे, तर त्याने लिहिलेल्या कँटरबरी टेल्सच्या जोरावर, त्याने इंग्रजीला खंबीर आणि उत्तुंग झेप दिली. चॉसरने एका बोलीला, भाषेमध्ये रूपांतरीत केले व येणाऱ्या काळात प्रगतीच्या नव्या वाटा खुल्या करून दिल्या.

ह्यानंतर जवळजवळ दोनशे वर्षे, इंग्रज लेखक व कवी चॉसरच्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार लिहीत राहिले. विल्यम शेक्सपियर (१५५८–१६२५) काळाच्या रंगभूमीवर आल्यावर, इंग्रजीच्या इतिहासात नवीनच प्रवेश सुरू झाला. त्याच्या नाटकांनी व काव्याने, साहित्याचे नवीन मानदंड व मूल्ये निर्माण केली, ज्यांचा हात धरून इंग्रजी अजून पुढे सरकली. ह्यानंतर दोनशे वर्षांनी सुरू झालेल्या 'विज्ञानयुगाने', समाजातल्या प्रत्येक घटकावर विलक्षण परिणाम केला. आता विज्ञानाच्या आज्ञेबरहुकूम भाषा–व्यवहार सुरू होणार होता. काव्यापेक्षा गद्यलेखन लोकप्रसिद्ध झाले. कहाणी आवडण्याऐवजी लोकांना सत्यकथा आवडू लागली. जोनाथन स्विफ्ट (१६६७–१७४५) पासून टी. एस. इलियट (१८८८–१९६५) पर्यंत डझनावारी लेखक व कवी ह्या विज्ञानयुगाचे प्रतिनिधीत्व करतात. ते इंग्रजीच्या आधुनिक साहित्ययुगाचे निर्माते होत. आपली कालक्रमणा ह्या युगातून होते आहे.

अगदी असेच काही दुसऱ्या भाषांच्या संदर्भात घडले. लेखक किंवा लेखकांचे गट नव्याने निर्माण होत होते, जे त्यांच्या पूर्वसूरींपेक्षा जास्त प्रसिद्धी पावत होते. अशा गटांच्या निर्माणाच्या प्रत्येकवेळी भाषा एका नवीन पायरीला जाऊन पोहोचत असे. असे घडत गेल्याने, प्रत्येक भाषा इतकी बदलली, की ती भाषा बोलणाऱ्या एखाद्याला, त्या भाषेचे प्राचीन वाङ्मय वाचायचे झाल्यास, शब्दकोश व टीकांच्या मदतीशिवायच ते वाचणे, अशक्य बनले.

अशा जागतिक बनलेल्या भाषाशास्त्रविषयक गुणधर्माला एकच अपवाद आहे, आणि तो म्हणजे अरबीचा. दुसरा कुणीही अशा तऱ्हेचे पुस्तक लिहू शकणार नाही हा कुरआनचा दावा शब्दशः खरा ठरला आहे. गेली शतकानुशतके कुरआनच्या तोडीचे ग्रंथराज लिहिण्याचे जे प्रयत्न केले गेले, त्यांच्याकडे नुसती नजर टाकली तरी, ह्या दाव्यासंदर्भातला स्वयंसिद्ध पुरावा आपल्या येईल. असे सर्व प्रयत्न अक्षरशः भयाण तऱ्हेने कोलमडून पडले. मुसैलेमा इब्ने हबीब, तुलाइयाह इब्ने खुवैलिद, नज्र इब्ने अल् हारीस, इब्ने अल् रावंदी, अबूल अला अल् माअरी, इब्नुल मुकफ्फा, अल् मुतनब्बी, हे सर्व व इतरही काही, ह्यांनी असे प्रयत्न केले. मुसैलेमाचा संदर्भ द्यायचा झाला तर 'ईश्वर गर्भवती स्त्रीला आशीर्वचन देतो व ह्या आशीर्वचनांमुळे पोटातून व गर्भाच्या आवरणातून उल्हासी जीव निर्माण होतो', अशा तऱ्हेचे काव्य त्याने निर्माण केले. कुरआनच्या साहित्यिक नृपत्वाशी तुलना करता एकूणच हा प्रकार भयंकर दिसतो. अगदी असाच प्रकार उपरोल्लेखित लेखक व कवींचा आहे.

'दुसरा कुणीही अशा तऱ्हेचे पुस्तक लिहू शकणार नाही.' (कुरआन १७:८८) ह्या कुरआनच्या विधानाचा सर्वात मोठा पुरावा एर्न्स्ट रेनानने अरबी भाषेबद्दल म्हटल्याप्रमाणे 'भाषाशास्त्रीय चमत्कार' हा आहे. दुसऱ्या कुठल्याही भाषेप्रमाणे अरबीतसुद्धा मोठमोठे लेखक व कवी होऊन गेले आहेत. पण कुरआन अवतीर्ण झाल्यानंतर गेल्या १५०० वर्षात त्यापैकी एकानेसुद्धा कुरआनशी तुलना होऊ शकेल अशी, साहित्यकृती निर्माण केलेली नाही. कुरआनच्या मानदंडात त्यानंतर कधीही फेरबदल झालेले नाहीत. कुरआनने दाखविलेल्या रस्त्यावरच अरबी भाषेची कालक्रमणा चालू राहिली. कुरआनहून चांगले काही जर निर्माण झाले

असते तर अरबी कधीही कुरआनच्या मार्गावरती पक्की राहिली नसती. तिला एक नवीनच जोर व वेग प्राप्त झाला असता व ती नव्या मार्गावर चालू राहिली असती. भाषेचा इतिहास ज्यावेळी सुरू होतो, त्या सुरुवातीच्या काळात एखादा लेखक अशी काही साहित्यकृती निर्माण करतो, की त्या कृतीची साहित्यिक मूल्ये त्या भाषेसंदर्भात चिरंतन ठरतात. अशा जनक कृतीनंतर, दुसरा कितीही मोठा लेखक, त्या भाषेचा चेहरामोहरा बदलवून टाकू शकत नाही. अरबीच्या संदर्भात कुरआन हीच अशी साहित्यकृती ठरली. त्याकाळी बोलल्या जाणाऱ्या अरबीमध्ये कुरआनची निर्मिती झाली. आणि ह्या साहित्यकृतीने असा काही उच्चतम साचा निर्माण केला की, त्यापूर्वी ही कधी वा त्यानंतरही कधी ह्या साच्याचा भंग कुणी करू शकले नाही.

पारंपारिक अभिव्यक्तींच्या तऱ्हांमध्ये कुरआनने अशी काही जिवंत भर घातली की त्यामुळे कुरआनने अरबी भाषेच्या वाढीचा व प्रगतीचा मार्ग खुला केला. उदाहरणच द्यायचे झाले तर कुरआनच्या ११२ व्या, 'एक' ह्या शीर्षकाच्या प्रकरणामधील 'एक' (अहद) ह्या अर्थाच्या शब्दाचे देता येईल. त्यापूर्वी तो शब्द षष्ठी विभक्तीचे रूप समजला जाई. 'आमच्यातला (आमचा) एक' असे म्हणताना किंवा 'आठवड्याचा पहिला दिवस' (म्हणजे शनिवार), 'यौम अल् अहद', असा ह्या शब्दाचा वापर होत असे. सर्वसाधारण नकार दर्शविण्यासाठी त्याचा वापर होई. जसे की, 'मा जानी आहदुन', 'मला भेटायला एकजण (सुद्धा) आला नाही'. पण सर्वशक्तीमान ईश्वराचा गुण दर्शविण्यासाठी ज्यावेळी अहदचा वापर झाला, त्यावेळी त्या शब्दाचा, सर्वार्थाने नवीन व आश्चर्यजनक वापर कुरआनने सुरू केला. कुरआनने परकी भाषांमधील कितीतरी शब्द अरबीमध्ये नित्य वापरासाठी आणले. उदाहरणार्थः इस्तब्रक़ पर्शियनमधून, क़सवारा ॲबिसिनियनमधून, सीरात ग्रीकमधून, यम सीरीयनमधून, घस्साक तुर्कीमधून, क़िस्तास लॅटीनमधून, मलकूत अरेमिकमधून, काफूर (कर्पूर) हिंदीमधून. कुरआनमध्ये (२५:६०) वर्णन आहे की, मक्केतले मूर्तीपूजक रहेमान ह्या शब्दाशी अडखळले. ते विचारायचे, 'हा रहेमान हा काय प्रकार आहे?' कारण रहेमान हा मुळात अरबीतला शब्दच नव्हता. तो साबिअन व हमीरी भाषांमधून घेण्यात आला होता. येमेन व ॲबिसिनियातले ख्रिस्ती लोक देवाला 'रहेम्नान' म्हणत असत. अरबीकरण झालेला हा शब्द कुरआनमध्ये वापरला गेल्यावर, मक्कावासी हा शब्द परका आहे, असे म्हणू लागले. रहेमान शब्दाची भाषाशास्त्रीय पार्श्वभूमी माहीत नसल्याने ते त्या शब्दाचा अर्थ विचारू लागले. कुरआनमध्ये अशा तऱ्हेचे, मूळ अरबी नसलेले सुमारे १०० शब्द घेण्यात आले. आणि हे शब्द पर्शियन, लॅटीन, नाबाटीयन, हिब्रू, सिरीयन, कॉप्टिक व इतर अशाच अतिदूरच्या प्रदेशांत बोलल्या जाणाऱ्या भाषांमधून घेण्यात आले.

कुरआन हे मुख्यत्वे जरी कुरैशांच्या बोलीभाषेत निर्माण झाले तरी त्यामध्ये दुसऱ्या अरबी टोळ्यांच्या बोलीतले शब्दसुद्धा वापरले होते. कुरआनमध्ये ज्यावेळी 'फातीर' (खालेक, उत्पन्न करणारा), हा शब्द आला, त्यावेळी अब्दुल्ला इब्ने अब्बास हे कुरैशी मुसलमान गृहस्थ गोंधळात पडले. 'आकाशा व पृथ्वीला खणून उत्पन्न करून काढणाऱ्या, ह्या शब्दाने, कुरआनला काय म्हणायचे आहे ते आम्हाला कळालेच नाही', ते म्हणाले, 'नंतर एकदा एका अरबाला, मी

त्याने विहीर, खणून उत्पन्न केली आहे, असे म्हणतात ऐकले. विहीर पूर्ण खोदून व्हायच्या आधीच तो असे म्हणत होता. तत्क्षणी मला फातिर म्हणजे काय ते समजले.' अबू हुरैरा सांगतात की, त्यांनी त्या आधी 'सिक्कीन' हा शब्द कधीच ऐकला नव्हता. कुरआनच्या 'युसूफ' ह्या प्रकरणामध्ये त्यांनी तो प्रथम ऐकला. 'आम्ही सुरीला (चाकूला) तोपर्यंत 'मुदिया' हा शब्द वापरत असू', हुरैरा म्हणाले.

जलालुद्दीन सुयुती ह्यांनी अल् इत्क़ाम ह्या पुस्तकात दाखवून दिले आहे की, निरनिराळ्या अरबी टोळ्या निरनिराळ्या शब्दांचे उच्चार निरनिराळे करीत असत. कुरआनने नाजूक तऱ्हेने साहित्यिक वापर केला. 'त्याने दिले' हे सांगण्यासाठी कुरैश 'अता' शब्द वापरीत तर हिम्यारी त्याच शब्दाचा उच्चार 'अंता' असा करीत. कुरआनने अंता ऐवजी अता ह्या स्वरूपाचा स्वीकार केला. अशाच तऱ्हेने कुरआनने 'शनातीर' ऐवजी 'असाबी' व 'कता' ऐवजी 'जअब' ह्या शब्दांची निवड केली. कुरैशी शब्दकळा स्वीकारण्याची तऱ्हा कधीकधी अगदी उलट बनत असे. उदाहरणार्थ, बनो अब्बासच्या बोलीतून 'लायलित्कुम मिन आमालिकुम' हा शब्द समूह घेण्यात आला. ह्या शब्दसमुहाचा अर्थ 'तुमच्या कृतींपासून काहीही वेगळे काढून घेतले जाणार नाही', असा आहे.

अरबी शब्दांना व अभिव्यक्तीला नवीनच खोली व सौंदर्य देणारे साहित्यिक श्रेष्ठतेचे असे काही प्रमाण कुरआनने निर्माण केले की, त्यानंतरचा एकही लेखक त्याहून जास्त चांगले प्रमाण देऊ शकला नाही. कुरआनमध्ये काही रूपकांचा सुधारित तऱ्हेने, असा वापर केला गेला की, तसा तो त्यापूर्वी ऐकण्यातसुद्धा आला नव्हता. एका प्रचीन अरबी कवीने ह्या जगाची क्षणभंगूरता (अशाश्वतता) पुढील तऱ्हेने व्यक्त केली आहे.

'एखाद्या मातेच्या पुत्राने सुरक्षित आयुष्य कितीही लांबकाळापर्यंत मजेने व्यतीत केले तरी शेवटी त्याला शवपेटीमध्ये बसूनच जायचे असते.'

कुरआनमध्ये हीच कल्पना संक्षिप्त पण मर्मभेदक तऱ्हेने व्यक्त झाली आहे: 'प्रत्येक आत्मा मृत्यूची चव चाखतो.' (कुरआन ३:१८५) खून व लुबाडणूक हे प्राचीन अरबस्तानातले अगदी नेहमीचे प्रमुख प्रश्न होते. वधच फक्त वधाचा शेवट करू शकतो ही कल्पना व्यक्त करणारे काही वाक्प्रचार तयार झाले आहेत. हे वाक्प्रचार इस्लामपूर्व काळात भाषालंकार समजले जात. 'एखाद्याला मारणे म्हणजे बाकीच्या सर्व जगाला आयुष्य देणे'. 'अजून ठार मार, ज्यायोगे ठार मारणे कमी होईल'. 'वधच वधाचा शेवट करतो' हे त्यापैकी काही होत. कुरआनमध्ये ही कल्पना पुढील तऱ्हेने व्यक्त झाली आहे. 'समजदार माणसांनो, प्रतिकारामध्ये तुम्हाला (तुमचे) आयुष्य सापडेल'. (कुरआन, २:१७९)

जगातल्या दुसऱ्या इतर भाषांप्रमाणे, कुरआनपूर्व काळात अरबीमध्ये काव्य अतिशय उच्च समजलेजात असे. साहित्य क्षेत्रात कल्पनांची काव्याभिव्यक्ती ही अभिमानास्पद गोष्ट समजली जात असे. कुरआनने ही मळलेली वाट सोडून देऊन अभिव्यक्तीसाठी काव्याऐवजी गद्याचा वापर केला. खरे तर कुरआनच्या दैवीपणाविषयीचा हाच एक पुरावा समजायला हवा.

कारण शेवटच्या दिवसापर्यंत टिकून राहाणारी श्रुती (दैवी पुस्तक) ही, गद्य स्वरूपातच असायला हवी. हे, त्या, काव्याला महत्त्व असणाऱ्या इसवी सनाच्या सातव्या शतकात ईश्वराव्यतिरिक्त दुसऱ्या कुणाला ठाऊक असणार होते! ईश्वरच फक्त भविष्य व भूत जाणू शकतो. कुरआनने नेहमी पुढील पिढ्यांना संबोधित केले आहे आणि कुरआननंतर लवकरच याच काळात जनसंपर्काचे माध्यम म्हणून काव्याची सद्दी संपणार होती. कुरआनपूर्व काळात आलंकारिक भाषा ही अतिशय प्रचलित होती. साहित्याच्या इतिहासात प्रथमच कुरआनने आलंकारिक शैलीऐवजी वास्तव शैलीचा अवलंब केला. युद्ध व शृंगार कथा हेच कुरआनपूर्वी प्रसिद्ध साहित्यविषय होते. कुरआनने ह्याहून कितीतरी विस्तृत विषय साहित्याला उपलब्ध करून दिले. हे विषय नीती विषयक, कायदेविषयक, शास्त्रीय, मानसशास्त्रीय, आर्थिक, राजकीय, ऐतिहासिक, अशा सर्व तऱ्हांनी महत्त्व देणारे होते. प्राचीनकाळी दृष्टांतकथा (अन्योक्ती), हे अभिव्यक्तीचे सुप्रसिद्ध व लोकप्रिय साधन होते. कुरआनने ह्या संदर्भातसुद्धा नवीन पाया रचला आणि गोष्टी सांगायची जास्त प्रत्यक्ष व वास्तव पद्धत स्वीकारली. कुरआनमध्ये वापरलेली कारण मीमांसेची पद्धतही कुरआनपूर्व काळाहून फारच वेगळी होती. त्याकाळी कल्पना मांडून उदाहरणे देऊन (एखादी गोष्ट) सिद्ध करणे ही गोष्टच फक्त सर्वांना माहित होती. कुरआनने मात्र, प्रत्यक्ष प्रयोगात्मक व शास्त्रीय पुरावा देण्याची पद्धत अवलंबिली आणि ह्या सर्वाचा मुकुटमणी म्हणजे कुरआनने हे सर्व अतिशय सूक्ष्म साहित्यिक शैलीने केले आणि त्यामुळे काळाच्या पटावर ते अविनाशी बनले.

एक प्राचीन अरबी म्हण आहे: ‘सर्वात गोड (व सुंदर) कविता ही सर्वात जास्त खोट्या गोष्टींनी भरलेली असते.’ कुरआनने प्रथमच हे बदलून लेखनाची ‘स्पष्टोच्चारक वाणी’ (कुरआन,५५:४) ही शैली अवलंबिली, जी काल्पनिक दंतकथांऐवजी प्रत्यक्षातल्या सत्य घटनांवर आधारलेली होती. आता अरबीने कुरआनचे नेतृत्व स्वीकारले होते. इस्लामपूर्व साहित्य हे गोळा करून संग्रहित केले गेले. ती अरबी भाषा समजण्यासाठी व तिचे संरक्षण करण्यासाठी कुरआन ध्यानात ठेवून, हे केले गेले. कुरआन समजावून सांगण्यासाठी व कुरआनच्या आज्ञा व निधेष स्पष्ट करण्यासाठी शिक्षणाचे भले मोठे खाते अस्तित्वात आले. अरबीचे व्याकरण, अरबीचे वाक्या–रचनाशास्त्र व व्युत्पत्तीशास्त्र, इस्लामी परंपरा व धर्मशास्त्र व कुरआनचे अध्ययन, ह्या सर्व गोष्टींचे, पद्धतीशीर शिक्षण सुरू करण्यामागचा हेतू, हा आपल्याला कुरआनचा संदेश योग्य तऱ्हेने समजावा, हाच होता. अगदी सुरुवातीला अरबांनी इतिहास व भूगोल ह्या विषयांचा जो अभ्यास सुरू केला; तो सुद्धा कुरआनची तत्त्वे अंमलात आणण्यासाठी केलेला एक प्रयत्न होता. एखाद्या देशातल्या लोकांवर व त्यांच्या भाषेवर एखाद्याच पुस्तकाने एवढा परिणाम केल्याचे दुसरे उदाहरण जगाच्या इतिहासात नाही.

अरबी भाषेची उन्नतीकारक प्रगती केल्याने कुरआन अद्वितीय साहित्याचा नमुना बनले. ज्या कुणाला अरबी येते, त्याला अरबीमधल्या दुसऱ्या कुठल्याही साहित्य कृतीशी कुरआनची तुलना केली असता कुरआनचे एकमेवाद्वितीयत्व दिसेल. मानवी अंतःप्रेरणेला सुचू शकणाऱ्या कुठल्याही गोष्टीहून कितीतरी मोठा फरक आपल्याला कुरआनच्या दिव्य शैलीत

आढळतो. आपण ह्या प्रकरणाचा शेवट एका कथेने करूयात. दैवी निर्मिती व माणसाची निर्मिती ह्यांमधल्या फरकाचे सुदंर चित्रण ह्या कथेमध्ये, केले आहे. 'अल–जवाहीर फी तफसीर अल् कुरआन अल करीम' ह्या शेख तंतावींनी लिहिलेल्या, कुरआनच्या भाष्यामधून ही कथा घेण्यात आली आहे.

**तंतावी लिहीतात:** मी १३ जून १९३२ रोजी कामिल गिलानी ह्या इजिप्शियन लेखकाला भेटलो. त्यांनी मला थक्क करणारी एक गोष्ट सांगितली. अमेरिकन प्राच्यविद्याविशारद, फिंकल, ज्यांच्याशी गिलानींची बौद्धिक स्वरूपाची घनिष्ट मैत्री होती, ह्यांना ते एक दिवस भेटले. फिंकल गिलानींच्या कानात हळूच पुटपुटले, 'काय तूही अजूनही त्यांच्यातलाच एक आहेस; जे कुरआनला दैवी चमत्कार समजतात?' आणि ते हसले. ह्या प्रश्नामागे व हास्यामागे अशा प्रकारचा विश्वास बाळगणाऱ्या लोकांविषयी कुत्सितता भरलेली होती. त्यांना असे वाटे की, अंधश्रद्धेमुळे मुसलमानच फक्त असा विश्वास बाळगू शकतात. ह्या विश्वासाला कुठल्याही तऱ्हेचे भरीव, निरपेक्ष तात्विक स्पष्टीकरण नाही. आपला ठोसा (जबड्यावर!) योग्य ठिकाणी बसला, असे वाटून फिंकल स्वतःच स्वतः अतिशय खूश झाले. त्यांची ही वृत्ती पाहून गिलानीसुद्धा (जोरजोराने) हसू लागले. 'कुरआनच्या शैलीवर एखादे (टिकात्मक) (जाहीर) विधान करण्याआधी आपण, त्या दर्जाचे काही निर्माण करू शकतो का, हे एकदा तपासून पाहायला हवे. आपण, असा प्रयत्न करून पाहिल्यावर मगच आपण, माणसे कुरआनच्या तोडीचे लिहू शकतात, अथवा नाही ह्या विषयी निष्कर्षात्मक विधान करू शकू', गिलानी म्हणाले.

ह्यानंतर कुरआनमधली एक कल्पना अरबीमध्ये लिहून दाखविण्याचे आवाहन गिलानींनी फिंकलना केले. 'नरक फारच विस्तृत पसरलेला आहे,' ही कल्पना निवडली. फिंकल तयार झाले आणि मग दोघेही कागद व पेन घेऊन बसले. दोघांनी मिळून अरबीमध्ये सुमारे वीस वाक्ये लिहिली. 'नरक फारच विस्तृत पसरलेला आहे'. 'नरक तुमच्या कल्पनेहूनही मोठा आहे'. 'माणसाची बुद्धीमत्ता नरक किती मोठा आहे ह्याचा ठाव  घेऊ शकत नाही.' ही आणि अशीच कितीतरी वाक्ये त्या दोघांनी मिळून तयार केली. दुसऱ्या कुठल्याही तऱ्हेने ही कल्पना त्यांना व्यक्त न करता येईपर्यंत, ते वाक्ये तयार करीत राहिले व शेवटी कधीतरी थांबले. गिलानींनी फिंकलकडे एक विजयाचा कटाक्ष टाकला. 'आता आपण आपल्याकडून सर्व प्रयत्न केले आणि कुरआन हे, कुठल्या ही मानवी लिखाणाहून कसे उच्च दर्जाचे आहे, हे पाहाण्यास मोकळे झालो,' गिलानी म्हणाले. 'काय? कुरआनने ही कल्पना ह्याहून चांगल्या तऱ्हेने व्यक्त केली आहे?' फिंकलनी पृच्छा केली. 'कुरआनशी तुलना केली असता आपण तर रांगती खेळती बाळे आहोत', गिलानींनी त्यांना सांगितले. ह्यावर आश्चर्य वाटून फिंकलनी विचारले की, ह्या संदर्भात कुरआनमध्ये असे काय लिहिले आहे. सूरे काफमधील पुढील आयात गिलानींनी फिंकलना म्हणून दाखवली: त्या दिवशी आम्ही नरकास विचारू, 'काय तू भरून गेलास?' आणि नरक उत्तर देईल, 'काय अजून लोक शिल्लक आहेत?' (कुरआन ५०:३०) हे ऐकल्यावर फिंकल दिपून गेले. कुरआनच्या बेजोड शैलीने आश्चर्यचकित होऊन त्यांनी आपला पराभव मान्य

केला. ते म्हणाले, ‘तुम्ही अगदी बरोबर होतात. अगदी बरोब्बर. मी बिनशर्त पराभव मान्य करतो.’ ‘तुमच्यासारख्या उच्चविद्याविभूषित माणसाने ह्या गोष्टीला मान्यता देण्यात विशेष असे काय घडले? कारण भाषाशैलीचे महत्त्व काय आहे हे तुम्हाला उत्तम समजते,’ गिलानी म्हणाले. फिंकल हे इंग्रजी, जर्मन, हिब्रू व अरेबिक ह्या भाषांचे पंडित होते व त्यांचे संपूर्ण आयुष्य त्यांनी ह्या भाषांचे साहित्य अभ्यासण्यात घालविले होते. (शेख अल् तंतावी अल् जौहरी, अल् जवाहिर तफसीर अल् कुरआन अल् करीम, खंड : २३, पृ. १११ – ११२)

# १६ पैगंबरांचे सहकारी

**स**हाबा (पैगंबरांचे साथीदार), पैगंबरांच्या जीवनकाळात जसे त्यांच्या अवतीभवती राहिले, तसेच ते इतिहासातसुद्धा पैगंबरांच्या भोवती उभे आहेत. कारण ईश्वराच्या पैगंबराला मदत करण्यासाठी ईश्वरानेच त्यांची निवड केली होती. पैगंबर कार्य योग्य निष्कर्षाप्रत पोहोचावे म्हणून, ते पैगंबर पक्षात राहून पैगंबरांबरोबरच काम करत राहिले. अब्दुल्ला इब्ने मसूद म्हणतात, 'ईश्वराने त्याच्या पैगंबराला साथ देण्यासाठी, व त्याच्या धर्माची स्थापना करण्यात मदत करण्यासाठी त्यांची निवड केली होती.'

सहाबांचे काही गुण आता पाहूयात, ज्यायोगे त्यांना इतिहासात मिळालेले स्थान समजण्यास आपल्याला मदत होईल.

### इस्लामवरती त्यांचे खरेखुरे प्रेम होते

सहाबांचे एक वैशिष्ट्य जे कुरआनने वर्णिले आहे, ते म्हणजे त्यांची तीव्र धर्मश्रद्धा. (कुरआन ४९:७) ह्या श्रद्धेचे सर्वोच्च रूप म्हणजे प्रेम ह्या स्वरूपात व्यक्त झालेली अभिव्यक्ती. कारण एखाद्या गोष्टीविषयी एखाद्याच्या मनात निर्माण होऊ शकणारी सर्वोच्च भावना म्हणजे प्रेम. प्रेमवस्तू संदर्भात कुणाचीही वृत्ती ही नैसर्गिक प्रेरणाशक्तीनुसार ठरविली जाते. (प्रेमवस्तू काळजाचा ठाव घेते). प्रेमवस्तूविषयी प्रेमभावना जागृत झाल्यावर कुणालाही काय करायला हवे व काय करायला नको, ते बरोबर समजते. प्रेमवस्तूचा आनंद व दुःख आपली स्वतःचीच बनून जातात. भावनांची अगदी हीच तीव्रता सहाबांना इस्लामविषयी होती. एखाद्या पित्याला पुत्राच्या यशाने जसा आनंद होईल, तसाच आनंद, सहाबांना इस्लामच्या यशाने होत असे. इस्लामला 'दुखापत' झाली तर ती ठीक होईपर्यंत, करेपर्यंत, त्यांना चैन पडत नसे.

सहाबांनी जसे इस्लामला वाहून घेतले तसे एखाद्या ध्येयाला वाहून घेतल्यावर आयुष्यात बाळगायचे दृष्टिकोन व वृत्ती ह्याविषयी स्वतंत्र काही सांगण्याची गरज राहात नाही. उत्साहाने भारलेले मनच बरोबर रस्ता दाखविते. प्रेमवस्तूला अपेक्षित असणारे सर्व काही मिळावे म्हणून मग माणूस कुठलीही गोष्ट तिच्यासाठी द्यायला तयार होतो. तिच्यासाठी झालेले नुकसान मग फायद्याचेच ठरते. आणि वैयक्तिक संपत्तीच्या ऱ्हासाची, तिच्या प्रत्यक्ष किमतीची तुलना करणारी, कुठलीही भावना मनात उरत नाही. तिचा स्वीकार केल्यावर ज्या अडचणींना तोंड द्याला लागते त्याची भरपाई, त्या तेजाने होते ज्याने ती व्यक्ती लिप्त झालेली असते.

सहाबांविषयी अतिनैसर्गिक किंवा अभूतपूर्व असे काही नव्हते. आपल्यासारखीच माणसे, सहाबा होते. उरलेल्या माणसांपासून त्यांना वेगळे करणारा घटक म्हणजे त्यांना इस्लाम विषयी वाटणारे प्रेम होय. असे प्रेम सर्वसाधारण माणसे फक्त स्वतःवरच करतात! स्वतःच्या भवितव्याची बांधणी सर्वसाधारण माणूस कसा करतो, अगदी तशीच बांधणी त्यांनी इस्लामच्या भवितव्याची केली. स्वतःच्या अपेक्षा व स्वार्थ पूर्ण करण्यासाठी कुठलाही माणूस जशी शक्तीची व

संपत्तीची योजना करतो; त्याप्रमाणे सहाबांनी आपल्या जवळची प्रत्येक गोष्ट इस्लामचा स्वार्थ पूर्ण होण्यासाठी दिली. धर्मश्रद्धेच्या सत्तेची स्थापना, सहाबांच्या ह्या अतीव इस्लाम प्रेमामुळेच ते करू शकले.

### पैगंबरांना अगदी सुरुवातीलाच ओळखणे

सहाबांचे सर्वात महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी त्यांच्या समकालीन पैगंबराला ओळखले. समकालीन पैगंबराला ओळखणे व त्याच्यावरती विश्वास टाकणे, ही अतिशय अवघड बाब आहे. सहाबांव्यतिरिक्त दुसऱ्या कुठल्याच माणसांच्या गटाने आजवर असे केलेले नाही. हेच ह्या गोष्टीचे प्रमाण होय. इतिहासाच्या प्रत्येक प्राचीन टप्प्यावर पैगंबर निर्माण झाल्यावर त्यांच्या लोकांनी त्यांना नाकारले व त्यांची टवाळी केली. 'तुम्ही माझ्या पैगंबरांचा काहीच विचार केला नाही,' असे बायबल म्हणते. पैगंबरांविषयी काहीच विचार न करणारे हे लोक होते तरी कोण? हेच लोक तर प्रेषितत्वावर व श्रुतींवर (दैवी पुस्तक) विश्वास ठेवणारे लोक होते. निरनिराळ्या पैगंबरांचे स्मृतीदिन पाळण्यासाठी मोठ्या उत्साहाने ह्याच लोकांनी त्यांच्या वर्षतालिकेवर (कॅलेंडरवर) काही दिवस राखून ठेवलेले असत. पण हा अशा तऱ्हेचा आदर त्यांना फक्त पुरातन काळी घडून गेलेल्या पैगंबरांविषयीच असे. समकालीन प्रेषितांना मात्र ते टीकेचे, टिंगलीचे व टवाळीचे लक्ष्य बनवीत.

प्रेषित मूसा (मोझेस) ह्यांच्यावर विश्वास असूनही, ज्यू लोक प्रेषित इसा (जीझस) ह्यांच्यावर मात्र श्रद्धा ठेवत नाहीत. जीझसविषयी अत्यादर असणाऱ्या ख्रिस्त्यांनी, पैगंबर मोहम्मदना मात्र नाकारले. प्रेषित इब्राहीम (अब्राहम) ह्यांचे वंशज असण्याचा, कुरैशांना खूप अभिमान वाटत असे; पण इब्राहीम ह्यांच्या प्रेषित वारशाचा वंशज ज्यावेळी त्यांच्यामध्ये निर्माण झाला, त्यावेळी त्याच्यावर मात्र त्यांनी हल्ला केला व त्याला देशामधून हाकलून दिले.

प्राचीन पैगंबर व समकालीन पैगंबर, ह्यांना द्यायच्या वागणुकीमध्ये लोक इतका मोठा फरक का बरे करीत असावेत? ह्याचे कारण म्हणजे प्राचीन पैगंबरांना भव्य ऐतिहासिक परंपरांचा पाठिंबा असे. लोकांच्या राष्ट्रीय वारशाचा ते अविभाज्य घटक बनलेले असत. नंतरच्या पिढ्यांमधल्या लोकांना मागे वळून पाहाताना जुन्या काळातले प्रेषित हे पवित्र नायक वाटत असत. त्यांच्या राष्ट्रीय स्वत्वाला धीमेपणाने पुढे नेणारे पवित्र नायक. स्पष्टच सांगायचे तर श्रद्धा ठेवून लाभ होत असताना, फारच थोडे श्रद्धेला विरोध करतात. समकालीन प्रेषिताचा विचार करताना मात्र गोष्टी फारच बदलून जातात. त्याची पैगंबरी ही अजूनही वादविषयच असते. त्याचे कार्य, हे शंकेच्या पांघरूणात लपेटलेले असते. त्याच्यावर श्रद्धा ठेवण्यास बाह्यात्कारी स्वरूपामधून आत पाहावे लागते. त्याचा अनुयायी बनण्यासाठी, स्वतःविषयीचे सारे विचार गाडून टाकावे लागतात. त्याच्या कार्यामागच्या सत्यापेक्षासुद्धा त्याविषयीच्या शंकाच जास्त प्रभावी राहातात. इतिहासाच्या पडताळणीची मोहोर अजून त्याच्या प्रेषितत्त्वाला लागलेली नसते. अशा परिस्थितीमध्ये पैगंबरावरती श्रद्धा ठेवून, त्याच्या कार्यामध्ये कृतिशील सहभाग घेणे, ही जगातली सर्वात अवघड गोष्ट असते; पण अगदी हीच अवघड गोष्ट सहाबा करू शकले. ह्यात

छोटीशीही तडजोड त्यांनी केली नाही. ही अवघड गोष्ट म्हणजे समकालीन पैगंबरावर, तो अगदी प्राचीन काळात घडून गेलेल्या पैगंबरांपैकी आहे, अशा तऱ्हेची श्रद्धा ठेवणे.

खंदकाच्या युद्धाच्या वेळी (हि.स.५) कुरैश आणि त्यांना येऊन मिळालेल्या टोळ्यांनी मदिनेला वेढा घातला. ह्या कडक वेढ्यामुळे मुसलमानांना रोजच्या चरितार्थासाठी लागणाऱ्या वस्तू मिळेनाशा झाल्या. ह्या सुमाराला एक मुसलमान भीतीने म्हणाला, 'मोहम्मद तर आम्हाला खुसरो व सीझरच्या खजिन्यांची ग्वाही देत असे आणि ही सध्याची आपली अवस्था! जगण्याची शांतीसुद्धा आपल्याला लाभत नाहीये.' ज्यावेळी हे युद्ध झाले, त्यावेळी पैगंबरांचे वचन हे फक्त शाब्दिक वचन होते आणि त्याची पूर्तता दृष्टिपथातसुद्धा नव्हती. आता मात्र तो जुन्या इतिहासाचा भाग झाला आहे. पैगंबरांचे वचन 'इतिहास बनण्याच्या' आधीच सहाबांनी पैगंबरांची महत्ता ओळखली होती. इतिहासाने महत्तेचा शिक्का पैगंबरांवर मारल्यावर व त्यांनी दिलेल्या वचनांची पूर्तता झाल्यावर, आजच्या काळातले आपण, पैगंबरांच्या महत्तेला मान्यता देतो. ह्या दोन मान्यतांमध्ये जमीन आस्मानचा फरक आहे. आज मुस्लिम नसलेल्या इतिहासकारांनासुद्धा, मानवी इतिहासात पैगंबरांना अभिमानाने स्थळ द्यावे लागत आहे; पण पैगंबरांच्या आयुष्यातच त्यांना पैगंबर म्हणून ओळखणे ही खूप अवघड गोष्ट होती. ती इतकी अवघड गोष्ट होती की, ईश्वराची विशेष कृपा ज्यांच्यावर झाली होती, तेच ही गोष्ट करू धजले.

### कुरआन अजूनही वादाचा विषय होता त्यावेळी सहाबा कुरआनला चिकटून राहिले

सहाबांची धर्मश्रद्धेचा प्रसार करण्याची पद्धत, म्हणजे कुरआनचे उपलब्ध असलेले भाग, लोकांना म्हणून दाखविणे ही होती. ह्याच कारणाने जे सहाबा (मक्केहून) मदिनेला आले, ते मुक्री म्हणून ओळखले जाऊ लागले. मुक्री म्हणजे कुरआनचा पाठक. आधुनिक युगात ह्यात विशेष असे काही वाटणार नाही; पण सहाबा व आपण ह्यांमधली इतिहासाची चौदाशे वर्षे जर आपण बाजूला केली, तरच आपल्या लक्षात येईल की, त्या काळची परिस्थिती काय होती. आणि मग आपल्याला सहाबांच्या कृतीचा एक नवीनच अन्वयार्थ लागेल. त्या काळी लोकांमध्ये उभे राहून कुरआन म्हणून दाखविणे, हेच मुळी एक कर्मकठिण पहाडासारखे काम होते. सहाबांव्यतिरिक्त हे काम आजवर दुसऱ्या कुठल्याच लोकांनी केलेले नव्हते.

कुरआन म्हटल्यावर आज डोळ्यासमोर जे चित्र उभे राहाते, ते केसाएवढ्या शंकेलाही जागा न ठेवता गेल्या १४०० वर्षांत ज्या पुस्तकाचे मोठेपण, काळाच्या कसोटीवर सिद्ध झाले आहे, त्या पुस्तकाचे असते. जगातले कोट्यावधी लोक आता त्याला ईश्वराचे पुस्तक म्हणून मान्यता देतात. कुरआनवरची श्रद्धा जाहीर करणे, हा आज एखाद्याच्या अभिमानाचा विषय असतो. ज्यावेळी कुरआन साक्षात्कारित होत होते त्यावेळी मात्र कुरआनला हा सामाजिक दर्जा लाभला नव्हता. सहाबांचे कितीतरी समकालीन लोक कुरआनला, एक कुत्सितपणाने टीका करण्याचा विषय समजत. कुरआनबद्दल ते म्हणत, 'हो आम्ही ऐकलय ते. त्यात विशेष काय

आहे? आम्ही मनात आणले तर आम्हीसुद्धा असे काहीबाही बोलू. प्राचीन दंतकथा व कहाण्यां व्यतिरिक्त त्यात काय आहे?' (८:३१) त्याने 'मोहम्मदने प्राचीनांच्या दंतकथा लिहिल्या आहेत. त्या त्याला सकाळ–संध्याकाळ सांगितल्या जातात,' (२५:५) ते म्हणत.

अशा काळात कुरआनवर श्रद्धा ठेवणे म्हणजे भविष्यकालीन घटना आधीच घडून गेल्या आहेत, अशा तऱ्हेने त्यांच्याकडे पाहाण्यासारखे होते. लोकांच्या नजरेत एखादे सत्य सुस्थापित व्हायच्या आधीच त्या सत्याला ओळखण्याची विशेष दृष्टी असणे, ह्यासाठी आवश्यक होते. मग आपल्याला थोडीशी कल्पना करता येईल की, धर्मप्रसार कार्याचा पाया म्हणून कुरआन वापरणे किती अवघड होते. असे केल्याने स्वतःचे वैयक्तिक महत्त्व नष्ट होणार होते व दुसऱ्या एखाद्याचे महत्त्व मान्य होणार होते. अशा गोष्टीचे व माणसाचे महत्त्व की जे अजून जगाने मान्य केले नव्हते. अरबी कवी लबीद ह्यांनी ज्यावेळी इस्लाम स्वीकारला; त्यानंतर त्यांनी आपले काव्य लेखन सोडून दिले. त्यांना ह्या संदर्भात कुणी विचारले तर ते म्हणत, 'काय? आता कुरआननंतर?' एखाद्या कवीने जर आज अशी कृती केली व अशाच कारणासाठी आपले लेखन थांबविले, तर त्याला लोकांकडून भरपूर प्रसिद्धी व मानमरातब मिळेल, कुरआन सारखे प्रागतिक भव्य साहित्य निर्माण झाल्यावर आता मी कसे लिहू?' असे म्हणताना त्याला कुरआनचा नेत्रदीपक इतिहास दिसत असतो. इतिहासप्रसिद्ध गोष्टीची महत्ता मान्य करणे आणि ती इतिहाससिद्ध व्हायच्या आधी तिची महत्ता मान्य करणे, ह्यात फार फरक आहे. कुरआनने हा फरक पुढील शब्दांत वर्णिला आहे;

'तुमच्यापैकी ज्यांनी विजयाच्या आधी युद्धात भाग घेतला व आपली संपत्ती दिली ते (अशी कृती ज्यांनी नंतर केली, त्यांच्याशी) समान नाहीत. त्यांचे स्थान ज्येष्ठ दर्जाचे आहे.'

(कुरआन ५७:१०)

### जे सत्य अजून सिद्ध झाले नाही त्या सत्यासाठी स्वतःची वैयक्तिक संपत्ती खर्च करणे

अब्दुल्ला इब्ने मसूद ह्यांचा हवाला देऊन इब्ने अबी हातीम ह्यांनी पुढील प्रसंग वर्णन केला आहे: 'जो ईश्वराला चांगले कर्ज देईल, त्याचे ते कर्ज कितीतरी वेळा दुप्पट करण्यात येईल (५७:११)', कुरआनमधली ही आयात ज्यावेळी आली, त्यावेळी अन्सारांपैकी अबू दाहदा ह्यांनी पैगंबरांना विचारले, 'ईश्वराला खरोखरच आमच्याकडून कर्ज हवे आहे काय?' पैगंबरांनी ठणठणीतपणे हो म्हणून सांगितले. 'तुमचा हात मला द्या पाहू,' अबू दाहदा म्हणाले. पैगंबरांनी तसे केल्यावर अबू दाहदा म्हणाले की, माझी संपूर्ण बाग मी ईश्वराला देतो आहे. ह्या बागेत खजूराची सहाशे झाडे होती. त्यांची पत्नी उम्म दहादा ह्या आपल्या कच्च्याबच्च्यांबरोबर त्यावेळी बागेत होत्या. अबू दाहदांनी त्यांना बाग सोडून द्यायला सांगितले. कारण, 'आता मी ती सर्वोच्च ईश्वराला कर्ज देऊन टाकली आहे,' असे ते म्हणाले. 'वा! काय झक्कास सौदा तुम्ही केला आहात!' असे उद्गारून उम्म दाहदांनी आपल्या मुलांसह सर्व सामानसुमान घेऊन बाग सोडली. 'अबू दाहदांना स्वर्गामध्ये कितीतरी झाडे, फळांनी लगडलेली व उत्तम तऱ्हेने वाढ झालेली अशी

मिळतील (त्याची कल्पनासुद्धा करवत नाही)'. पैगंबरांनी ह्या दानाचे वर्णन केले.

सहाबांमध्ये इस्लामकार्यासाठी आपली संपत्ती दान करण्यासाठी कशी अहमहमिका लागलेली असे, त्याचे हा प्रसंग हे एक उदाहरण आहे. अर्थात, आपण हे विसरता कामा नये की, हे सर्व १४०० वर्षांपूर्वी घडले. आजच्या काळात जर एखाद्या मुसलमानाने असे काही दान धर्माचे कृत्य केले तर अशी एक दाट शक्यता आहे की, ह्या त्यागाहून कितीतरी जास्त किमतीचा, त्याचा आदरसत्कार मुसलमान करतील. सहाबांचा काळ मात्र वेगळा होता. धर्मासाठी संपत्ती खर्च करणाऱ्याला, त्या काळात समाज वेडा ठरवीत असे. असे एखाद्याने करणे, म्हणजे स्वतःला प्रसिद्धीचा शिरपेच चढविण्याऐवजी विस्मृतीच्या खोल गर्तेत ढकलण्यासारखे होते. ज्या कामासाठी सहाबांनी आपले आयुष्य व संपत्ती खर्च केली, ते कामच मुळी त्या काळी शंकेच्या दाट आवरणातून बाहेर पडलेले नव्हते. त्या कामाच्या बाजूने ऐतिहासिक पुरावा व पाठिंबा असून गोळा व्हायचा होता. समाजामध्ये मोठ्या प्रमाणावर अजून इस्लामची सत्यता पसरलेली नव्हती. अशा इस्लामी इतिहासाच्या अनिश्चिततेच्या काळात सहाबांनी आपली संपत्ती आपल्या धर्मासाठी देऊन टाकली. आता शेकडो वर्षांच्या इतिहासानंतर, १४०० वर्षांनी इस्लामचे मोठेपण ही सुस्थापित सत्य घटना बनली आहे. सुस्थापित व एकगठीत धर्म कार्यासाठी पैसा खर्च करणे, ही गोष्ट ते धर्मकार्य तसे नसतानासुद्धा त्यावर पैसा खर्च करणे, ह्याहून फार वेगळी आहे.

**स्वतःच्या डोकीचा मुकुट दुसऱ्यांच्या डोक्यावर चढविणे**

पैगंबरांनी मदिनेला स्थलांतर करण्याआधी अब्दुल्ला इब्ने उबइ हा शहराचा नेता म्हणून अगदी सहजच प्रकाशात आला होता. त्याचे चारित्र्य, व्यक्तिमत्त्वाचा लखलखाट व बुद्धीमत्ता ह्यांमुळे मदिनेतल्या लोकांनी त्याचा राजा म्हणून स्वीकार केला होता. त्यांच्यामध्ये निर्माण झालेले वाद व भांडणे आणि नंतरचे यादवी युद्ध ह्या गोष्टी, ज्या बऱ्याच काळपर्यंत चालू होत्या, त्यांना संपुष्टात आणू शकणारी व्यक्ती, म्हणून त्याची त्यांनी राजा म्हणून निवड केली होती. त्याच्या राज्याभिषेकाची तयारी लोकांनी सुरू केली.

अब्दुल्ला इब्ने उबइच्या राज्याभिषेकाची तयारी पूर्ण झाली व इस्लाम मदिनेत येऊन पोहोचला. मदिनेतल्या लोकांनी नव्या धर्माचे नैसर्गिक रीतीने स्वागत केले व इस्लाम मदिनेतल्या घरोघर जाऊन पोहोचला. एक शिष्टमंडळ मक्केत गेले असताना त्यातल्या लोकांनी इस्लामचा उपदेश स्वतः पैगंबरांच्या तोंडून ऐकला. तो ऐकून त्यांचे मत असे पडले की, राज्य करण्यासाठी त्यांना जशा प्रकारचा माणूस हवा होता, तो अब्दुल्ला इब्ने उबइ नसून पैगंबर मोहम्मद हा आहे. मदिनेतल्या लोकांच्या वतीने त्यांनी पैगंबरांना मदिनेत येऊन त्यांचे नेतृत्व करण्याचे आमंत्रण दिले. त्यांनी अकाबा येथे पैगंबरांना निष्ठेची शपथ दिली. ही घटना इस्लामी इतिहासातल्या सर्वोच्च महत्त्व असलेल्या घटनांपैकी एक होय.

ह्या घटनेचे फार दूरवर पोहोचणारे ऐतिहासिक अन्वयार्थ, जरी क्षणभर दूर ठेवले, तरीही ही शपथेची घटना अभूतपूर्व अशी होती, असे म्हणायला लागते. जणू काही मदिनेतले

लोक स्वतःच्या डोईचा मुकुट उतरवून तो एका परक्याच्या डोईवर चढविणार होते. आपल्या टोळीतला नसलेल्या माणसाला, नेतृत्व घ्यायला लोक नेहमीच, नाराज व नाखूश असत. प्राचीन अरबस्तानला अशा तऱ्हेची घटना ठाऊकच नव्हती. ह्या घटनेत अजून एक मेख पाहायची तर, ते ज्या माणसाला नेतृत्व करायला सांगत होते, तो माणूस 'इतिहास–प्रसिद्ध मोहम्मद पैगंबर' नव्हता, तर स्वतःच्या टोळीतून हाकलून देऊन बहिष्कृत केलेला असा तो माणूस (मोहम्मद पैगंबर) होता. ते फक्त वादग्रस्त व्यक्तिमत्त्व नव्हते तर घरदार नसलेला निराधार व निराश्रित असा माणूस होते. कसल्याही मोबदल्याची अपेक्षा न बाळगता मदिनावासी त्याला सर्वस्व द्यायला तयार झाले होते. २० व्या शतकात नाव घेण्याजोगे पाश्चात्य विचारवंत, उदाहरणार्थ बर्नाड शॉ, हे काय म्हणतात ते आपण ऐकत असतो. 'मोहम्मद, पैगंबर हे पश्चिमी जगताचे उत्कृष्ट नेते बनू शकले असते,' हे 'बर्नाड शॉचे' मत म्हणून आपण ऐकतो. सहाव्या शतकात मात्र हे मान्य करणे व (मदिनावासियांनी जे देऊ केले तसे) देऊ करणे ही फारच वेगळी गोष्ट होती. कारण पैगंबरांचे एकमेवाद्वितीय नेतृत्वगुण त्याकाळी इतिहासाच्या पानांवर सोनेरी अक्षरांत छापले गेले नव्हते.

**स्वतःच्या मर्यादा जाणणे**

पैगंबर स्वतःच्या सहकाऱ्यांबरोबर, अगदी छोट्या छोट्या बाबींमध्ये सुद्धा सल्लामसलत करीत असत. ते त्यांना गोळा करीत व गोष्ट समजावून सांगून त्या बाबतचे प्रत्येकाचे मत जाणून घेत. जरी ते प्रत्येकाचे मत जाणून घेत आहेत, असे दिसले तरी प्रत्यक्षात मात्र ह्यानंतर क्षणाची शांतता पसरत असे. नंतर अबू बकर उभे राहून स्वतःचे मत थोडक्यात सांगत. उमर आणि बाकी बरेचजण असेच करीत व मग एकमताचा निर्णय तयार होई. अबू बकर ह्यांच्या खिलाफतीच्या काळात सल्लामसलतीची हीच पद्धत चालू राहिली. उमर प्रथम बोलत व मग त्यानंतर ज्यांना बोलावेसे वाटेल ते काहीजण बोलत. शेवटच्या निर्णयाला मात्र सर्वांची मान्यता असे. पैगंबरांना न पाहिलेल्या मुसलमानांची संख्या वाढल्याने, उमर ह्यांच्या खिलाफतीच्या काळात मात्र सल्ला मसलतीची ही प्रथा बदलायला लागली.

ही गोष्ट खरे तर फार साधी वाटेल. पण नाही. तिच्यामागे फार मोठा अर्थ दडलेला आहे. सहाबा केवढे विनयशील होते हेच ह्यातून प्रतीत होते. त्यांना त्यांच्यामधील त्रुटी व मर्यादा ठाऊक होत्या. दुसरा स्वतःहून मोठा असू शकतो, हे मान्य करण्याची विनयशीलता ज्यांच्यात असते, तेच लोक फक्त अशी पद्धत स्वीकारू शकतात. सहाबांचा हा फार मोठा गुण होता की, ते दुसरा सामान्य माणूस त्याच्याहून दुसऱ्या माणसाकडे जसा बघेल, तशाच रितीने स्वतःकडे निरपेक्ष बुद्धीने पाहात असत.

आपण इथेसुद्धा लक्षात ठेवायला हवे की, अबू बकर व उमर ह्या दोन व्यक्तींचा इथे जो उल्लेख होतो आहे, तो ऐतिहासिक महत्त्व लाभलेल्या अबू बकर व उमर ह्यांचा नाही. अबू बकर व उमर ह्यांच्या व्यक्तिमत्वाचे मूल्य आपल्याला दिसते, ते त्याकाळी लक्षात येणेही अवघड होते. त्या इस्लामी इतिहासाच्या सुरुवातीच्या काळातसुद्धा, ह्या दोघांच्या कृतींचे महत्व मान्य करायला लागते. आता परिस्थिती बदलली आहे. इतिहासातली माहिती मिळवून आता त्यांचे मूल्यमापन

करणे जास्त सोपे आहे. सहाबांसाठी ते त्यांच्यातलेच दोघेजण होते. पण आपल्यासाठी मात्र ते, इतिहासातले दोन मोठे आधारस्तंभ आहेत. आपण जर ह्या दोघांचे कर्तृत्व मान्य केले नाही, तर तो इतिहासाचा उघडउघड अपलाप ठरेल. सहाबांनी ह्या दोघांना मोठे ठरविणे, म्हणजे स्वतःच्या व्यक्तिमत्त्वावर तिलांजली सोडून स्वतःचा परित्याग करण्यासारखे होते. हे अत्यंत अशक्य कोटीतले वाटणारे काम, सहाबांनी मात्र अत्यंत सहज केले.

### स्वतःवरती जबाबदारी घेणे

सिरीयन वाळवंटात जात अस्सलासिल नावाची एक जागा आहे. हिचा ताबा घस्सानिद व क्लब टोळ्यांनी घेतला होता. ह्या प्रदेशावर अम्र इब्ने अल आस ह्यांच्या नेतृत्वाखाली एक मोहीम पैगंबरांनी पाठविली. ज्यावेळी फौज तिथे जाऊन पोहोचली, त्यावेळी शत्रूची, युद्धाची तयारी झालेली पाहून, आपल्या स्वतःच्या फौजा त्यांच्याशी युद्ध करण्यास असमर्थ आहेत, हे त्यांच्या लक्षात आले. म्हणून मग त्यांनी एके जागी छावणी टाकली व पैगंबरांना कुमक पाठविण्या विषयी निरोप पाठविला. पैगंबरांनी मग २०० मुहाजिरांची वाढीव तुकडी बनविली व अबू उबैदा इब्न अल जर्राह ह्यांच्या नेतृत्वाखाली तिची रवानगी केली.

ज्यावेळी अबू उबैदाचे सैन्य, अम्र इब्ने अल् आस ह्यांच्या सैन्याला जाऊन मिळाले तेव्हा एकत्रित सैन्याचे नेतृत्व कोणी करायचे असा प्रश्न निर्माण झाला. अम्र इब्न अल् आस ह्यांच्या दृष्टीने काही प्रश्नच नव्हता; कारण ही कुमक त्यांच्याच तर विनंतीवरून पाठविण्यात आली होती. अबू उबैदांच्या फौजेला मात्र हे मान्य नव्हते. त्यांचे असे म्हणणे होते की, एकतर संपूर्ण सैन्याचे नेतृत्व अबू उबैदा ह्यांनी करावे किंवा मग त्यांच्या तुकडीने स्वतंत्र नेतृत्वाखाली राहावे. ज्यावेळी भांडण विकोपाला गेले, त्यावेळी अबू उबैदा अम्रना म्हणाले की, त्यांनी पैगंबरांना शेवटी वचन दिले होते की, ते दोघेही एकमताने चालतील व ऐक्यानेच कामे पार पडतील. ते पुढे म्हणाले, 'जरी तू माझा आज्ञाभंग केलास, तरी मी मात्र तुझी आज्ञा पाळेन.'

जर अबू उबैदांनी मनात आणले असते, तर त्यांनी हट्टाने अम्रना परिस्थितीची तोड काढण्यास भाग पाडले असते. त्यांच्या बाजूने कितीतरी चांगली, त्यांना पाठिंबा देणारी कारणे सापडू शकत होती. पण त्यांनी असा घटनाक्रम टाळला व उलट, आपल्या बाजूने वादाचा एकतर्फी निकाल लाऊन टाकला. सामाजिक जीवनात लोक अशारितीने वागू शकणे ही एक आवश्यक गोष्ट असते. लोक ज्यावेळी स्वतःच्या हक्कांविषयी भांडण्याचे टाळून, स्वतःची कर्तव्ये मान्य करताना औदार्य बुद्धी दाखवितात, त्याच वेळी समाजाचा गाडा निष्कंटक व सुरळीत तऱ्हेने चालू शकतो. असे करायला अपवादात्मक असलेले धैर्य लागते; पण समाजाच्या ऐक्याचे जतन करण्याचा ह्याहून दुसरा चांगला मार्गही नाही.

## आकस न बाळगणे

खालिद इब्ने वलिद हे फार शूर व सक्षम सैनिक होते. सिरियामधल्या मुसलमान सैन्याचे पैगंबरांच्या काळापासून अबूबकर ह्यांच्या काळापर्यंत ते सेनापती होते. खालिद ह्यांच्या काही सवयी न आवडल्याने उमर ह्यांनी अबू बकरना, खालिद ह्यांना त्यांच्या पदावरून दूर करण्यास सांगितले. अबूबकर उमर ह्यांच्या सल्ल्यानुसार वागले नाहीत. पण उमर ह्यांचे हे मत इतके पक्के बनले होते की, खलिफा झाल्यावर त्यांनी खालिदना त्यांच्या पदावरून काढून टाकले. मुसलमान सैन्याचा सेनापती अशा तऱ्हेने सामान्य सैनिकाच्या पदाला पदावनत केला गेला.

मुसलमानांचे विजय मोर्चे सिरियात चालू होते. त्यावेळी खालिद ह्यांनी, ह्या मोहिमेपुढे बाकी सर्व गोष्टी कमी लेखून आपले सर्वस्व पणाला लावले होते. एवढ्यात खलिफांचे आज्ञापत्र आले. त्यांना दूर केल्याची बातमी अगदी अचानक आली व वणव्यासारखी सैन्यात पसरली. अबू उबैदा इब्न अल् जर्राह ह्यांनी त्यांच्याजागी नेमणूक झाली होती. खालिद ह्यांच्या सैन्याला धक्का बसला आणि सैनिकांचा एक गट त्यांच्या तंबूमध्ये गोळा झाला. त्यांनी त्यांचा पाठिंबा खालिदना दिला व खलिफांची आज्ञा न मानण्याचा सल्ला दिला. मी उमरसाठी लढत नसून, उमरच्या ईश्वरासाठी लढतो आहे, असे सांगून त्यांनी त्या सैनिकांना घालवून दिले. पूर्वी ते सेनापती म्हणून लढले होते. आता ते सामान्य सैनिक म्हणून लढणार होते.

आकस आणि दीर्घद्वेष ह्यांच्या, पुढे गेलेला माणूसच फक्त असे वागू शकतो. आयुष्याविषयीचा सकारात्मक दृष्टिकोन अशा माणसाचा असतो व सूड घेण्यापासून तो स्वतःला रोखून धरतो. ईश्वराची मर्जी सांभाळण्यासाठी खालिद किती ध्येयनिष्ठ राहिले होते, हेच त्यांचे शब्द व कृती दाखवून देतात. त्यांची इस्लाम निष्ठा एवढी होती की, उमरचा निर्णय त्यांनी पूर्णपणे अंमलात आणला.

## कायद्याने ठरवून दिल्यापेक्षा जास्त काम करणे

हिजरी सन सहाच्या शाबान महिन्यात पैगंबरांना बातमी लागली की, कुरैशांचे १००० लोक त्यांच्या नेत्यांच्या नेतृत्वाखाली एकत्र आले आहेत व मदिनेच्या दिशेने त्यांनी कूच सुरू केले आहे. ह्यातले ६०० जण चिखलतबंद होते व शंभर जणांचे अतिप्रगत घोडदळ ह्या सैन्यामध्ये होते. मदिनेमध्ये तणाव निर्माण झाला होता. पैगंबरांनी मुहाजिर व अन्सार ह्या दोघांना, परिस्थितीचा आढावा घेऊन काय करायचे ते ठरवायला बोलाविले. नेहमीप्रमाणे ह्या प्रसंगी ज्येष्ठ मुहाजिर आपले मतप्रदर्शन प्रथम मांडू लागले. ते म्हणाले, ‘ईश्वराच्या पैगंबरा, ईश्वर तुम्हाला जशी आज्ञा देईल, तसे करण्यासाठी पुढे व्हा. आम्ही तुमच्याबरोबर आहोत. आम्ही इथे बसून, तुम्ही आणि तुमचे ईश्वर दोघेजण जाऊन लढा, असे तुम्हाला सांगणार नाही. जसे ज्यूंनी पूर्वी केले होते (कुरआन, ५:२४). उलट आम्ही म्हणतो, तुम्ही आणि तुमचा ईश्वर तर लढाच, आम्हीही तुमच्याबरोबर राहू. आमच्यातला एकजण जिवंत असेपर्यंत आम्ही तुम्हाला एकटे सोडून देणार नाही.’

मुहाजिरांनी अशा तऱ्हेने खात्री दिल्यावरसुद्धा, पैगंबरांनी लोकांना, त्यांनी काय करायला हवे, हे विचारायचे सोडले नाही. साद इब्ने मुआज़ हे अन्सारांपैकी एकजण उठले व म्हणाले, 'बहुधा आमचा विचार तुमच्या मनात आला आहे.' पैगंबर हो म्हणाले. ह्यावर साद इब्ने मुआज़नी अन्सारांच्या वतीने पैगंबरांना परत एकदा खात्री दिली. 'आम्ही तुमच्यावर विश्वास ठेवला व तुम्हाला ईश्वराचे पैगंबर म्हणून मान्यता दिली. आम्ही तुमच्या शिकवणीमागच्या सत्याला मान्यता दिली आहे. आम्ही एकमताने बिनशर्त तुमचे ऐकायचे व तुमची आज्ञा पाळायची असे वचन तुम्हाला दिले आहे. म्हणून ईश्वराच्या पैगंबरा, तुम्हाला जी योग्य वाटत असेल ती कृती करा. आम्ही तुमच्याबरोबर आहोत. आम्ही त्या ईश्वराची शपथ घेऊन सांगतो, ज्याने तुम्हाला सत्य देऊन पाठविले आहे की, जर तुम्ही आम्हाला समुद्रकिनारी नेऊन, समुद्राच्या पाण्यामध्ये बुडवायचे ठरविलेत, तरी आम्ही तुमच्या पाठीमागे येऊ. आमच्यापैकी कुणीही पाठीमागे राहणार नाही. उद्या शत्रूशी तुमच्याबरोबर लढायला उतरताना आम्हाला कुठल्याही तऱ्हेची रूखरूख नाही. आम्ही युद्धभूमीवर निग्रहाने उभे राहू व संघर्षाचे वेळी आमच्या शब्दाला जागू. कदाचित ईश्वर आम्हाला चांगल्यारितीने सिद्ध करेल, ज्या योगे तुम्हाला आनंद होईल. ईश्वराच्या कृपेने आमच्यावर विश्वास ठेवा व आम्हाला तुमच्याबरोबर घ्या.' साद इब्ने मुआज़ ह्यांना जे म्हणायचे होते, ते म्हणून झाल्यावर शेवटी शत्रूला भेटण्यासाठी कूच करण्याचा निर्णय घेण्यात आला.

बदरच्या संग्रामात (हि.स. ३) पैगंबर अन्सारांकडे पाहात होते (त्यांच्याकडून अपेक्षा बाळगत होते). इब्ने हिश्शाम ह्यांनी पैगंबरांच्या ह्या काळजीच्या पार्श्वभूमीविषयी लिहिले आहे: 'ज्यावेळी अन्सारांनी अक़ाबा येथे पैगंबरनिष्ठेची शपथ घेतली त्यावेळी त्यांनी पैगंबरांचे मदिनेत संरक्षण करण्याची जबाबदारी घेतली होती. ह्या त्यांच्या शपथेनुसार ते पैगंबरांचे मदिनेबाहेर संरक्षण करण्यास बांधील नव्हते. 'आम्ही, तुम्ही आमच्या देशात असताना, आमच्या बायका मुलांचे जसे संरक्षण करू, तसे संरक्षण तुमचे करू.' हे सर्व ठीक व छान होते. पण पैगंबरांना अशी भीती वाटत होती की, शत्रू मदिनेत जर शिरला तरच पैगंबरांच्या संरक्षणाची जबाबदारी अन्सार स्वीकारतील आणि मदिनेच्या वेशीबाहेर जर शत्रूने हल्ला केला तर मात्र ते जबाबदारी झटकून मोकळे होतील, अशीही एक शक्यता होती.'

ही गोष्ट अगदी खरी की, अन्सारांनी अक़ाबा येथे जो संरक्षण करार केला होता, त्यानुसार ते बदरमध्ये लढायला बांधील नव्हते. कारण बदर हे मदिनेपासून ८० मैल अंतरावर होते. पण अन्सारांनी मात्र ह्या गोष्टीचा युद्धापासून दूर राहाण्यासाठी कारण म्हणून वापर केला नाही. त्यांच्या भलेपणात ते इतके पुढे गेले की, त्यांनी करारातल्या कलमांना सोडून देऊन, ते पैगंबरांबरोबर गेले व त्यांनी बदरच्या युद्धात स्वतःच्या रक्ताची आहुतीही दिली.

### वादविषय टाळून स्वतःच्या मूळ ध्येयावर लक्ष केंद्रित करणे

मस्वर इब्ने मक्रमाह ह्यांचा हवाला देऊन, इतिहासकार तबरानी लिहितात: एकदा एका प्रसंगी पैगंबर सहाबांना म्हणाले, 'ईश्वराने मला सर्वांसाठी कृपा म्हणून पाठविले आहे. त्यामुळे तुम्ही मला बोलताना ऐकता, ते दुसऱ्यांना सांगत जा. ईश्वर त्याच्या कृपेचा प्रत्यय नक्कीच

देईल आणि मेरीचा पुत्र जीझस, ह्यांचे शिष्य जसे एकमेकांत भांडले, तसे तुम्ही भांडू नका. जीझसने त्यांना, मी आता तुमच्यावर विश्वास टाकून, जे काम सांगतो आहे, तेच काम सांगितले होते. पण जीझसनी सांगितलेली, कल्पना, ज्यांना आवडली नाही, त्यांना दूर निघून जायला सांगीतले गेले व जीझसला ईश्वराकडे ह्या संबंधाने तक्रार करावी लागली.' 'आम्ही तुमचा संदेश दुसऱ्यांना सांगू. तुम्हाला जिथे पाहिजे असेल तिथे आम्हाला पाठवा,' सहाबा उत्तरले.

अंतर्गत भांडणे, हा समाजाच्या रस्त्यावरील सर्वात मोठा काटा असतो. हा काटा, रचनात्मक कार्य समाजाच्या घटकांना सातत्याने चालू ठेवण्यापासून रोखतो. क्षुद्र वादांच्या दलदलीत सहाबांनी स्वतःला कधीच रुतू दिले नाही. ईश्वराच्या भयाने त्यांना नेहमीच जबाबदारीची तीव्र जाणीव राहिली. ते ही जबाबदारी पार पाडत राहिले व ती पार पाडत राहिल्याने त्यांना भांडणांसाठी वेळच मिळाला नाही. पैगंबरांच्या आयुष्यातच त्यांनी इस्लामला अरबी द्वीपकल्पाच्या सीमांवरती नेऊन सोडले. त्यांच्या मृत्यूनंतरही जणू पैगंबरांचीच आज्ञा होते आहे, अशा तऱ्हेने ते कृतिशील राहिले. स्वतःची भरभराट किंवा बढती असा विचारही मनात न आणता, ते शेजारील राष्ट्रामधून विखुरले. त्यांची घरे म्हणजे छोट्या शाळाच असत, ज्यामध्ये ते अरबी भाषा, कुरआन व पैगंबरवाणीचे (सुन्नत) शिक्षण देत. अशा तऱ्हेने पैगंबरांपासून घेतलेल्या ज्ञानाचा प्रसार ते करीत राहिले. हा इस्लामच्या मोठ्या विजयांचा काळ होता व मुस्लिम समाजातल्या काही जणांना वाढत्या मुस्लिम साम्राज्याबरोबर, राजकीय जबाबदाऱ्यासुद्धा निभावून न्याव्या लागत. राजकीय सत्तेत व वैभवात सहाबांनी त्यांचा वाटा उचलावा, अशी अपेक्षा केली जाऊ शकत होती, पण ह्या गोष्टींकडे इतकासुद्धा कल सहाबांनी दाखविला नाही. इस्लामच्या विजयाने निर्माण झालेल्या वातावरणाचा त्यातल्या बहुसंख्य जणांनी, त्यांचे धर्मप्रसार कार्य पुढे नेण्यासाठी केला. ते स्वतः व त्यांचे शिष्य ह्यांच्या धीम्या व अखंड चाललेल्या प्रयत्नांनी, फक्त पन्नास वर्षात, आज ज्याला आपण अरब जगत म्हणून ओळखतो, त्या फार मोठ्या राष्ट्राची निर्मिती केली. त्यांनी तीन खंडांमध्ये पसरलेल्या लोकांचा फक्त धर्म बदलला असे नव्हे, तर त्यांना नवीन भाषा व संस्कृतीसुद्धा दिली.

### अप्रसिद्ध राहाण्यात सन्मान मानणे

पैगंबरांच्या मृत्यूनंतर सर्वप्रथम ज्या गोष्टीची पूर्तता करायची होती, ती म्हणजे नवीन खलिफांची निवडणूक. अन्सारांनी स्वतःचा उमेदवार–साद इब्ने उबादा, ह्यांना पुढे केले. अन्सारांच्या योजनेचा सुगावा लागल्यावर मुहाजिर लगबगीने बनो सादच्या ज़कीफ़ा (पडवी, चार लोकांनी बसायची जागा) मध्ये पोहोचले, जिथे अन्सार जमले होते. अबू बकर त्यांना म्हणाले, 'तुम्ही निदर्शिलेले गुण खरोखर तुमच्या नेत्या आहेत, ह्याविषयी काहीच शंका नाही. पण जिथे अरबांच्या नेतृत्वाचा प्रश्न येतो तिथे आपल्याला कुरैशांचाच विचार प्रथम करायला हवा. भौगोलिक व वांशिकदृष्ट्या अरब जीवनात कुरैशांना केंद्रस्थान आहे. मी तुम्हाला दोन नावे सुचवितो. त्यापैकी, पसंत पडणाऱ्या कुणालाही तुम्ही निष्ठेची शपथ वाहा.' (सीरत इब्ने हिश्शाम खंड ४, पृ. ३३९)

ह्यानंतर उमर ताबडतोब उठले व त्यांनी अबू बकर ह्यांना निष्ठेची शपथ वाहिली. अन्सारांनी त्यांचे अनुकरण केले; पण त्यातल्या काही जणांना इतके दुःख झाले की, ते मुहाजिरांना म्हणाले की, त्यांनी जणू साद इब्ने उबादांचा वधच केला.

इस्लामकार्यासाठी अन्सारांनी अपरिमित व प्रचंड असा त्याग केला होता. स्वतःच्या (मालकीच्या) पाण्यातून निघून जायला जेव्हा भाग पाडण्यात आले होते. तेव्हा इस्लामच्या बुडणाऱ्या नौकेला त्यांनी सहारा दिला होता. असे सर्व तऱ्हेचे त्याग करूनही, त्यांनी अजून एक त्याग केला. त्यांनी सत्तेत योग्य वाटा न मिळविता एका कुरैशी खलिफाच्या मागे उभे राहायचे मान्य केले. ह्या नेमणुकीमागे तसेच सबळ कारण होते. मुहाजिर ज्या टोळीचे घटक होते, त्या कुरैश टोळीने शेकडोशे वर्षे अरबस्तानचे नेतृत्व केले होते. एका उमलू लागलेल्या साम्राज्याचे शासन रेटताना जशा तऱ्हेचा पाठिंबा मिळायला हवा, तसा पाठिंबा दुसऱ्या कुठल्याही टोळीतल्या नेत्याला मिळाला नसता. किंबहुना तो मिळवू शकला नसता. आपली स्वतःची ह्या संदर्भातली त्रुटी, मान्य करण्यामध्ये, अन्सारांनी वास्तवतावादी दृष्टिकोन घेतला व मुहाजिरांचा एकतर्फी निर्णय त्यांनी स्वीकारला. स्वार्थरहित वास्तवतावादाचे इतके नामी उदाहरण जगाच्या इतिहासात दुसरे आढळणार नाही.

## तीव्र भावनिक घटनाप्रसंगी तार्किक निर्णय

उहदचा संग्राम (हि.स. ४), हे इस्लामी इतिहासातले सर्वात मोठे युद्ध होते. बदरच्या युद्धातल्या पराभवाचा वचपा काढण्यासाठी मुसलमानांच्या रक्ताची तहान लागलेले, सूडाने पेटलेले कुरैश, मुसलमानांवर तुटून पडले. ज्यावेळेला हातघाईची लढाई सरू झाली; अगदी त्याचक्षणी पैगंबरांनी स्वतःची तलवार काढली व ती घेऊन तिची बरोब्बर किंमत चुकती करणारा कोण आहे म्हणून विचारले. पहिल्यांदा काही जणांनी इच्छा व्यक्त केली; पण पैगंबरांनी तलवार दिली नाही. मग अबू दुजाना पुढे झाले आणि त्यांनी तलवारीची पूर्ण किंमत काय आहे म्हणून पैगंबरांकडे चौकशी केली. 'शत्रूला मारत असताना ती पूर्ण वाकून जाईपर्यंत तिचा वापर व्हायला हवा. हे पेलू शकणाऱ्यालाच मी ती देऊ करेन,' पैगंबर उत्तरले. अबू दुजानांनी तलवारीची पूर्ण किंमत देण्याचे कबूल केले व पैगंबरांनी त्यांना ती दिली. हातात तलवार पडल्यावर, पैगंबरांची तलवार मिळाल्याचा अभिमान, अबू दुजानाच्या चेहऱ्यावर स्पष्ट तऱ्हेने व्यक्त होत होता व तो, ती मिरवीत फिरू लागला. 'असे मिरविणे ईश्वराला मंजूर नाही. पण प्रसंगच असा आहे की, तुला माफ केले जाईल,' पैगंबर त्याला म्हणाले. आपण हाराकिरी करण्यासाठी सिद्ध झालो आहोत, हे दाखविण्यासाठी अबू दुजानाने आपल्या डोक्याला लाल रंगाचा रुमाल बांधला. खरोखर त्याने अतोनात शौर्य दाखविले. त्याच्या वाटेत येणाऱ्या प्रत्येकाचा खातमा तो करू लागला. नंतर एक आश्चर्यजनक घटना घडली. जी अबू दुजानांनी सांगितली आहे. कुणीतरी एकजण शत्रूला अत्यंत हिंसक रीतीने उत्तेजन देत होता. मी त्याला मारण्यासाठी पुढे सरसावलो. पण तो माणूस जोरात किंचाळला आणि माझ्या लक्षात आले की, ती एक बाई होती. एखाद्या बाईला मारून, पैगंबरांच्या तलवारीचे अवमूल्यन व अप्रतिष्ठा करण्याचे मी टाळले. स्वतःला रोखून धरले.

दुसऱ्या एका सहाबांपैकी माणसाने ह्या प्रसंगाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे, 'हिंद बिंत उत्बाला मारण्यासाठी अबू दुजानाने तलवार उचलल्याचे मी पाहिले. पण नंतर मात्र त्याने अचानक तिच्या डोक्यावरून तलवार काढून घेतली.' पैगंबरांची एक युद्धकालीन आज्ञा अशी होती की, स्त्रिया, मुले व म्हातारी माणसे ही मारली जाता कामा नाहीत. युद्धाच्या रणधुमाळीतही अबू दुजानांना पैगंबरांची आज्ञा आठविली आणि त्यांची तलवार त्यांच्या बळीचा वेध घेणार एवढ्यात, ती स्त्री आहे हे पाहिल्यावर त्यांनी ती मागे घेतली.

ह्यावरून सहाबांचा आपल्या भावनांवर किती ताबा होता, ते कुणाच्याही लक्षात यावे. अगदी अशक्य कृती शक्य करून टाकायला लावणाऱ्या, भावावेगाच्या क्षणीही, ते तार्किक निर्णय घेऊ शकत. भावनेला आव्हान किती दिले, तरीही भावावेगाच्या भरात न जाता, तार्किक निर्णय करणे ही फार अवघड गोष्ट आहे. राग आणि सूड ह्या भावनांनी सर्व मर्यादा ओलांडल्यावरही, मनाच्या चौकटीचा सांचा ते ढासळू देत नसत. अतिवेगाने प्रवास करीत असताना दिशा बदलणे, ऐकायला जरी सोपे वाटले, तरी प्रत्यक्षात मात्र ती फार अवघड गोष्ट असते. ईश्वराचे भय ज्याला आहे असाच कुणी, ही अशी अवघड कामे करू शकतो. कारण जणू काही ईश्वर त्याच्या पूर्ण सत्तेने व वैभवासह त्याच्यासमोर उभा असतो.

### वृक्षासारखे वाढत जाणे

सहाबांचे दोन गुण वर्णन करण्यासाठी कुरआन, तौराह व इंजिल (जुना व नवा करार) ह्या दोघांचाही उल्लेख करतो. तौराह, त्यांच्या वैयक्तिक गुणांवर प्रकाश टाकतो, तर इंजिल त्यांच्या समाजाचे घटक म्हणून असणाऱ्या गुणांवर प्रकाश टाकतो.

'तौराह व इंजिलमध्ये त्यांचे वर्णन अशा तऱ्हेने केले गेले आहे: जशा तऱ्हेने बीज अंकुर निर्माण करून त्याला बळ देते, ज्या योगे त्या अंकुराची खूप वाढ व्हावी व खोडाच्या आधारावर तो वृक्ष वाढत जावा आणि त्यामुळे पेरणी करणाऱ्याला त्यापासून संतोष लाभावा. अश्रद्धावंतांना ह्यापासून फार राग यावा म्हणून ईश्वर असे करतो. ईश्वराने त्यांच्यापैकी जे श्रद्धावान बनतील व ईश्वरनिहित चांगली कामे करतील त्यांनाच दया दाखवायची व खूप मोठे बक्षीस द्यायचे, असे वचन दिले आहे.' (कुरआन, ४८:२९)

हे उदाहरण सद्यकालीन बायबलमध्ये पुढील तऱ्हेने दिले आहे:

'आणि तो म्हणाला, माणूस जसा जमिनीवर बीज पेरतो, तशाच तऱ्हेचे देवाचे साम्राज्य आहे; रात्री व दिवसा झोपून उठावे, बीजाने अंकुर द्यावा व त्याची वाढ व्हावी, हे कसे होते हे त्याला माहीत नसते. कारण भूमीच तिच्यामधून तिचे फळ निर्माण करते. प्रथम (धान्याचे) ताट निर्माण होते, मग कणीस आणि शेवटी कणसांत दाणे भरतात.

ज्यावेळी फळ तयार होते, त्यावेळी ते चटकन विळ्यासमोर आणले जाते, कारण सुगीचे दिवस आलेले असतात. आणि तो (माणूस) म्हणतो ईश्वराचे राज्य आम्हाला का बरे आवडावे? किंवा त्याच्याशी तुलना करण्यासाठी दुसरी तुलाना कुठे आहे?

मोहोरीच्या दाण्यासारखे असलेले बीजे जमिनीत पेरल्यावर जमिनीत असलेल्या

दुसऱ्या बीजाहून फार काही वेगळे नसते, तसेच हे आहे.

पण हे बीज पेरले गेल्यावर, वाढते आणि दुसऱ्या झुडपांपेक्षा मोठे होते आणि त्याला मोठ्या फांद्या फुटतात, ज्यावर हवेत उडणारे पक्षी, त्याच्या सावलीमध्ये निवारा शोधतात.'

(मार्क, ४:२६–३२)

ही जी दृष्टांतकथा बायबल व कुरआनमध्ये सांगितलेली आहे, ती आपल्याला हे सांगते की, पैगंबरांच्या सहकाऱ्यांच्या सामाजिक जाणीवा, एखाद्या झाडाप्रमाणे कशा उन्नत होत गेल्या. एक छोटेसे बीजारोपण ज्यांच्यामध्ये घडले होते, त्यांच्यापासूनच महावृक्षाचा बुंधा तयार झाला, ज्याच्या मुळांनी सावकाशपणे जमिनीमध्ये पकड मिळविली व दूरदूरवर त्याच्या फांद्या पसरल्या. अतिशय नैसर्गिक रीतीने, टप्प्या–टप्प्याने त्यांची वाढ झाली व मग एकेवेळी ते त्यांच्या पूर्णवाढीच्या पायरीला पोहोचले. त्यांच्या ह्या सर्वांगसुंदर वाढीने श्रद्धावंतांच्या मनात तीव्र आदर निर्माण होई तर अश्रद्धावंतांच्या मनात वैफल्य.

इस्लामची वाढ वृक्षाप्रमाणे व्हावी, म्हणून ईश्वराची इच्छा असलेले हे काम करण्यासाठी, पैगंबरांच्या सहकाऱ्यांची निवड करण्यात आली होती. ईश्वराचीच तशी इच्छा असल्याने सहाबांचे काम सोपे होते, असा मात्र त्याचा अर्थ नव्हे. सोप्पे आणि चटकन काम करण्याचे मार्ग टाळून संयम व धीराच्या मार्गाने त्यांनी काम करावे अशी अपेक्षा व गरज होती. ईश्वराच्या इच्छेला प्राधान्य देऊन त्यांनी स्वतःच्या इच्छा व स्वार्थ ह्यांना पुरून टाकावे अशीसुद्धा अपेक्षा होती. ह्या जगामध्ये, कुठल्याही लाभाची अपेक्षा न बाळगता, इस्लामचा वृक्ष अस्तित्वात यावा म्हणून सहाबांना त्यांच्याजवळचे सर्व काही द्यावे लागले. ईश्वराच्या योजनेत त्यांना बिनशर्त सहभागी व्हावे लागले. त्यांच्या प्रयत्नांमुळेच एका कायम फळाफुलांनी लगडलेल्या बागेत इस्लामचे रूपांतर झाले व ही बाग भव्य झाली. जगातल्या कुठल्याही सत्तेला ह्या बागेची नासधूस करता आली नाही.

# १७ सद्यकालीन युगात पैगंबरीचे स्पष्टीकरण

**शे**वटचे पैगंबर मोहम्मद (स.) ह्यांना ईश्वराने असे काम निर्धारित केले की त्यांनी खऱ्या धर्माचे वर्चस्व दुसऱ्या सर्व धर्मांवर स्थापित करावे. (कुरआन, ६१:९)

इस्लामच्या पैगंबरांना जे, हे कार्य विश्वासाने निहित करण्यात आले, ते त्यांच्या अनुयायांच्या साठीसुद्धा तसेच निहित करण्यात आले आहे. त्या आधीच्या सुमारे २५०० वर्षांत ज्या गोष्टीची तयारी करण्यात आली होती, त्या भव्य योजनेची सांगता मोहम्मद ह्यांनी आणलेल्या धर्माच्या वर्चस्वाने करण्यात आली. सर्व पैगंबरांना जे करायचे होते, ते पूर्णत्वास नेण्यात आले. पैगंबरांच्या उम्माहची (समाज, अनुयायी), ही अशी परिस्थिती आहे. गेल्या १००० वर्षांमध्ये खऱ्या धर्माचे वर्चस्व निर्माण करण्यासाठी पाया रचण्यात आला आहे. त्यांना मिळणाऱ्या संधींचा हुशारीने व सद्सद्विवेक बुद्धी जागृत ठेवून जर मोहम्मदांच्या अनुयायांनी वापर केला तर नक्कीच दैवी मदतीचे पांघरून त्यांनासुद्धा लाभेल जसे ते पैगंबरांना लाभले. हे ईश्वराने दिलेले वचन आहे.

'माणूस आणि त्याचा देव' ह्यासंबंधीच्या विश्वकोशामध्ये, इस्लाम वरती एक प्रकरण आहे. त्या प्रकरणामध्ये मुहम्मद पैगंबरांनी इस्लामी क्रांती करून, 'मानवी इतिहासाचे वळणच बदलून टाकल्याचा' स्पष्टोल्लेख आहे. (पृ. ३८९) हा लेखक ख्रिस्ती प्राच्यविद्याविशारद असूनही, इस्लामने जो एकमेवाद्वितीय ऐतिहासिक परिणाम घडविला, तो मान्य करण्यावाचून त्याला गत्यंतर राहिलेले नाही. माणसाच्या आध्यात्मिक उन्नतीहून कितीतरी जास्त असे काही इस्लामने निर्मिले. वरवरचे समज व मूर्तिपूजा ह्यांच्या ओझ्याने दबून गेलेल्या माणसाला, त्यातून बाहेर काढून, जीवनातल्या कितीतरी क्षेत्रात, आपली प्रगती इस्लामच्या साहाय्याने करून घेता आली. इस्लामी क्रांतीचे फळे असलेल्या ह्या निर्माणवस्तूंचा इस्लामच्या प्रगतीसाठी व फायद्यासाठी परत परत वापर करता येऊ शकतो. आताची परिस्थिती ही, परत एकदा उत्कर्षाला येऊन इस्लामचे वर्चस्व प्रस्थापित व्हावे, अशी आहे. चांगल्या सुपीक सिंचित जमिनीतून जसे उत्तम पीक येते, तसेच ही गोष्टसुद्धा वास्तवतेमध्ये उतरू शकते.

एक ईश्वर व मृत्यूनंतरचे जीवन ह्या दोन श्रद्धांवर खंबीरपणे कायम राहून पैगंबर व त्यांच्या सहकाऱ्यांनी आध्यात्मिक क्रांतीच घडवून आणली. तरीही फार दूरवर पोहोचणारे भौतिक परिणामसुद्धा घडलेच. खऱ्या धर्माचा प्रचार करणे ही गोष्ट प्राचीन काळचा विचार केला असता आता सोपी बनली आहे. फार मोठे सामाजिक बदल लाटेसारखे येऊन गेल्याने, मानवाला ईश्वराकडे बोलावणाऱ्याच्या रस्त्यातले मोठे अडथळे, बुडून गेले आहेत.

'पश्चाताप' शीर्षकाचा कुरआनमधला सूरा ज्यावेळी साक्षात्कारित करण्यात आला; त्यावेळी पैगंबरांनी अलींना, इथून पुढे मूर्तिपूजाकांना हज करू दिली जाणार नाही, असा संदेश देऊन मक्केला पाठविले. त्यांना हा निरोप इतक्या जोरजोराने ओरडून सांगायला लागला की, शेवटी त्यांचा आवाज घोगरा होऊन बसला. आजच्या काळात ध्वनीवर्धकाचा वापर करून त्यांनी हीच गोष्ट सोप्या तऱ्हेने केली असती. आधुनिक सुखसोयींचा वापर इस्लामप्रसारासाठी कसा

करता येऊ शकेल, ह्याचे हे छोटेसे उदाहरण झाले.

खऱ्या धर्माच्या प्रसार व प्रचाराचे दोन काळ पडतात. एक शेवटच्या पैगंबरांच्या येण्यापूर्वीचा व दुसरा त्यानंतरचा. मोहम्मद पैगंबरांच्या आधी, दैवी पुस्तकाच्या संरक्षणाची जोखीम पैगंबरांच्या अनुयायांवर टाकण्यात येत असे. कुरआनच्या शब्दात, 'ईश्वराच्या पुस्तकांची जपवणूक करण्याची जबाबदारी त्यांच्यावर होती.' (५:४४) पण कुरआन निर्मितीनंतर मात्र ईश्वराने स्पष्टपणे जाहीर करून टाकले, 'आम्हीच कुरआनची निर्मिती केली व आम्ही नक्कीच त्याचे संरक्षण करू.'(१५:९)

इस्लामच्या पैगंबरांच्या पैगंबर कार्याबरोबरच ह्या जगातला अनेकेश्वरत्ववाद नष्ट व्हावा व त्या जागी एकेश्वरत्ववादाने राज्य करावे, ही ईश्वराचीच इच्छा होती (कुरआन, ८:३९). फक्त ईश्वरच मानवी विचारांमध्ये अशा तऱ्हेचे बदल घडवून आणणारे प्रसंग व परिस्थिती निर्माण करू शकतो. म्हणूनच पैगंबर मोहम्मद येण्याच्या २५०० वर्षे आधीपासून इस्लामच्या क्रांतीसाठी पाया रचण्यात आला होता. इस्लामच्या पैगंबरांना ह्या रचलेल्या पायावरती काम करून अनेकेश्वरत्ववादावर एकेश्वरत्वाचे वर्चस्व स्थापन करायचे होते.

पैगंबरांच्या काळातल्या इस्लामी क्रांतीने अनेकेश्वरत्ववादाला कायमची मूठमाती दिली. पैगंबर व सहाबांच्या कार्यामुळे, अनेकेश्वरत्ववाद परत ह्या जगावर राज्य करेल, अशी परिस्थिती व शक्यता नष्ट झाली. तरीही, आधुनिक काळात एकेश्वरत्वाच्या संकल्पनेने ह्या जगावरचे आपले वर्चस्व परत एकदा गमावले आहे. आजकालच्या काळात निरीश्वरत्ववाद हा अभिमानाचा विषय बनला आहे व प्रत्यक्षात, आचारांमध्ये एकेश्वरत्ववाद हा दुय्यम दर्जाचा समजला जाऊ लागला आहे.

निरीश्वरत्ववाद हा ह्या जगात आपले डोके वर काढणार आहे, ह्या गोष्टीचे ईश्वराला पूर्ण ज्ञान होते. म्हणून मग त्याने त्याची मदत पाठविली व निरीश्वरत्वाचा मुकाबला करून एकेश्वरत्वाचे (जाणारे) वर्चस्व परत स्थापण्यासाठी परिस्थिती निर्माण केली. ही प्रक्रिया गेली हजार वर्षे चालू आहे. आता ती उच्चबिंदूला येऊन पोहोचली आहे. एकेश्वरत्वाचे श्रेष्ठत्व परत एकदा बिनतोडपणाने सिद्ध व्हावे, अशी परिस्थिती निर्माण झाली आहे.

प्राचीन इराकच्या उर ह्या राजधानीत पैगंबर इब्राहीम ह्यांनी, सुमारे ४००० वर्षांपूर्वी ईश्वराचा धर्म सांगायला सुरुवात केली. ईश्वर हाच सर्व नफ्यातोट्याचा नियंत्रक आहे, ही गोष्ट त्यांनी लोकांच्या मनावर ठसविली. त्याचा कुणीही भागीदार नाही. त्या एकाकडूनच लोकांनी मदत मागावी व त्या एकाचीच पूजा करावी. एकेश्वरत्वाचा हा संदेश तत्कालीन राजा नम्रूद ह्याला सहन होणे अशक्य होते. त्याच इब्राहीम ह्यांच्या उपदेशावरची प्रतिक्रिया इतकी तीव्र होती की, त्याने ईश्वराच्या पैगंबराला जिवंत जाळण्याची आज्ञा दिली. ह्यामधून इब्राहीमना दैवी चमत्काराने वाचविले. आज मूर्तीपूजा ह्या जगात काही ठिकाणी चालू आहे. पण तरीही आजच्या काळात जर इब्राहीम ह्यांचा संदेश एखाद्या देशात सांगायचा असता, तर कुठलाही आधुनिक राज्यकर्ता, अशा हिंसक तऱ्हेने वागला नसता.

ह्याचे मुख्य कारण म्हणजे राज्यकर्त्यांच्या मनःस्थितीमध्ये व तत्त्वज्ञानात झालेला बदल. नम्रूदच्या काळात अनेकेश्वरत्व हा एक राजकीय विचार होता. तर आज मात्र तो अतिशय मर्यादित असा धार्मिक विचार आहे. प्राचीन काळातली सरकारे हीच मुळी अनेकेश्वरत्वाच्या पायावर उभारलेली असत. नम्रूद त्याच्या काळातल्या इतर दुसऱ्या राजांप्रमाणे, त्या व्यवस्थेचाच एक घटक होता. त्या काळच्या समजाप्रमाणे, तो सूर्यदेवाचा अवतार होता; ज्यामुळे त्याला दुसऱ्या लोकांवर सत्ता गाजविण्याचा अधिकार प्राप्त झाला होता. आधुनिक काळातला कुणीही राज्यकर्ता, हा अशा तऱ्हेचा दावा करून आपले राज्य कधीच उभारणार नाही. आता दैवी शक्ती ऐवजी लोकमान्यता, ही एखाद्याला सरकार बनविण्यासाठी आवश्यक गोष्ट असते. आणि म्हणूनच तौहिद (एकेश्वरत्व) चा शुद्ध संदेश, हा आजच्या एखाद्या राज्यकर्त्याला अजिबात आव्हान ठरू शकणार नाही. नम्रूद आणि त्याच्या समकालीनांसाठी मात्र, त्यांच्या सत्तेचा समूळ नाश करणारा, असाच एकेश्वरत्ववाद होता.

सत्तेची गाठोडी सांभाळणाऱ्यांच्या कृतिशील विरोधातच, प्राचीन पैगंबरांना आपले काम करावे लागे. पैगंबरकार्य व विरोध, दोन्ही एकाच वेळी ऐनभरात असत. ते लोक, ज्या दैवी पात्रतांचा दावा करीत, त्याला पैगंबराची शिकवण म्हणजे शाप असे. कारण ह्या दोन्ही गोष्टी एकमेकांच्या प्रत्यक्ष विरोधात असत. अशा दैवी पात्रता नाहीत म्हणून सांगणे, म्हणजे राज्य करण्याच्या स्वतःच्या हक्कालाच सुरूंग लावण्यासारखे होते. आपण कुठल्या तरी देवाचे पुत्र अथवा अवतार आहोत, असे सांगूनच एखाद्याला राजेपदापर्यंत पोहोचता येई. एकेश्वरत्वाचा एखाद्याने, अशा काळात उपदेश सुरू करणे म्हणजे अनेकेश्वरत्ववादी राज्यसत्तेच्या स्तंभांनाच उद्ध्वस्त करण्यासारखे होते. हा धोका नाहीसा करण्यासाठी प्रस्थापित सत्तेला पावले उचलावी लागली. कुठल्याही माणसांमध्ये अतिनैसर्गिक शक्ती नाहीत हे सत्य इस्लामने प्रथम ठळकपणाने जगाला दाखविले. ईश्वर हाच सर्व शक्तीचा स्त्रोत असतो. इस्लामने सर्व माणसांची समानता जगाला प्रथम जाहीर केली. एखाद्याला अनुवांशिक श्रेष्ठत्व दिले जाऊ शकत नाही, असे इस्लामने शिकविले. धार्मिक विचारातून राजकीय संस्था, ही ह्याच काळात वेगळी झाली. राज्यकर्त्यांच्या सत्तेचा पाया, हा तिथून पुढच्या काळात लोकमर्जीतून घडणार होता. 'आकाशातून' सत्ता मिळविण्याऐवजी, त्याला ती जमिनीवरच घडवावी लागणार होती. दैवी पात्रतांचा दावा, हा इथून पुढे सत्ता मिळविण्यासाठी, एखाद्याला उपयुक्त ठरणार नव्हता.

अतिनैसर्गिक पात्रता सांगणाऱ्या प्राचीन डॉक्टरांची (वैद्यांची) कथा अशीच आहे. प्राचीन काळी, यशस्वी वैद्य बनण्यासाठी एखाद्या माणसाला, त्याने गूढ शक्ती संपादित केल्या आहेत व वैद्यकाची गुढतत्त्वे त्याला अतिनैसर्गिक शक्तीकडून कळली आहेत, असे खोटेच सांगावे लागे. अशा समाजात, वैद्यकी, महाविद्यालयात शिकायची असते व तिचा आणि गूढ शक्तीचा काहीही संबंध नाही, असे एखाद्याने सांगायचे, अशी कल्पना करून पाहा. ह्या कल्पनेला पहिला विरोध त्या शक्तींचा दावा करून वैद्यक व्यवसाय चालविणाऱ्या माणसानेच सर्वप्रथम केला असता. आधुनिक काळातले वैद्य तर अगदी वेगळ्या तऱ्हेने वागतात. विश्वविद्यालयात जाऊन

वैद्यक शिकायला विरोध करण्याऐवजी, ते स्वतः तसेच शिकतात व दुसऱ्यांनाही तसे शिकायला प्रोत्साहन देतात.

पैगंबर मोहम्मदांनी केलेल्या इस्लामी क्रांतीने, इतिहासाला बदलणाऱ्या काळाची, इसवी सनाच्या सातव्या शतकात झालेली सुरुवात, शक्य झाली. आता ही बदलाची प्रक्रिया संपुष्टात येते आहे. मानवी ज्ञानाच्या परिघामध्येच, पाठिंबादर्शक पुरावा देऊन, खऱ्या धर्माचे प्रसारक आपला प्रसार करू शकतात. वैधानिक व सामाजिक प्रगतीमुळे धर्मप्रसार हा जास्त स्वतंत्र व मोकळा बनला आहे. एखादा नम्रूद किंवा फारोह, धर्मप्रसाराच्या विरोधात उभे राहून सत्याचा आवाज बंद करू शकत नाही. निसर्गातले कार्यकारण भाव व कार्यशक्ती ह्यांच्याविषयी ज्ञान प्राप्त करण्याचे फार मोठे मार्ग खोदण्यात आले आहेत व ह्यांमुळे आपले ज्ञान फार वाढले आहे. हे सर्व ज्ञान, खऱ्या धर्माच्या शिकवणुकीला खंदा बौद्धिक पाठिंबा देते आहे. सत्याला हिंसक विरोध करणाऱ्यांच्या पायाखालची जमीन त्यांच्या पायाखालून नाहीशी झाली आहे.

शास्त्रीय क्रांती नावाची, प्रचंड बौद्धिक क्रांती आधुनिक काळात होऊन गेली आहे. लोकांच्या दृष्टिकोनांमध्ये, तिने जे बदल घडविले आहेत, ते सर्वस्वी सत्यधर्माच्या बाजूने आहेत. जर उपलब्ध असलेल्या सद्यकालीन संधींचा सुयोग्य वापर केला तर एकेश्वरत्वाचा विचार पुनर्स्थापित केला जाऊ शकतो. लोकांच्या बुद्धीला लिखित व भाषणाच्या स्वरूपात केल्या गेलेल्या आवाहनांनी हे घडू शकते. प्राचीनकाळी जशी सत्यधर्माच्या प्रसारासाठी हातात शस्त्रे धरण्याची गरज होती, तशी ती आता आधुनिक काळात राहिलेली नाही.

आधुनिक काळातली वैज्ञानिक क्रांती, ही खरे तर इस्लामी क्रांतीचा अवक्षेप म्हणायला हवा. पैगंबरांनी केलेल्या क्रांतीमुळे, ईश्वराने काही घटक कार्यान्वित केले. ऐतिहासिक बदलांच्या प्रक्रियेचा शेवट, वैज्ञानिक क्रांतीने करण्यात आला. त्याची सुरुवात, इस्लामी क्रांतीनेच केली. इस्लामी क्रांतीच्या सुरुवातीच्या काळी अनेकेश्वरत्वावर एकेश्वरत्वाचे वर्चस्व स्थापण्यात आले, त्याचवेळी ईश्वराने असे घटक निर्माण केले की, जे शेवटी, एकेश्वरत्वाला परत एकदा निरीश्वरवादी व अज्ञेयवादी विचारावर विजय मिळवून देतील.

इस्लाम येण्याआधी सर्व जगावर अनेकेश्वरत्ववाद राज्य करीत होता. रूपाची पूजा, हे अनेकेश्वरत्वाचे खरे स्वरूप असते. अनेकेश्वरत्वाच्या उर्मिने, लोक चटकन भावणाऱ्या अथवा भव्य व दिव्य दिसणाऱ्या भौतिक गोष्टींचीच पूजा करू लागत. मग तो आकाशातला सूर्य असो किंवा जमिनीवरचा राजा. म्हणूनच अनेकेश्वरत्वाच्या युगात शास्त्रीय संशोधन होऊ शकत नसे. सुप्रसिद्ध इतिहासकार आर्नोल्ड टॉयनबी ह्यांनी एका मुद्याकडे लक्ष वेधले आहे. नैसर्गिक घटनांना पूजावस्तू बनविल्याने, त्यांना संशोधनाचा विषय बनविणे शक्य नव्हते. नैसर्गिक घटनांकडे चमत्कार म्हणून आश्चर्याने जे बघितले जात असे, ते इस्लाममुळे व त्याच्याबरोबर एकेश्वरत्ववादामुळे कोलमडून पडले. ईश्वराव्यतिरिक्त जे काय आहे, ते त्याची निर्मिती आहे, हे लोकांना समजले. अधिभौतिक घटनांना पवित्र मानण्याचे काहीच कारण शिल्लक न राहिल्याने, आता त्यांचे विश्लेषण व संशोधन शक्य झाले. इस्लामने मानवी बुद्धीला जे स्वातंत्र्य बहाल केले,

त्याची सुरुवात, पैगंबरांच्या जीवनकाळातच इस्लामी क्रांतीपासून झाली. एका चंद्रग्रहणाच्या प्रसंगी पैगंबर मुहम्मद ह्यांनी सांगितले की, सूर्य व चंद्रग्रहण ह्या ईश्वराच्या खुणा होत. इस्लामच्या पूर्वी एक अंधश्रद्धा होती की, ग्रहणांचा संबंध काही माणसांच्या जन्म व मृत्यूशी असतो. अशा तऱ्हेने पैगंबरांनी मानवी व अधिभौतिक घटनांच्या महत्तेला नाकारले. आणि फक्त एकाच एक ईश्वराची महत्ता स्थापित केली. असे करताना, त्यांनी एक अशी विचारधारा सुरू केली की, जी घटनाक्रमाने युरोपात जाऊन पोहोचली व आधुनिक काळातल्या वैज्ञानिक क्रांतीची सुरुवात, अशा तऱ्हेने झाली.

इस्लामी क्रांतीचा सर्वात मोठा फायदा म्हणजे तिने अंधश्रद्धेच्या युगाला कायमचे नाहीसे केले. खोट्या धार्मिक समजुतींना सर्वसाधारणपणे धूसर व अंधुक कल्पनाजालाचा पाठिंबा असतो. त्या कधीच सत्यघटनांवर आधारलेल्या नसतात. प्राचीन अरबस्तानात अशीच एक समजूत होती, की, चंद्र व सूर्यग्रहणे व एखाद्या महापुरुषाचा मृत्यू ह्यांचा अन्योन्य संबंध असतो. ही अंधश्रद्धा वर उल्लेखिलेल्या खोट्या धार्मिक समजुतींपैकी एक उदाहरण होय. इस्लाम स्वीकारताना सर्वात मोठा अडथळा, ह्या समजुती असत. ज्याचे मन अशा समजुतींनी भरलेले आहे; तो इस्लामची तुलना दुसऱ्या विचारांशी निरपेक्षपणे करू शकत नाही. घटनांचे विश्लेषण वास्तव व पटणाऱ्या पुराव्यानिशी करण्याऐवजी असा माणूस काही पूर्वीच ठरविलेल्या कल्पनांना रास्त समजतो, व जी घटना ह्यात बसत नाही, तिला चुकीची व अयोग्य ठरवितो. उदाहरणादाखल धर्माचा इतिहास घेऊयात. इस्लामची इतिहाससिद्धता जो माणूस निरपेक्षपणे विचारात घेईल, त्याला इस्लामची तुलना दुसऱ्या धर्मांशी केली असता, इस्लामविषयक ऐतिहासिक शंका व्यक्त केल्या जाऊ शकत नाहीत, हे मान्य करावे लागेल. दुसरे धर्म मात्र गूढता दंतकथांच्या वेढ्याने घेरलेले आढळतील. इतिहाससिद्धता हा काही फार मोठा गुण प्राचीन काळी समजला जात नसे. आधुनिक युगातले आपण मात्र तो एक फार मोठा गुण समजतो. धर्मांचा तौलनिक अभ्यास व उच्च पातळीवरची टीका ही आज स्वतंत्र ज्ञानशाखा बनली आहे. तिने घेतलेला शोध आपणास असे सांगतो की, फक्त इस्लाम हा एकच असा धर्म आहे जो इतिहाससिद्धसुद्धा आहे. बाकीच्या धर्मांचा पाया, हा खऱ्या इतिहासाऐवजी, प्रामुख्याने मिथककथा हा आहे.

प्रयोग व निरीक्षणांच्या माध्यमातून ह्या विश्वाच्या रहस्यांचा शोध घ्यायचा प्रयत्न वैज्ञानिक मन करीत असते. वैज्ञानिक संशोधनामुळे विश्वाची कितीतरी रहस्ये ठाऊक झाली; ज्यांमुळे इस्लामची शिकवणूक एका उच्च बौद्धिक पातळीवर सिद्ध झाली. मानवी संशोधनाने असे ठरविले आहे की, निसर्गनियम विश्वात सर्वत्र एकसारखे आहेत. जमिनीवरचे अथवा अवकाशातले, सर्व काही ह्या शाश्वत नियमांनुसार चालत असते. ह्यातून हेच सिद्ध होते की, विश्वाचा नियंता एकच आहे; कारण निरनिराळे अनेक देव जर असते तर त्यांचे तऱ्हेतऱ्हेचे निराळे नियम आपल्याला दिसले असते.

एकेश्वरत्वाच्या मान्यतेमध्ये प्राचीन तत्त्वज्ञान हाही फार मोठा अडथळा होता.

इस्लामपूर्व काळात शिक्षित लोकांची मने ही नेहमी तत्त्वज्ञानाच्या दृष्टिकोनातूनच विचार करीत असत. तत्त्वज्ञांचे प्रमुख ध्येय हे अंतिम शाश्वतता शोधून काढणे हे असे; पण पाच हजार वर्षांच्या 'थोर इतिहासानंतर' सुद्धा ते त्यांच्या ध्येयाच्या जवळपासही पोहोचले नाहीत. ह्याचे सर्वात महत्त्वाचे कारण म्हणजे ह्या तत्त्वज्ञांना मानवी मर्यादाच समजलेल्या नव्हत्या. अंतिम शाश्वततेपर्यंत पोहोचण्याचे त्यांचे सर्व प्रयत्न व्यर्थ गेले, कारण माणूस त्याच्या मर्यादित बुद्धीने स्वतःहून त्या अंतिम शाश्वततेपर्यंत कसा पोहोचणार होता? कारण ती तर अपरिमित व अमर्यादित अशी होती! ह्याकरिता 'पैगंबर प्रतिभा' हवी. पण तात्त्विक विचारांनी माणसाला नेहमीच पैगंबरांनी सांगितलेले सत्य मान्य करण्यापासून व त्याचे पालन करण्यापासून रोखले आहे.

शेकडो वर्षे धर्मशास्त्री लोक, तत्त्वज्ञानात्मक विचाराने भारून जाऊन, एकेश्वरत्वाची संकल्पना ज्यावर आधारलेली आहे. ती खोटी ठरविणाऱ्या मूल्यांचे वर्णन व व्याख्या ठरविण्यासाठी धडपडत आहेत. ते जी सर्वात महत्त्वाची गोष्ट विसरतात, ती म्हणजे जी गोष्ट कधीही माणूस अनुभवू शकत नाही, अशाच गोष्टीचा शोध घेताहेत. सद्यःकालीन बुद्धीमंत हे अशा न पाहिलेल्या शाश्वततेचा स्वीकार करू शकत नाहीत. अंतिम सत्य, हे आपण पाहू शकतो. ही चुकीची कल्पना नाहीशी करणे, हे महत्त्वाचे काम विज्ञानाने केले आहे. विज्ञानाच्या ह्या कामाचा धार्मिक अन्वयार्थ फार मोठा आहे. माणसाच्या समजुतीला व ज्ञानाला मर्यादा आहेत, हेच ह्यातून सिद्ध झाले आहे. विज्ञानाच्या महत्तेमुळे तत्त्वज्ञानाला दुय्यम दर्जा प्राप्त झाला आहे. माणसाच्या बुद्धीचे मार्गदर्शन आता विज्ञान करते. ह्यामुळे एकेश्वरत्ववादाचा मार्ग मात्र मोकळा झाला आहे. किमान अप्रत्यक्षरीत्या तरी हे पुरेसे स्पष्ट झाले आहे की, अंतिम सत्याचा शोध घेण्याचा फक्त एकच मार्ग माणसाला उपलब्ध आहे; त्याने पैगंबरांच्या हाकेला उत्तर द्यावे! माणसांना कदाचित आजही एखाद्या गोष्टीवर विश्वास ठेवण्याआधी ती बघावी असे वाटेल! पण तत्त्वज्ञानाची जी चौकट त्यांच्या मनामध्ये आहे, तिने मात्र विज्ञानयुगामुळे आज संरक्षणात्मक पवित्रा घेतला आहे. ईश्वर साक्षात्कार व शाश्वत विश्व हे सर्व प्रत्यक्ष बघायचा आग्रह धरणे हे ज्ञानशास्त्रीयदृष्ट्या अशक्य आहे, हे माणसांना समजले आहे.

ज्ञात इतिहासात प्रथमच माणसाच्या ज्ञानाला असणाऱ्या अंगभूत मर्यादा स्थापित करण्यात आल्या आहेत. विश्वाची रहस्ये धुंडाळण्याच्या अथक प्रयत्नांत माणसाला एक गोष्ट लखलखीत स्पष्टपणाने समजली आहे. अंतिम सत्याला कवेत घेणे, हे माणसाच्या मर्यादित ज्ञानशक्तीला सर्वस्वी अशक्य आहे. हा शोध इस्लामकरिता फार महत्त्वाचा आहे कारण तो पैगंबरपदाची गरज सिद्ध करतो. एका बाजूला, अंतिम सत्य जाणून घेण्यासाठी अत्युत्सुक होऊन धडपडणारा माणूस आपल्याला दिसतो. तर दुसऱ्याच बाजूला अंगभूत मर्यादांनी तो असे काधीही करू शकणार नाही, हेही दिसत असते. माणसाच्या आध्यात्मिक जाणिवेमध्ये असलेली निर्वात पोकळी, फक्त दैवी मार्गदर्शन किंवा पैगंबरीच भरून काढू शकते. माणसाच्या ज्ञानमर्यादेला मान्यता देताना; विज्ञान हे ज्ञानवस्तूच्या पातळीवर दैवी साक्षात्काराचीच गरज प्रतिपादित असते. माणसाच्या त्रुटींना भरून काढू शकणारे दुसरे काही नाही.

प्राचीनकाळी लोकांना भावना स्वातंत्र्य (उच्चार स्वातंत्र्य) दिले जात नसे. ह्याचे सर्वात महत्वाचे कारण राजे व चमकणारे नेते, ह्यांच्याविषयीचा आदर, हे असे. जे लोक समाजात एखाद्या कारणाने उन्नत स्थळी जात, त्यांना लोक पवित्र व ईश्वराचा आशीर्वाद लाभलेले समजत. त्यांच्या मतांना दुसऱ्यांच्या मताहून फार मोठी किंमत दिली जाई. त्यांना हा जो आश्चर्ययुक्त आदर लाभे, त्यातून ते दुसऱ्यांना स्वतःच्या मर्जीनुसार वागायला भाग पाडीत. इस्लामच्या एकेश्वरी क्रांतीने मानवी महत्तेचे हे सर्व गैरसमज दूर केले व मनुष्यमात्रांना एका समान पातळीवर आणून उभे केले. एक नवीनच तात्त्विक दृष्टिकोन उदयास आला व ह्यातून पश्चिमी जगामध्ये लोकशाहीचा उदय झाला. लोकशाहीचे सर्वात मोठे गृहितक म्हणजे सर्व माणसे समान होत, हे आहे. लोकशाहीने सर्वांना, ज्याच्या त्याच्या सद्सद्विवेक बुद्धीने चालणारे उच्चार व विचार स्वातंत्र्य दिले. दैवी धर्माचा प्रसार कुठलेही भय न बाळगता अथवा कुठलाही अडथळा न येता करणे, इतिहासात प्रथमच लोकशाही व्यवस्थेत शक्य झाले.

मानवाला शेकडो वर्षे उपलब्ध नसलेल्या शेकडोशे सुख सोयी विज्ञानाने उपलब्ध करून दिल्या आहेत. संपर्काच्या नवीन माध्यमांची प्रगती, ही इस्लामच्या दृष्टीने ह्यातली सर्वात मोठी व महत्त्वाची सोय होय. दूरसंपर्काची माध्यमे, सुखकारक व वेगवान प्रवास, संगणक व दृकश्राव्य फिती (व्हीडीओ क्रांती) ह्या सर्वांचा वापर इस्लामची शिकवणूक जगभरच्या लोकांपर्यंत पोहोचविण्यासाठी होऊ शकतो.

ह्या संधीचा सुयोग्य वापर इस्लाम कार्यार्थ फार चांगल्या तऱ्हेने केला जाऊ शकतो. इस्लाम ज्यावेळी स्थापण्यात आला, त्यावेळी एकेश्वरत्वाचे वर्चस्व स्थापन होण्यासाठी त्या आधी २५०० वर्षे त्याची तयारी ईश्वराने चालविली होती. आताही तसेच आहे, गेली हजार वर्षे एक प्रक्रिया चालू आहे, जिच्यामुळे आता परत एकदा इस्लामच्या वर्चस्वाचे दिवस येण्यासाठी आवश्यक असलेली परिस्थिती निर्माण झाली आहे. संधींची कमी नाही; पण त्यापासून पिकले फळ मिळविण्यासाठी त्यांचा सुयोग्य वापर करणारा हवा. (योजकस्तत्र दुर्लभः) एका भारलेल्या वेगवान समाजाची गरज आहे. पैगंबर व सहाबांनी त्यांना मिळालेल्या संधींचा जसा वापर केला, तसा स्वतःला मिळणाऱ्या संधीचा वापर करणारा समाज निर्माण व्हायला हवा आहे. असा समाज जर निर्माण होऊ शकला तर तो नक्कीच निरीश्वरवादी व अधार्मिक विचारावर ताबा मिळवून परत एकदा इस्लामचे वर्चस्व स्थापू शकेल. जसे ते इस्लामच्या सुरुवातीच्या काळात अनेकेश्वरवादावर मिळविले गेले.

ह्या सर्व शक्यता, गेली शंभर वर्षे अशा एखाद्या समाजाच्या प्रतिक्षेत आहेत; पण दुर्दैवाने असा समाज अजून निर्माण झालेला नाही. एक गोष्ट खरी की, असंख्य मुसलमान गट ह्या काळात फुलले आहेत; पण हे स्पष्टच सांगायला हवे की, हे गट घटनांच्या प्रतिक्रियेतून उदयाला आले आहेत. राजकीय परिस्थितींनी त्यांच्या अस्तित्त्वात फार मोठा वाटा उचलला आहे. ह्या उलट अशा एखाद्या गटाची आवश्यकता आहे की, जो गेल्या १,००० वर्षात ईश्वराने निर्माण केलेल्या परिस्थितीविषयी सजग असेल व तिचा वापर करेल. इस्लामचे पुनरुत्थापन, ह्या ईश्वरी

इच्छेला जाणून घेऊन ईश्वराच्या योजनेचा एक भाग बनून, त्याने निर्माण केलेल्या सर्व शक्यतांचा वापर करेल, अशा एखाद्या गटाची आवश्यकता आहे.

बदरच्या संग्रामात घडलेल्या एका घटनेचा संबंध पैगंबर चरित्रांमधून पुढील तऱ्हेने लावण्यात आला आहे; नास्तिकांची संख्या मुसलमानांहून कितीतरी जास्त होती. ही प्रबळ फौज जेव्हा पैगंबर व त्यांच्या सहकाऱ्यांवर तुटून पडली, तेव्हा स्वतःच्या भावनांनी उत्पन्न झालेल्या तीव्र भाववेगाने, पैगंबरांनी स्वतःला ईश्वराच्या पायावर झोकून दिले. ते ओरडले, 'ईश्वरा, तू जर ह्या लोकांचा विनाश होऊ दिलास तर ह्या पृथ्वीवर परत कधीच तुझी पूजा होणार नाही.' पैगंबरांचा जर विचार केला तर ह्यात काहीच अतिशयोक्ती नव्हती. कारण बदरच्या संग्रामात भाग घेतलेले ते ३१३ जण, कोणी सोमेगोमे नव्हते. बाह्यात्कारी जरी ते शक्तीहीन भासले तरी ते २५०० वर्षांच्या इतिहासाचे फळ होते. गेली १,००० वर्षे जी दैवी योजना आकार घेत आहे, त्याची तीव्र जाणीव ज्यांना आहे व ज्यांनी मनाने पूर्णतया त्या योजनेत सहभागी व्हायचे ठरविले आहे, असेच लोक फक्त असा गट बनवू शकतात. अशा लोकांना त्यांची ध्येयनिष्ठा खंबीर व न डगमगणारी ठेवावी लागेल; की ह्या योजनेची पूर्ती करण्यासाठी त्यांना कुठलाही लांबचा मार्ग चोखाळावा लागला किंवा कशाही तऱ्हेचे त्याग करावे लागले तरी त्याची तयारी ठेवावी लागेल. ईश्वरपक्ष हा असाच असतो. व ईश्वराचाच पक्ष शेवटी जिंकतो (५८:२२) 'अरबांचा इतिहास' ह्या पुस्तकात प्रा. फिलीप हित्ती ह्यांनी लिहिले आहे: 'पैगंबरांच्या मृत्युनंतर जणू काही जादू झाली व एरवी नापीक असलेले अरबस्तान सुपीक बनून त्याने कितीतरी 'नायकांना' जन्म दिला. संख्यात्मक व गुणात्मक दोन्हीही दृष्टींनी असे उदाहरण अन्यत्र सापडणार नाही.' (पृ.१४२)

इस्लामने जगात सर्वोच्च स्थान अधिग्रहीत करण्यासाठी, लोकांची विचार करण्याची पद्धत, सर्व तऱ्हेने बदलणे जरूरीचे आहे. इस्लामी विचाराने दुसऱ्या प्रत्येक विचारपद्धतीवर मात करणे जरूर आहे. हेच काम करण्यासाठी ईश्वराने पैगंबर व सहाबांना निवडले होते आणि त्याचे महत्त्व अजिबात नजरेआड करता कामा नाही. जर पैगंबरांचे अनुयायी हे काम करण्यात यशस्वी झाले असेल तर त्याचे सर्वात महत्त्वाचे कारण म्हणजे ह्या 'नायकांच्या बागेत' ते पाठीमागे उभे राहिले. कितीतरी त्रासदायक अडथळे ओलांडून गेल्यावरच ते अनेकेश्वरत्ववादावर इस्लामचे प्रभुत्व स्थापन करू शकले. आता पाळी निरीश्वरवादाची आहे. इस्लामचे वर्चस्व पुनर्प्रस्थापित होण्यासाठी परत एका 'नायकांच्या बागेची' गरज निर्माण झाली आहे. पैगंबर व त्यांच्या नजीकच्या काळातल्या अनुयायांनी जर ह्या सुरुवातीच्या अवघड बाबींमध्ये भाग घेतलेला आहे, तर तसेच करताना पैगंबरांच्या सद्यःकालीन अनुयायांना जड वाटू नये.

पैगंबरकालीन अनुयायांना विलक्षण हालांना व सर्व तऱ्हेच्या संकटाना, इस्लामला सर्वोच्चपदी पोहोचविताना, तोंड द्यावे लागेल, तशाच प्रकारच्या, इस्लामच्या पुनर्स्थापनेसाठी होणाऱ्या प्रचंड लढ्यामध्ये, मुस्लिमांना भाग घ्यावा लागत आहे. त्यापैकी काही जणांनी आपला जीव व मालमत्ता गमाविली आहे. इस्लाम प्रचाराची भाषणे व साहित्य तयार करण्यात वेळ व शक्ती घालविली आहे. त्यापैकी काही जणांनी इस्लामकार्यार्थ फार दूरचे प्रवास केले आहेत. फक्त

प्रयत्नांची मर्यादा बघायची ठरविली तर सद्यःकालीन मुस्लिम लढ्याने पैगंबरांचे समकालीन व त्यांचे निकटचे वंशज, ह्यांची मर्यादा कधीच पार केली आहे; पण जर निष्कर्षांचा विचार केला तर फारच वेगळे चित्र दिसते. पैगंबर व त्यांचे सहकारी ह्यांनी, इतिहासाचे रूप पालटून टाकले, तर सद्यःकालीन मुसलमानांनी स्वतःची दैन्यावस्था मात्र वाढवून घेतली.

एका बाजूला पैगंबरकालीन मुस्लिम व दुसऱ्या बाजूला सद्यःकालीन मुस्लिम, असा जर विचार केला तर हा विरोधाभास त्या दोघांच्याही मानसिकतेतून निर्माण झालेला दिसतो. एका शोधाच्या भावनेतून पहिला गट कार्यरत होता. तर दुसरा गट नुकसानीच्या भावनेतून कार्यरत आहे. उदाहरणार्थ, ॲबिसिनियाला जबरदस्तीने घालून दिले आहे, असे वाटणाऱ्या मुसलमानांना सुरक्षितपणे परत येता यावे म्हणून कुरैशांनी दोन माणसांना पाठविले. निगसने (राजा) मुसलमानांना दरबारामध्ये बोलावून त्यांच्या धर्माविषयी विचारले. जाफर ह्यांनी दिलेली प्रतिक्रिया सहाबांना काय वाटत होते त्याचे विस्तृत चित्र उभे करते. ते म्हणाले, 'हे राजा, आम्ही अज्ञानात बुडालेली माणसे होतो. मूर्तीपूजा करत होतो. योग्य तऱ्हेने वध न केलेले प्राण्यांचे शिळे मांस खात होतो. आम्हाला वाईट सवयी होत्या. आमच्यापैकी प्रबळ जो असे, तो अशक्ताचा नायनाट करी. ईश्वराने त्याचा प्रेषित आमच्यामध्ये पाठवेपर्यंत, आम्ही हे असे होतो. आम्हाला ह्या पैगंबराची पूर्वपीठिका ठाऊक आहे. तो किती सच्चा आहे ते माहीत आहे व तो किती विश्वास ठेवण्यालायक सुदृढ व्यक्तिमत्त्वाचा आहे, तेही ठावूक आहे. त्याने आम्हाला ईश्वराकडे बोलावले आणि ईश्वराचे एकत्व मान्य करून त्याची पूजा करायचे मान्य करावे असे सांगितले. दगड व मूर्तींना सोडून द्यायला सांगितले, ज्यांची पूजा आमचे पूर्वज करीत असत. त्याने आम्हाला खरे बोलायला सांगितले व दिलेल्या वचनांची पूर्तता करण्यास सांगितले. नात्यांचा आदर करावा व शेजाऱ्यांचे हक्क मान्य करावेत, तसे सांगितले. रक्तपात व गुन्ह्यांपासून बाजूला राहा, असे सांगितले. म्हणून आम्ही एका ईश्वराचीच पूजा करतो व त्याच्याशी गाठी बांधल्याप्रमाणे, त्याने परवानगी दिलेल्या गोष्टीच तेवढ्या करतो व त्याने निषिद्ध ठरविलेल्या गोष्टी करीत नाही. ह्या कारणांमुळे आमचे लोक आमच्याविरुद्ध उठले आहेत आणि आमच्या धर्माचा आम्ही त्याग करावा म्हणून आमचा छळ करीत आहेत. आम्ही एकाच ईश्वराची पूजा सोडून देऊन परत एकदा मूर्तीपूजेला लागावे, अशी त्यांची इच्छा आहे. म्हणूनच तुम्हाला, श्रेष्ठ प्रतीचे राजे समजून आम्ही तुमच्या देशात आलो आहोत. तुमच्या संरक्षणाखाली आम्ही खूश आहोत आणि हे राजा, आम्ही अशी आशा करतो की, ह्या तुझ्या देशात आम्हाला अन्याय सहन करावा लागणार नाही.'

आपल्याला जाफर ह्यांच्या शब्दातून कळले असेल की, इस्लाम त्यांना केवढ्या महत्त्वाची गोष्ट वाटत होती, ज्यांच्या बाजूने ते बोलत होते. त्यांच्या दृष्टीने अंधःकारमय अज्ञानापुढे इस्लाम, म्हणजे सजग विवेकबुद्धीचे आयुष्य होते. इस्लाम मूर्तीचा भंग व त्याग होता तर एका ईश्वराचा शोध होता. मोहम्मद पैगंबरांनी त्यांना मार्गदर्शित केलेला दैवी मार्ग म्हणजे इस्लाम होता, जो त्यांनी असत्याचा मार्ग नाकारून स्वीकारला होता. त्यांना आता ह्या भौतिक जगापेक्षा शाश्वततेची ओढ होती. मागच्या काळातल्या अनैतिक गोष्टी निघून गेल्या होत्या व आता

त्या लोकांना नैतिकतेच्या जाणीवेतून निर्माण होणारा आनंद ठावूक झाला होता. अज्ञानाच्या व अन्यायाच्या मार्गाऐवजी न्यायाचा मार्ग उपलब्ध झाला होता. क्रूरतेऐवजी दया उपलब्ध झाली होती.

नवीन शोधाची भावना माणसांत न झाकोळू शकणारा उत्साह निर्माण करते. ह्यामुळे विचार व कृतींमध्ये विजिगीषु वृत्ती व वेग येतो. ह्या उलट नुकसानाची भावना मात्र सर्व प्रयत्न व्यर्थ ठरविते. अशा भावनेने भारलेला, मग कृती व विचारांमध्ये रचनात्मकता आणू शकत नाही. पहिल्या काळचे मुसलमान शोधवस्तू मिळाल्याच्या आनंदात होते. म्हणूनच त्यांनी अभूतपूर्व अशा धडाकेबाज कृती करून दाखविल्या. आधुनिक मुसलमान चळवळी ह्या नुकसान झाल्याच्या भावनेवर आधारलेल्या आहेत आणि हेच ह्या चळवळीच्या चुकलेल्या धोरणामागेचे व चुकीच्या प्रयत्नांमागचे कारण आहे. चुकीच्या चळवळींची ही गाथा अभूतपूर्व अशी आहे.

आयुष्यामध्ये हार पत्करावी लागली, अशा तऱ्हेची तीव्र भावना, ह्या चळवळींच्या प्रत्येक नेत्याने व्यक्त केली आहे.

'आम्ही आमच्या पूर्वजांचा वारसा गमावून बसलो आहोत. आकाशातल्या कृत्तिका नक्षत्रांच्या (सातव्या स्वर्गातून) तेजःपुंज तारका समूहातून स्वर्गाने आम्हाला जमिनीवर ढकलून दिले आहे.'

आधुनिक काळातल्या जवळ जवळ सर्व मुसलमान चळवळी ह्या अशा तऱ्हेने नुकसान व छळाच्या भावनेतून निर्माण झाले आहेत. छोट्या मोठ्या मुद्यांवर त्यांच्यामध्ये कदाचित फरक दाखविताही येईल. त्यातले काहीजण राष्ट्रीय राजकारणाचा धोशा लावतात तर काही जण (नुसत्याच) धार्मिक परिभाषेला चिकटवून घेतात; पण खरे तर त्या सर्व एकाच तऱ्हेच्या आहेत. प्राचीन काळचे वैभव हरविल्याच्या भावनेतूनच त्या निर्माण झाल्या आहेत. ज्यावेळी प्रख्यात ग्रीक गणिती आर्किमिडीजला (इ.स. पूर्व २८७–२१२) विशिष्ट गुरूत्वाच्या नियमाचा शोध लागला तेव्हा त्याला झालेल्या आनंदाचे वर्णन करता येणार नाही. ह्या शोधाच्या आनंदात तो खरोखरच स्वतःला प्रत्यक्षतः विसरून गेला. इराणच्या शहांचे तर फक्त सिंहासनच हिसकावण्यात आले होते; पण ह्या शुद्ध भौतिक नुकसानामुळे त्यांची जगण्याची इच्छाच हरपली. शोधवस्तू मिळण्यामध्ये व नुकसानाच्या भावनेमध्ये हाच फरक असतो. प्रत्येक जण शोधापासून होणाऱ्या फायद्याकडे अथवा नुकसानाकडेच बघत असतो.

ही शोधाची भावना निर्माण होणे, हे व्यक्तिमत्त्वावर व चारित्र्यावर अवलंबून आहे, ह्यात काहीच शंका नाही. ह्या उलट नुकसानाच्या भावानेबरोबर मात्र सर्व नकारात्मक गोष्टीच येतात. पहिल्या काळच्या मुसलमानांनी ज्या उन्नत व श्रेष्ठ तऱ्हेने कृती केल्या त्या पाठीमागे त्यांची ही शोध लागल्याची दृष्टी होती. सत्यापुढे झुकण्याएवढे मोठे मन त्यांच्याकडे होते. दुसऱ्याचे मोठेपण मान्य करण्याचे औदार्य त्यांच्याकडे होते. ते लोक सत्य वचनी होते. ते जे बोलत अगदी तसेच व तसेच वागत. ते दुसऱ्यांना क्षमा करीत, कारण असे करताना त्यांना आशा असे की, ईश्वर त्यामुळे त्यांना क्षमा करील. त्यांची सत्याकडे पाहाण्याची दृष्टी इतकी तीक्ष्ण होती की, ते तिच्यापासून

कधीच ढळले नाहीत. त्यांच्या स्वतःच्या भावभावनांमुळे ह्या दृष्टीवर पडदा यावा, हे त्यांनी कधीच मान्य केले नाही. त्यांच्या निर्णयाला पक्क्या तर्काचा पाया असे. त्यांना मिळणाऱ्या वागणुकीचा सूड म्हणून त्यांनी कधीच कुठलीच कृती केली नाही. त्यांनी ज्या कृती केल्या त्या त्यांना तशा करायच्या होत्या म्हणूनच केल्या.

सकारात्मक व्यक्ती असेच वागते. नकारात्मक व्यक्तिमत्त्वाचे वागणे अगदी वेगळे असते. नकारात्मकता ही सत्यातून निर्माण होण्यापेक्षा भावनेतून निर्माण होते. शंकित व अडखळणारे मन ती तयार करते, ज्यामुळे अर्थपूर्ण सुरुवात करणे अवघड बनते. दुसऱ्यांबरोबर करायचे सहकार्य सुद्धा ह्याचमुळे अवघड बनते. वास्तवतेपासून दूर पळणे ही मग वृत्ती बनते. स्वतःकडे व दुसऱ्यांकडेही माणूस वास्तव दृष्टिकोनातून पाहू शकत नाही. घटनांना सत्य स्वरुपात पाहाण्याऐवजी मग स्वतःच्या एका विशिष्ट छटा प्राप्त झालेल्या दृष्टीतून पाहिले जाते. मग स्वतःची पात्रता स्वतःच्याच नजरेत फुगविली जाते, तर दुसऱ्यांची कमीतकमी बनविली जाते. परिकथेतल्या विश्वामध्ये, जे स्वतःच्या कल्पनेने निर्मिलेले असते, त्यामध्ये मग पराभव हे विजयाप्रमाणे भासू लागतात आणि वास्तवातल्या आयुष्यात मात्र कधी कधी यश हे अपयशात रूपांतरित होते. ह्या इथेच आजचे मुस्लिम हे त्यांच्या धर्माचा पाया घालणाऱ्या त्यांच्या मुसलमान पूर्वजांहून वेगळे होतात.

इस्लामच्या पैगंबरांनी ह्या जगामध्ये अभूतपूर्व अशी क्रांती घडवून आणली. जी एकेकाळी, फार मोठ्या आध्यात्मिक शोधाच्या जाणीवेतून सुरू झाली व एका अतिविशिष्ट सकारात्मक मूल्यांच्या साहाय्याने घडविण्यात आली. जर एखाद्याला नुकसानाच्या भावनेतून निर्माण होणाऱ्या, नकारात्मक वृत्तीतून, अशाच तऱ्हेची क्रांती करायची असेल, तर त्याने खरे तर दुसऱ्या एखाद्या ईश्वराचा शोध घेणे सुरू करावे! कारण अशा तऱ्हेची नकारात्मक क्रांती घडावी अशी ईश्वराची इच्छा नाही! शिवाय त्याने नव्या पैगंबरांचासुद्धा शोध घ्यावा, कारण त्यांनी निवडलेला मार्ग हा पैगंबरांचा मार्ग नाही!

# परिशिष्ट – १

मराठी वाचकाला ह्या अनुवादामध्ये सापडणारी नावे पूर्णतः अपरिचित व नवीन संस्कृतीमधील वाटतील. दुसरे म्हणजे, लेखकाने कालानुक्रमाने तपशीलवार माहिती चरित्रनायक व इतर महत्त्वपूर्ण पात्रांबाबत न दिल्याने, एक फार मोठी त्रुटी मराठी वाचकांसाठी निर्माण झाल्याचे जाणवले.

अर्थात दोष लेखकाचा नाही. कारण पुस्तक लिहीत असताना लेखकासमोर मुस्लिम वाचक असावेत. महाभारतातील पात्रे अथवा रामायणातील पात्रे, ज्याप्रमाणे सर्वसामान्य हिंदू वाचकाला ठाऊक असतात, तशीच काहीशी परिस्थिती ह्या पुस्तकातील पात्रांबाबत मुस्लिम वाचकांची असणार. अनुवादकाचा अनुवाद करीत असताना सर्वप्रथम हेतू, हा पैगंबरचरित्राचा हिंदू मराठी वाचकांना परिचय करून द्यावा हा होता. त्यामुळे ह्या हेतूसंबंधाने फार मोठी त्रुटी पुस्तकात राहून जाईल, असे जाणवल्यावर, ही त्रुटी दूर करण्याचा प्रयत्न ह्या परिशिष्टामधून करण्यात आला आहे.

अर्थात अशा प्रयत्नासंबंधाने काही निर्णय घेणे अतिशय अवघड होते. कारण ज्या पात्रांची ओळख मराठी वाचकांना करून द्यायची, त्यांची निवड काय निकष लावून करणार? हा अनुवादकासमोर सर्वात मोठा गहन प्रश्न होता. पैगंबरचरित्रासंबंधित पात्रांची ओळख, हाच मुळात एक खंडात्मक लिखाणाचा विषय इतिहासकारांसाठी झालेला आहे. ज्या पुस्तकाचा अनुवाद येथे केला आहे, त्या पुस्तकाच्या आशय व विस्ताराशी विसंगत असे हे परिशिष्ट होऊ नये, इतकी काळजी अनुवादकाला घेणे भाग होते.

मूळ पुस्तक वाचल्यावर, ज्या वाचकांची उत्सुकता थोडीशी वाढली असेल, त्या वाचकांची उत्सुकता थोडीशी शमविणे एवढाच माफक उद्देश ह्या परिशिष्टांमधून आहे. इथे केलेली पात्रांची निवड ही पूर्णतया हेतूरहित व उद्देशरहित अशी आहे. ह्या पात्रांचे इस्लामला झालेले योगदान व पैगंबरांशी त्यांचा असलेला नातेसंबंध एवढ्या दोन गोष्टीचा फक्त ही निवड करताना विचारात घेतल्या आहेत.

पैगंबरांच्या पत्नींना 'श्रद्धावंतांच्या माता' (उम्मुल मोमिनीन) म्हणून संबोधिले जाते. पैगंबरांच्या सहचरांपैकी दहा जणांना, निश्चित स्वर्ग प्राप्त होईल, असे भाकित पैगंबरांनी केले होते. ह्या दहा जणांना अशरे मुबश्शिरा ह्या समूहनामाने संबोधिले जाते. अशरे मुबश्शिरा म्हणजे स्वर्गप्राप्तीची बातमी ज्यांना सांगितली गेली, असे दहा लोक.

अरबी रिवाजाप्रमाणे माणसाला त्याच्या आई–वडिलांनी ठेवलेल्या नावाहून एक स्वतंत्र नाव त्याच्या उत्तरायुष्यात दिले जाते. ह्या नावाला कुनियत (टोपणनाव) म्हणतात, जे मूळ नावाहून लोकप्रिय असते. ही कुनियत अशा तऱ्हेची असते की, त्यायोगे त्या माणसाची परिचयाच्या माणसांना ओळख व्हावी. एखाद्या झोपाळू माणसाचे नामकरण आपण ज्या तऱ्हेने चटकन कुंभकर्ण म्हणून करतो तसाच काहीसा हा प्रकार आहे. तसेच अर्जुनाची पार्थ व कौंतेय ही

नावे, कर्णाचे राधेय हे नाव, हिंदू संस्कृतीमधील अशा कुनियतची उत्तम उदाहरणे आहेत.

अरबीमध्ये हे अबू म्हणजे वडील व उम्म म्हणजे आई. इब्ने म्हणजे मुलगा व बिंत म्हणजे मुलगी. सर्वसाधारणपणे कुनियतमध्ये ह्या चार शब्दांचा वापर आढळतो. उदाहरणार्थ: अबू हुरैरा. अबू हुरैरा म्हणजे मांजरांचा बाप! ह्या गृहस्थांना मांजरे आवडत असल्याने ह्यांची कुनियत अबू हुरैरा पडली. कुनियतमधला नातेसंबंध व प्रत्यक्ष नातेसंबंध एकच असतील असे नव्हे, पण बऱ्याच वेळी ते एकसुद्धा असतात. जसे की, पैगंबरांची कुनियत होती, अबुल कासिम (कासिमचा पिता). पैगंबरांच्या एका पुत्राचे नाव कासिम असे होते.

इथे ज्या पात्रांचे नाव समाविष्ट केले आहे, त्यांचे जन्मवर्ष व मृत्यूवर्ष आणि वडील व आईचे नाव द्यायचा प्रयत्न केला आहे. अर्थातच तो प्रत्येक वेळी यशस्वी झालेला आहे, असे नव्हे. ह्या शिवाय, प्रत्येक पात्राचे अतिसंक्षिप्त चरित्र व इस्लामला झालेले योगदान ह्या दोन गोष्टी प्रामुख्याने दिल्या आहेत. ही सर्व माहिती किती अपुरी आहे ह्याची जाणीव अनुवादकाला आहे. हे परिशिष्ट वाचून जर कुणाला विस्तृत माहिती मिळवावीशी वाटली, तर अशा वाचकांसाठी पुस्तकांची नावे परिशिष्ट ३ मध्ये दिली आहेत. ही सर्व पुस्तके मुख्यत्वे इंग्रजी, हिंदी व उर्दू भाषांमध्ये आहेत.

इथे दिलेल्या माहितीमध्ये काही त्रुटी अथवा नजरचूक राहिली असल्यास, त्याची जबाबदारी सर्वस्वी अनुवादकाची आहे. अशी चूक लक्षात आणून दिल्यास दुरुस्त करण्यात येईल.

## पैगंबरांचे कुटुंबीय व सहचर

**१) अब्दुल मुत्तालिब इब्ने हाशिम :** पैगंबरांचे पितामह. पैगंबरांचे पिता अब्दुल्ला ह्यांच्या मृत्यूनंतर ह्यांनीच पैगंबरांचा प्रतिपाळ केला. ज़मज़म ह्या सुप्रसिद्ध विहिरीला ह्यांनीच दुसऱ्यांदा खोदून त्यातले पाणी मक्कावासियांना उपलब्ध करून दिले. म्हणून ह्यांना साहेबे–ज़मज़म म्हटले जाते. ह्यांचा मृत्यू पैगंबर आठ वर्षांचे असताना इ.स. ५७८ मध्ये झाला.

**२) अब्दुल्ला इब्ने अब्दूल मुत्तालिब :** पैगंबरांचे पिता. ह्यांचा मृत्यू पैगंबरांचा जन्म ज्यावेळी झाला नव्हता, अशावेळी वयाच्या पंचविसाव्या वर्षी इ.स. ५७० मध्ये झाला. सिरियामध्ये व्यापारासाठी गेलेल्या तांड्याबरोबर परत येत असताना, मदिनेत हे आजारी पडले व त्यातच त्यांचा अंत झाला.

**३) आमिना बिंते वहब :** जन्म इ.स. ५४९, मृत्यु इ.स. ५७६. पित्याचे नाव वहब बिन अब्दे मुनाफ. मातेचे नाव बर्राह. पैगंबरांच्या माता. ह्यांचा विवाह झाल्यावर एका वर्षातच पैगंबरांचा जन्म झाला. पैगंबरांचा जन्म होण्याआधीच पतीचा मृत्यू झाला. ह्यानंतर, ह्या, सहा वर्षे विधवेचे जीवन जगल्या व त्यानंतर ह्यांचा मृत्यू झाला. पैगंबर गर्भामध्ये असताना ह्यांना दैवी साक्षात्कार होत असत, अशा तऱ्हेची नोंद तत्कालीन इतिहासकारांनी करून ठेवली आहे. ह्यांचा मृत्यूही मदिनेजवळ झाला व जवळच्या अब्वा नावाच्या ठिकाणी दफन करण्यात आले.

**४) खदिजा बिंते खुवैलिद :** जन्म इ.स. ५५६, मृत्यू इ.स. ६१९. पैगंबरांच्या प्रथम

पत्नी. ह्यांच्या पित्याचे नाव खुवैलिद व मातेचे नाव फातिमा. ह्या तत्कालीन मक्केतील एका सर्वात श्रीमंत स्त्री म्हणून ओळखल्या जात. पैगंबरांशी विवाह होण्याआधी ह्यांचे दोन विवाह झाले होते. ह्या दोन विवाहांपासून ह्यांना आपत्ये होती. दोन्ही पतींचा मृत्यू झाल्यानंतर, वयाच्या चाळीसाव्या वर्षी त्यांनी पैगंबरांशी विवाह केला. ह्यावेळी पैगंबर पंचवीस वर्षांचे होते. ह्या विवाहाने पैगंबरांना उत्तम साथसंगत तर दिलीच; शिवाय आर्थिक फायदाही झाला. कारण विवाहानंतर खदिजा ह्यांचा व्यापार पैगंबर पाहू लागले. ह्यांच्यापासून पैगंबरांना चार मुली व दोन मुलगे झाले. दोन्ही मुलगे अतिशय लहान असतानाच मृत्यू पावले. पैगंबरांना ज्या वेळी कुरआन अवतरित होऊ लागले, त्या वेळी पहिल्याच प्रसंगी पैगंबर स्वतः अतिशय घाबरून गेले होते. त्या वेळी त्यांना दिलासा देण्याचे महत्त्वाचे काम ह्यांनी केले. ह्या पैगंबरांना ह्यांचे चुलतभाऊ वराक्का बिन नौफल ह्यांचेकडे घेऊन गेल्या. वराक्कांनी पैगंबरांना दिलासा दिला. वराक्का स्वतः ज्यू व ख्रिस्ती धर्मांबाबत ज्ञानी होते. त्यांनी पैगंबरांना, ते पैगंबर असल्याचे सांगितले व स्वतः अतिशय म्हातारे असल्याने प्रत्यक्ष गरज निर्माण होईल, त्यावेळी ते पैगंबरांना मदत करू शकणार नाहीत. ह्याबद्दल खंत व्यक्त केली.

खदिजा ह्या पहिल्या स्त्री मुसलमान. इस्लाम ज्यावेळी तीस चाळीस लोकांपर्यंत मर्यादित होता, त्यावेळी त्यांनी पैगंबरांची बहुमोल मदत केली, ज्याचा उल्लेख पैगंबर कृतज्ञतेने कायम करीत. ह्या हयात असेपर्यंत पैगंबरांनी दुसरा विवाह केला नाही. ह्यांचा मृत्यू इसवी सन ६१९ (डिसेंबर) मध्ये झाला.

**५) आयेशा बिंते अबू बकर :** ह्यांचा जन्म इ.स. ६१४ व मृत्यू इ.स. ६७८ मध्ये झाला. ह्यांच्या पित्याचे नाव अबूबकर व मातेचे नाव ज़ैनब (कुनियत–उम्मे रुमान) वयाच्या ६ व्या वर्षी मक्केमध्ये, ह्यांचा पैगंबरांशी विवाह झाला व वयाच्या ९ व्या वर्षी मदिनेमध्ये ह्यांची पतिगृही पाठवणी झाली. ह्या पैगंबरांच्या एकमेव कुमारी पत्नी होत.

ह्या तत्कालीन मुस्लिम समाजातील व त्यानंतरच्या पिढ्यांमधीलही सर्वात मोठ्या धर्मपंडिता होत्या. ह्या अतिशय समजदार प्रज्ञावंत व प्रतिभावंत अशा होत्या. पैगंबरांच्या मृत्यूनंतर पैगंबरी धर्माचा प्रचार व प्रसार करण्यामध्येच ह्यांनी जीवन व्यतीत केले. ह्यांच्यापासून इस्लामविषयक व पैगंबरांच्या जीवनाबद्दल ज्ञान मिळविलेल्या विद्यार्थ्यांची संख्या जवळ जवळ दोनशे आहे. पैगंबरांच्या मृत्यूनंतर मुसलमानांच्या मातोश्री म्हणून जवळ जवळ ४० वर्षे ह्यांनी अतिशय समर्थपणे काळ व्यतीत केला व वयाच्या त्रेसष्टाव्या वर्षी ह्यांना मृत्यू आला. ह्यांचेपासून पैगंबरांना अपत्य झाले नाही. ह्यांचेपासून पुढच्या पिढ्यांना मिळालेला अमूल्य ठेवा, म्हणजे ह्यांनी सांगितलेली २२१० पैगंबरवचने, हा होय.

**६) रमला बिंते अबू सुफ्यान (उम्मे हबीबा):** ह्यांचा जन्म इ.स.५९१ व मृत्यू ६६४ मध्ये झाला. ह्यांच्या पित्याचे नाव अबू सुफ्यान इब्ने हरब व मातेचे नाव सफिया बिंत अबू अल् आस. ह्या हजरत मुआविया ह्यांची बहीण व हजरत उस्मान ह्यांच्या सख्ख्या आतेबहीण होत.

ह्यांचा पहिला विवाह उबैदुल्ला इब्ने जहश ह्यांच्याशी झाला होता. ह्या दोघांनी

इस्लामचा स्वीकार केला. सुरुवातीला ह्यांचे पिता अबू सुफयान इस्लामचे कट्टर वैरी होते. त्यांच्या व इतर कुरैशांच्या छळाला कंटाळून काही मुसलमानांनी ॲबिसिनियामध्ये (हबश) स्थलांतर केले. ह्या स्थलांतरितांमध्ये हे दोघे पती–पत्नी सुद्धा होते. उबैदुल्ला ह्यांचेपासून, ह्यांना हबीबा नावाची मुलगी झाली, जिच्यावरून ह्यांना उम्मे हबीबा म्हणून ओळखले जाते. पुढे उबैदुल्ला ह्यांनी इस्लामचा त्याग करून ख्रिस्ती धर्म स्वीकारला व ते दारू सुद्धा पिऊ लागले. असे न करण्याविषयी ह्यांनी पतीला परोपरीने विनवून सांगितले; पण उपयोग झाला नाही. अशा अवस्थेतच उबैदुल्ला ह्यांचा मृत्यू झाला. ही बातमी माहीत झाल्यावर पैगंबरांनी ह्यांना विवाह संदेश धाडला. हा संदेश अतिशय आनंदाने स्वीकारून, ह्यांनी पैगंबरांशी, पैगंबरांच्या अनुपस्थितीत हि.स. ७ अथवा ८ (इ.स. ६२७/६२८) मध्ये विवाह केला. योग्य परिस्थिती निर्माण झाल्यावर ह्या पुढे, ॲबिसिनियामधून निघून मदिनेला पैगंबरांकडे आल्या.

इस्लाम व पैगंबरांची बाजू घेऊन ह्या आपल्या माता–पित्यांशी सातत्याने भांडत असत.

**७) सौदा बिंते ज़मआ :** ह्यांचा जन्म इ.स. ५६५ व मृत्यू इ.स. ६४३ मध्ये झाला. ह्यांच्या पित्याचे नाव ज़मआ इब्ने क़ैस व मातेचे नाव समूस बिंते क़ैस असे असून पिता कुरैश व माता अन्सार घराण्यातल्या होत्या.

ह्यांचा पहिला विवाह हजरत सकरान बिन उमर ह्यांचेबरोबर झाला होता. ह्या दोघा पती–पत्नींनी इस्लामचा स्वीकार केला होता. हजरत सकरान ह्यांचेपासून, ह्यांना अब्दुल रेहमान नावाचा पुत्र झाला होता. इ.स. ६२० मध्ये ह्यांचा विवाह पैगंबरांशी झाला. ह्या विवाहाच्या वेळी ह्या चांगल्याच प्रौढावस्थेमध्ये होत्या. हजरत खदिजा ह्यांचेपासून झालेल्या पैगंबरांच्या मुली वयाने लहान होत्या व त्यांचा प्रतिपाळ करण्याचे अतिशय महत्त्वाचे काम ह्यांनी केले.

ह्या वृत्तीने अतिशय दयाळू व उदार होत्या. तसेच हस्त कौशल्याची कामे त्या उत्कृष्ट करीत असत. ह्यांचा पैगंबरांच्या उर्वरित पत्नींकडे पाहण्याचा दृष्टिकोन नेहमीच आदर व एखाद्या प्रौढ बहिणीसारखा राहिला. ह्यांनी पाच पैगंबरवचने पैगंबर–वचनांच्या संग्रहामध्ये सांगितली आहे.

**८) ज़ैनब बिंते जहश (उम्मुल हकम) :** ह्या कुरैशी घराण्यातील होत्या. ह्यांचा जन्म इ.स. ५८९ मध्ये व मृत्यू इ.स. ६४१ मध्ये झाला. ह्यांच्या पित्याचे नाव जहश बिन रुआब व मातेचे नाव उमैमा बिंते अब्दुल मुत्तालिब होते. ह्या पैगंबरांच्या आतेबहीण होत्या.

ह्यांच्या पहिल्या पतीचे नाव ज़ैद बिन हारिसा, हे होय. हा विवाह पैगंबरांच्या पुढाकाराने झाला होता. ज़ैद हे पैगंबर ह्यांचे नोकर होते व त्यांच्यावर पैगंबरांचे पुत्रवत प्रेम होते. काही कारणामुळे ज़ैनब ह्यांना हा विवाह पसंत नव्हता. त्यामुळे पुढे विवाह–विच्छेद घडून आला. पुढे पैगंबरांनी ह्यांना विवाह–प्रस्ताव दिला व त्यांचा विवाह पैगंबरांशी झाला. अरबी चालीरीतीप्रमाणे ज़ैद ह्यांच्या पत्नी म्हणून त्या पैगंबरांना सुनेप्रमाणे होत्या. पुत्रवधूशी विवाह करणे अरबी चालीरीतींशी विसंगत असल्याने ह्या विवाहावर टीका होऊ लागली. त्यावेळी कुरआनचा अंश

अवतरित केला गेला. ज्यानुसार मानलेला पुत्र, किंवा दत्तक पुत्र ही कल्पना मुसलमानांसाठी निषिद्ध ठरविण्यात आली. श्रद्धाळू मुसलमानांची अशी श्रद्धा आहे की, दत्तक विधानाला निषेध्द ठरविण्याचा इस्लामी कायदा अस्तित्त्वात यावा हे महत्त्वाचे काम ईश्वराने ह्या विवाहाद्वारे घडवून आणले.

ह्या वृत्तीने अतिशय धार्मिक, सत्यवचनी व उदार होत्या. ह्यांच्या मृत्यूनंतर गोरगरीब रडू लागले; कारण ह्यांची सर्व संपत्ती ह्या गरिबांमध्ये वाटून टाकत असत. ह्यांचा संदर्भ असणाऱ्या पैगंबरवचनांची संख्या ११ आहे. मृत्यूसमयी ह्यांचे वय त्रेपन्न वर्षे होते.

**९) ज़ैनब बिंते खूज़ैमा :** (उम्मुल मसाकीन, गरिबांची आई) ह्यांचा जन्म इ.स. ५९४ मध्ये व मृत्यू इ.स. ६२४ मध्ये झाला. ह्यांच्या पित्याचे नाव खुज़ैमा बिन हारिस व मातेचे नाव हिंद बिंते औफ बिन ज़हीर. ह्यांच्या पहिल्या पतीचे नाव अब्दुल्ला इब्ने जहश होते. हे पैगंबरांचे आतेभाऊ होते. उहदच्या युद्धात अतिशय शूरपणे हे लढले. तलवार तुटल्यावर ह्यांना पैगंबरांनी एक खजुराची काठी दिली, जिचा वापर ते तलवारीसारखा करू लागले; पण शेवटी त्यांना हौतात्म्य प्राप्त झाले. कुरैशांनी त्यांच्या देहाची विटंबना केली. अब्दुल्ला इब्ने जहश ह्यांच्या मृत्यूनंतर पैगंबरांनी ह्यांना विवाह–प्रस्ताव पाठविला. हा विवाह इ.स. ६२४ मध्ये झाला व विवाहानंतर दोन अथवा तीनच महिन्यात ह्यांचा मृत्यू झाला. ह्या व हजरत खदिजा ह्या दोनच पत्नींचे मरणोत्तर विधी पैगंबरांच्या हातून घडले.

ह्या अतिशय उदार व कनवाळू असल्याने लोक ह्यांना गरिबांची आई (उम्मुल मसाकीन) म्हणून ओळखत असत.

**१०) मैमुना बिंते हारिस :** ह्यांचा जन्म इ.स. ५७७ व मृत्यू इ.स. ६७१ मध्ये झाला. ह्यांच्या पित्याचे नाव हारिस बिन हज़न व मातेचे नाव हिंद बिंत औफ़ होय.

ह्यांचा पहिला विवाह मसूद बिन उमर ह्यांचेशी झाला होता. काही कारणाने विवाह–विच्छेद घडून आला. ह्यांचा दुसरा विवाह अबू रुहम बिन अब्दुल उझ्झा ह्यांचेशी झाला व त्यांचा मृत्यू इ.स. ६२८ मध्ये झाला. त्याच वर्षी पैगंबर उमरा करण्यासाठी मक्केला गेले असताना त्यांचे चुलते अब्बास ह्यांनी पैगंबरांपुढे विवाह–प्रस्ताव ठेवला, जो पैगंबरांनी मान्य केला. ह्या हजरत अब्बास ह्यांच्या पत्नीच्या बहीण होत. ह्यांचे मूळ नाव बर्रा होय. जे बदलून पैगंबरांनी ह्यांचे नाव मैमुना ठेवले.

ह्या नातेवाईकांशी उत्तम संबंध ठेवण्याबद्दल व त्यांना मदत करण्याबद्दल प्रसिद्ध होत्या. तसेच ह्यांना वाटणारे ईश्वराचे भय उल्लेखनीय समजले जाते. ह्यांचा संदर्भ असणाऱ्या पैगंबर–वचनांची संख्या ४६ आहे. मक्केपासून दहा मैल अंतरावर असणाऱ्या सरफ नावाच्या जागी ह्यांना मृत्यू आला. ह्याच ठिकाणी त्याआधी ४४ वर्षे पैगंबर व ह्यांचे विवाहोत्तर मीलन घडले होते.

**११) हिंद बिंत अबी उमैय्या (उम्मे सलमा) :** ह्यांचा जन्म इ.स. ६०० मध्ये व मृत्यु इ.स. ६८३ मध्ये वयाच्या ८४ व्या वर्षी झाला. ह्यांच्या पित्याचे नाव अबू उमैय्या बिन मुग़िरा होय

व मातेचे नाव आतिका बिंत आमेर.

ह्यांचे पिता अतिशय श्रीमंत व खर्चिक स्वभावाचे होते. ह्यांचा पहिला विवाह, ह्यांचे चुलतभाऊ अबू सलमा बिन अब्दुल असद ह्यांच्याशी झाला होता. हे वृत्तीने अतिशय सरळ व प्रामाणिक होते. ह्यांच्या टोळीचा अत्यंत विरोध असूनही ह्यांनी इस्लामचा स्वीकार केला. ह्यानंतर कधीतरी उम्मे सलमा ह्यांनी इस्लामचा स्वीकार केला. ह्यांच्या पतीचा मृत्यू उहदच्या युद्धात एक विषारी बाण लागून, नंतर ही जखम चिघळल्यामुळे झाला. इस्लाम विरोधकांच्या छळवणुकीमुळे ह्यांना व ह्यांच्या पतीला अतिशय शोकात्म प्रसंगांना तोंड द्यावे लागले. पतीच्या मृत्यूनंतर सुमारे वर्षभराने, पैगंबरांनी विवाह–प्रस्ताव पाठविला व हा विवाह इ.स. ६२५ मध्ये घडून आला. उम्मे सलमा व त्यांच्या प्रथम पतीने केलेला त्याग इस्लामी इतिहासात माणूस इस्लामसाठी करू शकणाऱ्या त्यागाचा एक आदर्श समजला जातो.

ह्या अतिशय उदार होत्या. ह्यांच्या घरातून रिकाम्या हाताने कुणीही कधीही जात नसे. पहिल्या विवाहापासून ह्यांना दोन मुलगे व दोन मुली होत्या. पैगंबरांपासून अपत्य नाही. ह्यांचा संदर्भ दिल्या जाणाऱ्या पैगंबर वचनांची संख्या ३७८ आहे.

**१२) हफ़सा बिंते उमर :** ह्यांचा जन्म इ.स. ६०६ मध्ये व मृत्यू इ.स. ६६५ मध्ये झाला. ह्यांच्या पित्याचे नाव उमर इब्ने ख़त्ताब व मातेचे नाव ज़ैनब बिंते मज़ऊन होय.

ह्यांच्या पहिल्या पतीचे नाव खुनैस बिन हज़ाफा होते. अतिशय सुरुवातीलाच खुनैस ह्यांनी व त्यांच्यामागून हफ़सा ह्यांनी इस्लामचा स्वीकार केला. खुनैस ह्यांचा मृत्यू व उहदच्या युद्धात गंभीर जखमी झाल्यामुळे व नंतरचे इलाज व्यवस्थित न झाल्याने झाला. ह्यांचा विवाह बहुधा इ.स. ६२४ अथवा ६२५ साली पैगंबरांबरोबर झाला.

ह्या स्वभावाने जरा रागीट होत्या. आपला सर्व वेळ त्या ईशसेवेत घालवीत असत व उपवास करीत असत. ह्यांचा संदर्भ दिल्या जाणाऱ्या पैगंबरवचनांची संख्या ६० आहे.

**१३) जुवैरिया बिंते हारिस :** ह्यांचे नाव बर्रा होते. ह्यांचा जन्म इ.स. ६०५ मध्ये व मृत्यू इ.स.६७० मध्ये वयाच्या पासष्टाव्या वर्षी झाला. ह्यांच्या पित्याचे नाव हारिस बिन अबी जरार होते.

कुरैशांच्या चिथावणीमुळे हारिसनी इ.स. ६२६ मध्ये मदिनेवर हल्ला करण्याची तयारी केली. मदिनेत हे वृत्त आल्यावर मुसलमानांच्या फौजेने बनु मुस्तलक़ ह्या टोळीवर हल्ला केला. हारिस पळून गेला. अकरा लोक मारले गेले व सहाशे युद्धकैदी पकडले गेले. ह्यामध्ये जुवैरिया होत्या. तत्कालीन रिवाजानुसार युद्धलुटीमध्ये त्या हजरत साबित बिन क़ैस ह्यांच्या वाट्याला गुलाम म्हणून आल्या. त्यांना कुणाचे तरी गुलाम बनणे पसंत नसल्याने त्यांनी काही रक्कम देऊन साबित ह्यांच्याकडून स्वातंत्र्य मागितले, जे त्यांनी दिले. ह्यानंतर पैगंबरांनी ह्यांच्यासमोर विवाह–प्रस्ताव ठेवला, जो ह्यांनी मान्य केला. ह्या विवाहाच्या खुशीप्रीत्यर्थ मुसलमानांनी त्यांच्या वाट्याला आलेले युद्धकैदी सोडून दिले. हा सर्व प्रसंग कळल्यावर आपली युद्धकैदी म्हणून पकडली गेलेली मुलगी, पैगंबरांची पत्नी बनली आहे. हे कळाल्यावर हारिस ह्यांनी ताबडतोब

इस्लाम स्वीकारला. विवाहानंतर पैगंबरांनी ह्यांचे बर्रा हे नाव बदलून ह्यांचे नाव जुवैरिया ठेवले.

ह्या सतत ईशसेवेत मग्न असत. ह्यांच्यापासून काही पैगंबरवचने उपलब्ध झाली आहेत.

**१४) सफ़िया बिंत हूई :** पैगंबर हारून (आरोन) ह्यांच्या घराण्यातील होत्या. ह्यांच्या पित्याचे नाव हुई बिन अख्तब व मातेचे नाव बर्रा (जर्रा) बिंते समुइल होय. एका परंपरेनुसार सफ़िया ह्यांचे खरे नाव ज़ैनब होते. ह्यांचा जन्म इ.स. ६१० मध्ये व मृत्यू इ.स. ६७० मध्ये वयाच्या साठाव्या वर्षी झाला.

हुई बिन अख्तब हा बनु नज़ीर ह्या ज्यू टोळीचा सरदार होता. पैगंबर हारून ह्यांचा वंशज असल्याने ह्याला फार महत्त्व मिळत होते. सफ़िया ह्यांच्या पहिल्या पतीचे नाव सलाम बिन मुश्कम व दुसऱ्या पतीचे नाव किनाना बिन अबिल हक़ीक़ होते.

खैबरच्या ज्यूंबरोबर इ.स. ६२८ मध्ये मुसलमानांनी युद्ध केले व ह्या युद्धात ह्या युद्धकैदी म्हणून पकडल्या गेल्या. पैगंबरांनी ह्यांना मुक्त करून स्वतंत्र केले व आपल्या घरी परत जावे किंवा त्यांच्याशी विवाह करावा, असा प्रस्ताव ठेवला. सफिया ह्यांनी पैगंबरांशी विवाह करण्याचा प्रस्ताव मान्य केला.

ह्या वृत्तीने अतिशय सौम्य, मृदू, उदार मनाच्या, सुखी समाधानी व संयमी होत्या. पैगंबर स्वतः ह्यांची काळजी घेत असत. ह्यांच्यापासून काही पैगंबरवचने उपलब्ध झाली आहेत.

**१५) ज़ैनब बिंते मुहम्मद :** पैगंबरांची सर्वात मोठी मुलगी. ह्यांच्या आधी पैगंबरांना एक मुलगा झाला होता व तो तान्हेपणी वारला. पैगंबरांचे सगळ्यात मोठे अपत्ये कोणते? ह्याविषयी इतिहासकारांमध्ये वाद आहे. काही इतिहासकारांच्या मते ज़ैनब ह्या सर्व मुलांमध्ये मोठ्या होत. ह्यांच्या माता हजरत खदिजा होत. ह्यांचा जन्म इ.स. ६०० मध्ये व मृत्यू इ.स. ६२९ मध्ये झाला.

ह्यांच्या पतीचे नाव अब्दुल आस रबी लक़ित हे इस्लामचे विरोधक होते. बदरच्या लढाईत ह्यांनी मुसलमानांच्या विरोधात भाग घेतला. पुढे हे युद्धकैदी म्हणून पकडले गेले व तुलनात्मकदृष्ट्या खूप उशिरा ह्यांनी इस्लामचा स्वीकार केला.

ज़ैनब ह्या मदिनेला स्थलांतर करीत असताना कुरैशांपैकी काही दुष्ट लोकांनी त्यांच्यावर हल्ला केला. त्या उंटावरून खाली पडल्या. त्यावेळी त्या गर्भार होत्या. गर्भपात झाला. खूप रक्तस्त्राव झाला. ह्यावेळी झालेल्या रक्तस्त्रावामुळे ह्यांची तब्येत इतकी बिघडली की ती नंतर कधी सावरलीच नाही.

ह्यांना उमामा नावाची मुलगी व अली नावाचा मुलगा होता. ज़ैनब ह्यांच्या मृत्यूनंतर दोन्ही मुलांचा प्रतिपाळ पूर्ण जबाबदारीने पैगंबरांनी केला. हजरत फातिमा ह्यांच्या मृत्यूनंतर हजरत अली ह्यांनी हजरत उमामा ह्यांच्याशी विवाह केला.

**१६) रुक़ैया बिंते मुहम्मद :** जन्म इ.स. ६०३ व मृत्यू इ.स. ६२२ पैगंबरांची दुसरी मुलगी. मातेचे नाव खदिजा.

ह्यांच्या पहिल्या पतीचे नाव उत्बा इब्ने लहब. काही परंपरांनुसार विवाह झाला होता; पण रुक़ैया ह्यांची पतिगृही पाठवणी मात्र झाली नव्हती. अबू लहब इस्लामचा कट्टर दुश्मन

असल्याने व इतर कुरैशांनी चिथावणी दिल्याने उत्बाने ह्यांना घटस्फोट दिला. ह्यानंतर ह्यांचा विवाह हजरत उस्मान ह्यांचेशी झाला. उस्मान ह्यांचेपासून ह्यांना अब्दुल्ला नावाचा मुलगा झाला.

मदिनेला स्थलांतर केल्यावर ह्यांना देवी आल्या व ह्या आजारातच ह्यांचा मृत्यू झाला.

**१७) उम्मे कुलसुम बिंते मोहम्मद :** ह्यांचा जन्म इ.स. ६०४ मध्ये व मृत्यू इ.स. ६३० मध्ये झाला. पैगंबरांची ह्या तिसरी मुलगी. ह्यांच्या माता खदिजा.

ह्यांचा पहिला विवाह अबू लहबचा दुसरा पुत्र उतैबा ह्याच्याबरोबर झाला होता. अबू लहबच्या चिथावणीनुसार उतैबाने ह्यांना घटस्फोट दिला. हा घटस्फोट झाला; त्यावेळी सुदैवाने ह्यांचीसुद्धा पतिगृही पाठवणी झाली नव्हती.

रुक़ैय्या ह्यांच्या मृत्यूनंतर ह्यांचा विवाह हजरत उस्मान ह्यांच्याशी झाला. ह्यांना अपत्य झाले नाही.

**१८) फातिमा बिंत मोहम्मद :** जन्म इ.स. ६०५ व मृत्यू इ.स. ६२२. पैगंबरांची चौथी मुलगी. मातेचे नाव खदिजा.

ह्यांच्या पतीचे नाव हजरत अली, जे पैगंबरांचे चुलतभाऊ होते. (पाहा: अली इब्ने अबू तालिब) हा विवाह इ.स. ६२३ मध्ये झाला. ह्यांना चार अपत्ये झाली. दोन मुलगे, हसन व हुसैन. दोन मुली उम्मे कुलसुम व ज़ैनब.

एका पैगंबरवचनानुसार हजरत फातिमा ह्या स्त्रीत्वाचा आदर्श समजल्या जातात. पैगंबरांच्या सर्व अपत्यांपैकी पैगंबरांच्या मृत्यूसमयी ह्याच फक्त उपस्थित होत्या. कारण त्याच फक्त जिवंत होत्या. पैगंबरांच्या मृत्यूनंतर इ.स. ६३२ मध्ये ह्यांचा मृत्यू झाला.

**१९) कासिम इब्ने मुहम्मद :** जन्म इ.स. ५९९. पैगंबरांचे पहिले अपत्य. माता, खदिजा. ह्यांचा फार लहानपणी मृत्यू झाला. ह्यांच्या नावावरून पैगंबरांची कुनियत अबुल कासिम पडली.

**२०) अब्दुल्ला इब्ने मुहम्मद :** जन्म इ.स. ६११ आणि मृत्यू इ.स. ६१३. हजरत खदिजा ह्यांच्यापासून झालेला दुसरा पुत्र. ह्या मुलाचीच दुसरे नाव तैयब व ताहेर आहेत असे समजले जाते, पहिले पुत्र कासिम ह्यांचेविषयी ज्याप्रमाणे खात्रीशीर माहिती मिळते, तशी माहिती ह्यांचे बाबत मिळत नाही. ह्यांचाही मृत्यू फार लहानपणी झाला.

**२१) इब्राहीम इब्ने मुहम्मद :** पैगंबरांचे हजरत खदिजांव्यतिरिक्त दुसऱ्या पत्नीपासून झालेले एकमेव अपत्य. जन्म इ.स. ६२९. पैगंबरी मिळाल्यानंतर झालेला एकमेव पुत्र. ह्यांच्या जन्मप्रसंगी मदिनेत खूप आनंदोत्सव करण्यात आला.

हा मुलगा दीड वर्षाचा (सोळा महिन्याचा) असताना ह्याचा मृत्यू झाला. ह्याच्या मृत्यूनंतर पैगंबरांना फार दुःख झाले. दुसऱ्या कुठल्याही सामान्य बापाप्रमाणेच ते रडू लागले व नंतरही त्यांना मधून मधून मुलाची आठवण येई व ते दुःख व्यक्त करीत राहात.

**२२) अबू बकर इब्ने अबू क़हाफ़ा (अशरे मुबश्शिरा) :** जन्म इ.स.५७२, मृत्यू इ.स.२३ ऑगस्ट ६३४. पित्याचे नाव अबू क़हाफ़ा व मातेचे नाव सलमा उम्मुल खैर.

वडिलांचे नाव उस्मान होते व कुनियत अबू क़हाफ़ा होती. अबू बकर ह्यांचे नाव अब्दल्ला होते व कुनियत अबू बकर होती. पैगंबरांनंतर इस्लामचा प्रचारक व प्रसारक म्हणून ह्यांचे स्थान प्रथम होय. इस्लामसाठी आपली सर्व संपत्ती खर्च केली. हिजरत करीत असताना पैगंबरांचे साथीदार. कुरआनने ज्या मोजक्या सहाबांचा उल्लेख केला आहे त्यापैकी एक. कुरआन, ह्यांचा उल्लेख सानी असनैन म्हणून करते.

पैगंबरांनंतर पहिले स्वतंत्र (गुलाम नसलेले) पुरुष मुसलमान. पहिल्या चार मुसलमानांपैकी एक. हजरत आयेशा, ह्या ह्यांच्या कन्या. ह्या नात्याने हे पैगंबरांचे सासरे. मक्केतील मुसलमान व कुरैश लोकांनी, नेहमीच ह्यांचे नेतृत्व मान्य केले. पैगंबरांच्या नंतर सर्व सम्मतीने पहिले खलिफा म्हणून निवड झाली.

खलिफा म्हणून ह्यांनी केलेल्या महत्त्वाच्या कामांपैकी सर्वात महत्त्वाचे काम म्हणजे पैगंबरांच्या मृत्यूनंतर संपूर्ण अरेबियाभर इस्लामत्यागाची लाट उसळली, त्या लाटेचा यशस्वी मुकाबला. स्वतःनंतरचा वारसा म्हणून ह्यांनी उमर ह्यांचे नाव सुचविले.

ह्यांनी चार विवाह केले. ह्यांना तीन मुलगे व तीन मुली झाल्या. सव्वादोन वर्षांच्या खिलाफतीच्या काळानंतर ह्यांचा मृत्यू झाला. ह्यांना सानी असनैन म्हणून ओळखले जाते.

**२३) उमर इब्ने ख़त्ताब (अशरे मुबश्शिरा) :** जन्म इ.स. ५८२, मृत्यू इ.स. ६४४. पित्याचे नाव ख़त्ताब बिन नुफैल होते व मातेचे नाव हंतमा बिंते हिश्शाम बिन मुघीरा. ख़त्ताब हे बनू अदि टोळीचे सदस्य होते. ह्यांच्या माता ह्या मकज़ूम टोळीमधील होत्या.

इ.स. ६१५ मध्ये ह्यांनी इस्लामचा स्वीकार केला. त्या आधीच्या काळात हे इस्लामचे कट्टर दुष्मन होते. ह्यांच्या घराण्यामध्ये मक्केचा परराष्ट्र–व्यवहार, न्यायसंस्थेसंबंधीची कामे, असे व्यवसाय होते. अशा व्यवसायांसाठी आवश्यक असणारा मुत्सद्दीपणा, चातुर्य, वक्तृत्व ह्या गुणांचे बाळकडू ह्यांना लहानपणापासून वडिलांकडून मिळाले होते. ह्यांची शरीरसंपदा, उंची विशेष असल्याने लोकांच्या एखाद्या गटात ह्यांचे व्यक्तिमत्त्व उठून दिसत असे.

लष्करी विद्या, घोडेस्वारी, कुस्ती ह्या गुणांबरोबरच लेखन, वाचन व वक्तृत्व ह्या कलांमध्ये सुद्धा हे निपून होते. तसेच वंशावळी पाठ करून ठेवण्याची कलासुद्धा ह्यांना अवगत होती. ह्यांच्या आयुष्यातील रोमांचकारी प्रसंगांची यादी बनविण्यासाठी एखादी पुस्तिका लिहावी लागेल.

इस्लाम स्वीकारल्यावर इस्लामच्या संरक्षणाची धुरा स्वतःच्या खांद्यावर घेणारे बिनीचे शिलेदार. ह्यांच्या सर्वगुणसंपन्नतेचा विचार करू लागल्यास, इस्लामच्या इतिहासातले एक विलक्षण उत्तुंग व्यक्तिमत्व म्हणून ह्यांना का ओळखले जाते, ते थोडेफार कळू शकते. एखाद्या राज्यव्यवस्थेला आवश्यक असणाऱ्या न्यायव्यवस्था, महसूल–व्यवस्था, शिक्षण–व्यवस्था कायदा व सुव्यवस्था राखण्यासाठी पोलीस खाते, अशी स्वतंत्र खाती निर्माण करून ह्यांनी राज्य व्यवस्था सुरळीत व सुस्थापित बनवली. ह्यांनी अनेक विवाह केले. ह्यांना नऊ मुलगे व चार मुली होत्या. ह्यांची खिलाफत १० वर्षे व काही महिने चालू राहिली. ह्यांना 'फारुक़े आज़म' म्हणून

ओळखले जाते.

**२४) उस्मान बिन अफ़्फ़ान (अशरे मुबश्शिरा) :** जन्म इ.स. ५७६, मृत्यू इ.स. ६५६. ह्यांच्या पित्याचे नाव अफ़्फ़ान बिन अबुल आस व मातेचे नाव अर्वा बिंते करेझ होय. अफ़्फ़ान, कुरैशांच्या उमय्या घराण्यातील होते, ह्यांच्या आजी (वडिलांची आई) अब्दुल मुत्तालिब ह्यांच्या कन्या होत.

हे कापडाचे व्यापारी होते. मक्केतील एक अतिशय मोठे व्यापारी होते. ह्या व्यापारासाठी हे अनेक वेळा सिरियामध्ये जाऊन आले होते. हे इतके दयाळू होते की, स्वतःच्या संपत्तीला, गरिबांची मदत करण्याचे साधन समजत असत. इस्लाम स्वीकारणाऱ्या पहिल्या काही मुसलमानांपैकी एक.

पैगंबरांची कन्या रुक़ैय्या ह्यांचे पती. रुक़ैय्या ह्यांच्या मृत्यूनंतर पैगंबरांच्या दुसऱ्या कन्या उम्मे कुलसुम ह्यांच्याशी विवाह झाला. ह्या दोन विवाहांमुळे ह्यांना 'ज़ुन्नुरैन' (दोन प्रकाश राखणारा) ही पदवी मिळाली. आपले घर व सर्व संपत्ती सोडून ॲबिसीनियाला स्थलांतर करणारे पहिले मुसलमान. बदरचे युद्ध सोडून पैगंबरांबरोबर बाकीच्या सर्व युद्धांमधून भाग घेतला. हुदायबिय्याच्या तहाच्या वेळी वाटाघाटींमध्ये ह्यांनी महत्त्वाचा भाग घेतला. मदिनेत 'पैगंबर मशिद' बांधण्यासाठी ह्यांनी जमीन खरीदली. २०,००० दीनार भरून ह्यांनी एका ज्यूकडून मुसलमानांसाठी विहरी विकत घेतली होती. कुरआन अवतरित होत असताना, लिहिण्याचे काम हे करीत असत.

ह्यांच्या खिलाफतीच्या काळात (इ.स. ६४४ ते इ.स.६५५) उत्तर आफ्रिका मुसलमानांनी जिंकून घेतला. इराणसुद्धा ह्यांच्या काळात जिंकला गेला. ह्यांनी नौदलाची स्थापना केली. ह्यांच्या उत्तरायुष्यात मुसलमानांमध्ये आपापसात भांडणे सुरू झाली व कायदा व सुव्यवस्थेची परिस्थिती ढासळू लागली. विद्वानांच्या मते ह्या गोष्टीसाठी ह्यांना सर्वस्वी जबाबदार धरले जाऊ शकत नाही. ह्यांनी आठ विवाह केले. ह्यांना एकूण पंधरा अपत्ये होती. ह्यांच्या खिलाफतीच्या काळात कुरआन संहितेचे प्रमाणीकरण केले जाऊन कुरआनाच्या अधिकृत प्रती निर्माण केल्या गेल्या.

**२५) अली इब्ने अबू तालिब (अशरे मुबश्शिरा) :** जन्म इ.स. ५९९, मृत्यू इ.स. ६६१. ह्यांच्या पित्याचे नाव अबू तालिब बिन अब्दुल मुत्तालिब व मातेचे नाव फातेमा बिंते असद बिन हाशिम हे होय. अबू तालिब ह्यांच्या मृत्यूनंतर ह्यांचा प्रतिपाळ पैगंबरांनी स्वतःच्या मुलाप्रमाणे केला.

पैगंबरांना पैगंबरी मिळाल्यानंतर अगदी सुरुवातीलाच ह्यांनी इस्लाम स्वीकारला. तबुकचे युद्ध सोडून पैगंबरांबरोबरच्या सर्व युद्धात ह्यांनी भाग घेतला. हे जबरदस्त योद्धा म्हणून प्रसिद्ध होते. बदरच्या युद्धातला ह्यांचा पराक्रम फार मोठा होता.

पैगंबरांची कन्या फातिमा ह्यांच्याशी विवाह केल्यामुळे, ह्या नात्याने पैगंबरांचे जावई होत. हजरत उस्मान ह्यांच्या मृत्यूनंतर तीन दिवस मदिनेतील परिस्थिती विलक्षण गोंधळाची

होती. मुसलमान आपापसात लढत होते किंवा लढाई टाळण्यासाठी घरांमध्ये बसून होते किंवा मदिना सोडून जात होते. अशा अत्यंत गोंधळाच्या परिस्थितीत, हे खलिफा बनले. (जून इ.स. ६५६) ह्यांची खिलाफत चार वर्षे नऊ महिने राहिली.

हे अंगापिंडाने मजबूत व मध्यम उंचीचे होते. हे ईशसेवेत, धर्मयुद्धात व मुसलमानांच्या कल्याणाच्या कामात अग्रभागी असत.

ह्यांनी खूप विवाह केले व ह्यांना ह्या विवाहांपासून खूप अपत्ये झाली. हजरत फातिमा ह्यांच्यापासून ह्यांना तीन पुत्र झाले. हसन, हुसैन व मोहसीन. मोहसीन ह्यांचा मृत्यू ते फार लहान असताना झाला. अली ह्यांचा मृत्यू इ.स. ६६१ मध्ये झाला. ह्यांना 'फातेह खैबर' म्हणून ओळखले जाते.

**२६) अबू उबैदा अल् जर्राह (अशरे मुबश्शिरा) :** जन्म इ.स. ५८०, मृत्यू इ.स. ६३८.

हजरत अबू बकर ह्यांच्या प्रयत्नांमुळे हे मुसलमान बनले. अगदी सुरुवातीच्या काळात जे मुसलमान बनले त्यापैकी एक. पैगंबरांबरोबर जवळ जवळ सर्व युद्धांमधून ह्यांनी भाग घेतला. बदरच्या युद्धात कुरैशांकडून ह्यांचे वडील युद्धात सामील झाले होते. अबू उबैदा वडिलांना टाळत होते. वडील मात्र स्वतःच्या मुलाला खिजवत सारखे त्यांच्यासमोर येऊन उभे राहात होते. इस्लामप्रेमामुळे वडिलांविषयीच्या प्रेमाने टिकव धरला नाही व पित्याला पुत्राच्या हातून मृत्यू आला! उहदच्या युद्धात ह्यांनी पैगंबरांचे सर्व शक्तीनिशी रक्षण केले. ह्याच युद्धात पैगंबरांच्या जबड्यात अडकलेल्या शिरस्त्राणाच्या लोखंडी साखळ्या उपटून काढण्याचे काम ह्यांनी केले. हे काम तर यशस्वी झाले; पण काम करीत असताना अबू उबैदांचे दोन दात निखळून बाहेर पडले. ह्यांच्या कर्तृत्वामुळे लोक ह्यांना 'अमीनुल उम्मत' (प्रजेचा रक्षक व पालक) म्हणून ओळखू लागले.

पैगंबरांच्या मृत्यूनंतर अबू बकर ह्यांना खलिफा म्हणून निवडताना ह्यांची भूमिका मोठी व महत्त्वाची राहिली. पैगंबरांच्या मृत्यूनंतर मोठमोठ्या मोहिमांची जबाबदारी ह्यांच्यावर आली. सिरिया, इजिप्त, जेरुसलेम ह्यांच्या नेतृत्वाखाली सर झाले. पुढे हे सिरियाचे शासक बनल्यावर प्लेगच्या एका साथीमध्ये ह्यांचा वयाच्या अठ्ठावन्नाव्या वर्षी मृत्यू झाला.

**२७) अब्दुल रहेमान बिन औफ़ (अशरे मुबश्शिरा) :** जन्म इ.स. ५७६, मृत्यू इ.स. ६५१. पित्याचे नाव औफ़ बिन अब्दे मनाफ़ व मातेचे नाव शीफा बिंते औफ़.

इस्लाम स्वीकारणाऱ्यांमध्ये ह्यांचा क्रमांक तेरावा होता. कुरैशांच्या छळाला कंटाळून ॲबिसिनियाला जे मुसलमान स्थलांतरित झाले, त्यांमध्ये हे होते. ह्यांचा व्यवसाय व्यापाराचा होता. मदिनेला जे स्थलांतर झाले त्यामध्येही हे होते. हजरत उमर ह्यांच्या खिलाफतीनंतर ज्यांची नावे खिलाफतीसाठी सुचविण्यात आली; त्या सहा लोकांपैकी एक. पैगंबर हयात असताना ज्यांना धार्मिक निवाड्याचा अधिकार होता, अशा मोजक्या इस्लाम पंडितांपैकी एक.

ह्यांची चौदा लग्ने झाली. ह्यांना एकोणीस मुलगे व आठ मुली झाल्या. तत्कालीन

काळातले एक अतिशय श्रीमंत गृहस्थ. ह्यांनी आपली अमाप संपत्ती इस्लाम सेवार्थ व गरीब मुसलमानांना मदत म्हणून खर्च केली. ह्यांना 'दूमतुल जंदलचा योद्धा' म्हणून ओळखले जाते.

**२८) ज़ुबैर बिन अल अव्वाम (अशरे मुबश्शिरा) :** जन्म इ.स. ५९२, मृत्यू इ.स. ६५६. पित्याचे नाव अल् अव्वाम व मातेचे नाव सफ़िया बिंते अब्दुल मुत्तालिब होय.

पैगंबरांवर ज्यावेळी बहिष्कार टाकण्यात आला त्यावेळी हे बनु हाशीमबरोबर शीब अबी तालिब (अबू तालिब घळ) मध्ये राहात असत. ह्यांचा विवाह अबू बकर ह्यांची जेष्ठ कन्या अस्मा बिंते अबू बकर ह्यांच्याशी झाला होता; ह्या नात्याने हे, पैगंबरांचे साडू होत.

बदरच्या युद्धात मुसलमानांचे फक्त दोन घोडेस्वार होते, त्या दोघांपैकी एक. बदरच्या युद्धात हे इतक्या शूरपणे लढले की, बदरच्या युद्धाच्या दिवसाला 'ज़ुबैरचा दिवस' म्हणून ओळखले जाते. ह्यांच्या शरीराला युद्धांमध्ये जखमा होऊन, त्यामध्ये चक्क खड्डे पडले होते. ज्या खड्ड्यांशी ह्यांची मुले खेळत असत. ह्यांना अस्मांपासून अब्दुल्ला व उर्वा नावाचे दोन पुत्र होते. हे दोघेसुद्धा नौजवान इस्लामी नायक म्हणून इस्लामी इतिहासात प्रसिद्धीस आले. ह्यांचे सहा विवाह झाले. ह्यांना अकरा मुलगे व नऊ मुली होत्या. ह्यांच्यापासून ३८ पैगंबरवचने उपलब्ध झाली आहेत. ह्यांना 'हव्वारी रसूल' म्हणून ओळखले जाते.

**२९) तल्हा बिन उबैदुल्ला (अशरे मुबश्शिरा) :** जन्म इ.स. ५९५, मृत्यू इ.स. ६५६. ह्यांच्या पित्याचे नाव उबैदुल्ला बिन उस्मान व मातेचे नाव साआबा बिंते अब्दुल्ला.

ह्यांचा व्यवसाय व्यापाराचा होता व व्यापारासाठी हे सिरिया, येमेन व इराकमध्ये जात असत. इस्लाम स्वीकारणाऱ्या पहिल्या आठ लोकांमध्ये समावेश होतो. उहदच्या युद्धात ह्यांनी इतका पराक्रम केला की, लोक ह्यांना 'साहेबे उहद' (उहदचा वीर, उहदचा योद्धा) म्हणून ओळखत असत. पैगंबरी, पैगंबरांना प्राप्त व्हायच्या आधी लेखन-वाचनाची कला, कुरैशांपैकी फक्त सतरा लोकांना येत असे. अशा सतरा लोकांपैकी एक.

ह्यांना वक्तृत्वकला अवगत होती व तत्कालीन अरेबियातील एक उत्तम वक्ता म्हणून ओळखले जात. बदरचे युद्ध सोडून पैगंबरांबरोबरच्या सर्व युद्धात हे सामील होते. ह्यांना 'ज़िंदा शहीद' (जिवंत हुतात्मा) म्हणून ओळखले जात असे. ह्यांच्यापासून ३८ पैगंबरवचने उपलब्ध झाली आहेत.

**३०) सईद बिंन ज़ैद (अब्दुल अउर, अशरे मुबश्शिरा) :** जन्म इ.स. ५९१, मृत्यू इ.स. ६७१. ह्यांच्या पित्याचे नाव ज़ैद बिन अम्र व मातेचे नाव फातेमा बिंते बाआज़ा होय.

बदरच्या युद्धात हे प्रत्यक्ष युद्धभूमीवर सहभागी नव्हते. पैगंबरांच्या नेतृत्वाखाली झालेल्या बाकी सर्व युद्धांमध्ये ह्यांनी भाग घेतला. हे हजरत उमर ह्यांचे चुलतभाऊ व हजरत उमर ह्यांच्या बहिणीचे पती म्हणून ह्या नात्याने उमर ह्यांचे मेव्हणेसुद्धा होते. हजरत उमर ह्यांनी इस्लाम स्वीकारायचा निर्णय ह्यांच्या घरातच घेतला. ह्यांचे पिता ज़ैद बिन अम्र हे एकेश्वरी धर्माचे पुरस्कर्ते होते.

उर्वरित अरब ज्यावेळी जन्माला आलेल्या मुलींना जिवंत गाडत असत, त्यावेळी हे,

त्या मुलींना मागून घेत असत. अशा मुलींचा प्रतिपाळ करून, ते त्यांचे लग्नसुद्धा करून देत असत. इस्लाम येण्याआधीपासून ते, हे, अतिशय महत्त्वाचे काम करीत असत.

ह्यांना भरपूर मुले व मुली होत्या. हे प्रसिद्धी पराङ·मुख असल्याने इस्लामच्या इतिहासात ह्यांची फार कमी माहिती मिळते.

**३१) साद बिन अबी वक़्क़ास (कुनियत–अबू इसाक़, अशरे मुबश्शिरा) :** जन्म इ.स. ५९१, मृत्यू इ.स. ६७१. पित्याचे नाव अबी वक़्क़ास बिन मालिक व मातेचे नाव हम्ना बिंते सूफ़यान बिन उमय्या होय.

इस्लामी इतिहासातील एक अतिशय महत्त्वाची व्यक्ती. ह्यांचे वडील अबू वक़्क़ास हे पैगंबरांच्या आईचे चुलतभाऊ होत. ह्या नात्याने साद हे पैगंबरांचे मामेभाऊ होत. पैगंबर प्रेमाने कधी–कधी ह्या आपल्या मामेभावाला, मामा अशीच हाक मारीत असत.

ह्यांनी पैगंबरांबरोबर बदर, उहद, एहज़ाब, खैबर, मक्केवरील विजय, हुनैन, ताएफ व तबुक ह्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या लढायांमधून भाग घेतला. ह्यांनी पहिल्या चार खलिफांच्या खिलाफतीचा काळ पाहिला. अबु बकर व उमर या दोन्ही खलिफांच्या काळात हवाज़िन टोळींच्या प्रदेशाचे सुभेदार म्हणून काम केले. ह्यांची तब्येत पुढे खालावली व नजर गेली. ह्यांना अठरा मुलगे व अठरा मुली होत्या. ह्यांच्यापासून मिळणाऱ्या पैगंबर वचनांची संख्या २१५ आहे.

पैगंबरांच्या मृत्यूनंतर हजरत उमर ह्यांच्या काळात ह्यांनी इराक जिंकण्याच्या मोहिमेचे नेतृत्व केले. इराक हा अरब प्रदेश त्याकाळी इराण्यांच्या ताब्यात होता. ह्यांना 'शहसवारे इस्लाम' म्हणून ओळखले जाते.

**३२) अबू सूफ़्यान बिन हर्ब :** जन्म इ.स. ५६५ आणि मृत्यू इ.स. ६४०. पित्याचे नाव हर्ब बिन उमय्या. मातेचे नाव सफ़ीया बिंते हज़न. हजरत उमर ह्यांच्या काळात मृत्यू. हे व पैगंबर जवळ–जवळ एकाच वयाचे होते. दोघांचाही प्रतिपाळ एकाच कुटुंबात झाला. हे पैगंबरांचे दूरच्या नात्यातले चुलत भाऊ होते. हे दोघे दूधभाऊसुद्धा होते.

पैगंबरी मिळण्याच्या आधीपर्यंत हे पैगंबरांचे खूप जवळचे मित्र होते; नंतर मात्र मैत्री शत्रुत्वात रुपांतरित झाली. हे शत्रुत्व वीस वर्षांपर्यंत चालू राहिले. मक्केच्या विजयाआधी एक–दोन दिवस इस्लाम स्वीकारला. इस्लामच्या स्वीकारानंतर मात्र एका अतिशय धार्मिक मुसलमानाचे आयुष्य जगले.

**३३) अबू हुरैरा :** ह्यांचे खरे नाव अब्दुर रहेमान बिन सख़र. जन्म इ.स. ६०२. मृत्यू इ.स. ६७८.

हे एका येमेनी टोळीतील कुटुंबामधील होते. ह्यांच्या टोळीतील तुफ़ैल बिन अम्र ह्यांनी इस्लाम स्वीकारल्यानंतर हे इस्लामच्या संदेशाने इतके प्रभावित झाले की, त्यांनी इस्लाम स्वीकारला. पैगंबरांना स्वतः बघण्याची इच्छा तीव्र असल्याने, हे सर्व लोक मदिनेला आले. पैगंबर त्यावेळी खैबरला गेले असल्याने, ह्या सर्व लोकांनी खैबरला जाऊन पैगंबरांची भेट घेतली.

ह्यांचे मातृप्रेम तीव्र होते; पण आई मात्र इस्लाम स्वीकारायला तयार नव्हती. ह्यांनी पैगंबरांना, आईने इस्लाम स्वीकारावा म्हणून ईश्वराकडे प्रार्थना करण्यासाठी विनविले. पैगंबरांनी तसे केल्यावर, त्याच दिवशी ह्यांच्या आईने इस्लाम स्वीकारला, ज्यायोगे ह्यांना अतिशय समाधान झाले.

पैगंबर व ह्यांचा प्रत्यक्ष सहवास फक्त चार वर्षांचाच होता. तरीही पैगंबर-वचनांच्या शास्त्राचे हे एक अधिकारी समजले जातात. ह्यांच्यापासून अक्षरशः हजारो पैगंबर-वचने उपलब्ध झाली आहेत. पैगंबरांची पाठ न सोडणे व तीव्र स्मरणशक्ती ही ह्याची कारणे असावीत.

एका अत्यंत गरीब घरातून आलेला, साध्या राहाणीचा हा माणूस हजरत उमर ह्यांच्या काळात बहारिनचा सुभेदार बनला. ह्यांच्या आयुष्याचा शेवटचा काळ ह्यांनी मदिनेत शांतपणे शैक्षणिक कार्य करण्यात घालविला.

**३४) अब्बास बिन अब्दुल मुत्तालिब :** जन्म इ.स. ५६५, मृत्यू इ.स. ६५३. पित्याचे नाव अब्दुल मुत्तालिब बिन हाशीम. मातेचे नाव नातीला बिंते जनाब.

हे पैगंबरांचे चुलते, जवळ-जवळ पैगंबरांच्याच वयाचे होते. चुलत्याचे पुतण्यावर मित्रवत प्रेम होते. पैगंबरी प्राप्त झाल्यावर सुद्धा सुमारे पंधरा वर्षे मुसलमान बनले नव्हते. तरीसुद्धा, पुतण्या म्हणून जी मदत पैगंबरांना करायची, ती मदत हे करीत असत. पैगंबर ज्यावेळी यात्रेच्या वेळी येणाऱ्या निरनिराळ्या टोळ्यांच्या प्रमुखांना इस्लामचा संदेश सांगत फिरत असत; त्यावेळी सोबत म्हणून चलण्याविषयी पैगंबर ह्याच काकांना विनंती करीत असत. बदरच्या युद्धात मुसलमानांच्या विरोधात लढताना, हे युद्धकैदी म्हणून पकडले गेले. मक्केमध्ये ह्यांनी स्वतःच्या पत्नीजवळ खूप संपत्ती दडवून ठेवली होती, जी गोष्ट फक्त ह्यांना व ह्यांच्या पत्नीलाच ठाऊक होती. पैगंबरांनी ज्यावेळी कैदीपणातून सुटका करण्यासाठी मोठ्या रक्कमेची मागणी केली, त्यावेळी जवळ पैसे नसल्याचे ह्यांनी सांगितले. पैगंबरांनी, ह्यांनी पत्नीजवळ ठेवलेल्या संपत्तीचा उल्लेख करताच, ह्यांचा पैगंबरांच्या प्रेषितत्वावर विश्वास बसला व ह्यांनी इस्लाम स्वीकारला.

घरातील जबाबदार व्यक्ती म्हणून, पैगंबरांना, घरगुती कामांमध्ये ह्यांचा खूप उपयोग होत असे. पैगंबरांच्या मृत्यूनंतर, त्यांच्या क्रियाकर्माची देखरेख ह्यांनीच केली. हे व्याजाने पैसे देण्याचा व्यवसायसुद्धा करीत असत. इस्लामने सावकारी पद्धतीने व्याज निषिद्ध ठरविल्यावर सर्वात जास्त नुकसान ह्यांचेच झाले. मृत्युसमयी ह्यांचे वय ८८ होते.

**३५) अब्दुल्ला बिन मसूद :** जन्म इ.स. ५९४, मृत्यु इ.स. ६५२. पित्याचे नाव मसूद इब्ने ग़ाफिल व मातेचे नाव उम्मे अब्द.

बनु हुज़ैल ह्या गरीब टोळीचे सदस्य. इस्लाम स्वीकारल्यावर हे पैगंबरांचे जणू कुटुंबीय असल्यासारखे त्यांच्या घरात वावरू लागेल. ह्यांना पैगंबरांची सेवा करण्याची भरपूर संधी प्राप्त झाली व ह्या संधीचा लाभ उठवीत, पुढे हे कुरआन व पैगंबर वचनांबाबत निरपवाद विद्वान समजले जाऊ लागले. कुरैशांना प्रकटपणे मोठ्या आवाजात कुरआन म्हणून दाखविण्याबाबत ह्यांचा क्रमांक पैगंबरांनंतर दुसरा आहे. पैगंबरांच्या हयातीमध्ये कुरआनचे विद्वान म्हणवून

घेण्याचा सन्मान ज्या चार लोकांना लाभला त्यापैकी एक. ह्यांनी पैगंबरांनंतर मदिनेला स्थलांतर केले ह्या स्थलांतराच्या खूप आधी ह्यांनी ॲबिसिनियाला स्थलांतर केले होते.

बदरच्या युद्धात ह्यांनीच अबू जहल, ह्या इस्लामच्या कट्टर दुश्मनाला ठार मारले. पैगंबरांना हे कळाल्यावर, ते स्वतः अबू जहलच्या मृतदेहाजवळ गेले व त्यांनी अबू जहलची तलवार अब्दुल्ला ह्यांच्या स्वाधीन केली.

पैगंबरांच्या मृत्यूनंतर, इराकमधील एक फार मोठे शहर, कूफामध्ये ह्यांची नेमणूक सुभेदार म्हणून करण्यात आली. कुफामध्ये ह्यांनी ज्या विद्यालयाची स्थापना केली, ते पुढे जागतिक कीर्तीचे ज्ञानोपासनेचे केंद्र बनले. आयुष्यातला सर्वात शेवटचा कालखंड ह्यांनी मदिनेत व्यतीत केला.

**३६) इक्रिमा बिन अबी जहल :** जन्म इ.स. ५९८ व मृत्यू इ.स. ६३६. पित्याचे नाव अबू जहल बिन हिश्शाम. मातेचे नाव उम्मे मुजालिद.

हे मकज़ूम टोळीचे सदस्य होते. वडिलांप्रमाणेच हे सुद्धा इस्लामचे कट्टर दुश्मन होते. उहदच्या युद्धात ह्यांनी मुसलमानांचे खूप नुकसान केले. मक्केवरील विजयानंतर ज्या मोजक्या सतरा जणांना मृत्यूदंड सुनावण्यात आला होता, त्यामधील एक. ह्यांच्या पत्नी उम्मे हकीम ह्यांनी, ह्यांच्या वतीने माफी मागितली, जी दिली गेली.

इस्लाम स्वीकारल्यानंतर मात्र हे इस्लामच्या शूर वीरांपैकी एक म्हणून प्रसिद्धीस आले. यार्मुकच्या लढाईत ह्यांना मृत्यू आला.

**३७) बिलाल बिन रिबाह :** जन्म इ.स. ५८१, मृत्यू इ.स. ६४१ पित्याचे नाव रिबाह. मातेचे नाव हमामा होय.

हे एका गुलामाचे पुत्र व स्वतःसुद्धा गुलाम. उमय्या इब्ने ख़लफ, ह्या कट्टर इस्लाम विरोधकाचे गुलाम असल्याने, ह्यांना अपरिमित छळ सोसावा लागला. हे ॲबिसिनियातील कृष्णवर्णीय होते.

एक दिवस भर दुपारी वाळवंटात उघड्या अंगाने ह्यांना झोपविण्यात आले होते. अबू बकर ह्यांना हा छळ पाहविला नाही. उमय्याने मागितलेल्या किंमतीला अबू बकर ह्यांनी बिलालना विकत घेऊन मुक्त केले. पैगंबरांना ह्याचा फार आनंद झाला.

पुढे पैगंबरांच्या इच्छेनुसार, ह्यांचा विवाह अबू बकर ह्यांच्या मुलीशी झाला. व बिलाल ह्या नात्याने पैगंबरांचे साडू झाले. निग्रो (कृष्णवर्णीय) व गुलाम लोकांकडे पाहाण्याचा पैगंबरांचा दृष्टिकोन काय होता हे, ह्या घटनेवरून उत्तम समजते.

नमाज़ाची वेळ झाली आहे, हे सांगण्यासाठी जी अज़ान दिली जाते, ती देण्याचे काम पैगंबरांनी ह्यांच्यावर सोपविले होते, हे पहिले मोअज़्ज़न (अज़ान देणारा).

जेरुसलेम जिंकून घेण्याच्या मोहिमेत हे सामील होते. पुढे हे, सिरियात स्थायिक झाले. ह्यांना अपत्य झाले नाही.

**३८) खालिद बिन वलीद :** जन्म इ.स.५९३, मृत्यू इ.स. ६४३. पित्याचे नाव वलीद व

मातेचे नाव लबाबा. कुरैशांच्या बनु मकज़ूम टोळीचे सदस्य.

खालिद ह्यांची आत्या, मैमुना ह्या पैगंबरांच्या पत्नी होत्या. हजरत उमर, हे ह्यांचे चुलतभाऊ होते. खालिद ह्यांचे, वडील वलिद हे अतिशय श्रीमंत व फार प्रभावशाली व्यक्तिमत्त्व होते. त्यांनी इस्लाम स्वीकारावा, अशी पैगंबरांची फार इच्छा होती. कारण त्यामधून शेकडो लोकांनी इस्लाम स्वीकारला असता. घरची अतिशय श्रीमंती होती व युद्धकला शिकून पारंगत होणे, हे खालिद ह्यांचे उद्दिष्ट होत. अश्वयुद्ध, तलवारयुद्ध व धनुर्विद्या ह्या तीन कलांमध्ये खालिद निष्णात होते.

सुरुवातीला खालिद इस्लामचे कट्टर विरोधक होते. उहदच्या युद्धात मुसलमानांचा पराभव खालिदमुळे झाला. मुसलमान सैन्यातील त्रुटी हेरून, खालिदनी हल्ला चढविल्याने, मुसलमान हे युद्ध हरले. हुदाय्‌बिय्याच्या तहापर्यंत सर्व युद्धे, हे मुसलमानांच्या विरोधात लढले. ह्या तहानंतर मात्र इस्लामने ह्यांच्या हृदय काबीज केले व ह्यांनी इस्लाम स्वीकारला. पैगंबरांनी, ह्यांना सैफुल्ला' (ईश्वराची तलवार) अशी पदवी दिली. खालिद ह्यांचे लष्करी सेवेचे गुण इस्लामच्या प्रगतीसाठी, ह्यापुढे कायम वापरण्यात आले. पैगंबरांच्या मृत्यूनंतर इस्लाम विरोधी लाट, जी संपूर्ण अरेबियामध्ये पसरली; तिचा नायनाट करण्यात, हे अग्रस्थानी होते. ह्यांचा मृत्यू सिरियामध्ये हिम्स इथे झाला.

**३९) अन्सार :** मदत करणारे. ज्यावेळी मक्केतील मुर्तिपूजकांचा दहा वर्षांपासून चाललेला छळ असहनीय झाला होता, त्यावेळी पैगंबर व त्यांच्या सहकाऱ्यांनी मक्केहून मदिनेला स्थलांतर केले. अशा कठिण काळात पैगंबर व त्यांच्या साथीदारांना आश्रय देणारे आणि त्यांची सर्व प्रकारे मदत करणारे मदिनेतील नवमुस्लिम. या त्यांच्या अभुतपूर्व कार्यामुळे ते इतिहासात अन्सार (मदत करणारे) म्हणून ओळखले गेले.

**४०) काबागृह :** काबा म्हणजे चौरस, ही वास्तू अल् – मस्जिद अल् – हरम (पवित्र मस्जिद) च्या मधोमध स्थित आहे. इस्लाममध्ये हा सर्वात पवित्र स्थळ मानला जातो. ही पवित्र मस्जिद सौदी अरेबियाच्या मक्का शहरात स्थित आहे. मक्का हा सौदी अरेबियाच्या चौथ्या क्रमांकाचा शहर आहे. हा शहर हिजाज प्रांतात आहे. काबागृहाला अल्–काबा–अल्–मुशर्रफ (पवित्र काबा) सुद्धा म्हणतात. काबागृहाला बैतुल्लाह (ईश्वराचे घर) असे पण म्हणतात. नमाज पढण्यासाठी संपूर्ण जगभरातील मुस्लिम याचा किबला (प्रार्थनेची दिशा) म्हणून उपयोग करतात. पैगंबर अब्राहम आणि त्यांचे पुत्र पैगंबर इस्माईल ह्यांनी सुमारे ३५०० वर्षांपूर्वी याला बांधले होते. हज व उमराच्या विधींमधील सर्वात महत्वाची विधी तवाफ (घड्याळाच्या विरूद्ध दिशेने काबागृहाच्या सभोवती सात वेळा प्रदक्षिणा घालणे) याच्या भोवती केली जाते.

# परिशिष्ट – २

सोबत पैगंबरकालीन अरेबियाचा, नकाशा दिला आहे. मुद्दामच तत्कालीन गावांची व शहरांची, तसेच प्रदेशांची नावे, तीच ठेवली आहेत. व्यापारी अरब, शेकडो कि.मी. चा प्रवास खुष्कीच्या मार्गाने व्यापारासाठी करत असत. ह्या अरबी तांड्यांच्या वाटचालीत आशिया खंडाचा केवढा मोठा भाग ते फिरत असत, हे स्पष्ट व्हावे हा प्रधान उद्देश आहे. तसेच पुस्तकातील स्थलनामे वाचकाला नकाशात सापडावीत असाही उद्देश आहेच.

## *सद्यकालीन अरबी द्वीपकल्प*

# *अरबी गावे आणि टोळ्या, पैगंबरांच्या जन्मकालीन (इ.स. ५७०)*

# परिशिष्ट - ३

## संदर्भ व वाचनीय ग्रंथ

**संदर्भ ग्रंथ :**

खालील ग्रंथ परिशिष्ट १ लिहिताना, संदर्भासाठी वापरण्यात आले.

१) तज़्कारे साहबियात

२) आस्माने हिदायत के सत्तर सितारे

३) रहमते दारैन के सौ शैदाई

४) सरवरे कायनात के पचास सहाबा

५) ख़ैरुल बशर के चालीस जाँनिसार

६) शम्मे हिदायत के तीस परवाने

वरील १) ते ६) ह्या सर्व पुस्तकांचे लेखक श्री. तालिब हाशमी होत.

७) अशरे मुबश्शिरा श्री. साजिद रशीद.

वरील सातही पुस्तके उर्दु भाषेतील आहेत.

८) The Family of the Holy Prophet
-by S. M. Madani
Adam Publishers & Distributors,
K-E/26, Saket, New Delhi - 110 017.

९) Heroes of Islam Series
Taj Company, 3151, Turkman Gate,
Delhi - 110 006.

**वाचनीय ग्रंथ :**

१०) Muhammad : His life based upon the earliest
Sources - by Martin Lings

११) Muhammad : Rasulullah.
- by Syed Abul Hasan Ali Nadwi

१२) The Holy Quran : English translation of the meanings and commentary.

- by Abdullah Yusuf Ali

King Fahd Holy Quran Printing Complex P.O. Box 3561 Al-Madinah Al-Munawarah

१३) कुरआन : मराठी अनुवाद

–मौलाना वहीदुद्दीन खान

Goodword Books, 1, Nizamuddin West Market,
New Delhi - 110013
Mob.: +91 85888 22672
www.goodwordbooks.com
www.cpsglobal.org

१४) Mohammad : A Biography of the Prophet

-by Karen Armstrong

१५) Mohammad : A Prophet for our Time

-by Karen Armstrong

१६) The Life of Prophet Mohammad (SAW)

-by Imam Ibn Kathir

१७) The Prophet Mohammad :

A Simple Guide to His Life
By Maulana Wahiduddin Khan
Goodword Books, New Delhi.

१८) पैगंम्बर – ए – इस्लाम

एक आदर्श चरित्र

– मौलाना वहीदुद्दीन खान

Goodword Books, New Delhi.

१९) पैगंम्बरे इस्लाम हजरत मुहम्मद (स.) का जीवन

– मौलाना वहीदुद्दीन खान

Goodword Books, New Delhi.

(१३,१७,१८,१९ क्रमांकाची पुस्तके www.cpsglobal.org या संकेतस्थळावरून मोफत डाऊनलोड करता येईल.)

# THE QURAN

Available in different languages. Easy to understand

Buy Online / Order Free Quran / Download / Be a Quran Distributor
www.goodwordbooks.com / www.j.mp/freequran4all

# Achievements of Maulana Wahiduddin Khan

# मौलाना वहीदुद्दीन खान यांच्या इंग्रजी पुस्तकांचे मराठी भाषांतर

मराठी पुस्तके खालील पत्त्यावर मिळतील.


**अब्दुस समद खलिल अहेमद**

१०५०, रविवार पेठ, पुणे - ४११००२

फोन नं. : 020-24472830 मोबा. नं.: 9665059035